१३. जेव्हां वृत्राला आणि तुझ्या अशनीला [तूं आपल्या] वज्राच्या योगानें एकमेकांशीं झुंजविता झालास [तेव्हां] हे इंद्रा, [त्या] अहीला मारतांना तुझें बळ द्युलोकीं सर्वत्र व्यापून गेलें. आणि [तेणेंकरून तूं] आपलें आधिपत्य प्रगट करिता झालास.

१४. हे वज्रधरा, तुझ्या गर्जनेबरोबर जें कांहीं स्थावर आणि [जें कांहीं] जंगम [होय] तें [सर्व] कांपत असतें. हे इंद्रा, तुझ्या क्रोधाला भिऊन त्वष्टा सुद्धा थरथर कांपतो. आणि [या प्रकारेंकरून तूं] आपलें आधिपत्य प्रगट करितोस.

13. When thou didst by means of the thunderbolt cause Vritra and thy lightning to fight together, thy strength, O Indra, spread itself throughout Heaven as thou didst proceed to slay the Serpent, [thou] [thereby] manifesting thy empire.

14. At thy roaring, O Thunderer, [that] which stands and [that] which moves, trembles. At the dread of thy rage Tvashṭâ himself trembles and trembles, [thou] [thereby] manifesting thy empire.

टीप पहा.) इंद्राप्रमाणें वृत्र वृष्टि करितो, आणि त्याप्रमाणेंच तो गर्जना करितो.

चवथा आणि पांचवा हे चरण खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटले पाहिजेतः—

सहस्रं भृष्टिरायत ।
अर्चन्ननु स्वराजिअम् ।

१३. 'हे इंद्रा, तूं जेव्हां आपल्या वज्राच्या योगानें वृत्राचें आणि वीजेचें युद्ध लाविलेंस आणि वृत्राला मारावयाला लागलास, तेव्हां तुझें प्रचंड सामर्थ्य सकळ द्युलोकभर पसरलें आणि तेणेंकरून तुझें पूर्ण आधिपत्य या जगतावर आहे असें प्रगट झालें.'

'तुझ्या अशनीला'=' तव अशनिम्'. साधारण संस्कृतांत 'अशनि' आणि 'वज्र' यांचा अर्थ एकच होतो, आणि ऋग्वेदांत कितीएक मंत्रांत 'अशनि' म्हणजे वज्र असाच अर्थ होतो; पण प्रस्तुत मंत्रांत 'वज्र' आणि 'अशनि' हे शब्द वेगवेगळ्या अर्थाचे आहेत. अशनि म्हणजे येथें वीज (वैद्युतः अग्निः) असा अर्थ आहे. वज्र म्हणजे जरी वस्तुतः वीजच आहे तरी तें इंद्राचें प्रसिद्ध आयुध होवून [illegible] स्थापित होऊन

**नहि नु याद॑धीमसीन्द्रं को वी॒र्या॑ प॒रः ।**
**तस्मि॑न्नृम्णमु॒त क्रतुं॑ दे॒वा ओजां॑सि॒ सं द॑धु॒रर्च॒न्ननु॑ स्व॒राज्य॑म् ॥ १५**

न॒हि । नु । यात् । अ॒धि॒ऽइ॒मसि॑ । इन्द्र॑म् । कः । वी॒र्या॑ । प॒रः ।
तस्मि॑न् । नृ॒म्णम् । उ॒त । क्रतु॑म् । दे॒वाः । ओजां॑सि । सम् । द॒धुः ।
अर्च॑न् । अनु॑ । स्व॒ऽराज्य॑म् ॥ १५ ॥

## भाषायाम्.

१५. यात् ( =यावत् ) [ इन्द्रम् अधीमसि तात्=तावत् ] इन्द्रं नहि नु अधीमसि ( =यावद् वयम् इन्द्रं जानीमः तावन्नैव तं जानीमः=यत् किमपि इन्द्रविषये अस्माकं ज्ञानं भवति तस्माल्पीयस्त्वाद् वयम् इन्द्रं नैव जानीम इति स्पष्टम् ) । को [ हि ] [ इन्द्रस्य ] वीर्या परः ( =वीर्याणि परस्तात्=वीर्येभ्यः परस्तात् इन्द्रस्य वीर्येभ्योपि महान्ति वीर्याणि ) [ अध्येति=जानीते ] ? तस्मिन् [ हि ] देवा नृम्णं ( =सामर्थ्यम् ) उत ( =अपि च ) क्रतुं ( =प्रज्ञाम् ) [ उत ] ओजांसि ( =बलानि) सं दधुः ( =संगृह्य स्थापयामासुः ) । [ एवं सः ] अनु स्वराज्यम् अर्चन् [ भवति ] ( =स्वस्याधिपत्यं प्रकटयति ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । यत् किमपि वयमिन्द्रविषये जानीमस्तस्मात्यल्पत्वात् वयमिन्द्रं नैव जानीम इति वक्तव्यम् । को वा इन्द्रं जानीयात् ? तस्य हि वीर्यकर्माणि अनुत्तमानि, तेभ्यः श्रेष्ठानि कोपि न जानीते । तस्मिंश्च सर्वे देवा शौर्यं प्रज्ञां बलानि च समस्तानि स्थापयामासुरिति कृत्वा स महान्ति वीर्यकर्माणि करोति तेषां च महीयस्त्वात् अल्पमतयो वयं तं न जानीम इति संबन्धः ॥

गेलें आहे, अशनिशब्दाविषयीं तसा प्रकार झालेला नाहीं. इतकाच भेद दिसतो.

‘अहोला’=‘अहिम्.’ म्हणजे वृत्रच.

या ऋचेंत ह्रस्वदीर्घांचा व्यत्यय वृत्तसंबंधानें नाहीं, आणि आधुनिक काळीं या वृत्तावर श्लोक केल्यास जसा नीट म्हणतां येईल तसाच हा मंत्र म्हणतां येतो.

१४. ‘हे इंद्रा, तूं वृत्राला मारतांना जी आपल्या वज्राच्या योगानें भयंकर गर्जना करितोस, तिला भिऊन स्थावरजंगम सर्व त्रैलोक्य कांपत असतें इतकेंच नाहीं, तर तुझें भयंकर वज्र ज्याणें निर्माण केलें तो त्वष्टा देवच स्वतः तुझ्या वज्राच्या गर्जनेला आणि तुझ्या क्रोधाला भिऊन थरथर कांपत असतो. या प्रकारेंकरून तुझें आधिपत्य सर्वत्र आहे असें तूं दाखवीत असतोस.’

इंद्राचें जें अतिभयंकर आणि प्रबळ

१५. आम्हांस किती झालें तरी इंद्राविषयीं ज्ञान होत नाहीं. [ त्याच्या ] पराक्रमापेक्षां मोठे [ पराक्रम ] कोणास ठाऊक आहेत ? त्याच्या ठायीं देवांनीं सामर्थ्य, आणि प्रज्ञा [ आणि ] प्रभाव हीं एकवट स्थापिलीं आहेत. आणि [ तेणेंकरून तो ] आपलें आधिपत्य प्रगट करितो.

15. As far [as we know] we do not know Indra. Who [ knows deeds ] above [ his ] deeds ? In him the Gods have placed together prowess and intelligence [and ] [ all ] powers, [ he thereby ] manifesting his empire.

वज्र तें त्वष्टा देव याणें करून दिलें असें वेदांत सांगितलें आहे. त्वष्टा देव हा देवांचा विश्वकर्मा म्हणजे सुतार होय. सू. ३२, मं. २ याजवरील आमची टीप पहा.

१५. 'इंद्राविषयीं आम्हीं स्तोत्रें गातों तथापि त्याचें खरें ज्ञान आम्हांस नाहीं. आणि आम्ही त्याविषयीं जाणत नाहीं यांत आश्चर्य नाहीं; कारण त्याच्या कृत्यांच्या पेक्षां मोठीं अशीं कृत्यें कोणीहि केलेलीं कोणासहि ठाऊक नाहींत. आणि हीं कृत्यें सर्वश्रेष्ठ असावींत यांत नवल नाहीं, कारण कीं सर्व देवांनीं मिळून शौर्य, प्रज्ञा आणि सामर्थ्य हीं सर्व गोळा करून जणुं एकट्या ह्या इंद्राच्या आंगीं स्थापन केलीं आहेत. तेणेंकरून तो आपलें आधिपत्य सर्वत्र आहे असें प्रगट करून दाखवितो.'

यांत इंद्राविषयीं आम्हांस खरें ज्ञान होत नाहीं असें ऋषि म्हणतो त्याजकडेस लक्ष्य द्यावें. कारण आपले आर्य पूर्वज आणि त्यांचे ऋषि (=कवि) हे केवळ त्रिकालज्ञ आणि सर्वज्ञ होते असें आम्ही आग्रह धरून हट्टानें समजतों तसें तेच स्वतः समजत नव्हते असें यावरून दिसून येईल. इंद्राचीं पराक्रमकृत्येंहि कोणास समजत नाहींत, मग त्याचें शौर्य, त्याची प्रज्ञा आणि शक्ति यांचें ज्ञान कोणास होईल? अशी कवीची विवक्षा आहे.

दुसऱ्या चरणांत ' वीरिआ परः' असें वृत्तासाठीं म्हटलें पाहिजे.

**यामथर्वा मनुष्पिता दध्यङ् धियमत्नत ।**
**तस्मिन्ब्रह्माणि पूर्वथेन्द्र उक्था समग्मतार्चन्ननु स्वराज्यम् ॥**
**१६ ॥ ३१ ॥ ५ ॥**

याम् । अथर्वा । मनुः । पिता । दध्यङ् । धियम् । अत्नत ।
तस्मिन् । ब्रह्माणि । पूर्वऽथा । इन्द्रे । उक्था । सम् । अग्मत । अर्चन् ।
अनु । स्वऽराज्यम् ॥ १६ ॥ ३१ ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

१६. यां धियं (=यस्मिन्निन्द्रे) अथर्वा (=एतन्नामक ऋषिः) मनुः पिता (=सकलानां प्रजानां पितृभूतः प्रजापतिः) [तथा] दध्यङ् (=एतन्नामक ऋषिश्च) अत्नत (=अकुर्वन्), तस्मिन् इन्द्रे पूर्वथा (=पूर्वकाले यथा तथा) ब्रह्माणि (=अस्माभिः प्रत्तानि हविरन्नानि) उक्था (=उक्थानि=स्तोत्राणि) [च] सम् अग्मत (=संगच्छन्ते=इन्द्रेण सह संगतानि सन्ति)। [एवं सः] अनु स्वराज्यम् अर्चन् [भवति] (=स्वस्याधिपत्यं प्रकटयति) ॥

अयं भावः। यस्मा इन्द्राय सकलप्रजानां पिता मनुः यस्मै च अथर्वा तथा दध्यङ् इत्येते हविरन्नानि स्तोत्राणि च पुरा काले प्रार्पयन्, तस्मा इन्द्राय तथैव इदानीमस्माभिः प्रत्तानि हविरन्नानि स्तोत्राणि च अनेन प्रकारेण इन्द्रं प्रति गतानीति ॥

१६. ज्या [इंद्रा]प्रीत्यर्थ अथर्वा [आणि] पिता मनु [आणि] दध्यङ् [हे] उपासना करिते झाले, त्या इंद्राप्रत पूर्वींच्या काळाप्रमाणें [हीं आमचीं] हविरन्नें [आणि] स्तोत्रें अर्पण केलीं आहेत. [या प्रकारेंकरून तो] आपलें आधिपत्य प्रगट करीत असतो.

16. To Indra to whom Atharvâ, Father Manu [and] Dadhyach offered worship, to Him our offerings [and] hymns have [thus] approached as in ancient times, he [thus] manifesting his empire.

१६. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. ऋषि म्हणतो, 'या प्रकारेंकरून आम्हीं इंद्राला हविरन्नें आणि स्तोत्रें अर्पण केलीं आहेत आणि तीं पुरातन काळचे जे अथर्वा, मनुप्रजापति आणि दध्यङ् इत्यादि उपासक हे जशी उपासना करीत त्याप्रमाणें अर्पण केलीं आहेत. या प्रकारेंकरून इंद्र आपलें स्वाधिपत्य सर्वत्र आहे असें उघड करून दाखवितो.'

'अथर्वा,' 'पिता मनु' आणि 'दध्यङ्' हे अतिपुरातन काळचे पहिले उपासक होत. पिता मनु म्हणजे सकळ मनुष्यांचा बाप जो प्रजापति अथवा मनुष्यांचा आदिपुरुष तो. याजविषयीं सू. ३६, मं. १९ आणि त्याजवरील टीप पहा. अथर्वा हाहि अतिप्राचीन आपला एक पूर्वज आहे. त्याणें अग्नीची उपासना प्रथम स्थापन केली आणि यज्ञ करण्याचा प्रचार घातला असें सांगितलें आहे. जसें: 'अथर्वा प्रथम यज्ञांनीं देवोपासनेचे मार्ग रचिता झाला' (=यज्ञैरथर्वा प्रथमं पथस्तते ऋ. १. ८३. ५); 'हे अग्नी, तुला अथर्वा [प्रथम] पुष्कराच्या झाडांतून मंथून उत्पन्न करिता झाला' (=त्वामग्ने पुष्करादधि अथर्वा निरमन्थत ६. १६. १३); 'प्रथम अथर्वा यज्ञांच्या योगानें देवांला उपास्य करिता झाला' (=यज्ञैरथर्वा प्रथमो वि धारयत् १०. ९२. १०); 'अंगिरस, नवग्व, अथर्ववंशांतील पुरुष आणि भृगु हे आमचे पितर म्हणजे पूर्वज होत' (=अङ्गिरसो नः पितरो नवग्वा अथर्वाणो भृगवः सोम्यासः १०. १४. ६). ऋ. १०. २१. ५ यांत अग्नीला 'जातो अथर्वणा' म्हणजे अथर्वा याणें प्रथम उत्पन्न केलेला असें विशेषण लाविलें आहे. याशिवाय अथर्वा याजविषयीं आणखी कांहीं वेदांत आढळत नाहीं. 'दध्यङ्' हा अथर्वा या ऋषीचा पुत्र असें वेदांत सांगितलें आहे (ऋ. ६. १६. १४). आणि अंगिरा, प्रियमेध, कण्व, अत्रि, मनु इत्यादिक जे अतिप्राचीन म्हणजे यज्ञ करण्याचा आणि अग्नीची उपासना करण्याचा प्रचार पाडणारे ऋषि, त्यांत याचें

## सूक्तम् ८१.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । इन्द्रो देवता । पङ्क्तिश्छन्दः ।

**इन्द्रो मदाय वावृधे शवसे वृत्रहा नृभिः ।**

**तमिन्महत्स्वाजिषूतेमर्भे हवामहे स वाजेषु प्र नोऽविषत् ॥ १ ॥**

इन्द्रः । मदाय । ववृधे । शवसे । वृत्रऽहा । नृऽभिः ।

तम् । इत् । महत्ऽसु । आजिषु । उत । ईम् । अर्भे । हवामहे । सः ।

वाजेषु । प्र । नः । अविषत् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. इन्द्रः नृभिः (=मनुष्यैः) मदाय (=हर्षार्थं) शवसे (=बलाय) [च] वृत्रहा वावृधे (=वृद्धो भूत्वा वृत्रं यथा हन्यात्तथा प्रवर्धितोभूत्) तम् इत् (=तमेव) महत्सु आजिषु (=प्रभूतेषु युद्धेषु) उत (=अपि च) अर्भे (=अल्पे) [युद्धे] [वयं] हवामहे (=अस्माकं संरक्षणाय आह्वयामहे)। स [इन्द्रो] वाजेषु (=संग्रामेषु) नः प्राविषत् (=अस्मान् प्रकर्षेण रक्षतु) ॥

इन्द्रो यथा मत्तो भूत्वा बलवांश्च भूत्वा वृत्रं हन्यात्तथा तं स्तोत्रादिभिर्मनुष्याः प्रवर्धितवन्त इति भावः । "स्तुत्या हि देवता प्राप्तबला सती प्रवर्धते" इति सायणपादाः ।

---

नांव येतें. ऋ. १. १३९. ९ आणि ६. १६. १४ पहा. याशिवाय दुसरा विशेष इतिहास वेदांत या दध्यङ् ऋषीविषयीं सांगितलेला नाहीं. मात्र ब्राह्मणांत त्याजविषयीं तो प्राचीन असल्यामुळें कांहीं कथा सांपडते. त्यांतून सायणांनीं ऋ. १. ११६. १२ या मंत्रावरील भाष्यांत दिलेली कथा आम्हीं खालीं उतरून घेतोंः—"इंद्रानें दध्यङ् ऋषीला प्रवर्ग्यविद्या ( सोम सिद्ध करण्याची विद्या ) आणि मधुविद्या अशा दोन विद्या शिकविल्या आणि म्हणाला, ह्या कोणाला तूं शिकवूं नकोस, शिकविशील तर तुझा शिरश्छेद करीन. मग अश्वी देवांनीं दध्यङ् ऋषीचें शिर तोडून त्या धडावर एका घोड्याचें शिर जोडिलें, आणि दध्यङ् ऋषीचें शिर लपवून ठेविलें. आणि नंतर दध्यङ् ऋषीनें अश्वींस ऋग्, साम, यजुः, प्रवर्ग्यविद्या आणि मधुविद्या हीं शिकविलीं. तें पाहून इंद्रानें दध्यङ् याचें शिर तोडिलें. तेव्हां अश्वींनीं दध्यङ् ऋषीचें जें खरें मानवी शिर तें त्याला पुनः लाविलें."

प्रस्तुत मंत्राचा भावार्थ इतकाच आहे कीं, मनुष्य जातीचे आदिपुरुष आणि आद्य ऋषि जे अथर्वा, मनु आणि दध्यङ् इत्यादि पुरुष ते जशी इंद्राची उपासना करीत तशी आम्हींहि आज केली आहे, ती त्याला मान्य होओ.

## सूक्त ८१.

ऋषि—रहूगणाचा पुत्र **गोतम.** देवता—इन्द्र. वृत्त—पङ्क्ति.

१. इंद्राला हर्ष व्हावा [आणि] बळ यावें [ आणि ] त्याणें वृत्रहनन करावें म्हणून त्याला मनुष्यांनीं वाढविलें आहे. त्यालाच मोठ्या युद्धांत आणि त्याला लहान युद्धांत [आम्ही] हाक मारीत असतों. तो संग्रामांत आम्हांला रक्षो.

## HYMN 81.

To *Indra*. By *Gotama*, son of *Rahûgaṇa*. Metre—*Pankti*.

1. Indra has been glorified by men that he may be exhilarated and be strong and become the killer of Vṛitra. It is him we invoke in battles great, him in battle small. May he protect us in fights.

---

१. 'इंद्राची स्तुति गाऊन इंद्राला मनुष्यांनीं मोठा केला आहे आणि त्यामुळें तो हृष्ट आणि प्रबळ होऊन वृत्राला मारण्यास समर्थ झाला. तो प्रबळ असल्यामुळें त्यालाच आपण लहानमोठ्या संग्रामांत हाक मारून आमचें रक्षण करण्यास बोलावितों. तर तो सकळ संग्रामांत आम्हाला रक्षो. '

' त्याला मनुष्यांनीं वाढविलें आहे '= ' वावृधे नृभिः.' स्तोत्रें म्हणून वाढविला असें तात्पर्य. स्तोत्र देवतेला अर्पण केलें म्हणजे तिची शक्ति वाढते आणि तिला पाहिजे ते अनेक पराक्रम करण्याची शक्ति येते असें वैदिक ऋषींचें हृद्ग अनेक वेळ पूर्वी आम्हीं दाखविलें आहे. याच मंत्रावरचें सायणभाष्य पहा.

वृत्तसुखासाठीं तिसरा आणि चवथा चरण खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटले पाहिजेतः—

तमिन्महत्सु आजिषु ।
उतेमर्भे हवामहे ।

असि हि वीर सेन्योऽसि भूरि परादादिः ।
असि दभ्रस्य चिद्वृधो यजमानाय शिक्षसि सुन्वते भूरि ते वसु॥२
असि । हि । वीर । सेन्यः । असि । भूरि । पराऽददिः ।
असि । दभ्रस्य । चित् । वृधः । यजमानाय । शिक्षसि । सुन्वते ।
भूरि । ते । वसु ॥ २ ॥
यदुदीरत आजयो धृष्णवे धीयते धना ।
युक्ष्वा मदच्युता हरी कं हनः कं वसौ दधोऽस्माँ इन्द्र वसौ दधः
॥ ३ ॥
यत् । उत्ऽईरते । आजयः । धृष्णवे । धीयते । धना ।
युक्ष्व । मदऽच्युता । हरी इति । कम् । हनः । कम् । वसौ । दधः ।
अस्मान् । इन्द्र । वसौ । दधः ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. हि (=यस्मात् कारणात्) हे वीर, [त्वं] सेन्योसि (=सेनार्हो भवसि=एकः सन्नपि प्रभूतया सेनया समानशौर्यो भवसि)। [त्वं] भूरि परादादिः असि (=प्रभूतं शत्रुजातं पराभविता=प्रभूतानां शत्रूणां पराभविता भवसि)। [त्वं] दभ्रस्य चित् (=अल्पीयसोप्युपासकस्य) वृधोसि (=वर्धको भवसि)। ते सुन्वते (=त्वदर्थं सोममभिषुण्वते) यजमानाय (=उपासकाय)। [त्वं] भूरि वसु (=प्रभूतं धनं) शिक्षसि (=अनुशास्सि=शत्रुभ्यो हत्वा तवोपासकवशं गमयसि)॥

३. यद् (=यदा) आजयः उदीरते (=संग्रामा उत्पद्यन्ते) [तदा] [त्वया] धृष्णवे धना धीयते (=जेत्रे धनानि धीयन्ते=दीयन्ते=पराजितस्य धनानि पराजेतुर्वशमानीयन्ते)। मदच्युता हरी (=मदच्युतौ हरी) (="शत्रूणां मदस्य च्यावयितारौ" तवाश्वौ=सामर्थ्येनोन्मत्तौ तवाश्वौ) युक्ष्व (=रथे योजय=त्वं हे इन्द्र योजयसि)। [एवं कृते सति] [त्वं] कं हनः (=कंचन हंसि) कं वसौ दधः (=कंचन धने स्थापयसि=कस्मैचन शत्रुहतानि धनानि ददासि)। [एवं सति] हे इन्द्र, अस्मान् वसौ दधः (=अस्मानेव वसुनि स्थापय=अस्मभ्यमेव धनं देहि अन्यस्मै मा देहि)॥

२. कारण कीं हे वीरा [इंद्रा], [तूं] [एकटा] [सगळ्या एका] सेनेंप्रमाणें आहेस, [तूं] [शत्रूंचा] मोठा पराभविता आहेस. [तूं] क्षुद्र उपासकाचा सुद्धा जय करविणारा होस. तुजकरितां सोम काढणाऱ्या यजमानाच्या हस्तगत तूं पुष्कळ संपत्ति करून देतोस.

2. Thou art, O Hero, a match for an army, thou art a great subjugator; thou art a promoter of even an humble worshipper. For the sacrificer that presseth the Soma for thee, thou winnest much wealth.

३. जेव्हां युद्धप्रसंग येतात [तेव्हां] जिंकणाऱ्याला [तुझ्या द्वारें] धन प्राप्त होतें. [तूं] [आपले] आवेशोन्मत्त दोनहि घोडे रथाला जोड. [तूं] युद्धांत कोणा एकाला मारशील, कोणा एकाला संपत्ति प्राप्त करून देशील. [तर] हे इंद्रा, [तूं] आम्हांलाच संपत्ति प्राप्त करून दे.

3. When battles ensue, spoils are given to the victor. Harness thy pair of proud tawny horses: some one thou slayest, to some one thou givest the spoil. To our lot, O Indra, mayest thou assign the spoil.

---

२. लहानमोठ्या सर्व युद्धांत इंद्रालाच आम्ही हाक मारून बोलावीत असतों म्हणून पूर्व मंत्रांत सांगितलें, त्याचें कारण या मंत्रांत सांगतो. ऋषि म्हणतोः— 'कारण कीं हे इंद्रा, तूं एकला कोणास साहाय्य करूं लागलास तर एका सगळ्या सेनेचें साहाय्य मिळाल्याप्रमाणें होतें, तूं सगळ्या एका सैन्यासारिखा आहेस. तूं शत्रूंला तुझ्या भजकांच्या स्वाधीन करून देण्याविषयीं परम प्रबळ आहेस. तूं यःकश्चित् उपासकालाहि विजयी करून मोठा करणारा आहेस. जो उपासक सोम सिद्ध करून तुला भजतो त्याच्या स्वाधीन शत्रूचें पुष्कळ धन होई असें तूं करितोस.'

ही सर्व ऋचा युद्धसंबंधाची आहे. इंद्र हा एका सेनेसमान आहे, तो पुष्कळ शत्रूंचा पराभव करितो, क्षुद्र उपासकाचाहि मोठ्या शत्रूबरोबर लढत असतां तो जय करविणारा होय, आणि सोम अर्पण करणाऱ्या यजमानाच्या हातीं शत्रूचें सर्व धन पडे असें तो करणारा होय असें ऋषि म्हणतो. यावरून आपले आर्य पूर्वज युद्धाविषयीं किती तत्पर आणि

**क्रत्वा महाँ अनुष्वधं भीम आ वावृधे शवः ।**
**श्रिय ऋष्व उपाकयोर्नि शिप्री हरिवान्दधे हस्तयोर्वज्रमायसम् ॥४**

क्रत्वा । महान् । अनुऽस्वधम् । भीमः । आ । ववृधे । शवः ।
श्रिये । ऋष्वः । उपाकयोः । नि । शिप्री । हरिऽवान् । दधे । हस्तयोः । वज्रम् । आयसम् ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. अनुष्वधं (=स्वधामनु=बलमनुसृत्य) क्रत्वा महान् (=प्रज्ञया महान्=बलेन यथा महान् तथा प्रज्ञयापि महान्) भीमः (=भयंकर) [इन्द्रः] शवः (=स्वस्य पराक्रमम्) आ ववृधे (=प्रत्यहं प्रवर्धयति)। ऋष्वः (=उत्तुङ्गः) शिप्री (=शोभनहनूयुक्तः=सुन्दरः) हरिवान् (=हरिनामकाश्वोपेत) इन्द्र आयसं वज्रम् (=अयोमयं स्वकीयं वज्रम्) उपाकयोर्हस्तयोः (=परस्परं समीपवर्तिनोः=निबिडयोर्हस्तयोः) श्रिये नि दधे (=शोभायै स्थापयति=यथा शोभेत तथा स्थापयति)॥

उत्सुक असत आणि युद्धप्रसंगाच्या संबंधानें आपल्या उपास्य देवतांला कसे भजत तें समजून येतें.

'पराभविता आहेस'=' असि भूरि परादादिः.' 'हस्तगत करून देतोस'= 'शिक्षसि.' या अर्थाविषयीं ऋ. ६. २७. ७; १०. ९९. ९; आणि ८. २. १५ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तानुरोधेंकरून 'असि हि वीर सेनिअः' असा चवथा चरण वाचला पाहिजे.

३. ही ऋचा सुद्धा युद्धाच्याच संबंधाची आहे. भावार्थ असा आहे कीं, 'हे इंद्रा, संग्रामप्रसंग येऊन युद्ध होऊं लागलें म्हणजे तूं उदासीन असत नाहींस, तर आपले मदोन्मत्त पिवळे घोडे रथाला जोडून युद्धाच्या स्थळीं जाऊन तुझ्या मनाला येईल त्या एका पक्षाला साहाय्य करून त्याचा जय करवितोस, आणि शत्रूला मारून त्याचें धन विजयीला देववितोस. तर तूं साहाय्य करणें तें आम्हांलाच करून आमच्या शत्रूंला मारून त्यांचें धन आम्हांस मिळे असें कर.' ह्या ऋचेवरून मानवी प्राणी जें काय करितील त्याविषयीं देव उदासीन नाहींत तर त्याविषयीं जें काय घडतें तें देवच घडवून आणितात अशी आपल्या आर्य पूर्वजांची भक्ति दिसून येते.

'आवेशोन्मत्त'=' मदच्युता.' म्हणजे शत्रूला जिंकण्याविषयींच्या सामर्थ्यानें परिपूर्ण असल्यामुळें आंगांत आवेश येऊन त्यामुळें गुंग झालेले असे. सू. ५१, मं. २ याजवरील टीप पहा.

४. जसा बळानें तसा प्रज्ञेनेंहि मोठा [जो] भयानक इंद्र [तो] [प्रतिदिनीं] आपला पराक्रम वाढवीत असतो. प्रगल्भ [आणि] सुमुख [आणि] पीताश्व इन्द्र [आपलें] लोहमय वज्र [आपल्या] निबिड खांद्यांवर सुंदर रीतीनें धारण करितो.

4. Great in wisdom as in might, formidable [Indra] augments his exploits. Handsome [and] lofty Indra, the master of the tawny pair of horses, puts his iron thunderbolt beautifully on his bulky shoulders.

'जोड'=' युक्ष्व.' म्हणजे जोडीत असतोस. रीतिभूत, भूत, रीतिवर्तमान, वर्तमान, रीतिभविष्य आणि भविष्य या काळांच्या स्थळीं आज्ञार्थी क्रियापदाचा प्रयोग जसा इतर भाषांत होतो तसा छांदस संस्कृतांतहि पुष्कळ होतो.

'आम्हांलाच'=' अस्मान्.' ह्यांत जो 'च' आम्हीं घातला आहे तो 'अस्मान्' हें पद पादारंभीं कवीनें मुद्दाम घातलें आहे त्याच्या स्थलापासून गम्यमान आहे.

वृत्तानुरोधानें 'अस्मान्' यांतील अ-चा लोप होऊं न देतां 'अस्माँ इन्द्रवसौ दधः' असा पंचम पाद म्हटला पाहिजे.

४. 'इंद्र जसा बळानें मोठा आहे तसाच प्रज्ञेनेंहि मोठा आहे. तो आपले पराक्रम नित्य अधिक अधिक करीत असतो. तो उंच, आणि सुंदर आहे आणि आपलें लोहमय वज्र आपल्या मांसल खांद्यांवर घेतो तेव्हां तें फार शोभतें, आणि असा सिद्ध झालेला जो इंद्र त्याला त्याचे पीतवर्ण अश्व रथांत घालून वाहून नेतात.' याप्रमाणें युद्धास तयार झालेल्या इंद्राचें वर्णन यांत आहे.

'जसा बळानें तसा'=' अनुष्वधम्.' अक्षरशः अर्थ 'बळाप्रमाणें', 'बळाला अनुसरून.' 'स्वधा' शब्दाचा 'बळ' हा अर्थ वेदांत प्रसिद्ध आहे.

आ पप्रौ पार्थिवं रजो बद्बधे रोचना दिवि ।
न त्वावाँ इन्द्र कश्चन न जातो न जनिष्यतेऽति विश्वं ववक्षिथ॥
॥ ५ ॥ १ ॥

आ । पप्रौ । पार्थिवम् । रजः । बद्बधे । रोचना । दिवि ।
न । त्वाऽवान् । इन्द्र । कः । चन । न । जातः । न । जनिष्यते ।
अति । विश्वम् । ववक्षिथ ॥ ५ ॥ १ ॥

यो अर्यो मर्तभोजनं परादाति दाशुषे ।
इन्द्रो अस्मभ्यं शिक्षतु वि भजा भूरि ते वसु भक्षीय तव राधसः॥
॥ ६ ॥

यः । अर्यः । मर्तऽभोजनम् । पराऽददाति । दाशुषे ।
इन्द्रः । अस्मभ्यम् । शिक्षतु । वि । भज । भूरि । ते । वसु । भक्षीय।
तव । राधसः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. [इन्द्रः] [स्वमहिम्ना] पार्थिवं (=पृथिवीसंबन्धि सकलमपि स्थलं) [तथा] रजः (=अन्तरिक्षम्) आ पप्रौ (=परिपूरितवान्) [स] दिवि (=द्युलोके) रोचना (रोचमानानि=नक्षत्राणि) बद्बधे (=बाधितवान्=परस्परमतिसंनिकटं स्थापितवान्)—हे इन्द्र, त्वावान् (=त्वत्समानः) कश्चन (=कोपि) न [भवति], न जातो न जनिष्यते (=पुरा न भूतः इत उत्तरमपि न भविष्यति) । [त्वं हि] अति विश्वं ववक्षिथ (=सकलमपि वस्तुजातमतीत्य प्रवृद्धोसि) ॥

६. अर्यः (=स्वामी) य [इन्द्रो] दाशुषे (=हविर्दत्तवते यजमानाय) मर्तभोजनं परादाति (=मर्त्यैर्मनुष्यैरुपभोग्यं वस्तुजातं ददाति) [स] इन्द्रः [तन्मर्तभोजनम्] अस्मभ्यं शिक्षतु (=ददातु) । —[हे इन्द्र], ते भूरि वसु (=तव यत् प्रभूतं धनं वर्तते तद्) वि भज (=अस्मदर्थं विभक्तं कुरु=तस्य भागमस्मभ्यं देहि) । तव राधसः भक्षीय (=तव धनस्य विभागं प्राप्नुयाम्) ॥

स्वामिभूत इन्द्रो यन्मर्त्यभोग्यं धनमुपासकेभ्यो ददाति तद् अस्मभ्यं ददातु । इन्द्रो हि प्रभूतस्य धनस्य प्रभुर्भवति न तस्य किमप्यूनम् । तस्य धनस्यैकभागोपि स्यात्पर्याप्तोस्माकमिति तात्पर्यार्थः ॥

५. त्याणें पृथिवीवरील सर्व अवकाश, [आणि] अंतरिक्ष [हीं] भरून टाकिलीं आहेत. त्याणें द्यु-लोकांत तेजस्वी नक्षत्रें भरून दि-लीं आहेत.–हे इंद्रा, तुझ्या समान कोणीहि नाहीं, [ पूर्वीं ] झालेला नाहीं [ आणि ] [ पुढें ] होणार नाहीं. [ तूं ] विश्वापेक्षां मोठा आहेस.

5. He has filled the whole Earth [and] the firmament. He crowds the brilliant stars in Heaven.—None, O Indra, is thine equal, none [ such ] has been born, nor shall be born. Thou hast grown greater than the Universe.

६. जो [ इंद्र ] प्रभु हविर्दा-त्या उपासकाला मर्त्यभोग्य धन देतो [तो] इंद्र आम्हांला [तें धन] देओ.– हे इंद्रा, तुझ्या विपुल धनाचा अंश आम्हांला दे, मला तुझ्या प्रसादाचा अंश लाभो.

6. May Lord [ Indra ], who gives away to his wor-shipper wealth to be enjoy-ed by mortals, confer [ the same ] on us.—Grant us, [ O Indra ], a share of thy wealth; may I enjoy [a por-tion ] of thy affluence.

---

५. ' इंद्र हा इतका मोठा आहे कीं, त्याणें आपल्या मोठेपणानें सर्व पृथिवी आणि सकळ अंतरिक्ष भरून टाकिलीं आहेत. त्याणें अत्युच्च द्युलोकीं असंख्य नक्षत्रें जडलीं आहेत.—तर हे इंद्रा, तुझ्यासारिखा दुसरा कोणीहि आजपर्यंत झाला नाहीं आणि पुढेंहि कोणी होणार नाहीं. तूं सकळ विश्वाच्या अतीत आणि विश्वापेक्षां मोठा आहेस.' इंद्रानें आपला प्रताप त्रैलोक्यांत भरिला आहे असें तात्पर्य आहे.

यांत जे इंद्राचे ( सर्वव्यापित्व आणि अद्वितीयत्व हे ) दोन गुण सांगितले त्यांच्या संबंधानें पाहिलें तर ईश्वराचे गुण आपल्या आर्य पूर्वजांस ठाऊक नव्हते असें कोणीहि म्हणूं शकणार नाहीं, आणि इंद्र म्हणजे ढगांचा आणि विजांचा आणि पावसाचाच देव असें समजून ते त्याला भजत नसत हेंहि उघड होतें.

वृत्तानुरोधानें पांचव्या चरणांत 'अति' शब्दांतील ' अ 'चा लोप न होऊं देतां ' अति विश्वं ववक्षिथ ' असा म्हटला पाहिजे.

६. ' इंद्र प्रभु आपल्या भक्तांस मर्त्यां-नीं भोगण्यास योग्य अशा सर्व वस्तु देत असतो. त्याच तो आम्हांस देओ, आणि यांत इंद्राला कांहीं कठिण नाहीं, कारण इंद्राजवळ मोठी संपत्ति आहे तिचा एक

**मदेमदे हि नो ददिर्यूथा गवामृजुक्रतुः ।**
**सं गृभाय पुरू शतोभयाहस्त्या वसु शिशीहि राय आ भर ॥ ७ ॥**

मदेऽमदे । हि । नः । ददिः । यूथा । गवाम् । ऋजुऽक्रतुः ।
सम् । गृभाय । पुरु । शता । उभयाहस्त्या । वसु । शिशीहि । रायः ।
आ । भर ॥ ७ ॥

**मादयस्व सुते सचा शवसे शूर राधसे ।**
**विद्मा हि त्वा पुरूवसुमुप कामान्त्ससृज्महेऽथा नोऽविता भव॥८**

मादयस्व । सुते । सचा । शवसे । शूर । राधसे ।
विद्म । हि । त्वा । पुरुऽवसुम् । उप । कामान् । ससृज्महे । अथ ।
नः । अविता । भव ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. हि (=यस्मात् कारणात्) मदेमदे (=सोमपानेन जाते हर्षे हर्षे=एतादृशं प्रति हर्षम्) ऋजुक्रतुः (=ऋजुप्रज्ञ) [इन्द्रो] नः (=अस्मभ्यं) गवां यूथा (=गवां यूथानि=गोसमूहान्) ददिः (=दाता=तेषां प्रापयिता) [भवति]। [स त्वं हे इन्द्र,] उभयाहस्त्या (=उभाभ्यां हस्ताभ्यां) पुरू शता वसु (=पुरूणि शतानि वसूनि) [अस्मभ्यं दातुं] सं गृभाय (=समस्य गृहाण)। [त्वं नः] शिशीहि (=तीक्ष्णीकुरू=धनानां दानेन जातोत्साहान् कुरु) [त्वं] रायः आ भर (=धनान्यानय) ॥

८. हे शूर [इन्द्र], सुते सचा (=अभिषुते सोमे सति) शवसे राधसे (=वृत्रवधादिशौर्यकर्मकरणाय तथा अस्मभ्यं धनदानाय) मादयस्व (=सोमं पीत्वा हृष्टो भव)। हि (=यस्मात् कारणाद्) [वयं] त्वा (त्वां) पुरुवसुं (=प्रभूतधनं) विद्म (=जानीमः) [अपि च] कामान् (=अस्माकं कामान्=कामनाः) उप ससृज्महे (=त्वया सह संगतान् कुर्मः)। अथ (=अतः कारणात्) [त्वं] नः अविता भव (=अस्माकं रक्षिता भव) ॥

---

लहानसा भाग आम्हांस दिला तरी पुष्कळ आहे. तर इंद्र मला तिचा भाग देओ आणि मला तो मिळो ' असा भावार्थ आहे.

' जो इंद्र ' इ०. म्हणजे जें मर्त्यभोग्य धन इंद्र उपासकांस देतो तें तो मला देओ.

या मंत्रांत इंद्र अतिसंपत्तिमान् आहे

७. कारण कीं [ तो ] सरळ बुद्धीचा [इन्द्र] सोमहर्षाच्या प्रत्येक प्रसंगीं आम्हांला गाईंचे कळप देणारा होय. [ तर हे इन्द्रा ], [ तूं आपल्या ] दोनहि हातांनीं शेकडों धनें आम्हांकारणें एकवट धारण कर. [ तूं आम्हांला ] उत्तेजन दे. [तूं] सर्व संपत्ति घेऊन ये.

८. हे शूरा [इन्द्रा], सोम काढून सिद्ध होतांच पराक्रम [ करण्या]करितां [आणि] [आम्हांला] प्रसाद [देण्या]करितां तो तूं पिऊन मादयुक्त हो. कारण कीं तूं मोठा धनवान् आहेस असें आम्ही जाणतों आणि आम्ही आमच्या कामना तुझ्या पुढें ठेवितों. तर [ तूं ] आमचा रक्षणकर्ता हो.

7. For at each exhilaration by the Soma the right-minded [ Indra ] [ is ] our giver of herds of cows.—Hold [ for us ], [ O Indra ], many hundred blessings in both [thy] hands. Sharpen [us]. Bring us riches.

8. Be exhilarated so soon as the Soma is extracted, O brave [ Indra ], that thou mayest perform exploits [and] mayest confer wealth on us. For we know thee to be possessed of vast wealth. We present our wishes to thee. Be thou therefore our protector.

आणि तो मनुष्यांस मनुष्यांनीं उपभोगण्यास योग्य अशा वस्तु देतो असें जरी सांगितलें आहे तरी अमर्त्यांनीं भोगावयाच्या वस्तुहि देण्याला समर्थ आहे असें कवीनें जाणविलें आहे.

यांत वृत्तासाठीं ‘ भज ’ असें रूप शुद्ध असतांहि ‘ भजा ’ असें झालें आहे.

७. इंद्र हा मोठा संपत्तिमान् आहे असें पूर्व मंत्रांत सांगितलें त्याला प्रमाण सांगतोः—‘कारण कीं, इंद्राला आम्ही जेव्हां जेव्हां सोम पिण्यास देऊन आनंदित करितों, तेव्हां तेव्हां तो आम्हांला गाईंचे कळपाचे कळप देत असतो. कारण तो सरळ बुद्धीचा, म्हणजे ज्यास जें देणें योग्य तें देण्याविषयीं सिद्ध असा आहे.—तर हे इंद्रा, तूं आपल्या दोनीहि उदार हातांत आम्हांकारणें शेकडो विपुळ संपत्ति घेऊन ये, आम्हांला उपासना करण्याला उत्तेजन दे ’ असें तात्पर्य.

‘ सोमहर्षाच्या प्रसंगीं.’ सोमपान केल्यावर देवांस जसें वळ येई तसेंच

एते त इन्द्र जन्तवो विश्वं पुष्यन्ति वार्यम् ।
अन्तर्हि ख्यो जनानामर्यो वेदो अदाशुषां तेषां नो वेद आ भर॥
॥ ९ ॥ २ ॥

एते । ते । इन्द्र । जन्तवः । विश्वम् । पुष्यन्ति । वार्यम् ।
अन्तः । हि । ख्यः । जनानाम् । अर्यः । वेदः । अदाशुषाम् । तेषा-
म् । नः । वेदः । आ । भर ॥ ९ ॥ २ ॥

## भाषायाम्.

९. हे इन्द्र, एते ते जन्तवः (=एते अस्मद्रूपास्त्वोपासका) विश्वं वार्यं पुष्यन्ति (=सकलमपि श्रेष्ठं धनं प्राप्नुवन्ति)। हि (=यस्मात्) अर्यः (=स्वामिभूतस्त्वम्) अदाशुषां (=हविषामदातॄणां) जनानाम् अन्तः (=जनानां मध्ये) [वर्तमानं] वेदः (=धनं) ख्यः (=जानासि)। [अतः] तेषां वेदः (=तेषां धनं) नः आ भर (=अस्मदर्थम् आनय) ॥

सोम अर्पण करणाऱ्या उपासकाला धन द्यावें अशी त्यांस इच्छा उत्पन्न होत असे.

ह्या मंत्राचा विनियोग अंत्येष्टींत करितात. वृषोत्सर्ग म्हणजे पोळ सोडणें म्हणून जें कर्म अकरावे दिवसीं करितात त्या वेळीं हा म्हणतात. परंतु यांत 'गवाम्' शब्द आला आहे याशिवाय दुसरें कांहीं कारण अथवा या मंत्राचा संबंध त्या कर्माशीं दिसत नाहीं.

वृत्तानुरोधेंकरून 'उभयाहस्तिआ' असा उच्चार केला पाहिजे.

८. 'हे शूर इंद्रा, आम्हीं सोमरस काढीत आहों तो सिद्ध होतांच तूं पिऊन आनंदित हो आणि पराक्रम करून आम्हांला धन दे; कारण कीं तूं अत्यंत धनवान् आहेस असें आम्हांस ठाऊक आहे आणि आमच्या कामना काय आहेत त्या तुझ्या पुढें आम्ही सांगतों; तर तूं आमचें रक्षण कर.'

९. हे इंद्रा, हे तुझे [उपासक] जन सकळ इष्ट वस्तूंप्रत पावतात. हवि न देणाऱ्या जनांचे घरीं असलेलें धन तूं प्रभु जाणतोस. तर त्यांचें धन आणून आम्हांला दे.

9. These thy servants attain to all that is desirable. For thou the Lord of wealth knowest the wealth that is among the unsacrificing people. Bring their wealth unto us,

९. 'हे इंद्रा, आम्ही जे तुझे दास त्यांला कांहीं उणें नाहीं. जगांत जें उत्तम धन तें सर्व आम्हांला मिळतें. तुला हवि न देणारे जे अभक्त त्यांचे घरीं कोणतें धन आहे तें तुला ठाऊक आहे. आणि तें तूं घेऊन आपल्या उपासकांला देत असतोस. तर तूं त्यांचें धन काढून घे आणि आम्हांला आणून दे.'

## सूक्तम् ८२.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । इन्द्रो देवता । अन्त्या जगती । शिष्टाः पङ्क्तयः ।

उपो षु शृणुही गिरो मघवन्मातथा इव ।
यदा नः सूनृतावतः कर आदर्थयास इद्योजा न्विन्द्र ते हरी ॥१॥

उपो इति । सु । शृणुहि । गिरः । मघऽवन् । मा । अतथाःऽइव ।
यदा । नः । सूनृताऽवतः । करः । आत् । अर्थयासे । इत् । योज ।
नु । इन्द्र । ते । हरी इति ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे मघवन्, [ अस्माकं ] गिरः ( =स्तुतीः ) उपो सु शृणुहि ( =उपैव सुष्ठु शृणुहि=अस्मान् प्रत्यागत्य शृणु ), अतथा इव मा [ भूः ] ( =विपरीतो मा भूः=पुरा यथानुग्रहबुद्धिरभवस्तस्माद्भिन्नो मा भव ) । यदा [ हि ] ( =यस्मात् हि ) [ त्वं ] नः ( =अस्मान् ) सूनृतावतः ( =वाचा युक्तान् ) करः ( =करोषि ) आत् ( =अतः कारणात् ) अर्थयासे इत् ( =प्रार्थ्यस एव=वयं त्वां याचिष्यामह एव ) । [तस्मात्] हे इन्द्र, ते हरी ( =तव हरिनामकावश्वौ ) नु ( =क्षिप्रं ) योज ( =रथे योजय=रथे योजयित्वा अस्मान् प्रति त्वमागच्छ ) ॥

## सूक्त ८२.

ऋषि–रहूगणाचा पुत्र **गोतम**. देवता– **इंद्र**. वृत्त– **पङ्क्ति**, मात्र शेवटच्या ऋचेचें **जगती** वृत्त.

१. हे मघवन् [ तूं ] येऊन [ आमच्या ] प्रार्थना मन लावून ऐकून घे. [ तूं आम्हांविषयीं ] उदासीन [ होऊं ] नको. [ तूं ] ज्यापेक्षां आम्हांला वाचा दिली आहेस त्यापेक्षां [ आम्ही ] तुझ्या जवळ याचना करणारच करणार. [ तर हे ] इन्द्रा, [ तूं ] आपले घोडे सत्वर जोड.

## HYMN 82.

To *Indra*. By *Gotama* son of *Rahûgaṇa*. Metre—*Pankti*, except of the last which is *Jagatî*.

1. Come and hear with attention our prayers, O Maghavan; do not [ become] indifferent. As thou hast given us speech, so thou shalt indeed be importuned. Quickly [ therefore ] harness thy pair of tawny horses.

---

१. हेंहि सूक्त गोतम ऋषीचेंच आहे, आणि देवता आणि वृत्त हींहि पूर्वींप्रमाणेंच आहेत. तर या सूक्तांत तरी गोतम ऋषीचें कांहीं अलौकिक रूप दृष्टीस पडतें, कीं गोतम ऋषि आम्हां दीन मर्त्यांसारिखेच होते तें आपण पाहूं. ते म्हणतातः ' हे इंद्रा, तूं सत्वर येऊन आम्ही तुजकारणें सूक्तें गात आहोंत तीं तूं मन लावून ऐक. तूं आम्हांविषयीं उदासीन न होतां आलेंच पाहिजे. आम्ही तुझी अशी वारंवार प्रार्थना करितों यावरून तुला राग न येओ. तूं आम्हांस बोलावयास वाचा दिली आहेस, आणि स्तोत्रें रचण्याची शक्ति दिली आहेस, यास्तव आम्ही तुला वारंवार प्रार्थना करून त्रास देणारच. तर तूं आपले घोडे रथाला जोड आणि आम्हांजवळ ये.'

या मंत्रांत पुत्र पित्याजवळ लडिवाळपणानें खरा पण अधिकाराच्या नात्यानें बोलतो, तसा ऋषि इंद्राप्रत बोलतो आहे. अशा प्रकारचीं सलगीचीं भाषणें तुकारामाच्या अभंगांत पुष्कळ सांपडतील.

' वाचा दिली आहेस '=' सूनृतावतः करः'. ' सूनृता ' म्हणजे प्रिय आणि सत्य अशी वाणी, म्हणजे स्तोत्र; आणि आम्हांस वाणी दिली आहेस म्हणजे स्तोत्र करावयाला शिकविलें आहेस, असें सायणाचार्य म्हणतात. तोच अर्थ पर्यवसानीं आम्हीं घेतला आहे.

या ऋचेंत ' शृणुहि ' असें पद वृत्ताकरितां ' शृणुही ' असें झालें आहे तें पाहा. जसें अर्वाचीन कवितेंत आपण

**अक्षन्नमीमदन्त ह्यव प्रिया अधूषत ।**
**अस्तोषत स्वभानवो विप्रा नविष्ठया मती योजा न्विन्द्र ते हरी ॥ २**

अक्षन् । अमीमदन्त । हि । अव । प्रियाः । अधूषत ।
अस्तोषत । स्वऽभानवः । विप्राः । नविष्ठया । मती । योज । नु ।
इन्द्र । ते । हरी इति ॥ २ ॥

**सुसंदृशं त्वा वयं मघवन्वन्दिषीमहि ।**
**प्र नूनं पूर्णवन्धुरः स्तुतो याहि वशाँ अनु योजा न्विन्द्र ते हरी ॥ ३**

सुऽसंदृशम् । त्वा । वयम् । मघऽवन् । वन्दिषीमहि ।
प्र । नूनम् । पूर्णऽवन्धुरः । स्तुतः । याहि । वशान् । अनु । योज ।
नु । इन्द्र । ते । हरी इति ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. हि (=यस्मात्) [हे इन्द्र], [यजमाना] अक्षन् (=त्वया दत्तान्यन्नान्यभक्षन्) [भुक्तवन्तश्च] अमीमदन्त (=तृप्ता आसन्)। [तदनन्तरं] प्रिया अव अधूषत (=प्रियास्तनूः स्वकीयानि शरीराणि अकम्पयन्=अनर्तयन् ?)। स्वभानवः (=स्वायतदीप्तयो) विप्राः (=मेधाविनः=यजमाना) नविष्ठया मती (=अतिनूतनया मत्या=स्तुत्या=सूक्तेन) [त्वाम्] अस्तोषत (=अस्तुवन्)। [तस्मात्] हे इन्द्र, ते हरी (=तव हरिनामकावश्वौ) नु (=क्षिप्रं) योज (=रथे योजय=रथे योजयित्वा अस्मान् प्रति आगच्छ) ॥

३. हे मघवन्, वयं सुसंदृशं (=सुष्ठ्वनुग्रहदृष्ट्या सर्वस्य द्रष्टारं) त्वा (=त्वां) वन्दिषीमहि (=स्तवामहि) [त्वम् अस्माभिः] स्तुतः [सन्] पूर्णवन्धुरः (=अस्मभ्यं दातव्येन धनेन पूर्णरथो) [भूत्वा] वशान् अनु (=यथाकामं) नूनं (=शीघ्रं) प्र याहि (=प्रस्थाय आयाहि)। [तस्मात्] हे इन्द्र, ते हरी (=तव हरिनामकावश्वौ) नु (=क्षिप्रं) योज (=रथे योजय=रथे योजयित्वा अस्मान् प्रति आगच्छ) ॥

---

ह्रस्वाचें दीर्घ आणि दीर्घाचें ह्रस्व करितों तसेंच पण फार थोड्या ठिकाणीं वैदिक कवितेंतहि करीत होते. पण बहुतकरून तो व्यत्यय ते पदांतीच करीत असत. आम्ही तो निर्बंध राखीत नाहीं.

पांचवा चरण 'योजा नु इन्द्र ते हरी' असा म्हटला पाहिजे. आणि हें पालवपद प्रत्येक ऋचेच्या शेवटीं येत जाईल. यास्तव येथें एकदाच त्याविषयीं सांगितलें तर पुरे. ऐशींव्या सूक्तांत सुद्धा पांचवा पाद पालवपद आहे तो पहा.

२. कारण कीं हे इन्द्रा, उपासक जन त्वां दिलेलें अन्न खाते झाले [ आणि ] आनंद पावले [ आणि ] आनंदानें नाचूं लागले; तेजस्वी [ आणि ] बुद्धिमंत उपासक अगदीं नव्या स्तोत्रानें [तुला] स्तविते झाले. [तर] हे इंद्रा, [ तूं ] आपले घोडे सत्वर जोड.

2. For thy worshippers ate, were exhilarated [and] shook their limbs [ in dance ]. The selfresplendent [and] wise worshippers praised [ thee ] with the newest hymn. Quickly [ therefore ] harness thy pair of tawny horses.

३. हे मघवन्, कृपादृष्टीनें पाहाणारा जो तूं त्या तुला आम्ही वंदन करीत आहों आणि तुला स्तवीत आहों. तर तूं रथ भरून घेऊन आपल्या इच्छेप्रमाणें ये. हे इंद्रा, [तूं ] आपले घोडे सत्वर जोड.

3. May we, O Maghavan, do homage to thee that lookest with favour. Being praised come thou quickly with thy full car according to thy will. Quickly [therefore] harness thy pair of tawny horses.

---

२. 'हे इंद्रा, हे तुझे उपासक त्वां प्रसन्न होऊन दिलेलें अन्न भक्षन आनंदित होऊन जणूं नाचत आहेत, आणि अगदीं नवें स्तोत्र रचून तुला अर्पीत आहेत. तर तूं आपले घोडे रथाला सत्वर जोडून आम्हांप्रत ये;' म्हणजे तुझी भक्ति करणारे आम्ही अगदीं नवें स्तोत्र रचून तुला प्रार्थीत आहों तर तूं सत्वर ये.

यांत ऋषि अगदीं नव्या स्तोत्रानें आपण इंद्राची स्तुति करीत आहों असें म्हणतो त्याजकडेस लक्ष द्यावें. नवीन स्तोत्र रचून उपासना केली तर ती देवांस अधिक मान्य होते असें ऋषींचें मत वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे.

या मंत्राच्या पहिल्या दोन पादांचा अर्थ स्पष्ट नाहीं. तो आम्हीं सायणाप्रमाणेंच केला आहे, पण 'अव प्रिया अधूषत' याचा अर्थ आचार्य अत्यानंदामुळें बोलण्यास असमर्थ होऊन आपलीं शरीरें कांपविते झाले इतकाच करितात.

'तेजस्वी'='स्वभानवः'. अक्षरशः अर्थ स्वताहाचें तेज आहे ज्यांस ते. या विशेषणाचें येथें काय प्रयोजन आहे तें समजत नाहीं. स्वभानु हें वेदांत उषा इत्यादि देवतांचें विशेषण येतें. या ठिकाणीं मरुत् देव सोमपानानें हर्षित होऊन इंद्राची स्तुति करीत आहेत असा कदाचित् अर्थ असेल काय ?

**स घा तं वृषणं रथमधि तिष्ठाति गोविदम् ।**
**यः पात्रं हारियोजनं पूर्णमिन्द्र चिकेतति योजा न्विन्द्र ते हरी॥४॥**

सः । घ । तम् । वृषणम् । रथम् । अधि । तिष्ठाति । गोऽविदम् ।
यः । पात्रम् । हारिऽयोजनम् । पूर्णम् । इन्द्र । चिकेतति । योज ।
नु । इन्द्र । ते । हरी इति ॥ ४ ॥

**युक्तस्ते अस्तु दक्षिण उत सव्यः शतक्रतो ।**
**तेन जायामुप प्रियां मन्दानो याह्यन्धसो योजा न्विन्द्र ते हरी॥५**

युक्तः । ते । अस्तु । दक्षिणः । उत । सव्यः । शतक्रतो इति शतऽक्रतो ।
तेन । जायाम् । उप । प्रियाम् । मन्दानः । याहि । अन्धसः । योज ।
नु । इन्द्र । ते । हरी इति ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

४. स घ (=स खलु=तस्मात् स) [इन्द्रो] वृषणं (=वीर्यवन्तं) गोविदं (=गवां लम्भयितारं) तं रथम् अधि तिष्ठाति (=आरोहतु) यो [रथः] हे इन्द्र, हारियोजनं (=हरियुग्मयुक्ताय तुभ्यमर्पितं) पूर्णं (=सोमेन परिपूरितं) पात्रं (=सोमपात्रं) चिकेतति (=जानाति=दूराद्दृष्ट्वा आगच्छति)। [तस्मात्] हे इन्द्र, ते हरी (=तव हरिनामकौ पीतवर्णावश्वौ) नु (=क्षिप्रं) योज (=रथे योजय=रथे योजयित्वा अस्मान् प्रति आगच्छ)॥

हरियोजनायेन्द्राय यजमानैः प्रार्पितं सोमपूर्णं पात्रं दृष्ट्वा तस्य रथः शीघ्रमिन्द्रमावहति। तं रथमधिष्ठाय शीघ्रमिन्द्र आयात्विति प्रार्थ्यतेऽत्रेति द्रष्टव्यम्॥

५. हे शतक्रतो (=शतप्रज्ञ) [इन्द्र], ते दक्षिणः (=दक्षिणपार्श्वस्थोऽश्वो) युक्तोऽस्तु (=रथे नियुक्तो भवतु) उत सव्यः (=अपि च वामपार्श्वस्थोऽश्वोऽपि) [रथे नियुक्तो भवतु]। तेन (=तादृशेन अश्वयुग्मयुक्तेन रथेन=तं रथमधिष्ठाय) अन्धसो मन्दानः (=अस्माभिरर्पितेन हविरन्नेन मत्तः) [त्वं] प्रियां जायाम् उप (=प्रीणयित्रीं तव स्त्रियं प्रति) याहि (=गच्छ)। [तस्मात्] हे इन्द्र, ते हरी (=तव हरिनामकौ पीतवर्णावश्वौ) नु (=क्षिप्रं) योज (=रथे योजय=रथे योजयित्वा अस्मान् प्रति आगच्छ)॥

४. तर हा इंद्र त्या बलवान् [आणि] गोदायक रथावर आरूढ होओ–[कीं] जो [रथ], हे पीताश्व इंद्रा, तुजकरितां [सोमानें] भरून ठेविलेलें पात्र जाणतो. [तर] हे इंद्रा, तूं आपले घोडे सत्वर जोड.

५. हे शतप्रज्ञ [इंद्रा], तुझा उजवा [घोडा] जोडिला जाओ आणि डावाहि [जोडिला जाओ]. [तूं] [आमच्या] हविरन्नानें तृप्त होऊन त्या रथांत बसून [आपल्या] प्रिय पत्नीप्रत जा. हे इंद्रा, [तूं] आपले घोडे सत्वर जोड.

4. Therefore may he mount that mighty [and] cow-giving car, which observes the bowl filled [with Soma] for thee, O Indra of the tawny pair! Quickly [therefore] harness thy pair of tawny horses.

5. May thy right [horse] be yoked and may, O [Indra] of hundred intellects, [thy] left [horse be yoked]. In that car go to thy beloved wife after being gratified with [our] oblation. Quickly [therefore] harness thy pair of tawny horses.

---

या मंत्राचा नान्दीश्राद्धांत आणि अंत्येष्टींत सपिण्डीप्रकरणांत विनियोग करण्याची चाल पडली आहे.

३ हे मघवन्, तुझी आम्हीं स्तुति करीत आहों. कारण कीं तूं सर्वांवर कृपा करणारा आहेस. तर तूं आमची स्तुति ऐकून आपला रथ आम्हास द्यावयाच्या संपत्तीनें भर आणि त्यांत बसून ये. आणि तूं आपले घोडे रथाला सत्वर जोडून आम्हांप्रत ये.

या मंत्राचा पहिला चरण ‘ सुसंदृशं तुआ वयं ’ असा म्हटला पाहिजे.

---

४. यांत ऋषीचा भावार्थ असा आहे कीं, ‘ हे इंद्रा, जो महापराक्रमी आणि उपासकांला गाई मिळवून देणारा तुझा रथ तुज पीताश्वाकारणें उपासकांनीं अर्पिलेलें सोमानें भरलेलें पात्र दुरून पाहून त्वरित तुला घेऊन येत असतो त्या रथांत तूं बैस आणि आम्हांप्रत सत्वर ये.’

‘ गोदायक रथ ’=‘ गोविदम्.’ म्हणजे उपासक जन संग्रामांत शत्रूशीं युद्ध करीत असतां इंद्राचा रथ त्यांच्या साहाय्याला येतो आणि त्यांचा जय करून शत्रूंच्या गाई त्यांला मिळवून देतो. म्हणून त्याला ‘ गोविद् ’ असें विशेषण लाविलें आहे.

‘ [कीं] जो [रथ] हे पीताश्व इंद्रा, तुजकरितां [सोमानें] भरून ठेविलेलें पात्र जाणतो ’=‘ यः पात्रं हारि-

युनज्मि ते ब्रह्मणा केशिना हरी उप प्र याहि दधिषे गभस्त्योः ।
उत्त्वा सुतासो रभसा अमन्दिषुः पूषण्वान्वज्रिन्त्समु पत्न्यामदः॥
॥ ६ ॥ ३ ॥

युनज्मि । ते । ब्रह्मणा । केशिना । हरी इति । उप । प्र । याहि । दधिषे । गभस्त्योः ।
उत् । त्वा । सुतासः । रभसाः । अमन्दिषुः । पूषण्ऽवान् । वज्रिन् । सम् । ऊम् इति । पत्न्या । अमदः ॥ ६ ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

६. [ हे इन्द्र ], [ अहं ] ब्रह्मणा ( =एतेन स्तोत्रेण ) ते ( =तव ) केशिना हरी ( =केशिनौ हरी=शिखावन्तौ हरिद्वर्णावश्वौ ) युनज्मि ( =रथे योजयामि ) । [त्वम्] उप प्र याहि ( =अस्मान् प्रति आगच्छ ) । [ त्वं ] [ प्रग्रहान् ] गभस्त्योः ( =हस्तयोः ) दधिषे ( =धारय ) । त्वा ( =त्वां ) रभसाः ( =तीव्राः=क्षिप्रमदकारिणः ) सुतासः ( =अभिषुताः सोमाः ) अमन्दिषुः ( =उत्कृष्टमदयुक्तं कुर्वन्तु=करिष्यन्ति ) [तस्मात् ] हे वज्रिन् ( =वज्रधर ), [ त्वं ] पूषण्वान् ( =पूष्णा देवेन सहितः ) [ सन् ] पत्न्या ( =तव जायया सह ) सम् उ अमदः ( =सम्यगेव तृप्तो भव ) ॥

पूष्णा सहितो भूत्वा तथा तव जायया सहितो भूत्वा त्वमागम्य अस्माभिः प्रार्पितं सोमं पीत्वा हृष्टो भवेत्यर्थः ॥

---

योजनं पूर्णम् इन्द्र चिकेतति.' अक्षरशः अर्थ, 'जो हे इंद्रा, भरलेलें हारियोजन पात्र जाणतो.' 'हरियोजन' म्हणजे हरित् अथवा पिवळ्या रंगाच्या घोड्यांची जोडी ज्याला आहे तो; त्यावरून 'हारियोजन' म्हणजे 'हरियोजना (=इंद्रा )-साठीं सिद्ध केलेलें जें तें.'

या ऋचेंत प्रथम तृतीयपुरुषीं निर्देश असून पुढें तृतीय चरणांत इंद्राला संबोधन करून द्वितीयपुरुषीं निर्देश आहे.

५. 'हे इंद्रा, तूं प्रथम उजवीकडचा घोडा रथाला जोड आणि नंतर डावीकडचा जोड; आणि असा जो दोनी घोडे जोडलेला रथ त्यांत बसून आम्हांप्रत ये आणि आम्हीं अर्पण केलेलें हविरन्न भक्षून तृप्त हो. आणि नंतर तुझी जी प्रिय पत्नी तिजप्रत त्या रथांत बसून जा. तर तूं आपले घोडे सत्वर रथाला जोड आणि ये.'

'हविरन्नानें '=' अन्धसः'. म्हणजे सोम पिऊन सोमरूप जें आम्हीं हवि

६. [ हे इंद्रा ], [मी] [माझ्या] स्तोत्रानें तुझे अयाळी पिवळे घोडे जोडितों. चल, [ तूं ] निघून ये. [ तूं आपल्या ] हातांत [ लगाम ] धर. [ आमचे ] तीव्र मदकारक सोमरस तुला उन्मत्त करितील. [ तर ] हे वज्रधर [ इंद्रा ], [ तूं ] पूषा [देवा]ला बरोबर घेऊन [आपल्या] पत्नीशीं संतृप्त हो.

6. I yoke with [ my ] hymn thy maned tawny horses. Come thou forth unto us. Hold [the reins] in [ thy ] hands. [ Our ] extracted sharp Somas shall exhilarate thee. Accompanied by Pûshâ do thou, O welder of the thunderbolt, enjoy thyself with [ thy ] wife.

---

अर्पण करितों आहों तेणेंकरून तृप्त हो, असा कवीचा भावार्थ.

‘ [ आपल्या ] प्रिय पत्नीप्रत’=‘जायाम् उप प्रियाम्.’ ही पत्नी कोण तें सायणाचार्य सुद्धा सांगत नाहींत. आणि कोणी पत्नीविशेष विवक्षित आहे असें दिसत नाहीं. जसे इंद्राचे अश्व आणि रथ हे कल्पनासिद्ध आहेत तशीच त्याची पत्नीहि कल्पनासिद्ध आहे. तिला वेदोत्तर ग्रंथांत, म्हणजे पुराणादिकांत, ‘ शची ’ असें नांव पडलें आणि तिला जयंत नांवाचा पुत्र झाला इत्यादिक कथांचा प्रसार झाला. सू. २९, मं. २ यावरील टीप पहा. आणि सू. ५३, मं. ३ हा मंत्र आणि त्याजवरीलहि टीप पहा.

---

६. इंद्रानें येऊन सोम प्यावा म्हणून जें वर सांगत आला आहे त्याच प्रार्थनातरंगाला अनुसरून ऋषि म्हणतो, ‘ हे इंद्रा, तूं आपले घोडे रथाला जोडण्याचे श्रम घेऊं नको. मीच आपल्या स्तोत्राच्या योगानें ते तुझ्या रथाला जोडितों. तर तूं नीघ आणि हातांत लगाम धरून घोडे हाकून मात्र ये. जर येशील तर आम्हीं काढिलेले अतितीक्ष्ण सोमरस तुला उत्तम आनंद करितील. तर तूं ये आणि येतांना पूषा देवाला बरोबर आण, आणिं आपल्या भार्येलाहि घेऊन ये आणि सर्वजण मिळून आमचा सोम प्या आणि अतितृप्त व्हा.’

‘ माझ्या स्तोत्रानें घोडे जोडितों ’= ‘ युनज्मि ब्रह्मणा हरी.’ स्तोत्र म्हटलें म्हणजे इंद्राचे घोडे आपोआप जोडले जातात, स्तोत्र म्हटलें म्हणजे रथ आपोआप येतो, आणि स्तोत्र म्हटलें म्हणजे इंद्राला शक्ति आणि शत्रूंला मारून टाकण्याचें इत्यादि सामर्थ्य येतें या समजुतीचे उल्लेख वेदांत पुष्कळ ठिकाणीं येत असतात. त्याचीं उदाहरणें पूर्वीं आलींच आहेत. तथापि हें एक चमत्कारिक

## सूक्तम् ८३.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । इन्द्रो देवता । जगती च्छन्दः ।

**अश्वा॑वति प्रथ॒मो गोषु॑ गच्छति सुप्रा॒वीरि॑न्द्र॒ मर्त्य॒स्तवो॒तिभिः॑ ।**
**तमित्पृ॑णक्षि॒ वसु॑ना॒ भवी॑यसा॒ सिन्धु॒मापो॒ यथा॒भितो॒ विचे॑तसः ॥ १**

अश्व॑ऽवति । प्र॒थ॒मः । गोषु॑ । ग॒च्छ॒ति॒ । सु॒प्र॒ऽअ॒वीः । इ॒न्द्र॒ । मर्त्यः॑ । तव॑ । ऊ॒तिऽभिः॑ ।
तम् । इत् । पृ॒ण॒क्षि॒ । वसु॑ना । भवी॑यसा । सिन्धु॑म् । आपः॑ । यथा॑ । अ॒भितः॑ । विऽचे॑तसः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे इन्द्र, तव ऊतिभिः (=त्वदीयैः संरक्षणैः) सुप्रावीः (=सुष्ठु प्ररक्षितो) मर्त्यः (=मरणधर्मा मनुष्यः) अश्वावति (=अश्ववैपुल्ये) [तथा] गोषु (=गोवैपुल्ये) प्रथमः (=प्रथमं यथा तथा=सर्वेभ्योपि पूर्वं) गच्छति (=अश्ववैपुल्यं तथा गोवैपुल्यं सर्वेभ्योपि पूर्वमेव प्राप्नोति) । तम् इत् (=तमेव) [त्वं] वसुना (=धनेन), सिन्धुं विचेतस आपो यथा (=विशिष्टज्ञानयुक्ता नद्यो यथा), अभितः (=समन्तात्) पृणक्षि (=पूरयसि) ॥

यं मर्त्यं त्वं संरक्षसि स एव प्रथममश्वादिवैपुल्यं प्राप्नोति स एव प्रभूतधनवान्भवतीत्यर्थः ॥

असल्यामुळें येथें उतरून घेतोंः–' हे इंद्रा, युद्धामध्यें शीघ्र आणि साहाय्यदाते असे जे तुझे स्तोत्रानें जोडले जाणारे दोन पिवळे घोडे ते मी माझ्या स्तोत्राच्या योगानें रथाला जोडितों (ब्रह्मणा ते ब्रह्मयुजा युनज्मि हरी सखाया सधमादे आशू) ऋ. ३. ३५. ४. शिवाय ऋ. ८. २. २७; १. १७७. २ हेहि मंत्र पहा. सू. ८४, मं. ३ पहा.

'पूषा देवाला बरोबर घेऊन '= ' पूषण्वान्.' पूषादेवासहित इंद्रानें यावें आणि त्याजबरोबर हवि इत्यादि भक्षून आनंदित व्हावें याविषयीं ऋ. ३. ५२. ७ हा मंत्र पहा.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें श्लोकवृत्ताला बसतोः–

युनज्मि ते ब्रह्मणॉ केशिना हरी
उप प्र याहिं दधिषे गभस्तिओः ।
उत्त्वा सुतासो रभसा अमन्दिषुः
पूषण्वॉन् वज्रिन् समु पत्निआ मदः ॥

## सूक्त ८३.

ऋषि–गोतम (पूर्वे सूक्ताचा जो तोच). देवता–इंद्र. वृत्त–जगती.

१. हे इंद्रा, तुझ्या संरक्षणाचा प्रसाद ज्याला होईल तो मर्त्य [सर्वांहून ] प्रथम अश्वसंपत्तीप्रत [आणि] गाईंप्रत पावतो. त्यालाच तूं, बुद्धिमंत नद्या आसमंतात् समुद्राला [भरितात त्या]प्रमाणें, अतिविपुल धनानें भरीत असतोस.

## HYMN 83.

To *Indra*. By *Gotama*, (author of the previous hymn). Metre—*Jagatî*.

1. That mortal, O Indra, who is well-championed with thy supports, is the first to attain to the wealth of horses [and] to cows. Him only thou fillest with plenteous wealth, as the wise rivers fill the ocean from all sides.

---

१. हेंहि सूक्त गोतम ऋषीनेंच केलेल आहे. ह्याचें वृत्त 'जगती' म्हणजे वंशस्थ होय.

या प्रथम मंत्रांत ऋषि म्हणतो कीं, 'हे इंद्रा, ज्याचें तूं संरक्षण करितोस तो मर्त्य मनुष्य अश्व, गाई इत्यादि संपत्तीप्रत प्रथम पावतो; आणि जशा नद्या सर्व बाजूंनीं वाहून जाऊन समुद्राला भरून टाकीत असतात, तशीं धनें सर्व बाजूंनीं त्याच्या घरीं जाऊन भरतात. असा तुझ्या प्रसादाचा महिमा आहे.'

'तुझ्या संरक्षणाचा प्रसाद ज्याला होईल'='तव ऊतिभिः सुप्रावीः.' अक्षरशः अर्थ 'तुझ्या संरक्षणांनीं उत्तम संरक्षणवान्.' म्हणजे तूं संरक्षण करितोस तें उत्तम संरक्षण होय, आणि तें संरक्षण ज्याला लाभेल तो.

'बुद्धिमंत नद्या'='आपो विचेतसः.' बुद्धिमंत हा अर्थ अक्षरशः आहे, तरी सायणांनीं दिलेल्या भावार्थास अनुसरून आहे. ते म्हणतात, उदकांच्या योगानें ज्ञानाचा विशेष लाभ होतो म्हणून उदकांला 'विचेतसः' हें विशेषण लाविलें आहे. आम्हास वाटतें, सरस्वती इत्यादिक नद्यांच्या तीरीं राहिल्यानें बुद्धि अधिक वाढते अशा समजुतीनें या विशेषणाचा प्रयोग केला आहे. नद्यांच्या कांठीं राहाणाऱ्या लोकांत बुद्धि आणि ज्ञान विशेष असतें, अशा अनुभवाला अनुसरूनच सरस्वती म्हणून जी एक नदी तिला आपल्या आर्य लोकांनीं बुद्धि आणि ज्ञान याची देवता केली आहे.

हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें श्लोकाला बसतोः—

अश्वावति प्रथमो गोषु गच्छति
सुप्रावीरिन्द्र मर्तअस्तवोतिभिः ।
तमित्पृणक्षि वसुना भवीयसा
सिन्धुमापो यथाभितो विचेतसः ॥

**आपो न देवीरुप यन्ति होत्रियमवः पश्यन्ति विततं यथा रजः ।**
**प्राचैर्देवासः प्र णयन्ति देवयुं ब्रह्मप्रियं जोषयन्ते वरा इव॥ २ ॥**

आपः । न । देवीः । उप । यन्ति । होत्रियम् । अवः । पश्यन्ति । विऽततम् । यथा । रजः ।

प्राचैः । देवासः । प्र । नयन्ति । देवऽयुम् । ब्रह्मऽप्रियम् । जोषयन्ते । वराःऽइव ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. आपो न देवीः ( =आपो देव्य इव=दिव्या आपो निम्नप्रदेशम् उप यन्ति धावन्ति तद्वत् ) देवा होत्रियम् उप यन्ति ( =होतुः स्वभूतं चमसं नाम सोमपात्रं प्रति गच्छन्ति) । [ ते ] विततं यथा रजः ( =विस्तीर्णं ज्योतिः=सूर्यादीनां प्रकाश-पुञ्जो भूम्यां पतति तद्वत् ) अवः पश्यन्ति ( =अवस्तात् पश्यन्ति=दूरगामिनं तेजोमयं दृष्टिपातं सोमपात्रस्योपरि कुर्वन्ति ) । [ ते ] देवयुं ( =देवान् आत्मन इच्छन्तं) [ चमसं ] प्राचैः प्र णयन्ति (=प्राचीनं यथा तथा नयन्ति=गृहीत्वा प्राचीं दिशं प्रति गच्छन्ति ) [ अपि च ] ब्रह्मप्रियं ( =ब्रह्मणा होतृकृतेन स्तोत्रेण द्वारा प्रीणयितारं ) [ तं चमसं ] वरा इव जोषयन्ते ( =एकामेव कन्यकामनेके वरा यथा ममेयं भविष्यति ममेयं भविष्यतीति सेवन्ते तथा ममायं चमसो भविष्यति ममायं भविष्यतीति सेवन्ते ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । होत्रा संस्कृतं सोमचमसं दृष्ट्वा देवा द्युलोकात् चमसस्थले तेजःपुञ्जसदृशं स्वस्य दृष्टिपातं कुर्वन्ति अपि च निम्नप्रदेशं प्रति जलानि यथा गच्छन्ति तथा तं चमसं प्रति गच्छन्ति अपि च तं देवार्थिनं स्तोत्रसाहचर्येण प्रियतरं चमसं सर्वेपि देवा ममायं भविष्यति ममायं भविष्यतीति वाञ्छन्तीति ॥

२. जशा आपो देवी [ सखल जागयाकडेस धांवतात त्याप्रमाणें ] देव होत्यानें सिद्ध केलेल्या सोमपात्राकडेस धांवतात, [ आणि ] विस्तीर्ण प्रकाशाच्या जाळ्याप्रमाणें आपली दृष्टि खालीं पसरतात; [ आणि ] देवार्थी [सोमपात्रा]ला पूर्वेकडेस घेऊन जातात, [आणि] स्तोत्राच्या योगानें आनंद करणाऱ्या [ त्या सोमपात्रा]ची, [ एकाच कन्यकेची] अनेक वर [वांछा करितात] तशी, ते वांछा करितात.

2. The Gods run to the Soma-bowl of the invoker, like as the divine waters [to a low level]. Down they throw their sight like a flood of light; they lead forth the God-devoted bowl to the east; they [ each ] strive for the [ bowl ], dear through the prayer, as many lovers [ strive for the same maiden ].

२. हा मंत्र कांहींसा कठिण आहे. पण याचा भावार्थ स्पष्ट दिसतो तो असा कीं, ' होत्यानें तयार केलेला सोमानें भरलेला प्याला पाहून स्वर्गस्थ देव आनंदित होतात, आणि तेजोमय जो आपला दृष्टिपात तो त्या चमसावर करितात. आणि एकाएकीं भूमीवर यज्ञमंडपांत येऊन तो सोमाचा प्याला घेऊन पूर्वदिशेकडे चालते होतात; आणि एकाद्या सुंदर कन्यकेला वरण्याकरितां आलेले अनेक वर जसे ही मी वरीन, ही मी वरीन अशा उड्या घालतात त्याप्रमाणें हा सोम मी पिईन, हा मी पिईन अशी ईर्ष्या करितात. कारण कीं सुंदर स्तोत्र म्हणून तें पात्र देवांस अर्पण केलेलें असतें त्यामुळें तें देवांला अधिक प्रिय होत असतें.' या मंत्रांत सोमरस पाहून देवांला किती आनंद होतो आणि ते तो पिण्याविषयीं किती उत्सुक असतात तें सांगण्याचा उद्देश आहे.

' आपो देवी ' म्हणजे उदकें. त्यांस देवी असें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, वेदांत त्यांस सचेतन कल्पून त्यांस देवता मानिल्या आहेत. प्रस्तुत स्थळीं जरी त्यांला सचेतन मानण्याचा विशेष उद्देश आहे असें नाहीं, तरी ' देवी ' हें त्यांस बहुत ठिकाणीं विशेषण लागत असल्यामुळें येथेंहि सहज लाविलें गेलें आहे.

' विस्तीर्ण प्रकाशाच्या जाळ्याप्रमाणें ' =' विततं यथा रजः'. म्हणजे, जसा प्रकाशाचा ओढा भूमीवर लोटावा तसा देवांच्या तेजोमय दृष्टीचा लोट सोमपात्राकडेस धांवतो. देवांच्या दृष्टिपाताला प्रकाशाच्या लोटाची उपमा देणें हें साहजिक दिसतें.

**अधि द्वयोरदधा उक्थ्यं१वचो यतस्रुचा मिथुना या सपर्यतः ।**
**असंयत्तो व्रते ते क्षेति पुष्यति भद्रा शक्तिर्यजमानाय सुन्वते॥३॥**

अधि । द्वयोः । अदधाः । उक्थ्यम् । वचः । यतऽस्रुचा । मिथुना । या । सपर्यतः ।
असम्ऽयत्तः । व्रते । ते । क्षेति । पुष्यति । भद्रा । शक्तिः । यजमानाय । सुन्वते ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. [हे इन्द्र], या यतस्रुचा मिथुना (=यौ यतस्रुचौ मिथुनौ=तुभ्यं हविः प्रदातुं पुरस्कृतस्रुचौ यौ दंपती) [त्वां] सपर्यतः (=पूजयतः) [तयोर्] द्वयोरधि (=द्वयोर्मध्ये) [त्वम्] उक्थ्यं वचः (=शंसनीयं वचः=स्तवनीयां वाणीम्) अदधाः (=स्थापयसि=ताभ्यां ददासि)। [त्वादृशो यजमानः] असंयत्तः (=युद्धार्थं शत्रुभिरनभिगतः=निःशत्रुः) [सन्] ते व्रते (=तव कर्मणि) क्षेति (=निवसति)। पुष्यति (=अश्वादिरूपेण धनेन पुष्टः समृद्धो भवति) [च]। त्वदर्थं सुन्वते यजमानाय (=सोममभिषुण्वत उपासकाय) भद्रा शक्तिः (=कल्याणकारि बलं) [भवति]॥

---

'पूर्वेकडेस घेऊन जातात'=' प्राचैः प्र णयन्ति.' सविता, उषा, अश्वी इत्यादिक तेजोमय देव पूर्वेकडून येतात असें समजणें हें योग्यच आहे. त्यावरून त्यांणीं आपल्या स्थानाकडेस पूर्वेला सोमपात्र उचलून नेण्याचें ऋषि सांगतो असें आम्हांस वाटतें.

'स्तोत्राच्या योगानें आनंद करणाऱ्या' =' ब्रह्मप्रियम्.' म्हणजे उपासक लोक स्तोत्र म्हणून सोम अर्पितात यास्तव नुस्ताच सोम अर्पण केल्यास तो जितका देवांला प्रिय होईल त्यापेक्षां स्तोत्राशीं समर्पिलेला सोम विशेष आनंदकारी होतो असें तात्पर्य.

३. [हे इंद्रा], जें जोडपें पळी पुढें करून [ तुला ] पूजितें [त्या] दोघांला [तूं] वर्णनीय वाणी देत असतोस. [तो यजमान] निरुपद्रव [होत्साता ] तुझ्या भक्तींत राहतो [ आणि ] उत्कर्षाप्रत पावतो. [ तुजकारणें ] सोमरस काढणाऱ्या उपासकाला कल्याणकारक शक्ति [ प्राप्त होते ].

3. Thou conferrest, [O Indra ], speech worthy of praise on that couple which, with the ladle stretched forth performs worship [ to Thee ]. Thy worshipper ] lives in thy ordinance, unmolested; [ he ] prospers. On him, who extracts the Soma and sacrifices [ to Thee ], attends beneficent power.

---

३. या मंत्रांत इंद्राच्या भक्ताचें भाग्य वर्णिलें आहे. ऋषि म्हणतो, 'हे इंद्रा, जो यजमान आपल्या स्त्रीसहित बसून तुला हवि अर्पण करितो त्याला आणि त्याच्या स्त्रियेला तूं उत्तम वाणी देतोस, तो यजमान निःशत्रु होतो आणि तुझी भक्ति करीत सुखानें दिवस घालवितो. त्याचा उत्कर्ष होतो. जो यजमान सोमरस काढून तुला अर्पण करितो आणि तुझें यजन करितो त्याला कल्याणकारक बळ प्राप्त होतें,' याप्रमाणें तुझ्या उपासकाचें भाग्य मोठें होय.

'पळी पुढें करून '=' यतस्रुचा.' स्रुच् म्हणजे ज्या पळीनें हवि अर्पण करीत ती पळी. ती सांप्रतच्या काळीं जे यज्ञ करितात त्यांत पळसाच्या अथवा खैराच्या लांकडाची करितात; पुरातन काळींहि लांकडाचीच करीत असतील. कोंकणांत अजूनहि घरांत खाण्याजेवणांत वापरण्याचीं भांडीं लांकडाचीं अथवा दगडाचींच करीत असतात. लांकडाच्या पळीला 'डोली' अथवा 'डावल' आणि लांकडाच्या परादीला 'मांड' म्हणतात आणि हातांत धरण्याच्या मूठीसहित असलेल्या लांकडाच्या बसीला 'हातूल' म्हणतात, हीं जशीं लांकडी भांडीं आपले कोंकणी गरीब लोक वापरतात तसेच आपले पुरातन आर्य लोक लांकडाच्या पळ्या वापरीत.

वृत्तानुरोधानें पहिल्या पादांत 'उक्थिअं वचः' असें म्हटलें पाहिजे.

आदङ्गिराः प्रथमं दधिरे वय इद्धाग्नयः शम्या ये सुकृत्यया ।
सर्वं पणेः समविन्दन्त भोजनमश्वावन्तं गोमन्तमा पशुं नरः॥४॥

आत् । अङ्गिराः । प्रथमम् । दधिरे । वयः । इद्धऽअग्नयः । शम्या । ये । सुऽकृत्यया ।
सर्वम् । पणेः । सम् । अविन्दन्त । भोजनम् । अश्वऽवन्तम् । गोऽमन्तम् । आ । पशुम् । नरः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. आत् (=अपि च) ये अङ्गिराः (=अङ्गिरसः) सुकृत्यया शम्या (=शोभनकृत्ययुक्तया उपासनया) इद्धाग्नयः (=प्रज्वलिताग्नयो) [भवन्ति] [ते] [अङ्गिरसः] प्रथमं (=सर्वेभ्योपि पूर्वं) वयो दधिरे (=हविरन्नमग्नौ प्रार्पयन्) [ते] नरः (=शौर्योपेता) [अङ्गिरसः] पणेः (=एतन्नामकस्यासुरस्य) सर्वं भोजनं (=सकलमपि धनं) अश्वावन्तं गोमन्तम् आ पशुम् (=अश्वसमूहसहितं गोसमूहसहितं पशुजातं च) समविन्दन्त (=अलभन्त) ॥

अत्रेदमुक्तम् । पणिनापहृतानां गवां प्रत्यानयने निमित्ते सति अग्निं समिध्य तस्मिन् हवींषि प्रार्प्य अग्न्युपासनाप्रचारम् अङ्गिरस एव सर्वेभ्योपि मनुष्येभ्यः पूर्वं स्थापितवन्तः । हविषा तृप्तेनाग्निना च प्रवर्धितबलास्ते पणिना सह युद्ध्वा तस्य सर्वं धनं गवाश्वादीनां पशूनां समूहं जित्वा स्वगृहं प्रति नीतवन्तः । अङ्गिरःकृताद् उपासनार्थाद् अग्नेरिन्धनात् पूर्वम् अग्नेरिन्धनं नासीदिति भावः ॥

४. आणि सुचरितयुक्त भक्तीनें जे [अंगिरस] अग्नीतें प्रज्वलित करिते झाले [ते] अंगिरस प्रथम हविरन्न अर्पण करिते झाले. [ते] वीर पणीचें सर्व अन्न [आणि] [त्याच्या] घोड्यांसहित आणि गाईंसहित [सकळ] गुरें हरण करून घेते झाले.

4. And the Angirases, who kindled Agni with devotion full of good deeds, first offered the oblation. [Those] brave ones became possessed of all the wealth of Paṇi with [his] horses, with [his] cows, and his cattle.

४. या मंत्रांत अंगिरस् ऋषींनीं अग्नीची उपासना करण्याचा प्रचार प्रथम घातला असें सांगितलें आहे. ऋषि म्हणतोः– ‘पणिनामक असुरानें अंगिरसांच्या गाई चोरून नेल्या तेव्हां त्या परत मिळाव्या म्हणून अंगिरसांनीं अग्नीला प्रदीप्त केलें आणि हवि अर्पण केलें. त्यापूर्वी अग्नीला प्रदीप्त करून हवि अर्पण्याचा प्रचार नव्हता, तो अंगिरसांनींच घातला. अंगिरसांनीं अग्नीला हवि अर्पण केल्यावर त्यांला विशेष सामर्थ्य येऊन ते पणीबरोबर लढले आणि पणीजवळ असलेलें सर्व द्रव्य, सर्व घोडे, गाई आणि इतर पशु हे सर्व हरण केले.’ याचें तात्पर्य इतकेंच कीं, मेघोदकरूपी आणि उषा आणि सूर्यप्रकाश इत्यादिरूपी ज्या गाई, त्या जेव्हां वृत्ररूपी चोरानें हरण केल्या तेव्हां, मनुष्यमात्रानें अग्नीची उपासना करण्याचा म्हणजे अग्नीतें प्रज्वलित करून त्यांत इंद्रादि देवांसाठीं हवि अर्पण्याचा प्रचार पाडिला, आणि त्या दिवसापासून आजपर्यंत अग्नीची उपासना लोक करीत आहेत.

अंगिरस हे फार प्राचीन देवभक्त होऊन गेले. ते आतां प्राचीन होत असें नाहीं, तर गोतमादिकांनीं प्रस्तुत सूक्तासारिखीं वेदसूक्तें रचिलीं त्या वेळींहि ते अतिप्राचीन होत असें समजून त्यांविषयीं उल्लेख येत असतात. पणि कोण आणि त्यांचा अंगिरसांशीं संबंध काय याजविषयीं सू. ६२, मं. २ याजवरील टीप पहा. त्याच सूक्ताच्या पांचव्या मंत्रावरीलहि टीप पहा. शिवाय, सू. ५१, मं. ३ पहा.

अंगिरसांनीं प्रथम अग्नींत हवि अर्पण्याचा प्रचार घातला असें या मंत्रांत सांगितलें आहे; तसेंच अथर्वा या एका दुसऱ्या अतिप्राचीन उपासकानें यज्ञ करण्याचा प्रचार घातला असें सांगितलें आहे तें पहा.

वृत्तानुरोधानें दुसरा चरण ‘इद्धाग्नयः शमिआ ये सुकृत्यया’ असा म्हटला पाहिजे.

यज्ञैरथर्वा प्रथमः पथस्तते ततः सूर्यो व्रतपा वेन आजनि ।
आ गा आजदुशना काव्यः सचा यमस्य जातममृतं यजामहे॥५॥

यज्ञैः । अथर्वा । प्रथमः । पथः । तते । ततः । सूर्यः । व्रतऽपाः ।
वेनः । आ । अजनि ।
आ । गाः । आजत् । उशना । काव्यः । सचा । यमस्य । जातम् ।
अमृतम् । यजामहे ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. यज्ञैः (=यागैः) अथर्वा (=एतन्नामकः पुराणतरः कश्चिदृषिः) प्रथमः पथस्तते (=पणिहृतानां गवां स्थलं प्रति गच्छतो मार्गान् सर्वेभ्योपि पूर्वम् अकरोत्)। ततः (=तदनन्तरं) व्रतपाः (=व्रतस्य=देवप्रीत्यर्थस्य कर्मजातस्य पालयिता) वेनः (=कान्तः=सर्वैरपि मनुष्यैरपेक्षितः) सूर्य आ अजनि (=गवां प्रदर्शनायाविरभूत्)। [ततोथर्वा] गा आ आजत् (=ता गाः प्राप्य प्रत्याहृतवान्), उशना काव्यः (=काव्य उशना एतन्नामकः कश्चित् पुरातन ऋषिः) सचा [अभूत्] (=सह अभूत्=सहायोभवत्)। [वयं] यमस्य अमृतं जातं यजामहे (=यमस्य मरणरहितं पुत्रं यजामहे=पूजयामः) ॥

अथर्वा नाम प्रख्यातः पुरातन ऋषिर्यज्ञकरणरूपान् मेघजलरूपगवादिलब्धिविषये देवानुग्रहप्राप्तेर्मार्गान् अकरोत् ततः पूर्वं यज्ञप्रचारो नासीदिति भावः। ततः अथर्वणा स्थापितदेवकर्मणां पालयिता सूर्य आविरभूत्। तस्य प्रकाशद्वारा च अथर्वा तथा च उशना काव्यः इत्येतौ ता गाः प्रत्यानीतवन्ताविति संबन्धः ॥

यमस्य जातममृतं यजामह इति दुर्बोधं सायणेनैवं व्याख्यातम्। यमस्य असुराणां नियमनार्थं जातं प्रादुर्भूतममृतं मरणरहितं तमिन्द्रं यजामह इति ॥

५. प्रथम अथर्वा यज्ञांच्या योगानें मार्ग करिता झाला. त्यानंतर कर्मांचा रक्षिता प्रिय सूर्य जन्माला आला. [मग] [अथर्वा] गाई हाकून आणिता झाला. [त्याला] काव्य उशना सहाय [झाला]. यमाच्या अमर पुत्राला [आम्ही] भजतों.

5. With sacrifices Atharvâ was the first to make the paths. Then Sûrya was born, the beloved protector of divine rites. [Atharvâ then] brought back the cows. Kâvya Us'anâ [ became his ] ally. We worship the immortal son of Yama.

---

५. जसा अग्नीच्या उपासनेचा प्रचार प्रथम अंगिरसांनीं घातला असें वर सांगितलें तसें यज्ञ करण्याची चाल अथर्वा या ऋषीनें प्रथम घातली असें या मंत्रांत सांगितलें आहे. ऋषि म्हणतो;–' पूर्वी सूर्याला व त्याच्या ज्या ज्योति तद्रूप गाई आणि जलमेघरूप गाई त्यांचें आच्छादन वृत्रानें केलें तेव्हां त्या गाई पुनः प्राप्त होणें हा जो देवांचा अनुग्रह त्याच्या प्राप्तीसाठीं अथर्वा याणें यज्ञ केले. तेव्हां देव प्रसन्न झाले आणि सूर्य पुनः उत्पन्न झाला आणि देवांप्रीत्यर्थ करावयाचीं कर्में पुनः चालू झालीं; आणि प्रकाशरूप गाई अथर्वा याणें पुनः वळवून आणिल्या. त्याला उशना काव्य हा ऋषि सहाय झाला. तेथपासून यज्ञ करण्याची चाल पडली.'

' अथर्वा.' हा एक अतिप्राचीन ऋषि होय. ह्याणें पूर्वी काय काय केलें त्याविषयीं थोडथोडा उल्लेख वेदांत केव्हां केव्हां येत असतो. सू. ८०, मं. १६ याजवरील टीप पहा.

' जन्माला आला '=' आ अजनि.' म्हणजे प्रगट झाला.

' हाकून आणिता झाला '=' आ आजत्'. म्हणजे, पणीनें ( वृत्रानें ) चोरून नेल्या होत्या त्या पुनः वळवून आणिल्या.

' काव्य उशना.' उशना हाहि एक अतिप्राचीन ऋषि होय. त्याला काव्य असें उपनांव आहे. जशी मनु, अथर्वा, अंगिरा, या अतिप्राचीन ऋषींची प्रसिद्धि वेदांत आहे तशीच उशना याची आहे. सू. ५१, मं. १० याजवरील उशनाविषयींची टीप पहा. जसा अथर्वा अतिप्राचीन तसाच काव्य उशना हा असल्यामुळें दोघांनीं मिळून गाई परत आणिल्या असें सांगितलें आहे.

' यमाच्या अमर पुत्राला आम्ही भजतों '=' यमस्य जातम् अमृतं यजामहे.' आम्हीं शब्दशः जो उघड अर्थ दिसतो तो येथें दिला आहे. पण यमाचा अमर पुत्र कोण हें सांगणें कठिण आहे. यम हा सकळ मनुष्यांचा आद्य पुरुष.

बर्हिर्वा यत्स्वपत्याय वृज्यतेऽर्को वा श्लोकमाघोषते दिवि ।
ग्रावा यत्र वदति कारुरुक्थ्य१स्तस्येदिन्द्रो अभिपित्वेषु रण्यति ॥
॥ ६ ॥ ४ ॥

बर्हिः । वा । यत् । सुऽअपत्याय । वृज्यते । अर्कः । वा । श्लोकम् । आऽघोषते । दिवि ।
ग्रावा । यत्र । वदति । कारुः । उक्थ्यः । तस्य । इत् । इन्द्रः । अभिऽपित्वेषु । रण्यति ॥ ६ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

६. यद् ( =यत्र=यस्योपासकस्य गृहे) बर्हिः स्वपत्याय वृज्यते वा (=बर्हिः कर्मणे छिद्यते=सुकर्मकरणाय बर्हिश्छिद्यमानं भूत्वा आस्तीर्यते ) वा ( =अथवा=अपि च ) [ यत्र ] अर्को दिवि श्लोकम् आघोषते ( =स्तोता इन्द्रस्य स्तोत्रं द्युलोके प्रघोषयति= उदात्तध्वनित्वाद् द्युलोकेपि प्रतिनाद्यमानं स्तोत्रमुच्चारयति) [अपि च] यत्र उक्थ्यः कारुः [ इव ] ग्रावा वदति ( =स्तुत्यः स्तोतेव सोमाभिषवाश्मा मधुरशब्दं करोति ) तस्य [ उपासकस्य ] इत् ( =तस्योपासकस्य एव ) अभिपित्वेषु ( =अभिगमनेषु= उपेतिषु=उपासनासु ) इन्द्रो रण्यति ( =रमते=हर्षं प्राप्नोति ) ॥

यस्योपासकस्य गृहे बर्हिरादिसाधनैः सुकर्म क्रियते, यस्य गृहे परमोदात्तध्वनि-युक्तं स्तोत्रमुच्चार्यते, यस्य गृहे च कविवाणीवन्मधुरनादेन ग्राव्णा सोमाभिषवः क्रियते तस्योपासकस्यैव उपासनाभिरिन्द्रो हृष्यतीत्यर्थः ॥

कारुरुक्थ्य इति लुप्तोपमम् इति सायणाः सम्यक् ॥

---

त्याणें यमीच्या पोटीं ‘ मनु ’ उत्पन्न केला अशी कथा आहे. तेव्हां अमर-कीर्तिमान् मनु ऋषि असा कदाचित् अर्थ होईल. सायणाचार्य “ असुरांच्या नियमनासाठीं प्रादुर्भूत झालेल्या अमर [ इन्द्राला ] आम्ही [ हवींनीं ] भजतों ” असा अर्थ करितात.

हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें वृत्ताला वसतोः—

यज्ञैरथर्वा प्रथमः पथस्तते
ततः सूर्यो व्रतपा वेन आजनि ।
आ गा आजदुशना काव्यः सचा
यमस्य जातममृतं यजामहे ॥

६. ज्या [उपासका]च्या येथें सुकर्माकरितां दर्भ कापून सिद्ध होतात, अथवा [जेथें] स्तोता [इन्द्राचें] स्तोत्र द्युलोकीं गाजवितो, [आणि] जेथें वर्णनीय गायका-[प्रमाणें] ग्रावा ध्वनि करितो, त्याच [उपासका]च्या उपासनांनीं इंद्र आनंदित होतो.

6. Where the Kus'a-[grass] is cut for [the performance of] a good rite, or [where] the singer causes [Indra's] praise to be resounded in Heaven, [and] where the Soma-pressing stone sounds [like] an excellent poet—in the offerings of that man alone does Indra delight.

६. या मंत्रांत इंद्र कोणा उपासकाच्या कसल्या उपासनेला पाहून आनंदित होतो तें सांगितलें आहे. ऋषि म्हणतात:— 'ज्या उपासकाचे घरीं दर्भ पसरून सत्कर्मे आचरतात, आणि ज्याच्या घरीं इंद्राची स्तुति इतक्या मोठ्या ध्वनीनें गाइली जाते कीं तिचा प्रतिध्वनि द्युलोकाहून ऐकूं येतो, आणि ज्याच्या घरीं सोम काढण्याचें काम ग्रावा म्हणून पाषाण असतो त्यांत चालून त्या ग्राव्याचा मधुर ध्वनि एकाद्या उत्तम गायकाच्या ध्वनीप्रमाणें ऐकूं येतो, त्याच उपासकाची उपासना पाहून इंद्राला आनंद होतो.'

ग्रावा म्हणून ज्या पाषाणांत सोमरस काढीत त्याच्या आवाजाच्या मधुरपणाविषयीं वेदांत अनेक उल्लेख येत असतात. सू. २८, मं. ५ आणि त्याजवरील टीप पहा. ग्राव्याचा मधुर ध्वनि ऐकून देवांस आनंद होतो आणि ते तेथें धांवत येतात असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं म्हटलेलें आढळतें. "जेथें ग्रावा वाजतो तेथें तुम्ही जा" (यत्र ग्रावा वदति तत्र गच्छतम् १. १३५. ७) असें वायु आणि इंद्र यांस म्हटलें आहे. ऋ. ५. ३६. ४ यांत 'हे इंद्रा, हा स्तोता ग्राव्याप्रमाणें उच्च ध्वनीनें तुझें स्तोत्र गात आहे' (एष ग्रावेव जरिता ते इन्द्र इयर्ति वाचं बृहत्) असें म्हटलें आहे. ग्रावा या पाषाणावर उपासकाची आणि उपास्य देवतांची फार प्रीति असे असें वेदवाक्यांवरून समजून येतें. सू. ८४, मं. ३ पहा.

'द्युलोकीं गाजवितो'=' दिवि आघोषते '. स्तोत्र म्हणणें तें फार मोठ्यानें म्हटल्यास देवांला विशेष प्रिय होतें असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. आणि असें समजणें हें स्वाभाविक आहे.

हा या सूक्ताचा उपसंहार आहे. येथपर्यंत गोतमाचीं सूक्तें विचारदृष्ट्या अवलोकून पहातां पुरातन ऋषि आधुनि-

## सूक्तम् ८४.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । इन्द्रो देवता । आदितः षड् अनुष्टुभः । सप्तम्याद्यास्तिस्र उष्णिहः । दशम्याद्यास्तिस्रः पङ्क्तयः । त्रयोदश्याद्यास्तिस्रो गायत्र्यः । षोडश्याद्यास्तिस्रस्त्रिष्टुभः । एकोनविंशी बृहती । विंशी सतोबृहती ॥

**असावि सोम इन्द्र ते शविष्ठ धृष्णवा गहि ।**
**आ त्वा पृणक्त्विन्द्रियं रजः सूर्यो न रश्मिभिः ॥ १ ॥**

असावि । सोमः । इन्द्र । ते । शविष्ठ । धृष्णो इति । आ । गहि ।
आ । त्वा । पृणक्तु । इन्द्रियम् । रजः । सूर्यः । न । रश्मिऽभिः ॥१॥

**इन्द्रमिद्धरी वहतोऽप्रतिधृष्टशवसम् ।**
**ऋषीणां च स्तुतीरुप यज्ञं च मानुषाणाम् ॥ २ ॥**

इन्द्रम् । इत् । हरी इति । वहतः । अप्रतिधृष्टऽशवसम् ।
ऋषीणाम् । च । स्तुतीः । उप । यज्ञम् । च । मानुषाणाम् ॥ २ ॥

### भाषायाम्.

१. हे इन्द्र, ते ( =त्वदर्थं ) सोमः असावि ( =अभिषुतोस्ति ) । [ तस्मात् ] हे शविष्ठ ( =अतिशयेन बलिन् ) धृष्णो ( =शत्रूणां जेतः ), [ त्वम् ] आ गहि ( =अस्मान् प्रति आगच्छ ) । [ सोमरसपानाज्जातम् ] इन्द्रियं ( =तव सामर्थ्यं ) सूर्यो रश्मिभी रजो न ( =सूर्यः स्वैः किरणैरन्तरिक्षं यथा=सूर्यो यथा स्वकिरणैरन्तरिक्षं पूरयति तद्वत् ) त्वा ( =त्वाम् ) आ पृणक्तु ( =परिपूरयतु ) ॥

२. अप्रतिधृष्टशवसम् ( =अहिंसितबलम्=अप्रतिहतसामर्थ्योपेतम् ) इन्द्रम् इत् ( =इन्द्रमेव ) हरी ( =हरिद्वर्णोपेतावश्वौ ) ऋषीणां च स्तुतीरुप ( =कवीनां स्तोत्राणि प्रति ) मानुषाणां यज्ञं च [ उप ] ( =सूक्तकरणसामर्थ्यहीनानां मनुष्याणां यज्ञं प्रति च ) वहतः ( =आनयतः ) ॥

नान्यस्य देवस्य तर्हि इन्द्रस्यैव हरी स्त इति तथा सर्वेपि कवयः सर्वेपि यजमानाश्च इन्द्रमेव सूक्तैर्हविर्भिश्च भजन्त इति च भावः ॥

---

क देवोपासकांहून अधिक शक्तिमान् अथवा भिन्नस्वभावाचे आणि भिन्नस्थितीचे होते असें पुराणांतरीं सांगितलें आहे तरी वस्तुतः ते तसे नव्हते असें यावरून उघड दिसून येतें.

हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें श्लोकवृत्ताला बसतोः--

बर्हिर्वा यत् सुअपत्याय वृज्यते
अर्को वा श्लोकमाघोषते दिवि ।
ग्रावा यत्र वदति कारुरुक्थिअः
तस्येदिन्द्रो अभिपित्वेषु रण्यति ॥

## सूक्त ८४.

ऋषि–रहूगणाचा पुत्र **गोतम**. देवता–**इन्द्र**. वृत्त–१-६ **अनुष्टुभ्**, ७-९ **उष्णिक्**, १०-१२ **पङ्क्ति**, १३-१५ **गायत्री**, १६-१८ **त्रिष्टुभ्**, १९ **बृहती**, २० **सतोबृहती**.

१. हे इंद्रा, तुजकारणें सोम काढिला आहे; हे परमशक्तिमान् शूरा, तूं ये. सूर्य [आपल्या] किरणांनीं अंतरिक्ष [व्यापितो] तसें [सोमपानानें आलेलें] सामर्थ्य तुला व्यापो.

२. ऋषींच्या स्तोत्रांप्रत आणि मनुष्यांच्या यज्ञाप्रत अप्रतिहतशक्तिमान् इंद्रालाच पिवळ्या घोड्यांची जोडी घेऊन येत असते.

## HYMN 84.

To *Indra*. By *Gotama* son of *Rahûgaṇa*. Metre—verses 1–6 *Anushṭup*, 7–9 *Ushṇik*, 10–12 *Pankti*, 13–15 *Gâyatrî*, 16–18 *Trishṭup*, 19 *Brihatî*, and 20 *Satobrihatî*.

1. The Soma has been pressed for thee, O Indra. Come thou, mightiest [and] brave [Indra]. May thy [Soma-inspired] strength pervade thee as Sûrya pervades the sky with [his] rays.

2. None but Indra of irresistible prowess do the pair of tawny horses bring to the hymns of poets and to the sacrifices of men.

---

१ हेंहि सूक्त गोतम ऋषींचेंच आहे. गोतम ऋषि इन्द्राकरितां सोम सिद्ध करून इंद्राला तो पिण्यासाठीं बोलावीत आहे आणि म्हणतो कीं, 'जसा सूर्य आपल्या प्रभेनें सर्व आकाश भरून टाकितो तसें आमचा सोम पिऊन जें सामर्थ्य तुझ्या आंगीं येईल तें तुला अगदीं भरून टाको. म्हणजे तुझें सर्व शरीर बलाविष्ट होओ.– म्हणजे आमचा सोम तुला अतिशय सामर्थ्य आणणारा असा आहे, यास्तव तूं सत्वर ये आणि तो पी.'

या मंत्रांत 'इंद्रिय' शब्द मूळ अर्थीं योजिलेला आहे. सू. ५५, मं. ४ पहा.

हा मंत्र आधुनिक अनुष्टुभाप्रमाणेंच म्हणतां येतो, मात्र तिसरा पाद 'आ त्वा पृणक्तु इन्द्रियम्' असा म्हटला पाहिजे.

२. यांत इंद्राचा महिमा सांगितला आहे. 'सुंदर दोन पिवळे घोडे इंद्राच्याच रथाला जोडिलेले असतात, दुसऱ्या देवांच्या रथाला जोडिलेले नसतात, आणि सकळ ऋषि, म्हणजे कवि आणि सकळ उपासक हे एकट्या इंद्राचींच स्तोत्रें गातात आणि इंद्राप्रीत्यर्थच यज्ञ करितात; तशी इतर देवांची स्तुति गात नाहींत आणि

आ तिष्ठ वृत्रहन्रथं युक्ता ते ब्रह्मणा हरी ।
अर्वाचीनं सु ते मनो ग्रावा कृणोतु वग्नुना ॥ ३ ॥
आ । तिष्ठ । वृत्रऽहन् । रथम् । युक्ता । ते । ब्रह्मणा । हरी इति ।
अर्वाचीनम् । सु । ते । मनः । ग्रावा । कृणोतु । वग्नुना ॥ ३ ॥
इममिन्द्र सुतं पिब ज्येष्ठममर्त्यं मदम् ।
शुक्रस्य त्वाभ्यक्षरन्धारा ऋतस्य सादने ॥ ४ ॥
इमम् । इन्द्र । सुतम् । पिब । ज्येष्ठम् । अमर्त्यम् । मदम् ।
शुक्रस्य । त्वा । अभि । अक्षरन् । धाराः । ऋतस्य । सदने ॥ ४ ॥

## भाषायाम्.

३. हे वृत्रहन्, [ त्वं ] रथम् आ तिष्ठ ( =स्वरथेऽस्माकं समीप आयातुमारूढो भव ) । ते हरी ( =तवाश्वौ ) [ हि ] ब्रह्मणा ( =अस्माकं स्तोत्रेण) युक्ता (=युक्तौ=रथे योजितौ ) [ स्तः ] । [ तस्माद् ] ग्रावा ( =सोमाभिषवाश्मा ) वग्नुना ( =स्वनादेन ) ते मनः ( =तव बुद्धिं ) सु अर्वाचीनं कृणोतु (=सुष्टु अस्मदभिमुखं करोतु=अस्माकं समीप आगन्तुकामं करोतु ) ॥

४. हे इन्द्र, [ त्वम् ] इमं ( =पुरोवर्तिनम् अस्माभिः प्राप्यमाणं ) ज्येष्ठम् (=अतिशयेन प्रशस्तम् ) अमर्त्यम् ( =मरणरहितानां देवानाम् उचितं ) मदं ( =मादकारिणं ) सुतम् ( =अभिषुतं सोमं ) पिब । [ अस्मिन्नस्माकम् ] ऋतस्य सदने (=सत्यरूपस्य यज्ञस्य गृहे ) [ हि ] शुक्रस्य धाराः ( =दीप्तस्य सोमस्य धाराः ) त्वा अभि ( =त्वाम् अभिमुखीकृत्य ) अक्षरन् ( =वहन्ति ) ॥

इतर देवांप्रीत्यर्थ यज्ञ करीत नाहींत.'

'अप्रतिहतशक्तिमान्'= 'अप्रतिधृष्टशवसम्.' म्हणजे, ज्याच्या बळावर वर्चस्व करणारें असें बळ कोणासच नाहीं, ज्याचें बळ इतकें आहे कीं त्याला मागें हटविणारें बळ दुसऱ्या कोणासच नाहीं.

या मंत्रांत ऋषि आणि साधारण मनुष्यांत भेद दाखविला आहे; जसें कोण म्हणेल, ऋषि हे साधारण मनुष्यांपैकीं नव्हेत. पण विवक्षा इतकीच दिसते कीं सूक्तें रचणारे आणि देवांस प्रसन्न करून घेणारे जे कवि ते इंद्राची स्तुति गातात, आणि इतर मनुष्य कीं ज्यांला सूक्तें रचण्याची शक्ति नाहीं ते त्याची उपासना नुस्ता यज्ञ करूनच करितात.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें अनुष्टुप् वृत्ताला बसतोः---

इन्द्रमिद्धरी वहतः
अप्रतिधृष्टशवसम् ।
ऋषीणां च स्तुतीरुप
यज्ञं च मानुषाणआम् ॥

३. हे वृत्रघ्ना [इंद्रा], तूं [आपल्या] रथावर आरूढ हो. [आमच्या] स्तोत्रानें तुझ्या घोड्यांची जोडी [ रथाला ] जोडिली आहे. ग्रावा [ आपल्या ] मधुर नादानें तुझें मन आम्हांविषयीं अनुकूळ करो.

3. Mount [thy] chariot O killer of Vṛitra. Thy pair of tawny horses is harnessed by our prayer. May the Soma-pressing stone with [its] sound make thy mind tend unto us.

४. हे इंद्रा, हा अत्युत्तम, अमर्त्य [ आणि ] माद उत्पन्न करणारा सोमरस [तूं] पी. [या आमच्या] यज्ञगृहांत पवित्र [सोमा]-च्या धारा तुजकडेस वाहत आहेत.

4. Drink thou, O Indra, this excellent, immortal [ and ] exhilarating Soma-juice. In [this] house of sacrifice the streams of brilliant Soma are flowing towards thee.

---

३. 'हे इंद्रा, आम्हीं स्तोत्र म्हणून तुझे घोडे तुझ्या रथाला जोडिले आहेत; तर तूं ऊठ आणि आम्हांकडे येण्यास्तव तूं त्या रथांत बैस. हा पहा आम्ही सोम तुजकरितां काढीत आहों, त्यांत ग्रावा पाषाण आनंदकारक नाद करीत आहे. हा ऐकून आम्हांजवळ येण्याविषयीं तुझें मन वळो.'

'स्तोत्रानें तुझ्या घोड्यांची जोडी [ रथाला ] जोडिली आहे '=' युक्ता ते ब्रह्मणा हरी.' वर ८२ व्या सूक्ताचा ६वा मंत्र आणि त्याजवरील टीप पहा.

हा मंत्र तर दीर्घह्रस्वांच्या कोणत्याहि व्यत्ययाशिवाय अनुष्टुभाप्रमाणें म्हणतां येतो.

४ 'हे इंद्रा, हा आम्हीं तुजकारणें सिद्ध केलेला सोम अत्युत्तम, अमर्त्य देवांनीं पिण्यास योग्य आणि मादकारक आहे, आणि त्या लकलकीत सोमाच्या धारा या आमच्या यज्ञगृहांत तुजकडे जाण्यासाठीं जणूं वाहत आहेत; तर तूं हा सोम पी.'

'अमर्त्य '=' अमर्त्यम्.' म्हणजे मरण न येई असें करणारा असा सायणाचार्य येथें अर्थ करितात. आणि ऋ. २. ३७. ४ या मंत्रावरील भाष्यांत सुद्धा तोच अर्थ त्यांणीं स्पष्टपणें केला आहे; तो घेतला तरी चांगला संभवतो.

'यज्ञगृहांत '=' ऋतस्य सदने.' अक्षरशः अर्थ 'सत्याच्या गृहीं' म्हणजे, सत्यमय जो यज्ञ तो जेथें करावयाचा त्या स्थळीं. यज्ञ करणें हाच खरा धर्म आणि तेंच सत्याचें तत्त्व होय असें आपले आर्य पूर्वज मानीत असत, त्यामुळें यज्ञगृहाला

इन्द्राय नूनमर्चतोक्थानि च ब्रवीतन ।
सुता अमत्सुरिन्दवो ज्येष्ठं नमस्यता सहः ॥ ५ ॥ ५ ॥
इन्द्राय । नूनम् । अर्चत । उक्थानि । च । ब्रवीतन ।
सुताः । अमत्सुः । इन्दवः । ज्येष्ठम् । नमस्यत । सहः ॥ ५ ॥ ५ ॥
नकिष्ट्वद्रथीतरो हरी यदिन्द्र यच्छसे ।
नकिष्ट्वानु मज्मना नकिः स्वश्व आनशे ॥ ६ ॥
नकिः । त्वत् । रथिऽतरः । हरी इति । यत् । इन्द्र । यच्छसे ।
नकिः । त्वा । अनु । मज्मना । नकिः । सुऽअश्वः । आनशे ॥ ६ ॥

## भाषायाम्.

५. [ हे ऋत्विजः ], [ यूयम् ] इन्द्राय (=इन्द्रप्रीत्यर्थं) नूनं (=क्षिप्रम्) अर्चत (=गायत) उक्थानि च ब्रवीतन (=सूक्तानि ब्रूत च) [ अस्माकम् एते ] सुताः (=अभिषुता) इन्दवः (=सोमबिन्दवः=सोमरसा) [ इन्द्रम् ] अमत्सुः (=मत्तं कुर्वन्तु)। [ यूयं ] ज्येष्ठं सहः (=अतिशयेन प्रशस्याम् इन्द्ररूपिणीं शक्तिं) नमस्यत (=नमस्कुरुत=भजध्वम्) ॥

६. हे इन्द्र, यद् (=यदा) [ त्वं ] हरी (=तव पीतवर्णावश्वौ) यच्छसे (=रथे योजयसि) [ तदा ] त्वद् रथितरो नकिः (=त्वत्तः शोभनरथवत्तरो नास्ति=त्वद्रथात् कस्याप्यन्यस्य शोभनतरो रथो न भवति)। त्वा (=त्वां) मज्मना (=बलेन) नकिः अनु [ आनशे ] (=न कोपि प्राप=त्वत्समानत्वं कोपि न प्राप्नोति)। स्वश्वो नकिः [ त्वाम् अनु ] आनशे (=शोभनाश्वयुक्तः कोपि त्वत्समानतां न प्राप=त्वदश्वसमानाः शोभनाश्वाः कस्यापि न सन्ति) ॥

'सत्याचें गृह' असें या ऋचेंत म्हटलें आहे. आधुनिक काळीं खिस्ती लोक सद्धा खिस्ताच्या धर्माला नुस्तें "सत्य" (The Truth) असें नांव देत असतात. इतर लोक जो धर्म आचरितात तो पाषाण्ड होय आणि आपण आचरीत आहों तोच कायतो खरा धर्म आहे अशी ज्याची खात्री झालेली असते त्यानें आपल्या धर्मास 'सत्य' असें नांव देणें हें साहजिक आहे.

श्लोकीकरणः—

इममिन्द्र सुतं पिब
ज्येष्ठममर्तिअं मदम् ।
शुक्रस्य त्वाभि अक्षरन्
धारा ऋतस्य सादने ॥

यांत 'सदने' असें पद असावें त्या-

५. [ हे मित्रांनो ], [ तुम्ही ] इंद्राप्रीत्यर्थ सत्वर गा आणि स्तोत्रें म्हणा. [ हे आपले ] गाळून काढिलेले सोमरस [ त्याला ] मत्त करोत. [त्या] सर्वोत्कृष्ट शक्तीला [तुम्ही] नमस्कार करा.

६. हे इंद्रा, [तूं] जेव्हां [आपले] पिवळे घोडे [रथाला] जोडितोस [ तेव्हां ] तुझ्यापेक्षां चांगला रथ कोणाचाहि नसतो. कोणीहि बळाविषयीं तुझी बरोबरी करणारा नाहीं. उत्तम घोड्यांविषयीं तुझ्या बरोबरीला कोणीहि आलेला नाहीं.

5. Quickly do ye, [ friends ], sing in honour of Indra, and chant hymns. The distilled drops shall intoxicate [ him ]. Adore ye [ that ] excellent power.

6. None possesses, O Indra, a better chariot than thine when thou harnessest thy pair of tawny horses [ to thy chariot ]. None has equalled thee in power. None has equalled [ thee ] in excellent horses.

ऐवजीं 'सादने' असा प्रयोग केला आहे तो केवळ वृत्तसुखासाठीं आहे. ह्रस्वाचें दीर्घ आणि दीर्घाचें ह्रस्व आपले आधुनिक कविच करितात असें नाहीं. वेदांतहि त्याचीं उदाहरणें क्वचित् सांपडतात.

५. ऋषि आपल्या मित्रांस म्हणतो, 'तुम्ही इंद्राप्रीत्यर्थ सत्वर स्तोत्रें गा म्हणजे तो येईल; आणि तो आल्यावर त्याला हे आमचे गाळून काढिलेले सोमरस माद आणितील आणि तो तेणेंकरून आनंदित होईल. या प्रकारेंकरून तुम्ही या इंद्ररूपी महा शक्तीला नमस्कारादिकांनीं भजा.'

'हे गाळून काढिलेले सोमरस'= 'सुता इन्दवः'. अक्षरशः अर्थ, 'गाळून काढिलेले थेंब.' मद्य जसें भट्टींतून एक एक बिंदूच्या रूपानें गाळून काढितात तसाच सोमरस पवित्रांतून एक एक थेंबाच्या रूपानें गाळून काढीत यास्तव अनेक बिंदूंच्या द्वारें खालीं गळून एकवट झालेला असल्यामुळें सोमाला अनेकवचन वेदांत केव्हां केव्हां येत असतें. याच कारणानें अथवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या कारणास्तव कितीएक भाषांत पातळपदार्थास नित्य अनेकवचन असतें. संस्कृतांतच 'आपः' हें नित्य अनेकवचनच असतें. कानडींत 'नीरु' (=उदक ) हालु (=दुध ) हीं नित्य अनेकवचनी असतात.

'त्या सर्वोत्कृष्ट शक्तीला'='ज्येष्ठं सहः.' अक्षरशः, 'सर्वाहून वडील शक्ती-

य एक इद्विदयते वसु मर्ताय दाशुषे ।
ईशानो अप्रतिष्कुत इन्द्रो अङ्ग ॥ ७ ॥
यः । एकः । इत् । वि॒ऽदयते । वसु । मर्ताय । दाशुषे ।
ईशानः । अप्रतिऽस्कुतः । इन्द्रः । अङ्ग ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. य एक इत् ( =य एक एव ) [ इन्द्रो ] दाशुषे मर्ताय ( =हविर्दत्तवते मनुष्याय ) वसु विदयते ( =धनं विशेषेण ददाति ) [ स ] इन्द्रः अङ्ग ( =इन्द्र एव ) अप्रतिष्कुत ईशानः ( =अप्रतिहतः प्रभुः ) [ भवति ] ॥

तें.' म्हणजे इंद्ररूप जी शक्ति तिजला असा अर्थ. ऋ. ६. ६०. १ यांत इंद्र आणि अग्नि या दोघांस 'सहस्तमा' म्हणजे 'उत्कृष्टशक्ति' असें म्हटलें आहे. या प्रकारच्या विशेषणांवरून इंद्र आणि अग्नि ह्या देवांचें खरें स्वरूप आपले आर्य पूर्वज समजत असत आणि त्याप्रमाणें तें वर्णांत असत असें उघड होतें.

६. 'हे इंद्रा, तूं जेव्हां आपले पिवळे घोडे आपल्या रथाला जोडितोस तेव्हां तुझा रथ इतका सुंदर आणि भव्य होतो कीं त्यासारिखा रथ कोणालाहि नाहीं. तुझें बळ इतकें आहे कीं त्यासारिखें बळ दुसऱ्या कोणालाहि नाहीं. तुझे नुसते घोडेच घेतले तरी त्या घोड्यांसारिखे घोडे आणखी कोणाजवळहि नाहींत.'

वृत्तानुरोधेंकरून 'नकिः सुअश्व आनशे' असा पाठ म्हटला पाहिजे.

७. हवि अर्पण करणाऱ्या मर्त्याला जो एकलाच धनसंपत्ति देत असतो तो इंद्रच निष्कंटक प्रभु [ होय ].

7. He who alone confers wealth on the mortal that has sacrificed—that Indra alone is the Lord unopposed.

७. 'हवीनें इत्यादि उपासना करणारे जे मर्त्य त्यांस इंद्रच संपत्ति देत असतो, दुसरा देव देत नसतो. त्यापेक्षां सकळांचा प्रभु एकटा इंद्र होय, दुसरा कोणी प्रभु नाहीं, आणि त्याला कोणत्याच गोष्टीविषयीं प्रतिबंध करणारा कोणीच नाहीं.'

या मंत्राचें वृत्त उष्णिक् आहे. या वृत्ताच्या स्वरूपाविषयीं सू. ७९, मं. ४ याजवर दिलेली टीप पहा. पुढच्या दोन मंत्रांचेंहि तेंच वृत्त आहे. आणि 'इन्द्रो अङ्ग' हीं जीं तिसऱ्या पादाचीं शेवटचीं च्यार अक्षरें तीं पालवपदाच्या रूपानें तीनहि मंत्रांत आलीं आहेत. तिसऱ्या चरणाचीं पहिलीं आठ अक्षरें अनुष्टुपाच्या चरणाप्रमाणें म्हणतां येतात असें प्रस्तुत सूक्तावरून दिसतें. आणि हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणतां येतो.

य एक इद्विदयते
वसु मर्ताय दाशुषे ।
ईशानो अप्रतिष्कुतः
इन्द्रो अङ्ग ॥

कदा मर्तमराधसं पदा क्षुम्पमिव स्फुरत् ।
कदा नः शुश्रवद्गिर इन्द्रो अङ्ग ॥ ८ ॥
कदा । मर्तम् । अराधसम् । पदा । क्षुम्पम्ऽइव । स्फुरत् ।
कदा । नः । शुश्रवत् । गिरः । इन्द्रः । अङ्ग ॥ ८ ॥
यश्चिद्धि त्वा बहुभ्य आ सुतावाँ आविवासति ।
उग्रं तत्पत्यते शव इन्द्रो अङ्ग ॥ ९ ॥
यः । चित् । हि । त्वा । बहुऽभ्यः । आ । सुतऽवान् । आऽविवासति ।
उग्रम् । तत् । पत्यते । शवः । इन्द्रः । अङ्ग ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. [ इन्द्रः ] अराधसम् ( =अयष्टारं ) मर्तं ( =मनुष्यं ) क्षुम्पम् इव ( =अहिच्छत्रमिव ) पदा ( =पादेन ) कदा स्फुरत् ( =स्फुरिष्यति बाधिष्यते ) ? इन्द्रो अङ्ग ( =इन्द्र एव=इन्द्रः खलु ) नः ( =अस्माकं ) गिरः ( =स्तुतीः ) कदा शुश्रवत् ( =शृणुयात्=श्रोष्यति ) ?

क्षुम्पमिवेत्यत्र सायणा एवमाहुः । क्षुम्पमिव अहिच्छत्रकमिव......यथाहिच्छत्रं मण्डलाकारेण शयानं कश्चिदनायासेन हन्ति । एवमिन्द्रोपि कदास्मच्छत्रून् हनिष्यतीत्यर्थः । * * * अत्र निरुक्तम् । क्षुम्पमहिच्छत्रकं भवति यत् क्षुभ्यते । कदा मर्तमनाराधयन्तं पादेन क्षुम्पमिवावस्फुरिष्यति । इति ॥

अङ्गेति एवार्थो निपात इति महित्वम् अग्ने त्वमङ्ग वित्से ( ऋ. १०. ४. ४ ) इत्यत्र सम्यक् सायणाः ॥

९. [ हे इन्द्र ], यश्चिद्धि ( =यः कोपि खलु ) [ उपासकः ] सुतावान् (=सुतवान्=अभिषुतसोमः सन् ) बहुभ्य आ ( =अन्येभ्यो बहुभ्यो देवेभ्यः सकाशात् ) त्वा ( =त्वाम् ) [ एव ] आविवासति ( परिचरति=भजते ) तत् उग्रं शवः (=तद् अन्यदेवतौदासीन्यात्मकं त्वद्भजनरूपं च यद् उद्गीर्णं श्रेष्ठं बलं तद् ) इन्द्रो अङ्ग ( =इन्द्र एव ) पत्यते ( =ईष्टे=तस्य बलस्य इन्द्र एव ईष्टे=हे इन्द्र, त्वमेव तस्य बलस्य प्रभुरसि ) ॥

हे इन्द्र, सर्वेपि यजमाना अन्यदेवांस्त्यक्त्वा त्वामेव सोमैर्भजन्ते । त्वं हि सर्वान् यजमानांस्त्वामेव परिचारयसि । इदं त्वदुपासनायां सकलानां प्रवर्तयितृ यन्महाबलं तत्त्वैवास्ति नान्येषां देवानामिति भावः ॥

८. [ इंद्र ] यज्ञ न करणाऱ्या मर्त्याला अळंब्याला पायानें [ चिरडल्या]प्रमाणें इंद्र स्वत: केव्हां चिरडून टाकील? इन्द्र आमची प्रार्थना केव्हां ऐकेल ?

९. बहुत [ देवां]स सोडून म्हटला तो [उपासक] सोम सिद्ध करून जो तुला [ च ] भजतो तो, हे इंद्रा, तुझाच महा पराक्रम होय.

8. When will Indra—[ Indra ] himself—trample the unsacrificing mortal like a Mushroom under [his] foot ? when will Indra himself hear our prayers ?

9. That every [worshipper ] whatsoever, having extracted the Soma, serves Thee in preference to many [ other Gods ], is O Indra, due to thine own great power.

---

८. 'आम्हांप्रमाणें इंद्राप्रीत्यर्थ यज्ञ न करणारे जे अभक्त मनुष्य त्यांस इंद्रानें अळंबें चिरडून टाकिल्याप्रमाणें चिरडून टाकावे अशी आम्ही वारंवार प्रार्थना करीत असतों ती आमची प्रार्थना ऐकून इंद्र त्या अभक्तांस कधीं नाहींसे करून टाकील बरें ?'

'अळंब्याला'='क्षुम्पम्.' हें एका वनस्पतीचें नांव आहे. ज्याला 'अहिच्छत्र' असें संस्कृतांत म्हणतात आणि जी गोलाकार असते अशी वनस्पति अथवा जिचें गोलाकार फळ असतें अशी एक वनस्पति तेंच क्षुम्प होय, असें सायणाचार्यांच्या आणि यास्कांच्या भाष्यांवरून दिसून येतें; पण ती कोंणती वनस्पति तें निश्चयानें सांगवत नाहीं. तथापि ज्याला 'अळंबें' अथवा 'छत्री' असें म्हणतात तसली एकादी वनस्पति अथवा वाळक्यासारिखें एकादें फळ असावें असें दिसतें. म्हणून आम्हीं 'अळंबें' या शब्दानें भाषांतर केलें आहे.

'स्वत: इन्द्र'='इन्द्रो अङ्ग.' 'अङ्ग' हें अव्यय 'एव' या अर्थी वेदांत येत असतें, त्याप्रमाणें येथें आलें आहे. ऋ. १०. ४. ४; ७. ५६. २; ८. ८०. ३ आणि ६. ५२. ३ आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावा:—

कदा मर्तमराधसं
पदा क्षुम्पमिव स्फुरत् ।
कदा नः शुश्रवत् गिरः
इन्द्रो अङ्ग ॥

९. 'हे इंद्रा, जो पाहिला तो उपासक इतर देवांला सोडून सोमरसांनीं तुलाच भजतो. तर इतर देवांला सोडून देऊन आपलीच उपासना जनाकडून करवून घेणें ही जी महा शक्ति ती तु-

स्वादोरित्था विषूवतो मध्वः पिबन्ति गौर्यः ।
या इन्द्रेण सयावरीर्वृष्णा मदन्ति शोभसे वस्वीरनु स्वराज्यम् ॥
॥ १० ॥ ६ ॥

स्वादोः । इत्था । विषुऽवतः । मध्वः । पिबन्ति । गौर्यः ।
याः । इन्द्रेण । सऽयावरीः । वृष्णा । मदन्ति । शोभसे । वस्वीः ।
अनु । स्वऽराज्यम् ॥ १० ॥ ६ ॥

## भाषायाम्.

१०. गौर्यः (=गौरवर्णा गावः=इन्द्रस्य गावः) स्वादोः (=स्वादुभूतस्य) इत्था विषूवतः (=सत्यमेव सर्वव्यापिनो) मध्वः (=माधुर्योपेतस्य सोमस्य) [भागं] पिबन्ति । या [गौर्यः] इन्द्रेण सयावरीः (=इन्द्रेण सयावर्यः=तेन सह गच्छन्त्यः सत्यः) शोभसे वृष्णा मदन्ति (=शोभितुं वीर्यवतेन्द्रेण सह हृष्यन्ति=वीर्यवतेन्द्रेण सह हृष्टा भूत्वा शोभन्ते) [याश्च] स्वराज्यम् अनु (=इन्द्रस्य स्वाधिपत्यमनुलक्ष्य) वस्वीः (=वस्व्यः=साध्व्यः) [सन्ति] ॥

या गाव इन्द्रेण सह गच्छन्त्यः वीर्यवता तेन सह हृष्टा भवन्त्यः स्वयमेव गौरवर्णाः सत्योपि अधिकं शोभन्ते ता गौरवर्णा गावः इन्द्राय प्रार्पितस्य स्वादिममाधुर्यादिगुणोपेतस्य सोमस्य भागं पिबन्तीत्यर्थः ॥ किंस्वरूपाः किल गाव इन्द्रस्येत्याकाङ्क्षां न सायणा अपि समादधति ॥

लाच आहे, इतर देवांला नाहीं. इतर देव आणखी नाहींत म्हणून जन तुला भजतात असें नाहीं, अथवा चुकून तुला भजतात असेंहि नाहीं; तर इतर देव आहेत असें ठाऊक असतांहि त्यांस सोडून तुलाच भजतात. आणि इतर देवांकडे प्रवृत्ति न होऊं देतां आपणाकडेसच सर्व उपासक जनांचीं मनें लावून घेणें ही शक्ति तुलाच आहे, इतरांला नाहीं.'

हा मंत्र थोडा कठिण आहे. पहिल्या पादांत इंद्राला संबोधन करून द्वितीयपुरुषीं निर्देश करूनहि तिसऱ्या चरणांत आणि पालवपदांत इंद्राविषयीं तृतीयपुरुषीं निर्देश आहे; तेणेंकरून अन्वय दुर्बोध झालेला आहे. जर ऋचा 'यश्चिद्धि तं बहुभ्य आ सुतावान् आविवासति । उग्रं तत् पत्यते इ०' अशी असती, तर सुलभार्थ झाली असती. अथवा 'उग्रं तत् पत्यसे शवः इन्द्र अङ्ग' असा प्रयोग असता, तरी अर्थ सुलभ झाला असता. आणि आम्हीं भाषांतर असाच अन्वय

१०. रुचिकर, खरोखर सर्वे-व्यापी, [आणि] मधुर सोमरसातें [इंद्राच्या] गाई पितात. ज्या [गाई] इंद्राबरोबर जाणाऱ्या असून त्या वीर्यवान् वीराशीं मत्त होतात आणि तेणेंकरून शोभिवंत दिसतात. [आणि त्या] [इंद्राच्या] आधिपत्याला अनुसरून कल्याणकारक [ होत ].

10. The fair [cows] drink of the delicious, the truly pervading [ and ] the sweet [Soma]; [cows], that go with Indra, and revelling with [that] manly hero appear beautiful, [ and are] beneficent in accord with [ his ] empire.

---

अर्थलाभासाठीं समजून केलें आहे.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावाः—

यश्चिद्धि त्वा वहुभ्य आ
सुतावाँ आविवासति ।
उग्रं तत् पत्यते शवः
इन्द्रो अङ्ग ॥

---

१०. ' ज्या गौरवर्ण गाई इंद्राबरोबर फिरत असतात आणि त्याच्या सहवासानें आनंदित होत असतात, आणि त्या सहवासाच्या योगानें विशेष सुंदर दिसतात, त्या गाई इंद्राबरोबर स्वादिष्ट आणि मधुर सोमरस पितात त्या इंद्राच्या सार्वभौम आधिपत्याला अनुसरून कल्याणकारी होत.'

' खरोखर सर्वव्यापी '=' इत्था विषूवतः' म्हणजे पिल्याबरोबर निःसंशय सर्वांगभर व्याप्त होणारा; सर्व शरीरांत माद उत्पन्न करणारा.

' गाई '=' गौर्यः'. अक्षरशः 'गौरवर्ण [ गाई ].' ह्या कोणत्या गाई समजावयाच्या त्याविषयीं भाष्यकार कांहीं सांगत नाहींत; आणि इंद्र आपल्या रथाला गाई अथवा बैल जोडितो असें कोठें सांगितलेलें प्रसिद्ध नाहीं. पुढचे दोन मंत्रहि याच गाईविषयीं आहेत. वीर्यवान् इंद्राबरोबर गाई जातात, असें येथें सांगितलें आहे तरी जसे त्याचे ' हरी ' ( पिवळे घोडे ) नित्य त्याजबरोबर असतात आणि त्याला यज्ञाप्रत आणितात असें सांगितलें आहे तशा गोऱ्या गाई त्याजबरोबर फिरतात अशी वेदांत प्रसिद्धि नाहीं.

' इंद्राच्या आधिपत्याला अनुसरून कल्याणकारक होत '=' वस्वीः अनु स्वराज्यम्.' म्हणजे इंद्राचें राज्य जसें सर्व प्रजांला सुखकारक होय तशाच त्याच्या गौर गाई कल्याणकारक होत असा अर्थ. तथापि ' वस्वीरनु स्वराज्यम् ' हें ( १०, ११, १२ या तीन मंत्रांत ये-

e 4

**ता अस्य पृशनायुवः सोमं श्रीणन्ति पृश्नयः ।**
**प्रिया इन्द्रस्य धेनवो वज्रं हिन्वन्ति सायकं वस्वीरनु स्वराज्यम् ११**

ताः । अस्य । पृशनऽयुवः । सोमम् । श्रीणन्ति । पृश्नयः ।
प्रियाः । इन्द्रस्य । धेनवः । वज्रम् । हिन्वन्ति । सायकम् । वस्वीः ।
अनु । स्वऽराज्यम् ॥ ११ ॥

## भाषायाम्.

११. ताः (=पूर्वमन्त्रोक्ता) अस्य (=इन्द्रस्य) पृशनायुवः (=स्पर्शेहाः=वत्सलाः) पृश्नयः (=नानावर्णा गावः) सोमं [स्वपयसा] श्रीणन्ति (=इन्द्रपेयं सोमम् आत्मीयेन दुग्धेन मिश्रीकुर्वन्ति)। [ता] इन्द्रस्य प्रिया धेनवः सायकं वज्रं हिन्वन्ति (=तस्य घातुकं वज्रं प्रेरयन्ति=स यथा मारकं वज्रं शत्रोरूपर्यस्यति तथा तं मादयन्ति) [अपि च] स्वराज्यम् अनु (=इन्द्रस्य स्वाधिपत्यम् अनुलक्ष्य) वस्वीः (=वस्व्यः=साध्व्यः) [सन्ति] ॥

णारें केवळ पालवपद आहे त्यामुळें त्यापासून विशेष अन्वयबद्ध अर्थाची अपेक्षा करावयास नको.

या मंत्राचें वृत्त 'पंक्ति' आहे. 'पंक्ति' शब्दाचा मूळ अर्थ 'पांचांचा समूह,' 'पांचांची संख्या.' जसा 'विंश-ति' म्हणजे 'विसांचा समूह', षष्-ति='षष्-टि' म्ह. 'साठांचा समूह', 'सप्त-ति' म्ह. 'सत्तरांचा समूह' त्याप्रमाणें पङ्क्-ति (=पञ्च्+ति) म्हणजे पांचांचा समूह. त्यावरून पंक्ति हें नांव या वृत्ताला लाविलें, कारण त्यांत 'पांच' चरण असतात. शेवटीं ज्यांत पांचांपेक्षांहि अधिकाचा समावेश होतो अशी मालिका असा अर्थ होऊं लागला. त्याचीं उदाहरणें ब्राह्मणांची 'पंगत', बहिष्कृताला 'पंगतीला' घेत नाहींत इत्यादि वाक्यांत प्रसिद्ध आहेत-च. पांच चरण सांगितले ते येणेंप्रमाणें:—

स्वादोरित्था विषूवतो
मध्वः पिबन्ति गौरिअः ।
या इन्द्रेण सयावरीः
वृष्णा मदन्ति शोभसे
वस्वीरनु स्वराजिअम् ॥

११. त्या त्याच्या नानावर्णाच्या प्रियकर गाई सोमाला [ आपल्या दुधानें ] मिश्र करितात. इंद्राच्या प्रिय धेनु घातक वज्र सोडितात. [ आणि त्या ] [ इंद्राच्या ] आधिपत्याला अनुसरून कल्याणकारक [ होत ].

11. Those cows of his, many-coloured [ and ] affectionate, mix [ his ] Soma [ with their milk ]. Indra's beloved cows discharge the fatal thunderbolt, [and are] beneficent in accord with [ his ] empire.

११. 'वर इंद्राच्या ज्या गाई सांगितल्या त्या नानावर्ण असून त्याजवर आपल्या वत्सावर प्रीति केल्याप्रमाणें अत्यंत प्रीति करणाऱ्या होत. आणि त्याला सुख व्हावें म्हणून त्याच्या सोमांत आपलें दूध मिसळून तो सोम मिष्ट करितात. आणि त्या इंद्राच्या प्रिय गाईनीं सोमांत आपलें दूध घातलें म्हणजे इंद्राला त्या सोमानें इतकें सामर्थ्य येतें कीं, तो आपलें घातक वज्र शत्रूवर घालवयाला समर्थ होतो. या प्रकारेंकरून इंद्राच्या सार्वभौम अधिकाराप्रमाणेंच त्या सर्वजणांस सुखकारक होत.'

इंद्र नित्य सोम पितो तो उपासकांनीं दिलेलाच पितो असें नाहीं, आपल्या घरींहि पीत असतो, आणि तो आपल्या सोमांत आपल्या गाईचें दूध घालीत असतो आणि त्या दुधाच्या योगानें त्याच्या सोमाला इतकें बळ येतें कीं तो पितांच इंद्र आपल्या शत्रूशीं वज्र फेकून युद्ध करावयास लागतो असा या मंत्राचा भावार्थ दिसतो.

उपासक जन जो सोम अर्पण करीत त्यांत ते तापलेलें दूध घालीत असत. त्यामुळें इंद्रहि आपल्या भुवनांत जो सोम पीत असतो त्यांत दूध घालण्याकरितां गाई बाळगतो अशी कल्पना करणें साहजिक होय.

स्वर्गी ज्या 'कामधेनु' (म्हणजे म्हटली ती वांछा पूर्ण करणाऱ्या गाई) आहेत असें पुराणादि ग्रंथ आम्हांला सांगतात त्यांचें बीज या आणि यासारिख्या दुसऱ्या मंत्रांत नाहीं काय ?

'प्रियकर'='पृशनायुवः.' अक्षरशः अर्थ, 'स्पर्श करूं इच्छिणाऱ्या', 'स्पर्श करणाऱ्या,' म्हणजे 'चाटणाऱ्या,' वत्सावर प्रेम केल्याप्रमाणें प्रेम करणाऱ्या.

ता अस्य नमसा सहः सपर्यन्ति प्रचेतसः ।
व्रतान्यस्य सश्चिरे पुरूणि पूर्वचित्तये वस्वीरनु स्वराज्यम्॥१२॥
ताः । अस्य । नमसा । सहः । सपर्यन्ति । प्रऽचेतसः ।
व्रतानि । अस्य । सश्चिरे । पुरूणि । पूर्वऽचित्तये । वस्वीः । अनु ।
स्वऽराज्यम् ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१२. प्रचेतसः ( =प्रकृष्टज्ञानवन्तः ) ताः ( =पूर्वोक्तास्तस्य गावो ) नमसा (=नमस्कृतिना ) अस्य सहः ( =तस्येन्द्रस्य बलं ) सपर्यन्ति ( =पूजयन्ति ) । अस्य पुरूणि व्रतानि ( =तस्य बहूनि कर्माणि=तत्प्रीत्यर्थं कर्तव्यानि बहूनि यज्ञादिकर्माणि ) पूर्वचित्तये ( =पूर्वबुद्धये=सर्वेभ्योपि पूर्वं ज्ञानाय=सर्वेभ्योपि पूर्वं स्वस्योपासनामेव यथा जानीयात्तथा सर्वेभ्योपि पूर्वं ) सश्चिरे (=सिषेविरे=सेवन्ते=अनुतिष्ठन्ति ) [अपि च] स्वराज्यम् अनु ( =इन्द्रस्य स्वाधिपत्यम् अनुलक्ष्य ) वस्वीः ( =वस्व्यः=साध्व्यः ) [ सन्ति ] ॥

सर्वेभ्योपि पूर्वं तस्य गाव एव तं पूजयन्ति तस्मै च यज्ञयागादिकर्माणि च कुर्वन्तीत्यर्थः ॥

१२. त्या प्रज्ञावंत [ गाई ] नमस्कार करून त्याच्या बळाची पूजा करितात. सर्वांच्या पूर्वी [ त्या गाई ] त्याजप्रीत्यर्थ सत्कर्मे करितात. [आणि त्या इंद्राच्या] आधिपत्याला अनुसरून कल्याणकारक [ होत ].

12. They the intelligent [cows] worship his puissance with adoration. They have performed, before all, many rites in honor of Him, [ and are ] beneficent in accord with [ his ] empire.

१२. यांत ऋषि अशी कल्पना करितो कीं, इंद्राजवळ ज्या नित्य राहणाऱ्या गाई आहेत त्या त्याची पूजा करीत असतील. कारण सर्व स्थावर जंगम पदार्थ कोठेंहि असले तरी त्याची पूजा करून त्याला भजतात. तर सतत इंद्राच्या संनिध असणाऱ्या ज्या गाई त्या त्याला सर्व उपासकांच्या अगोदर भजत असतात म्हणून सांगितल्यास कांहीं नवल नाहीं. गणपतीच्या संनिध नित्य राहणारा मूषक सर्व भक्तांच्या पूर्वी गणपतीची स्तुति आणि पूजा करितो असें म्हटल्यास, अथवा शिवाची सेवा प्रथम नंदी करितो, अथवा विष्णूची सेवा प्रथम गरूड करितो, किंवा रामाची स्तुति प्रथम मारुति करितो असें म्हटल्यास कांहीं नवें सांगितल्याप्रमाणें होत नाहीं.

‘ प्रज्ञावंत’=‘ प्रचेतसः.’ नंदीला, गणपतीच्या उंदराला, सार्जेच्या मोराला, विष्णूच्या शेषाला किंवा गरूडाला आणि रामाच्या मारुतीला ‘ प्रज्ञावंत ’ अथवा याहूनहि मोठमोठीं विशेषणें लाविलेलीं त्या त्या देवांच्या आणि त्यांच्या त्यांच्या प्रिय पशूंच्या माहात्म्यांत वर्णिलेल्या कथांत पुष्कळ सांपडतील.

‘ त्याच्या बळाची पूजा ’=‘ अस्य सहः’. म्हणजे, त्या बळवंताची पूजा इ०.

‘ सर्वांच्या पूर्वी ’=‘ पूर्वचित्तये ’. हा अर्थ ‘ पूर्वचित्तये ’ हें रूप ज्या ज्या मंत्रांत आलें आहे ते सर्व वाचून पाहून खात्री करून घेऊन आम्हीं येथें दिला आहे.

याचा तिसरा चरण ‘ व्रतानि अस्य सश्चिरे ’ असा म्हटला पाहिजे.

इन्द्रो॑ दधी॒चो अ॒स्थभि॑र्वृ॒त्राण्यप्र॑तिष्कुतः ।
ज॒घान॑ नव॒तीर्नव॑ ॥ १३ ॥

इन्द्रः॑ । द॒धीचः॑ । अ॒स्थऽभिः॑ । वृ॒त्राणि॑ । अप्र॑तिऽस्कुतः ।
ज॒घान॑ । न॒व॒तीः । नव॑ ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१३. अप्रतिष्कुतः (=अप्रतिहत) इन्द्रो दधीचः (=दध्यङ्नामकस्य अथर्वपुत्रस्य कस्यचिद् ऋषेः) अस्थभिः (=अस्थिभिः) नवतीर्नव (=नवनवतिसंख्याकानि=नवाधिकनवतिसंख्याकानि=अपरिमितानि) वृत्राणि (=शत्रून्) जघान (=हतवान्) ॥

अत्र सायणा एवमुपन्यस्यन्ति ॥

अत्र शाट्यायनिन इतिहासमाचक्षते । आथर्वणस्य दधीचो जीवतो दर्शनेनासुराः पराबभूवुः । अथ तस्मिन् स्वर्गतेऽसुरैः पूर्णा पृथिव्यभवत् । अथेन्द्रस्तैरसुरैः सह योद्धुमशक्नुवंस्तमृषिमन्विच्छन् स्वर्गं गत इति शुश्राव । अथ पप्रच्छ तत्रत्यान् नेह किमस्य किंचित्परिशिष्टमङ्गमस्तीति । तस्मा अवोचन् अस्त्येतदाश्वं शीर्षं येन शिरसाश्विभ्यां मधुविद्यां प्राब्रवीत् । तत्तु न विद्म यत्राभवदिति । पुनरिन्द्रोऽब्रवीत् तदन्विच्छतेति । तद्धान्वैषिषुः । तच्छर्यणावत्यनुविद्याजह्रुः । शर्यणावद्ध वै नाम कुरुक्षेत्रस्य जघनार्धे सरः स्यन्दते तस्य शिरसोऽस्थिभिरिन्द्रोऽसुराञ्जघानेति ॥

परमार्थतस्तु अत्रर्चैभिलक्षितया कयाचिदन्ययैवाख्यायिकया भवितव्यम् । वेदेभ्यस्त्ववर्चीनकालेषु रचितानां ब्राह्मणानां युगे तस्या विस्मृतत्वादेषा शाट्यायनिभिः प्रोक्ता कथा प्रादुरभावीति द्रष्टव्यम् ॥

१३. निष्कंटक इंद्र दध्यङ् याच्या हाडकांनीं नव्याण्णव वृत्रांला मारिता झाला.

13. Indra, the [Lord] unopposed, killed ninety-nine Vritras with the bones of Dadhyang.

१३. इंद्रानें दध्यङ् याच्या हाडकांच्या योगेंकरून शत्रु मारून टाकिले अशी एक जुनी कथा आहे; तिजविषयीं या ऋचेंत उल्लेख करून सांगितलें आहे. दध्यङ् म्हणून अथर्वा ऋषीचा एक पुत्र असे. त्याविषयीं सू. ८०, मं. १६ याजवरील टीपेंत सांगितलें आहे तें पहा. दध्यङ् हा अंगिरा, प्रियमेध, कण्व, अत्रि, मनु, नवग्व इत्यादि जे महापुरातन ऋषि त्यांत गणिला जातो. अग्नीची उपासना लोकांनीं करण्याला दध्यङ् प्रथम कारणीभूत झाला. सोमरस काढून तो देवांला अर्पावा याविषयींचा प्रचार पाडणारे जे ऋषि त्यांतून दध्यङ् हा एक होय. दध्यङ् याणें घोड्याच्या शिराच्या योगानें अश्वी देवांला मधुर सोमाचें ज्ञान होईं असें करून दिलें (ऋ. १. ११६. १२). तें घोड्याचें शिर अश्वींनीं त्याला लाविलें होतें (ऋ. १. ११७. २३). त्या घोड्याच्या तोंडानें अश्वींला उपदेश केला तो दध्यङ् याचें मन अश्वींनीं प्रसन्न केल्यावर केला (ऋ. १. ११९. ९). इंद्रानें प्रसन्न होऊन दध्यङ् याला मातरिश्व्याबरोबर गाई दिल्या (ऋ. १०. ४८. २). इतकेंच दध्यङ् ऋषीविषयीं ऋग्वेदांत सांगितलेलें आहे. आणि इंद्रानें दध्यङ् ऋषीच्या अस्थींनीं शत्रु मारिले असें प्रस्तुत मंत्रांत मात्र सांगितलें आहे. परंतु दध्यङ्च्या हाडकांनीं इंद्रानें शत्रु कसे मारिले त्याची कथा किंवा समजण्यास सुलभ असा उल्लेख ऋग्वेदांत आलेला नाहीं. परंतु वेदोत्तर जे ब्राह्मणादिक ग्रंथ त्यांत या कथेचा विस्तार आहे. तो असाः— "दध्यङ् ऋषि जीवंत असतां त्याला भिऊन असुर पराभव पावत असत. तो स्वर्गीं गेल्यावर असुर पृथ्वीभर पसरले. तेव्हां इंद्राच्या हातून त्यांचा पराभव करवेनासा झाल्यामुळें दध्यङ् ऋषीचा त्याणें शोध केला. तेव्हां तो स्वर्गीं गेला असें समजलें. मग इंद्रानें दध्यङ् ऋषीच्या शरीराचा तरी कांहीं भाग राहिला आहे काय असा शोध करितां ज्या घोड्याच्या शिरानें दध्यङ् याणें अश्वींला मधुर सोम करण्याची विद्या सांगितली तें अश्वशिर शर्यणावत् म्हणून कुरुक्षेत्रांत एक सरोवर आहे त्यांत सांपडलें. त्या डोक्याचीं हाडकें घेऊन त्यांच्या योगानें इंद्रानें असुरांला मारून टाकिलें" (शाट्यायन ब्रा.). परंतु ही कथा वाचतांच आपली खात्री होते कीं, मूळची कथा ही नव्हे. ज्या कथेला अनुलक्षून दध्यङ्च्या अस्थींनीं इंद्रानें शत्रु मारिले असें सांगितलें आहे ती विसरली गेल्यामुळें वेदोत्तरकालीं रचिलेली

इच्छन्नश्वस्य यच्छिरः पर्वतेष्वपश्रितम् ।
तद्विदच्छर्यणावति ॥ १४ ॥

इच्छन् । अश्वस्य । यत् । शिरः । पर्वतेषु । अपऽश्रितम् ।
तत् । विदत् । शर्यणाऽवति ॥ १४ ॥

---

### भाषायाम्.

१४. पर्वतेषु अपश्रितम् (=अपगत्य पर्वतेषु कृताश्रयं) यद् अश्वस्य शिरः [इन्द्रः] इच्छन् [अवर्तत] [तत् स] शर्यणावति (=एतन्नामके कस्मिंश्चित् सरोवरे) विदत् (=अलभत) ॥

शर्यणावदिति प्रचुरसोमवल्लीयुक्तं किंचित्सरोवरमिति मन्त्रान्तरेभ्यः श्रूयते ॥

---

जीं ब्राह्मणें त्यांत पुष्कळ काळ होऊन गेल्यावर रचिली गेली. कारण दध्यङ् याला भिऊन असुर पराभव पावत असत, इंद्राच्यानें असुरांस मारवलें नाहीं, असुरांनीं सर्व पृथिवी व्यापिली, आणि दध्यङ्चें अश्वशिर 'कुरुक्षेत्रांतील' शर्यणावत् सरोवरीं सांपडलें अशा प्रकारच्या कल्पना वेदाच्या काळच्या नव्हेत, तर त्यांच्या मुखचर्येवर अर्वाचीनकालिक जन्माची मुद्रा ठसलेली स्पष्ट दिसते. मूळची कथा काय असेल ती असो. तिचा विसर पडल्यामुळें ही दुसरी मागाहून रचिली असावी. पण पुढच्या मंत्रावरील टीप पहा.

'नव्याण्णव वृत्रांला'=' नवतीर्नव वृत्राणि' म्हणजे 'अनेक शत्रूंला' इतकाच अर्थ आहे. 'नवतीः नव' म्हणजे नऊवेळ नव्वद =आठशें दहा असा अर्थ नाहीं. ऋ. ४. ४८. ४ आणि ९. ६१. १ याजवरील सायणभाष्य पहा. सू. ५४, मं. ६ याजवरील टीप पहा. वृत्र याचा अर्थ शत्रु असा होतो. हे शत्रु कोण होते? वृत्र, शंवर, शुष्ण इत्यादि असतील, किंवा दध्यङ् याजविषयींची जी विस्मृत कथा तिजसंबंधी कोणी मानुष शत्रु असतील. पण पुढच्या मंत्रावरील टीप पहा.

वृत्तसुखासाठीं दुसरा चरण 'वृत्राणि अप्रतिष्कुतः' असा म्हटला पाहिजे.

१४. पर्वतांवर जाऊन राहिलेलें जें अश्वाचें शिर [इंद्र] शोधीत [होता] तें त्याजला शर्यणावतांत मिळालें.

14. The horse's head which [ he was ] desirous of finding [and]. which lay hidden in the mountains, he did discover in S'aryaṇâvat.

१४. ' जें अश्वाचें शिर पर्वतांत जाऊन नाहींसें होऊन राहिलें होतें त्याचा शोध करतां करतां तें इंद्राला शर्यणावत् या सरोवरांत सांपडलें.' दध्यङ् याणें अश्वाच्या शिरानें उपदेश केला अशी जी कथा आणि दध्यङ्च्या हाडकांनीं इंद्रानें शत्रु मारिले अशी जी कथा वरच्या मंत्रांत दर्शविली, तिलाच अनुलक्षून हाहि मंत्र प्रवृत्त झाला आहे. शर्यणावत् हें एक सरोवर होय आणि त्यांत सोमवल्ली पुष्कळ सांपडे; आणि तिचा सोमरस प्रसिद्ध असून तो उत्तम असल्यामुळें देवांस अर्पिला जाई असें बऱ्याच मंत्रांवरून दिसून येतें. यावरून दध्यङ् ऋषि म्हणून जो म्हणतात तो केवळ रूपकसिद्ध असून मूळ अर्थ सोमवल्ली इतकाच असेल. दध्यङ् शब्दाचा मूळ अर्थ ' दहीं ज्यांत मिश्रित केलें आहे तो ' इतकाच होतो. आणि दध्यङ्च्या हाडकांनीं इंद्रानें अनेक शत्रु मारिले म्हणजे सोमवल्लीचे जे हाडकांसारिखे तुकडे त्यांतून गाळून काढिलेला सोमरस पिऊन इंद्राला मोठें सामर्थ्य आलें आणि त्याच्या योगानें त्याणें आपले वृत्रादिक शत्रु मारिले असें जुळतें. त्याप्रमाणेंच दध्यङ् याणें घोड्याचें डोकें घालून अश्वींला मधुर सोमरस सिद्ध करण्याची विद्या शिकविली असें आहे त्याचें तात्पर्य इतकेंच दिसतें कीं, सोमवल्लीचें शिखर घोड्याच्या डोक्यासारिखें दिसत असेल, आणि पदार्थांस माधुर्य आणणें, कशांत तरी मधुररस उत्पन्न करणें, मधमाशांकडून मध करविणें हीं कामें अश्वी देव करितात त्यापेक्षां अश्वशिराप्रमाणें ज्याचें शिखर अशा सोमवेलांत मधुर रस मिळतो असें अश्वींला समजलें तें त्यांला घोड्याचें डोकें घालून घेऊन दध्यङ् याणें म्हणजे सोमवेलानेंच जणुं शिकविलें. आणि हें शिर इंद्राला शर्यणावत् या सरोवरांत शोधाअंतीं सांपडलें हेंहि योग्यच आहे, कारण कीं सोमाचे वेल त्या सरोवरांत मिळत असें प्रसिद्धच आहे. आणि हें घोड्याचें डोकें ( म्हणजे वस्तुतः घोड्याच्या डोक्यासारिखें दिसणारें सोमवेलाचें शिखर ) पर्वतांत जाऊन राहिलें होतें हेंहि खरेंच आहे, कारण कीं सोमवल्ली पर्वतांत असत, आणि त्यांच्या प्राप्त्यर्थ बहुतकरून पर्वतप्रदेशीं शोध करावा लागत असे. आणि ' दध्यङ् ' याणें सोमरस अर्पण करून अग्नीची उपासना करण्याचा प्रचार प्रथम पाडिला याचें तात्पर्य इतकेंच दिसतें कीं, सर्व युगांच्या

**अत्राह गोरमन्वत नाम त्वष्टुरपीच्यम् ।**
**इत्था चन्द्रमसो गृहे ॥ १५ ॥ ७ ॥**

अत्र । अह । गोः । अमन्वत । नाम । त्वष्टुः । अपीच्यम् ।
इत्था । चन्द्रमसः । गृहे ॥ १५ ॥ ७ ॥

## भाषायाम्.

१५. अत्र सायणाः । "अत्राहास्मिन्नेव गोर्गन्तुश्चन्द्रमसो गृहे मण्डले त्वष्टुर्दीप्तस्यादित्यस्य संबन्ध्यपीच्यं रात्रावन्तर्हितं स्वकीयं यन्नाम तेजस्तदादित्यस्य रश्मय इत्थेत्थमनेन प्रकारेणामन्वत अजानन् । उदकमये स्वच्छे चन्द्रबिम्बे सूर्यकिरणाः प्रतिफलन्ति । तत्र प्रतिफलिताः किरणाः सूर्ये यादृशीं संज्ञां लभन्ते तादृशीं चन्द्रेपि वर्तमाना लभन्त इत्यर्थः । एतदुक्तं भवति । यद्रात्रावन्तर्हितं सौरं तेजस्तच्चन्द्रमण्डलं प्रविश्याहनीव नैशं तमो निवार्य सर्वं प्रकाशयति । ईदृग्भूततेजसा युक्तः सूर्यश्चन्द्र एव द्वादशादित्येष्विन्द्रस्यापि परिगणितत्वात् । अतोऽहोरात्रयोः प्रकाशक इन्द्र एवेतीन्द्रस्तुतेः प्रतीयमानत्वादिन्द्रो देवतेत्येतदुपपन्नं भवति । ईदृग्भूतस्य तेजस आश्रयत्वेन चन्द्रमसः प्राधान्यविवक्षया चान्द्रमसाविष्टो विनियोगोऽप्युपपद्यते ॥ अत्र निरुक्तम् । अथाप्यस्यैको रश्मिश्चन्द्रमसं प्रतिदीप्यते तदेतेनोपेक्षितव्यमादित्यतोऽस्य दीप्तिर्भवतीति । सुषुम्णः सूर्यरश्मिश्चन्द्रमा गन्धर्व इत्यपि निगमो भवति । सोऽपि गौरुच्यते । अत्राह गोरमन्वतेति । नि० २. ६. । अत्राह गोः सममंसतादित्यरश्मयः स्वं नामापीच्यमपचितमपगतमपिहितमन्तर्हितं वा । नि० ४. २५. । इति" ॥

एषा भृशमेव दुर्बोधा । एवं स्यादर्थः । चन्द्रमसो गृहे इत्था (=चन्द्रमसः स्थाने= आन्तरिक्षेषु प्रदेशेषु यथा तथा) गोरत्राह (=गोरस्मिन्स्थलेपि=दृश्यमानेस्मिन् पृथिव्याः संबन्धिनि स्थलेपि=पार्थिवेषु प्रदेशेष्वपि) त्वष्टुः अपीच्यं नाम (=त्वष्टुर्देवस्य सर्वेषामपि वस्तूनामेतन्नामकस्य निर्मातुरन्तर्हितं बाह्यचक्षुर्भ्यामदृश्यं स्वरूपं जगत्कर्तृत्वरूपं) [जना] अमन्वत (=अजानन्=बोधन्ति) ॥ अन्तरिक्षे यथा त्वष्टुर्देवस्य जगन्निर्मातृ तर्कातीतं चातुर्यं चन्द्रादिपदार्थेषु दृश्यते तथैव पृथिव्यामपि वर्तमानेषु सोमादिषु वस्तुषु तदेव प्रचुरचातुर्योपेतं त्वष्टुः स्वरूपं दृश्यत इति भावः ॥

आरंभीं अग्न्यादिदेवांची उपासना करण्याचा प्रचार पडला त्यांत सोमरसच मुख्य उपकरण अथवा साधन होतें; सोम अर्पण्याच्या उद्देशानेंच प्रथम देवांची उपासना लोक करूं लागले. अशा युक्तीनें दध्यङ् ऋषीविषयींच्या सर्व कथांचें ख-

१५. या प्रकारेंकरून सूर्यकिरण, चालत असणाऱ्या चंद्राच्या या गृहीं सूर्याचें गुह्य तेज पाहाते झाले.

15. Thus did the [solar rays] perceive in this mansion of the travelling moon the hidden light of the sun.

तात्पर्य समजावयाचें असें आम्हांस वाटतें.

वृत्ताला अनुसरून दुसरा चरण 'पर्वतेषु अपश्रितम्' असा पाठ समजून वाचला पाहिजे.

१५. हा मंत्र लहानसा आणि गायत्रीवृत्तबद्ध आहे तरी फार दुर्बोध आहे. आणि मंत्र दुर्बोध आहे असें यास्क, आणि सायणाचार्य यांसहि वाटल्यासारिखें त्यांच्या त्यांच्या भाष्यावरून दिसून येतें. आमच्यानें या ऋचेचा निःसंशय खरा अर्थ काय आहे तें खात्रीनें सांगवत नाहीं, यास्तव सायणांनीं केलेला अर्थ आम्हीं उतरून घेतला आहे. त्याचा भावार्थ असा कीं, 'हें जें सतत चालत असणाऱ्या चंद्राचें मंडल आकाशांत आहे, त्याच्या ठायीं असलेलें तेज आपण मावळते वेळीं सूर्यानेंच ठेविलेलें आहे, असें सूर्यकिरणांला समजतें. म्हणजे, सूर्यकिरण सूर्याच्या ठायीं असतांना त्यांला जें नांव असतें तेंच ते परावर्तनानें चंद्रापासून निघतांनाहि प्राप्त होतें, कारण कीं चंद्राच्या आंगीं असलेला प्रकाश सूर्याचाच होय.' परंतु या अर्थाविषयीं आम्हांस मोठाच संशय आहे. एक तर असा अर्थ केल्यानें या मंत्राशीं मागच्या पुढच्या मंत्रांचा संबंध कांहींच राहत नाहीं; दुसरें असें कीं, 'गोः' म्हणजे 'चालणाऱ्या' असें 'चन्द्रमसः' याचें विशेषण केलें आहे तें संभवत नाहीं; तिसरें हें कीं, 'त्वष्टुः' म्हणजे 'सूर्याचें' असा अर्थ करणें यांत मोठी ओढाताण आहे. परंतु यास्कांनीं केलेला अर्थहि अशाच प्रकारचा आहे. निरुपायासाठीं या मंत्राविषयीं आशा सोडली पाहिजे असें वाटतें.

तथापि खालीं लिहिल्याप्रमाणें अर्थ कदाचित् होईल असें आम्हांस वाटतेंः—

'याच ठिकाणीं, म्हणजे शर्यणावत् नामक सरोवरांतच, आकाशांत असलेल्या चंद्राच्या घरीं जसें त्वष्टा देवाचें गुह्य रूप दृष्टीस पडतें तसें, सोमाच्या योगानें त्वष्टा या देवाचें गुह्य स्वरूप जनांच्या दृष्टीस पडलें.' म्हणजे त्वष्टा देव सकळ प्राण्यांचा आणि सकळ सोमादिक पदार्थांचा उत्पन्नकर्ता होय. तो वस्तु कशा निर्माण करितो तें चातुर्य गुह्य आहे; म्हणजे सुतार घरें बांधितो आणि तसेच दुसरे पदार्थ निर्माण करितो, पण ते कसे करितो तें सर्वांस दृष्टी पडतें त्यामुळें त्याच्या कौशल्यांत गुह्य कांहीं नाहीं; पण त्वष्टा

**को अद्य युङ्क्ते धुरि गा ऋतस्य शिमीवतो भामिनो दुर्हृणायून्।**
**आसन्निषून्हृत्स्वसो मयोभून्य एषां भृत्यामृणधत्स जीवात्॥ १६॥**

कः। अद्य। युङ्क्ते। धुरि। गाः। ऋतस्य। शिमीऽवतः। भामिनः। दुःऽहृणायून्।
आसन्ऽइषून्। हृत्सुऽअसः। मयःऽभून्। यः। एषाम्। भृत्याम्। ऋणधत्। सः। जीवात्॥ १६॥

## भाषायाम्.

१६. अद्य (=अस्मिन् दिने) शिमीवतः (=शौर्यकर्मोपेतान्) भामिनः (=तेजोयुक्तान्) दुर्हृणायून् (=अन्यैर्दुःसहक्रोधयुक्तान्) आसन्निषून् (=बाणगर्भमुखान्) हृत्स्वसः (=हृदये बाणान् क्षिपतो) मयोभून् (=सुखकारिणः) [एतादृशान्] ऋतस्य गाः (=सत्यमयस्य यज्ञस्य वर्धयितॄन् वृषभान् अश्वान् वा) धुरि (=इन्द्ररथस्य अग्रभागे) को युङ्क्ते (=कः संयोजयति)? यः [सुभग] एषां भृत्याम् ऋणधत् (=इन्द्ररथस्य संबन्धिनां वृषभानां रथवहनक्रियां समर्धयति=ते यथा रथं वहन्ति तथा मन्त्रैः करिष्यति) स जीवात् (=स एव जीविष्यति=चिरायूर्भविष्यति)॥

हा चंद्रादिक सुंदर पदार्थ कसे करितो तें मोठें गुह्य अथवा गूढ आहे. तर हें जें त्वष्टा देवाचें अगाध कर्तृत्व तें शर्यणावतांत सोम निर्माण केला यावरून लोकांस समजलें, कारण असा अत्यानंदकारक पदार्थ शर्यणावतासारिख्या रूक्षप्रदेशीं निर्माण करणें यांत कौशल्य साधारण आहे असें नाहीं. आणि तो सोम आकाशरूपी जलमय प्रदेशांत जसा चंद्र दिसतो आणि आपला निर्माणकर्ता त्वष्टा देव याच्या चातुर्ययुक्त कर्तृत्वाची साक्ष पुरवितो तसाच शर्यणावत् सरोवरांत राहून शोभतो आणि आपल्या कौशल्ययुक्त त्वष्टा या पित्याच्या कर्तृत्वाविषयीं साक्ष पुरवितो. त्वष्टा देव सकल वस्तूंचा निर्माणकर्ता असें वेदांत सांगितलें आहे. आणि आकाशांत जसा चंद्रमा शोभतो तसा पात्रांत सोम शोभतो अशाहि उपमा वेदांत येतात (यो अप्सु चन्द्रमा इव सोमश्चमूषु ददृशे। पिबेदस्य त्वमीशिषे ऋ. ८. ८२. ८). या आमच्या अर्थाचें तात्पर्य इतकेंच कीं सोम हा मनुष्यांला शर्यणावत् सरोवरांत मिळाला आणि त्याजपासून त्वष्ट्या देवाचें चातुर्य समजून आलें; तो सोम आकाशरूपी जलप्रदेशांत चंद्र शोभतो तसा शर्यणावत् जलमय सरोवरांत शोभला. या अर्थांत 'गोः' म्हणजे 'सोमापासून'

१६. आज सत्यरूप यज्ञाचे [पोषक] [असे जे] महा पराक्रमी, शोभिवंत, संतापलेले, तोंडांत बाण धारण करणारे, हृदयावर [बाण] मारणारे [आणि] कल्याणकारक वृषभ, [त्यां]ला [इन्द्राच्या] रथाला कोण जोडील? जो [कोण] यांजकडून रथ ओढवील तो चिरायु होईल.

16. Who yokes today to the pole [those] bulls of Truth, [that are] brave, brilliant, raging, holders of shafts in their mouths, strikers of the heart [and] bestowers of happiness? He shall live who should make them draw the chariot.

असा अर्थ करावा लागतो आणि 'गो' शब्दाचा अर्थ 'सोम' असा प्रसिद्ध नाहीं पण होण्यास अडचण दिसत नाहीं. परंतु या अर्थाहिपेक्षां चांगला आणि सरळ अर्थ आम्हांस एक सूचतो तो असा:—

'चंद्राच्या घरीं (म्ह. आकाशांत) जसें त्वष्ट्या देवाचें अगाध स्वरूप अवगत होतें तसेंच या पृथिवीच्या ठायींहि त्वष्ट्या देवाचें अगाध स्वरूप अवगत होत आहे.' म्हणजे, त्वष्ट्या देवाचें कौशल्ययुक्त कर्तृत्व आकाशप्रदेशांत जसें दृष्टोत्पत्तीस येतें तसें भूमीवरचे पदार्थ पाहूनहि त्याचें चातुर्य मनांत भरतें. इंद्रदेवताक सूक्तांत त्वष्टा या देवाविषयीं उल्लेख येतो इतकीच या अर्थाच्या संबंधानें अडचण. पण अशीं उदाहरणें दुसरीं पुष्कळ मिळतील.

१६. यांत ऋषि म्हणतो कीं, 'यज्ञाप्रत येऊन यज्ञाची सांग सिद्धि करणारे, शक्तिमान्, तेजःपुंज, आवेशी, युद्धांत शत्रूंवर मारण्याकरितां तोंडांत बाण धारण करणारे आणि शत्रूच्या हृदयावर प्रहार करणारे पण भजकाला सुख देणारे असे जे इंद्राचे वृषभ (=बैल) ते आज त्याच्या रथाला कोण जोडील? म्हणजे जेणेंकरून इंद्र त्यांला आपल्या रथाला जोडून रथांत बसून येई असे चांगले मंत्र कोण म्हणूं शकतो? जो कोण तसे मंत्र म्हणून त्या वृषभांकडून इंद्राचा रथ ओढून आणवील तो सुभागी होय, आणि तो चिरायु होईल.' इंद्राला मंत्राच्या योगानें कोण घेऊन येईल? जो येईल तो मोठा देववान् होय इतकें या ऋचेचें तात्पर्य दिसतें.

'सत्यरूप यज्ञाचे [पोषक] वृषभ' =' ऋतस्य गाः'. अक्षरशः अर्थ, 'सत्याचे वृषभ' इतकाच आहे. यज्ञ करणें हेंच सत्य अशी आपल्या पूर्वजांची समजूत असे, म्हणून ते यज्ञाला सत्य असें नांव देत.

'तोंडांत बाण धारण करणारे'=

**क ईषते तुज्यते को बिभाय को मंसते सन्तमिन्द्रं को अन्ति ।**
**कस्तोकाय क इभायोत रायेऽधि ब्रवत्तन्वे३को जनाय ॥ १७ ॥**

कः । ईषते । तुज्यते । कः । बिभाय । कः । मंसते । सन्तम् । इन्द्रम् । कः । अन्ति ।
कः । तोकाय । कः । इभाय । उत । राये । अधि । ब्रवत् । तन्वे । कः । जनाय ॥ १७ ॥

---

## भाषायाम्.

१७. क ईषते (=कः पलायते)? तुज्यते [कः] (=हिंसते कः)? को बिभाय (=कः शत्रुभ्यो बिभेति)? कः सन्तम् इन्द्रं मंसते (=सहायत्वेन वर्तमानमिन्द्रं को जानाति)? अन्ति [वर्तमानमिन्द्रं] को [मंसते] (=समीपे वर्तमानमिन्द्रं को जानाति)? कस्तोकाय [अधि ब्रवत्] (=अपत्यस्य पक्षपाती भूत्वा क इन्द्रं प्रति वक्ष्यति)? क इभाय [अधि ब्रवत्] (=स्वहस्तिनः पक्षपाती भूत्वा को वक्ष्यति)? उत [को] राये (=स्वधनस्य पक्षपाती सन् को वक्ष्यति)? अधि ब्रवत् तन्वे कः (=स्वशरीरस्य पक्षपाती भूत्वा को वक्ष्यति)? को जनाय (=अन्यजनस्य पक्षपातित्वेन क इन्द्रं प्रति वक्ष्यति)?

अत्र सायणाः । अनुग्रहीतरीन्द्र आगते सति क ईषते । शत्रोर्भीतः सन् को निर्गच्छति । न कोपीत्यर्थः। कस्तुज्यते । को हिंस्यते । शत्रुभिर्हिंस्योपि कश्चिन्नास्तीत्यर्थः। को यजमानो बिभाय । बिभेति । इन्द्रे रक्षके सति भयमपि नोत्पद्यते । दूरे तस्य शत्रुकृता हिंसा । अन्त्यन्तिके समीपे सन्तमस्माकं रक्षकत्वेन वर्तमानमिन्द्रं कः पुरुषो मंसते । जानाति । वयमेव जानीमो नान्य इत्यर्थः । एकः कः पूरकः । युद्धे सहायार्थमिन्द्र आगते सति को यजमानस्तोकाय पुत्रायाधिब्रवत् । हे इन्द्रास्मदीयं पुत्रं रक्षेत्येवंरूपमधिवचनं पक्षपातेन वचनं ब्राह्मणायाधि ब्रूयादिति यथा । एवंरूपमधिवचनं को यजमानः कुर्यात् । न कोपीत्यर्थः । अपि च तन्वे स्वकीयाय शरीराय जनाय परिजनाय च कोधिब्रवत् । स्वशरीररक्षार्थं परिजनरक्षार्थं चेन्द्रस्याधिवचनं नापेक्षितम् । स्तुत्या प्रीत इन्द्रः स्वयमेव रक्षतीत्यर्थः ॥

इभायेति पदं भृशमेवास्पष्टार्थम् । तस्य पदस्य गतभयार्थत्वं सायणा मन्त्रान्तरेषु प्रतिपादयन्ति । पाश्चात्यैः पुनः पण्डितैर्ग्रास्मानप्रभृतिभिर्वृद्धो भृत्यसमूह इत्यर्थो न कुत्रापि सायणभाष्ये दृश्यते तेषु तेषु च तच्छब्दयुक्तेषु मन्त्रेषु कथं कथमपि युज्यते ॥

१७. पळतो कोण? पराभव कोणाचा होतो? भीतो कोण? इंद्र सहाय [आहे असें] कोण जाणतो? [इंद्र] जवळ [आहे हें] कोण [जाणतो]? [आपल्या] मुलांचा भार [इंद्रावर] कोण घालील? [आपल्या] हत्तीचा भार [इंद्रावर] कोण [घालील]? आणि [आपल्या] संपत्तीचा भार [त्याजवर] कोण [घालील]? [आपल्या] स्वताहाविषयीं [आणि दुसऱ्या] लोकांविषयीं [इंद्रावर] भार कोण घालील?

17. Who flees? Who is beaten? Who fears? Who considers Indra [as] [our] ally? Who [as being] near? Who speaks on behalf of [his] children? Who on behalf of [his] elephant, and [who on behalf of his] wealth? Who on behalf of himself [and] who on behalf of [other] people?

'आसन्निषवः.' याचें तात्पर्य काय असेल तें असो. आणि 'हृदयावर बाण मारणारे'='हृत्स्वसः' याविषयींहि असेंच म्हटलें पाहिजे.

वृत्तानुरोधानें हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजेः—

को अद्य युङ्क्ते धुरि गा ऋतस्य
शिमीवतो भामिनो दुर्हृणायून्।
आसन्निषून् हृत्सुअसो मयोभून्
य एषां भृत्यामृणधत् स जीवात् ॥

१७. ऋषि म्हणतोः—'इंद्र आमचें रक्षण करण्याकरितां युद्धादिकांच्या प्रसंगीं आला म्हणजे तो साहाय्य करण्याकरितां जवळ आला आहे आणि उभा आहे असें कोणास समजत नाहीं, तरीहि तो येतांच उपासकाला इतकें धैर्य येतें कीं मग कोणी पळून जात नाहीं; कोणी उपासक पराभव पावत नाहीं; कोणी भीत नाहीं; कोणी उपासक हे इंद्रा, हीं आमचीं मुलें आहेत यांचें तूं संरक्षण कर असा त्याजवर भार घालीत नाहीं; कोणी आपल्या हत्ती इत्यादि पशूंविषयीं त्याजवर भार घालीत नाहीं; कोणी आमचें धन रक्ष असें त्याला म्हणत नाहीं; कोणी हें माझें शरीर रक्ष अथवा हे माझे परिचर आहेत यांचें रक्षण कर असें म्हणत नाहीं. कारण असें म्हणण्याच्या पूर्वींच इंद्र तसें करीत असतो.' हा अभिप्राय सायणांस अनुसरून आम्हीं दिला आहे आणि तो आम्हांस खरा आहे असा दिसतो.

'हत्तीचा'='इभाय.' हा शब्द कठि-

को अग्निमीट्टे हविषा घृतेन स्रुचा यजाता ऋतुभिर्ध्रुवेभिः ।
कस्मै देवा आ वहानाशु होम को मंसते वीतिहोत्रः सुदेवः १८

कः । अग्निम् । ईट्टे । हविषा । घृतेन । स्रुचा । यजाते । ऋतुऽभिः। ध्रुवेभिः ।
कस्मै । देवाः । आ । वहान् । आशु । होम । कः । मंसते । वीतिऽहोत्रः । सुऽदेवः ॥ १८ ॥

## भाषायाम्.

१८. कः (=कीदृशो) [यजमानो] हविषा घृतेन (=हविर्भिः घृताहुतिभिश्च) अग्निम् ईट्टे (=स्तौति)? ध्रुवेभिर्ऋतुभिः (=नित्यैः कालैः=वसन्तादिषु कालेषु) स्रुचा (=जुह्वा) [कः कीदृशो यजमानोऽग्निं] यजाते (=यजेत=यक्ष्यते)? कस्मै (=कीदृशाय यजमानाय) देवा होम (=हवीरूपेण प्रार्पितव्यं धनम्) आशु आ वहान् (=शीघ्रम् आनयिष्यन्ति)? कः (=कीदृशो यजमानो) वीतिहोत्रः (=कान्तयज्ञः=प्रियकरयज्ञः) [तथा] सुदेवः (=शोभनदेवः=शोभनदेवानामुपासको) मंसते (=मन्यते=ज्ञायते)?

सर्वेपि हविरादिभिरग्निं सेवितुं न शक्नुवन्ति न च नित्यं सर्वेपि स्रुचा प्रत्तैर्हविर्भिस्तोषयितुं शक्नुवन्ति, तर्हि ये महाभागास्त एव तस्मिन् कर्मणि समर्थाः । तथैव न सर्वेभ्यो यजमानेभ्यो देवा धनं ददति केषांचिदननुग्रहणीयत्वात् । अपि च यद्यपि सर्वे यज्ञं कुर्वन्ति देवांश्च पूजयन्ति तदपि प्रिययज्ञः सुदेवश्चेति संज्ञा कैश्चनैव लभ्यते न सर्वैरिति हृद्यम् ॥

ण आहे. तो ऋग्वेदांत त्याच ठिकाणीं आलेला आढळतो. परंतु ते सर्व मंत्र पहातां सायणांनीं वेगवेगळ्या ठिकाणीं वेगवेगळा अर्थ केलेला आहे. या ठिकाणीं त्यांणीं केलेलाच अर्थ आम्हीं घेतला आहे. पण आम्हांस त्याच्या योग्यतेविषयीं संशय आहे.

वृत्तासाठीं खालीं दाखविल्याप्रमाणें पाठ म्हटला पाहिजेः—

क ईषते तुज्यते को बिभाय
को मंसते सन्तमिन्द्रं को अन्ति ।
कस्तोकाय क इभायोत राये
अधि ब्रुवत्तन्वे को जनाय ॥

## पौंच ता. १ पासून ता. ३१ आक्टोबरपर्यंत.

| | रु. आ. |
|---|---|
| कारभारी साहेब सं० मिरज. ... ... ... | ५१- ० |
| पोलिटिकल सु. सावंतवाडी. ... ... ... | ३८- ४ |
| रा. बा. मणीभाई जसभाई दिवाणकच्छ. ... ... ... | २४- ० |
| रा. बा. कृष्णाजी लक्ष्मण ... ... ... | ६- ६ |
| रा. बा. चिंतामण सखाराम ... ... ... | ६- ६ |
| रावसाहेब बाळाजी लक्ष्मण ओक मामलेदार ... ... | १२-१२ |
| रावसाहेब गोपाळराव गोविंद घांटे. ... ... ... | ६- ६ |
| रावसाहेब बाळकृष्ण ऐल. बापट ... ... ... | १२-१२ |
| डायरेक्टर आफ् पब्लिक इ. बेंगाल ... ... ... | ६३-१२ |
| मेसर्स टुबानर आणि कंपनी लंडन. ... ... ... | १४०- ० |
| डा. नारायणराव अनंत असि. सर्जन ... ... ... | ६- ६ |
| डा. रामचंद्र महादेव. ... ... ... | ६- ६ |
| रा. रा. लक्ष्मणराव विठ्ठल कारभारी सं. बांटवा. ... ... | ६- ६ |
| रेवरेंड आर. ए. ह्युम साहेब. ... ... ... | ६- ६ |
| शेट ठाकरसी मुळजी मुंबई. ... ... ... | ६- ० |
| राजेश्री करसनदास माधवदास मुंबई ... ... ... | ६- ० |
| रा. रा. हरिचंद्र कृष्ण जोशी मुंबई. ... ... ... | १२- ० |
| रा. रा. बाळाजी रामचंद्र गुर्जर ... ... ... ... | ६- ८ |
| ,, ,, जगन्नाथ गोविंद माडगांवकर मुंबई. ... ... ... | ६- ० |
| रा. रा. वेहारिलाल वसु प्लीडर. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, शांताप्पा अनंत नाडकर्णी. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, रामचंद्र महादेव हर्डीकर मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, श्रीमंत भाऊसाहेब सांगलीकर मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, भगवंतराव मंगेश वागळे मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, परभुदास माणजीवन मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, सदाशिव रघुनाथ वागळे मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, गोपाळ गोविंद जोगळेकर. ... ... ... | ४- ० |
| ,, ,, सखाराम नारायण मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, मोरोबा केशरीनाथ मुंबई ... ... ... | ६- ० |
| ,, ,, माधवराव श्रीधरजी मुंबई ... ... ... | ६- ० |
| ,, ,, बापुराव बाळकृष्णजी मुंबई ... ... ... | ६- ० |

Registered No. 98 of 1877.

| | रु.आ. |
|---|---|
| रा. रा. नरशिंगराव सायबु ... ... ... | १२- ० |
| ,, ,, अनंदराव बाजी मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, नगीनदास तुळशीदास मुंबई ... ... ... | ६- ० |
| ,, ,, मोरोबा दामोदरजी मुंबई ... ... ... | ६- ० |
| ,, ,, नारायणराव भाऊ मुंबई ... ... ... | ६- ० |
| ,, ,, व्यंकटराव रामचंद्र वकील ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, काशिनाथ नारायण साने असि. मास्तर ... ... | ६- ० |
| ,, ,, भाई जिवनजी मुंबई ... ... ... | ६- ० |
| ,, ,, रामचंद्र हरजी मुंबई ... ... ... | ६- ० |
| ,, ,, जीवाजी मंगेश कर्णिक ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, गोपाळ अनंत भट बी. ए. अ. मास्तर ... ... | ७- ० |
| ,, ,, मोरो हरि तेंडुलकर मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, दामोदर गंगाधर तळवलकर ... ... ... | १२-१२ |
| ,, ,, लक्ष्मण दशरथ वेदपाठक ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, गणेश हरि जोगळेकर. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, लक्ष्मण नारायण साधले. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, गोपाळशिंग टीचर. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, यशवंतराव विठ्ठल वकील. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, मनीराम मोतीराम. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, मागजी वलभराम नाईक ... ... ... | ६- ० |
| नेटिव लायब्ररी अकलकोट. ... ... ... | ६-१२ |
| नेटिव लायब्ररी कोलापूर ... ... ... | ६- ६ |
| नेटिव जनरल लायब्ररी सोलापूर ... ... ... | ६- ६ |
| ट्रेनिंग कालेज लायब्ररी पुणें. ... ... ... | ६- ६ |
| लॅंग लायब्ररी राजकोट. ... ... ... | ६- ० |
| जार्ज शर्ट साहेब. ... ... ... | ६- ६ |
| प्रिन्सिपाल बनारस कालेज. ... ... ... | २५- ० |
| कावसजी मेहेरवानजी. ... ... ... | ६- ६ |

---

**विशेष सूचना.**—आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षाची बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी.

तिकीटें पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्ताळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

---

THE

# VEDÂRTHAYATNA

OR

AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

# वेदार्थयत्न.

ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक ६. नोवेंबर सन १८७७. मासिक भाग २०.
Vol 2 Nov 1877 № 20

मुंबईः
"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.
(हें सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें नोंदलें आहे.)

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

१८. हवीनें [ आणि ] घृतानें अग्नीला कोण स्तवितो ? सर्वकाळ स्रुचेनें [ अग्निप्रीत्यर्थ कोण ] यज्ञ करूं शकतो ? कोणासाठीं देव सत्वर हवनद्रव्य घेऊन येतील ? [ लोक ] कोणाला प्रिययज्ञ [ आणि ] सुदेव असें समजतात ?

18. Who praises Agni, with oblation [and] with clarified butter ? [Who] can worship [ Agni ] in perpetual seasons with the ladle ? To what [sacrificer] will the Gods bring wealth swiftly ? Who is considered [as] a lover of sacrifice [and] [as] a servant of good Gods ?

१८. 'जरी अग्नीची पूजा करणारे पुष्कळ लोक आहेत तरी त्याला हवि, घृत इत्यादि पदार्थ सतत अर्पण करणें हें सर्वांच्याच हातून होतें असें नाहीं, कितीएकांच्याच हातून होऊं शकतें; देवांची भक्ति करणारे जरी बहुत लोक आहेत तरी ज्यांची भक्ति पाहून देव प्रसन्न झाले आणि धन आणून देते झाले असे उपासक थोडे. आणि यज्ञ करणारे आणि देवांस भजणारे जरी सर्वच लोक आहेत तरी ज्यांला यज्ञाविषयीं खरोखर परायण आणि चांगल्या देवांस भजणारे असें नांव द्यावें असे थोडेच मिळतील.'

'स्रुचेनें'='स्रुचः'. स्रुच् म्हणजे अग्नीमध्यें हवि जींतून अर्पावयाचें असतें ती पळी. या शब्दाविषयीं सू. ८३, मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा.

'हवनद्रव्य '=' होम.' म्हणजे धन, कीं जेणेंकरून उपासकाला देवांप्रीत्यर्थ यज्ञ करण्याचें सामर्थ्य येईल, आणि उत्तम हवि अर्पण करितां येईल.

'सुदेव '=' सुदेवः.' याविषयीं सू. ७४, मं.५ आणि त्याजवरील टीप पहावी.

हें सूक्त इन्द्रदेवताक आहे तरी हा प्रस्तुत मंत्र अग्नि आणि साधारण सर्व देव यांविषयीं आहे. परंतु त्यावरून आमच्या अर्थाला अडचण येते असें आम्हांला वाटत नाहीं.

हा मंत्र बहुतकरून श्लोकवृत्ताला सहज बसतोः—

को अग्निमीट्टे हविषा घृतेन
स्रुचा यजाता ऋतुभिर्ध्रुवेभिः ।
कस्मै देवा आ वहॉनाशु होम
को मंसते वीतिहॉत्रः सुदेवः ॥

त्वमङ्ग प्र शंसिषो देवः शविष्ठ मर्त्यम् ।
न त्वदन्यो मघवन्नस्ति मर्डितेन्द्र ब्रवीमि ते वचः ॥ १९ ॥

त्वम् । अङ्ग । प्र । शंसिषः । देवः । शविष्ठ । मर्त्यम् ।
न । त्वत् । अन्यः । मघऽवन् । अस्ति । मर्डिता । इन्द्र । ब्रवीमि ।
ते । वचः ॥ १९ ॥

## भाषायाम्.

१९. हे शविष्ठ ( =अतिशयेन बलवन् ) [ इन्द्र ], देवस्त्वमङ्ग ( =मरणरहितो देवभूतस्त्वमेव ) मर्त्यं प्र शंसिषः ( =मरणधर्मणो मनुष्यान् प्रशासितुं शक्नोषि=अमर्त्यस्त्वमेव मरणधर्मणां मनुष्याणां प्रशासिता भवसि ) । न [ च ] त्वद् अन्यः हे मघवन् ( =धनवन्निन्द्र ), मर्डिता अस्ति ( =सुखकारी त्वत्सकाशात् कोपि नास्त्यन्यः ) । [ अतः कारणात् ] हे इन्द्र, [ अहं ] ते वचो ब्रवीमि ( =तुभ्यं स्तुतिरूपं वचनं ब्रवीमि=तवैव स्तुतिं करोमि ) ॥

१९. हे परमशक्तिमान् [इंद्रा], देव असा जो तो तूंच मर्त्यांवर राज्य करूं शकतोस. हे मघवन्, अनुग्रह करणारा तुझ्याविना दुसरा [कोणी] नाहीं. [म्हणून] हे इंद्रा, [मी] तुझीच स्तुति गातों.

19. Thou only, a God, canst command the mortal, O mightiest One ! No other is there than Thee, O Maghavan, that will be merciful. [Therefore] to Thee, O Indra, I offer praise.

१९. 'हे अतिबलवान् इंद्रा, मरणरहित जो तूं तोच मर्त्यजनाचा राजा होण्यास योग्य आहेस, दुसऱ्याला तो योग्यता नाहीं. त्याप्रमाणें दीन मनुष्यांवर कृपा करणाराहि तुझ्या शिवाय दुसरा कोणी नाहीं. यास्तव, हे इंद्रा, मी तुझीच स्तुति गातों, अन्य देवाची गाऊं इच्छित नाहीं,' असा भावार्थ.

'तूंच'='त्वम् अङ्ग'. 'अङ्ग' या अव्ययाचा असा अर्थ होतो याविषयीं याच सूक्ताचा ७ वा मंत्र आणि त्याजवरील टीप पहावी.

या ऋचेचें वृत्त 'बृहती' आहे (सू. ४७ मं. १ आणि त्याजवरील टीप पहा), आणि ती श्लोकवृत्ताला खालीं दाखविल्याप्रमाणें वसतेः—

तुअमङ्ग प्र शंसिषो
देवो शविष्ठ मर्तिअम् ।
न त्वदन्यो मघवन्नस्ति मर्डिता
इन्द्र ब्रवीमि ते वचः ॥

मा ते राधांसि मा त ऊतयो वसोऽस्मान्कदा चना दभन् ।
विश्वा च न उपमिमीहि मानुष वसूनि चर्षणिभ्य आ ॥
॥ २० ॥ ८ ॥ १३ ॥

मा । ते । राधांसि । मा । ते । ऊतयः । वसो इति । अस्मान् । कदा । चन । दभन् ।
विश्वा । च । नः । उपऽमिमीहि । मानुष । वसूनि । चर्षणिऽभ्यः । आ ॥ २० ॥ ८ ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

२०. ते राधांसि (=तव धनानि=त्वया दातव्यानि धनानि) [अस्मान् कदा चन] मा [दभन्] (=अस्मान् कदापि मा हिंसन्तु=वयं यथा न कदापि हिंसिता भवामस्तथा कुर्वन्तु), ह वसो (=दयालो), ते ऊतयः अस्मान् कदा चन मा दभन् (=त्वया कर्तव्यानि रक्षणानि अस्मान् कदापि न हिंसन्तु=वयं यथा न कदापि हिंसिता भवामस्तथा कुर्वन्तु)। [तर्हि] हे मानुष (=मनुष्येभ्यो हित) [इन्द्र], नश्च विश्वा[नि] वसूनि उपमिमीहि (=अस्मभ्यमपि सर्वाणि धनानि देहि) चर्षणिभ्य आ [उपमिमीहि] (=इतरेभ्यो मनुष्येभ्यश्च सर्वाणि धनानि देहि)॥

आ समुच्चयार्थः। अस्मभ्यं च अस्मदितरेभ्यो मनुष्येभ्यश्च सर्वाणि धनानि देहीति भावः॥

मास्मान् दभन्नित्यस्य विदुष्टरेण ग्रास्मानेन मास्मान् अतिक्रामेयुरिति योनुवादः कृतः स आधारसापेक्ष इति भातितराम्॥

२०. हे कल्याणकारक [इंद्रा], तुझे प्रसाद आणि तुझे कृपाकटाक्ष आम्हांला कधींहि उपद्रव होऊं न देओत. हे मनुष्यहितकारका [इन्द्रा], [तूं] आम्हांला आणि सर्व मनुष्यांला सकळ संपत्ति दे.

20. May thy gifts never [let us perish], may thy aids, O good [Indra], never let us perish. Give all blessings, O [Indra] kind to men, both unto us and unto [other] men.

२०. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. आणि इंद्रापाशीं जो वर शेवटीं मागावयाचा तो यांत मागितला आहे. ऋषि म्हणतो, 'हे दयाळो इन्द्रा, आम्हांला संपत्ति नसल्यामुळें आमचा नाश होऊं लागला तर तूं आम्हांस संपत्ति देऊन आमचा नाश न होई असें कर. आणि तुझा आश्रय आणि तुझें साहाय्य आम्हांस नसल्यामुळें आमचा नाश होऊं लागला तर तो होऊं देऊं नको, तर आमचें संरक्षण कर आणि आमचा नाश न होई असें कर. आणि आम्हांस आणि त्याप्रमाणेंच इतर सर्व मनुष्यांस सर्व सुखें प्राप्त करून देऊन आमचें व इतर सर्व मनुष्यांचें तूं कल्याण कर.'

'कृपाकटाक्ष'=' ऊतयः.' अक्षरशः अर्थ, तुझीं 'साहाय्यें,' तुझीं 'रक्षणें,' रक्षण करण्याचे जे तुझे अनेक प्रकार ते असा भावार्थ.

'आणि [सर्व] मनुष्यांला'=' चर्षणिभ्य आ.' 'आ' या अव्ययाचा 'आणि' असा अर्थ वेदांत पुष्कळ ठिकाणीं होतो हें प्रसिद्ध आहे.

हें सूक्त एकंदरीनें पाहिलें असतां बरेंच कठिण आहे. आणि यांत वृत्तें वेगवेगळीं असल्यामुळें तें किंचित् विलक्षण आहे. या शेवटल्या मंत्राचें वृत्त सतोबृहती आहे (सू. ४७, मं. १ आणि त्याजवरील टीप पहा), आणि तो याप्रमाणें म्हणावयाचा आहे:—

मा ते रॉधांसि मॉ त ऊतयो वसो
अस्मान् कदा चना दभन् ।
विश्वा च नः उपमिमीहि मानुष
वसूनि चर्षणिभ्य आ ॥

## सूक्तम् ८५.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । मरुतो देवता । पञ्चमीद्वादश्यौ त्रिष्टुभौ । शिष्टा जगत्यः ।

**प्र ये शुम्भन्ते जनयो न सप्तयो यामन्नुद्रस्य सूनवः सुदंससः ।**
**रोदसी हि मरुतश्चक्रिरे वृधे मदन्ति वीरा विदथेषु घृष्वयः ॥१॥**

प्र । ये । शुम्भन्ते । जनयः । न । सप्तयः । यामन् । रुद्रस्य । सूनवः । सुऽदंससः ।
रोदसी इति । हि । मरुतः । चक्रिरे । वृधे । मदन्ति । वीराः । विदथेषु । घृष्वयः ॥ १ ॥

**त उक्षितासो महिमानमाशत दिवि रुद्रासो अधि चक्रिरे सदः ।**
**अर्चन्तो अर्कं जनयन्त इन्द्रियमधि श्रियो दधिरे पृश्निमातरः ॥२॥**

ते । उक्षितासः । महिमानम् । आशत । दिवि । रुद्रासः । अधि । चक्रिरे । सदः ।
अर्चन्तः । अर्कम् । जनयन्तः । इन्द्रियम् । अधि । श्रियः । दधिरे । पृश्निऽमातरः ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१. सप्तयः ( =शीघ्रगामिनो ) ये रुद्रस्य सुदंससः सूनवः ( =रुद्रदेवस्य शोभनकर्माणः पुत्राः=पराक्रमकारिणः पुत्रा ) यामन् जनयो न शुम्भन्ते ( =गमने=गमनसमये गमने निमित्ते सति वा योषित इव स्वशरीरमलंकुर्वन्ति ),—रोदसी ( =द्यावापृथिव्यौ ) हि मरुत [ एव ] वृधे चक्रिरे ( =वर्धनाय चक्रिरे=यथा प्रवृद्धे स्यातां तथाकुर्वन् ) घृष्वयो वीराः ( =घर्षणशीलाः=शत्रूणां घर्षणेन नाशयितारो वीरा मरुत एव ) विदथेषु मदन्ति ( =युद्धेषु हृष्यन्ति );

२. ते ( =पूर्वमन्त्रोक्ता ) रुद्रासः ( =रुद्राः=रुद्रस्य पुत्रा ) उक्षितासः ( =वृद्धाः) [ सन्तोपि ] महिमानम् आशत (=महत्त्वं प्राप्नुवन् महत्तरा अभवन् ) [ अपि च ] अधि दिवि ( =द्युलोके ) सदश्चक्रिरे ( =सदनमस्थापयन्=द्युलोके न्यवसन् ) । पृश्निमातरः ( =पृश्नेर्मातुः पुत्रा ) [ मरुतः ] [ इन्द्रविषयम् ] अर्कम् अर्चन्तः ( =स्तोत्रं गायन्तः ) [ सन्तस्तथैव ] इन्द्रियं जनयन्तः ( =इन्द्रसंबन्धि बलमुत्पादयन्तः ) [ सन्तः ] श्रियोधि दधिरे ( =आत्मनि स्वशरीरेषु ऐश्वर्याणि धारितवन्तः ) ॥

## सूक्त ८५.

ऋषि– **गोतम**. देवता–**मरुत्**. वृत्त– जगती, मात्र पांचवी आणि बारावी या दोन ऋचांचें **त्रिष्टुभ्**.

१. जे शीघ्रगामी [ आणि ] महापराक्रमी रुद्रपुत्र [मरुत्] चालूं लागले म्हणजे स्त्रियांप्रमाणें आपणास अलंकृत करितात,– कारण कीं मरुतांनींच भूलोक आणि द्युलोक यांस वर्धमान केलीं [आणि] बलाढ्य [ मरुतच ] युद्धांत आनंदित होतात;

२. ते महान् [ मरुत् ] मोठेपणाप्रत पावले; [ ते ] रुद्रपुत्र द्युलोकीं [ आपल्या ] घराची स्थापना करिते झाले; [ ते ] पृश्नीचे पुत्र [ इंद्राची ] स्तुति गाऊन इंद्राच्या अंगीं बळ उत्पन्न करिते झाले, आणि ऐश्वर्य धारण करिते झाले.

## HYMN 85.

To the *Maruts*. By *Gotama*. Metre—*Jagatî*, except verses 5 and 12, of which the metre is *Trishṭubh*.

1. [ Those Maruts ], the swift [ and ] brave sons of Rudra, who in [their] course decorate themselves like damsels,—for it is the Maruts that have made Earth and Heaven to be [so] vast, [ and that ], [ being ] crushing warriors, delight in battles;

2. Those great [Maruts] attained to greatness, the sons of Rudra placed [their] seat in Heaven, singing praises [ to Indra ], they produced strength in Indra. And the sons of Pṛis'ni wore splendors.

---

१–२. हेंहि सूक्त गोतमाचेंच आहे. मंत्र १ आणि २ यांचा अन्वय एकच असल्यामुळें भावार्थ एकत्र दिला पाहिजे. गोतम ऋषि म्हणतोः–'जे शीघ्रगामी आणि महापराक्रमशाली रुद्रपुत्र मरुत् रथांत बसून जाऊं लागले म्हणजे सुंदर स्त्रियांप्रमाणें सुशोभित दिसतात; आणि वीर मरुत् भूलोक आणि द्युलोक यांसहि मोठे करणारे आणि संग्रामांत युद्ध करण्याविषयीं आनंद पावणारे होत ( १ ); ते रुद्राचे पुत्र पूर्वीच मोठे होते तरी इंद्राची स्तुति करून आणि वृत्राला आणि इतर शत्रूंला मारण्याची शक्ति आणि उत्तेजन त्याच्या आंगीं आणून तेणेंकरून विशेष मोठे झाले आणि देव होऊन स्वर्गीं राहिले आणि ऐश्वर्यसंपन्न झाले ( २ ).'

'शीघ्रगामी'='सप्रयः.' हा अर्थ (सायणांस अनुसरून केलेला) पाश्चिमात्य कितीएक विद्वान् पंडितांनीं केलेल्या आणि कल्पिलेल्या अर्थापेक्षां विशेष आधारबद्ध दिसतो. 'घोडा' असा अर्थ बहुत ठिकाणीं होतो खरा, पण येथें तो जुळत नाहीं. 'मागाहून चालणारा,' 'बरोबर रथाला जोडिलेला' असा पाश्चिमात्य विद्वान् अर्थ करितात त्याला निर्वचनाचा जितका आधार आहे तितकाच 'चपळ,' 'शीघ्रगामी' या अर्थाला आहे. जेव्हां सायणांनीं केलेला अर्थ प्रमाददोषी आहे अशी खात्री उघडपणें आणि सहज होत नाहीं आणि ती खात्री त्यांच्याच ग्रंथावरून व्हावी तशी होत नाहीं, आणि त्यांनीं दिलेला अर्थ संदर्भाला जुळतो आणि दुसऱ्याहि मंत्रांत त्यांनीं तोच अर्थ केलेला असेल, तेव्हां त्यांचा अर्थ टाकून अन्य अर्थाची कल्पना करणें हेंच प्रमादास्पद आहे असें आम्हांला निःसंशय दिसतें.

'रुद्रपुत्र'='रुद्रस्य सूनवः'. सू. ३८, मं. ७ आणि त्याजवरील टीप पहा.

'चालूं लागले म्हणजे'='यामन्.' अक्षरशः अर्थ 'गमनांत,' 'मार्गी.' म्हणजे बाहेर जाऊं लागले म्हणजे—स्त्रिया बाहेर जाऊं लागल्या म्हणजे जशा आपल्या आंगावर अलंकार घालून सुशोभित होऊन जातात तसे, मरुत् आपल्या आंगावर दागिने घालून आपल्या शरीराला शोभा आणितात आणि मग बाहेर जातात असें तात्पर्य. मरुत् अलंकार घालितात याविषयीं सू. ३७, मं. २ आणि त्याजवरील टीप पहा. शिवाय ऋ. १. १६६. १०; २. ३४. २, ३; ५. ५३. ४ इत्यादि अनेक मंत्रांत मरुत् अलंकार आणि फुलांचे हार घालून आपलीं शरीरें शोभवितात असें सांगितलें आहे. पुढचाच ( तिसरा ) मंत्र पहा.

'कारण कीं'='हि.' हें कारण, मरुतांस 'महापराक्रमी' असें म्हटलें त्याचें आहे.

'भूलोक आणि द्युलोक यांस वर्धमान केलीं'='रोदसी चक्रिरे वृधे.' म्हणजे पृथिवी इतकी विस्तीर्ण आहे आणि द्युलोक पृथिवीपेक्षांहि इतका विस्तीर्ण आहे तो मरुतांनींच विस्तीर्ण केलेला आहे, आपोआप विस्तीर्ण झालेला नाहीं किंवा दुसऱ्या देवांनींहि केलेला नाहीं. ऋ. ८. ८३. ९, १०, ११ पहा.

'युद्धांत आनंदित होतात'='विदथेषु मदन्ति.' हें, मरुतांला 'महापराक्रमी' असें विशेषण दिलें तें कां लाविलें त्याचें कारण आहे.

'महान्'='उक्षितासः.' 'उक्षित' हें 'वक्ष्' ( वर्धनें, वाढणें ) या धातूपासून झालेलें—'वाढलेला,' 'मोठा' या अर्थाचें रूप आहे. 'वक्ष्' धातु ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलेला आहे, तीं सर्व स्थळें वाचून पहातां सायणांनीं बहुतकरून 'शिंपणें,' 'प्रोक्षित करणें,' 'भिजविणें' अशा अर्थानें निर्वाह केलेल

आहे. परंतु त्यांतून पुष्कळ मंत्रांत तो अर्थ लागत नाहीं आणि 'वाढणें,' 'मोठा होणें,' 'वृद्धिंगत होणें' असा अर्थ उघड दिसतो, आणि स्वतः सायणाचार्यांनींच ऋ. ४. १६ ५ यांत पर्यायानें आणि ऋ. ७. ८. २ याजवरील भाष्यांत स्पष्टपणें तोच ( वाढणें हा ) अर्थ दिला आहे तो पहा.

'घराची स्थापना करिते झाले'='दिवि अधि चक्रिरे सदः.' म्हणजे 'द्युलोकीं राहूं लागले.' पूर्वी ( म्हणजे इंद्राची स्तुति करून मोठेपणा पावण्यापूर्वी ) लहान असल्यामुळें भूमीवर राहत असत असें विवक्षित दिसतें.

'[ इंद्राची ] स्तुति गाऊन '=' अर्कम् अर्चन्तः.' मरुत् इंद्राची सेवा करितात आणि त्याचें स्तोत्र गातात असें वेदांत सांगितलें आहे. ऋ. ३. ३२. ३ यांत मरुत् इंद्राची स्तुति गातात आणि तेणेंकरून त्याचें बळ वाढवितात असें सांगितलें आहे ( ये ते शुष्मं ये तविषीम् अवर्धन् अर्चन्तः इन्द्र मरुतः ते ओजः). ऋ. ५. २९. १, २, ६ यांतहि तसेंच सांगितलें आहे. ( अर्चन्ति त्वा मरुतः पूतदक्षाः; मरुतः आर्चन् इन्द्रम्; अर्चन्ति इन्द्रं मरुतः सधस्थे ). शिवाय ऋ. ८. ३. ७ हा मंत्र पहा.

'पृश्नीचे पुत्र '=' पृश्निमातरः.' सू. ३८, मं. ४ आणि त्याजवरील टीप पहा.

'ऐश्वर्य धारण करिते झाले '=' अधि श्रियो दधिरे.' म्हणजे तेजःपुंज दिसूं लागले, त्यांजवर वैभवाची कांति दिसूं लागली.

**गोमातरो यच्छुभयन्ते अञ्जिभिस्तनूषु शुभ्रा दधिरे विरुक्मतः ।**
**बाधन्ते विश्वमभिमातिनमप वर्त्मान्येषामनु रीयते घृतम् ॥ ३ ॥**

गोऽमातरः । यत् । शुभयन्ते । अञ्जिऽभिः । तनूषु । शुभ्राः । दधिरे । विरुक्मतः ।
बाधन्ते । विश्वम् । अभिऽमातिनम् । अप । वर्त्मानि । एषाम् । अनु । रीयते । घृतम् ॥ ३ ॥

---

महान्तोपि मरुतः इन्द्रस्य स्तोत्रमुक्त्वा तस्मिन् बलमुत्पादयामासुः तस्य सखायो भूत्वा च देवत्वमापुः स्वर्गे च निवसनं कृत्वा ऐश्वर्योपेता अभवन्निति भावः ॥

वक्षधातोर्वर्धनार्थकत्वं तु कृष्णपविरोषधीभिर्ववक्षे ( ऋ. ७. ८. २ ) इत्यत्र सम्यगुक्तं सायणैः ॥

---

## भाषायाम्.

३. यद् ( =यदा ) गोमातरः ( =पृश्न्या गोः पुत्रा ) [ मरुतः ] अञ्जिभिः शुभयन्ते ( अलंकारैः स्वशरीराणि शोभयन्ति ) [ तदा ] [ ते ] शुभ्राः (=दीप्ता ) [ मरुतः ] तनूषु ( =स्वशरीरेषु ) विरुक्मतो दधिरे ( =दीप्तान्यायुधानि धारयन्ति ) । [ ते ] विश्वम् अभिमातिनं ( =सकलमपि शत्रुम् ) अप बाधन्ते ( =अपगमयन्ति ) । एषां वर्त्मानि अनु ( =तेषां मरुतां मार्गाननुलक्ष्य ) घृतं ( =घृतवत् पोषकम् उदकं) रीयते ( =स्रवति ) ॥

आभरणालंकृता धृतायुधाः शत्रुनाशका मरुतो यत्र यत्र गच्छन्ति तत्र तत्र मेघोदकवृष्टिर्भवतीति भावः ॥

३. [ते] गोपुत्र जेव्हां आपणास अलंकारांनीं शोभवितात [तेव्हां] [ते] देदीप्यमान [मरुत्] [आपल्या अंगावर] लकलकीत शस्त्रें धारण करितात. [ते] सकळ शत्रूंला दूर हाकून देतात. त्यांच्या मार्गीं पाणी गळत असतें.

3. When [those] sons of the cow are decorated with ornaments, they wear on their persons brilliant weapons. Away they drive every enemy. Along their paths the rich water runs.

३. 'पृथिवीरूप अथवा मेघमालारूप पृश्निगाईचे पुत्र असे जे आंगावर अलंकार घालणारे, आणि लकलकीत भाले इत्यादि शस्त्रें धारण करणारे, आणि जो कोणी म्हटला तो शत्रु आंगावर आला तरी त्याचा पराभव करून टाकणारे असे जे मरुत्, ते जिकडे जिकडे जातात तिकडे तिकडे पावसाची वृष्टि होत असते.'

'गोपुत्र'='गोमातरः.' म्हणजे पृश्नि या नांवाची जी गाय तिचे पुत्र. सू. ३८, मं. ४ याजवरील टीप पहा. मरुतांला जसे 'द्यूचे पुत्र' (दिवस्पुत्राः) आणि 'रुद्राचे पुत्र' (रुद्रियाः) असें नांव वेदांत आहे त्याप्रमाणेंच ते 'पृश्नीचे पुत्र' होत आणि पृश्नि ही त्यांची आई आहे असें पुष्कळ मंत्रांवरून समजून येतें.

'लकलकीत शस्त्रें धारण करितात'= 'दधिरे विरुक्मतः.' 'विरुक्मतः' या शब्दाचा अर्थ वज्रादि देदीप्यमान 'अस्त्रें' असा होतो याविषयीं ऋ. १०. १३८. ४ हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पहा. मरुत् भाले आणि त्यासारिखीं दुसरीं शस्त्रें धारण करीत असतात याविषयीं ऋग्वेदांत पुष्कळ प्रमाणें आहेत. सू. ३७, मं. २ आणि टीप पहा. पुढच्या मंत्रांतहि तेंच सांगितलें आहे. सू. ६४, मं. ११ हा मंत्र आणि टीका पहा.

'त्यांच्या मार्गीं पाणी गळत असतें'= 'वर्त्मानि एषाम् अनु रीयते घृतम्.' म्हणजे जेथें जेथें ते जातात तेथें तेथें पाऊस पडत असतो. सू. ३७, मं. १० आणि टीका पहा. पुढचा पांचवा मंत्रहि पहा.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें श्लोकवृत्ताला बसतोः—

गोमातरो यच्छुभयन्ते अञ्जिभिः
तनूषु शुभ्रा दधिरे विरुक्मतः ।
बाधन्ते विश्वमभिमातिनमप[illegible]
वर्त्मानि एषामनु रीयते घृतम् ॥

वि ये भ्राजन्ते सुमखास ऋष्टिभिः प्रच्यावयन्तो अच्युता चिदोजसा।
मनोजुवो यन्मरुतो रथेष्वा वृषव्रातासः पृषतीरयुग्ध्वम् ॥ ४ ॥

वि । ये । भ्राजन्ते । सुऽमखासः । ऋष्टिऽभिः । प्रऽच्यवयन्तः । अच्युता । चित् । ओजसा ।

मनःऽजुवः । यत् । मरुतः । रथेषु । आ । वृषऽव्रातासः । पृषतीः । अयुग्ध्वम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. ये सुमखासः (=सुमखाः=सुयज्ञाः=सुपूजनीया) [मरुतः] ऋष्टिभिर्वि भ्राजन्ते (=आयुधविशेषैर्विशेषेण शोभन्ते) [ते मरुतः] ओजसा (=स्वबलेन) अच्युता चित् प्रच्यावयन्तः (=अच्युतानि चित् प्रच्यावयन्तः=अचलान्यपि पर्वतादीनि महान्ति वस्तूनि चालयन्तः=तेषां कम्पयितारो) [भवन्ति] । —हे मरुतः, यद् (=यदा) वृषव्रातासः (=वीर्योपेतगणात्मका) [यूयम्] आ रथेषु पृषतीः अयुग्ध्वम् (=युष्माकं रथेषु युष्माकं श्वेतविन्दुविचित्रा हरिणीर्योजयथ) [तदा यूयं] मनोजुवः (=मन इव शीघ्रगमना) [भवथ] ॥

सुमखशब्दो भिन्नैर्व्याख्यातृभिर्भिन्नैः प्रकारैर्व्याख्यातः । सुमखः सुयोध इति विदुष्टरो ग्रास्मानः । सुमखो बलवान् इति मोक्षमूलराचार्याः । सुमखः सुयज्ञः सुमंहनीयः सुपूज्यो वेति सायणाः । सुमखशब्दयुक्तेषु सर्वेषु मन्त्रेषु सायणकृतोनुवाद एव विशेषेणोपपन्न इति भाति । न च मखशब्दस्यापि योधनार्थत्वं योद्धृत्वं वा कुत्रचिन्मन्त्रेषु दृश्यते । सायणाश्च यतः समानं सर्वमन्त्रेषु मखसुमखशब्दौ व्याचक्षते अतस्ते पुराणव्याख्यातृभ्यस्तमर्थं लब्ध्वा व्याचक्षत इति स्पष्टम् । न च वर्तते किमपि प्रयोजनमेतं सायणकृतमर्थं त्यक्त्वा अर्थान्तरकल्पनायाः । ननु 'संस्कृतभाषया समानोद्भवासु ग्रीकलाटीनप्रभृतिषु भाषासु वर्तमानेभ्यः केभ्यश्चन पदेभ्योर्थान्तरस्य संभवोनुमीयते । उच्यते । न तादृशानि प्रमाणानि पर्याप्तानि । सर्वेषु स्थलेषु च सायणस्याभिमतोर्थः सम्यग्युज्यते न तथा पाश्चिमात्यपण्डितानाम् । सायणाः सर्वेषु मन्त्रेषु समानेन प्रकारेण तं शब्दं विवृण्वन्ति तस्मात् तेषां व्याख्या पुरातनतमव्याख्यातॄणां वचनाधारवद्धेत्यादीनि प्रमाणानि ग्रीकप्रभृत्यार्यभाषोपलब्धप्रमाणेभ्यः सकाशाद्बलीयांसीति ॥

'वृषव्रातासः' इति पदं ग्रास्मानेन वृषभिरावृता इति यद्व्याख्यातं तच्चिन्त्यं

४. जे सुपूजनीय [मरुत्] भाल्यांच्या योगानें प्रकाशतात [ते आपल्या] बळानें अचल पदार्थाला सुद्धा कांपवितात.– हे मरुतांनो, सुवीर्यगणात्मक [जे तुम्ही ते] जेव्हां पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी [आपल्या] रथांला जोडितां [तेव्हां तुम्ही] मनाप्रमाणें वेगवंत [होत असतां].

4. The worshipful [Maruts] who shine with [their] spears [become] through [their] might the shakers of even the unshakable.— When [you], O Maruts, who go in mighty troops, yoke the white-spotted deer to [your] chariots, [you are] as swift as the mind.

४. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'लकलकीत भाले घेऊन जाणारे जे मरुत् ते जाऊं लागले म्हणजे त्यांच्या मार्गीं असणारे जे पर्वतादिक मोठमोठे अचल पदार्थ जे कधींहि हालणारे नव्हेत, तेहि कांपूं लागतात. आणि मरुत् आपल्या रथांस पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी जुंपून जाऊं लागले म्हणजे त्यांचा वेग इतका असतो कीं ते मनाच्या वेगाप्रमाणें वेगवंत होतात.'

'सुपूजनीय'='सुमखासः.' मख, आणि सुमख, अदुर्मख इत्यादि मखशब्दाचे संबंधी सर्व शब्द ज्या ज्या वेदवाक्यांत (ऋग्वेदसंहितेंत) आले आहेत तीं सर्व वाचल्यानंतर सायणांनींच केलेला अर्थ योग्य आहे, इतर कितीएक विद्वान् पंडितांनीं केलेला आधारपूर्वक नाहीं असें आम्हांस वाटल्यावरून आम्हीं सायणांस अनुसरूनच अर्थ केला आहे. भाषा पहा.

'अचल पदार्थाला सुद्धा कांपवितात'='अच्युता चित् प्रच्यावयन्तः.' सू. ३७. ७, ८, १२, ६४ मं. ३, ५ आणि टीका पहा.

'सुवीर्यगणात्मक'='वृषव्रातासः.' म्हणजे तुम्ही वीर्यवान् शूर असून तुमचे वेगवेगळे गण आहेत. हे गण सातांसातांचे आहेत असें सायणाचार्य म्हणतात.

'पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी'='पृषतीः.' मरुत् आपल्या रथाला पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी जुंपतात असें वेदांत सांगितलें आहे. सू. ६४, मं. ७ आणि त्याजवरील आमची टीका पहा.

ही ऋचा खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटली म्हणजे श्लोकवृत्ताला बसतेः–

वि ये भ्रॉजन्ते सुमखास ऋष्टिभिः
प्रच्यावयन्तो ॲच्युता चिदोजसा ।
मनोजुवो यन्मरुतो रथेषु आ
वृषव्रॉतासः पृषतीरयुग्धुअम् ॥

**प्र यद्रथेषु पृषतीरयुग्ध्वं वाजे अद्रिं मरुतो रंहयन्तः ।**
**उतारुषस्य वि ष्यन्ति धाराश्चर्मेवोदभिर्व्युन्दन्ति भूम ॥ ५ ॥**

प्र । यत् । रथेषु । पृषतीः । अयुग्ध्वम् । वाजे । अद्रिम् । मरुतः । रंहयन्तः ।
उत । अरुषस्य । वि । स्यन्ति । धाराः । चर्मऽइव । उदऽभिः । वि । उन्दन्ति । भूम ॥ ५ ॥

---

भाति । वीर्योपेतगणात्मका इति हि तस्यार्थः। मरुतः स्वयमेव सप्तगणात्मका भवन्तीति गणश्रियो नृषाचः शूरा ( ऋ. १. ६४. ९ ) सोमं पिब मरुद्भिर्गणश्रिभिः ( ऋ. ५. ६०. ८ ) इत्यादिषु मन्त्रेषु श्रुतत्वात् ॥

---

## भाषायाम्.

५. हे मरुतः, अद्रिं वाजे रंहयन्तः ( =अद्रिसदृशं=मेघं युद्धे प्रेरयन्तः=वृत्रेण सह युद्धयन्तो ) [ यूयं ] यद् ( =यदा ) रथेषु पृषतीः अयुग्ध्वं ( =वो रथेषु श्वेत-बिन्दुयुक्ता हरिणीर्योजयथ ) [ तदा ] [ भवन्तः ] उत अरुणस्य धारा वि ष्यन्ति चर्मेव [ च ] भूम उदभिर्वि उन्दन्ति ( =आरोचमानस्य वैद्युतस्याग्नेस्तेजोधारा विमोचयन्ति तथैव अल्पचर्मेव विस्तृतामेतां पृथिवीमपि मेघजलैर्विशेषेण आर्द्रां कुर्वन्ति)॥

एतदुक्तं भवति । यदा युक्तहरिणीरथा मरुतः शीघ्रतरं गच्छन्तो मेघरूपेण वृत्रेण सह युद्धयन्ति तदा वैद्युतस्याग्नेः प्रभा उदकधारा इव भूमौ पतन्ति अपि च मेघोदकवृष्टयोपि भवन्ति । आसां च प्राचुर्याद्भूमिरेषाल्पतरं चर्मेव क्लिद्यत इति ॥

अरुषस्य धारा इत्यत्र आरक्तस्य शत्रोर्धारा आरक्तस्वरूपस्य वृत्ररूपस्य धारा मेघोदकधारा इति मोक्षमूलराचार्याः । तत्तु प्रमाणसापेक्षं भवति । अरुषशब्दस्य आरक्तशत्रुरित्यर्थे कुत्राप्यप्रयुक्तत्वात् । स शब्दः पुनर्वैद्युतत्वादिनारक्तस्याग्नेर्वाचको भवतीति प्रसिद्धमेव । अपि चोक्तं मन्त्रान्तरे अध क्षरन्ति सिन्धवो न सृष्टाः प्र नीचीरग्ने अरुषीरजानन्निति । ऋ. १. ७२. १०. । मरुतश्च यत्र यत्र गच्छन्ति तत्र तत्र विद्युत उद्भवन्तीति विद्युतस्तविषीभिरक्रतेति विद्युन्न तस्थौ मरुतो रथेषु वः इति च ( ऋ. १. ६४. ५, ९ ) उक्तं भवति । तथा चोक्तम् । अग्निभ्राजसो विद्युतो गभस्त्योः ( ऋ. ५. ५४. ११ ) इति ॥

५. जेव्हां मरुत् पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी [ आपल्या ] रथांला जोडितात आणि पर्वताकडून युद्ध करवितात [ तेव्हां ते ] आरक्त [ वैद्युत अग्नी ]च्या [ तेजो ]-धारा वाहवितात आणि लहानसें चर्म भिजवून टाकिल्याप्रमाणें उदकवृष्टींनीं [ सर्व ] पृथिवीलाहि भिजवून टाकितात.

5. When the Maruts yoke the white. spotted deer to [ their ] chariots and force the mountain ( the cloud ) into battle, [ they ] pour down streams of the red Fire ( Lightning ) and drench with waters the earth like a hide.

५. 'जेव्हां मरुत् आपल्या रथांला हरिणी जुंपून जाऊं लागतात, तेव्हां त्यांच्या मार्गावर असलेले जे मेघ त्यांजशीं त्यांचें जणुं युद्ध होतें; आणि युद्ध होत असतां विजांचे जणुं प्रवाह खालीं वाहतात, आणि मेघवृष्टि तर इतकी होते कीं, ही सर्व विस्तीर्ण पृथिवी लहानशा एकाद्या कातड्याप्रमाणें ओली थबथबीत होते.' म्हणजे चांभारानें भिजत घातलेल्या चामड्याप्रमाणें भिजून थबथबीत होते. मरुत् जाऊं लागले म्हणजे ते मेघवृष्टि करितात म्हणून जसें सांगितलेलें मरुतांविषयींच्या सूक्तांत आढळतें तसेंच ते जिकडे जातात तिकडे वीजा उत्पन्न करितात असेंहि सांगितलें आहे, ( ऋ. १. ६४. ५, ९ आणि टीका पहा ). आणि आकाशामधून विजेच्या रूपानें जें तेज भूमीवर पडत असतें, त्याला उदकप्रवाहाची उपमा देतात याविषयीं सू. ७२, मं. १० आणि त्याजवरील टीका पहा. मरुत् म्हणजे वात अथवा तुफान. त्यांच्या ज्या अधिदेवता त्या जिकडे जातात तिकडे वीजा आणि मेघवृष्टि होतात म्हणून सांगितलेलें समजण्याला कांहीं कठिण नाहीं. ऋ. ५. ५४. ११ आणि त्याजवरील सायणभाष्य हींहि पहा.

'पर्वताकडून युद्ध करवितात'='वाजे अद्रिं रंहयन्तः.' पर्वत म्हणजे मेघ. सायणाचार्य पर्वताकडून म्हणजे 'मेघाकडून पर्जन्य पाडावयाचा असला म्हणजे' असा अर्थ करितात. परंतु तो अर्थ घेतला तर 'वाज'शब्दाच्या अर्थाविषयीं विनाकारण ओढाताण करावी लागते.

'आरक्त [ वैद्युत अग्नी ]च्या'='अरुषस्य.' 'अरुष' म्हणजे आरक्त जो विद्युद्रूप अग्नि तो, असा सायणांनींच अर्थ केला आहे. शिवाय ऋ. ३. २९. ६; ५. १२. २; ६. ८. १ हे मंत्र आणि सायणभाष्य पहा.

'रथांला जोडितात'='रथेषु अयुग्ध्वम्.' 'भिजवून टाकितात'=' वि उ-

आ वो वहन्तु सप्तयो रघुष्यदो रघुपत्वानः प्र जिगात बाहुभिः ।
सीदता बर्हिरुरु वः सदस्कृतं मादयध्वं मरुतो मध्वो अन्धसः ॥
॥ ६ ॥ ९ ॥

आ । वः । वहन्तु । सप्तयः । रघुऽस्यदः । रघुऽपत्वानः । प्र । जिगात । बाहुऽभिः ।
सीदत । आ । बर्हिः । उरु । वः । सदः । कृतम् । मादयध्वम् । मरुतः । मध्वः । अन्धसः ॥ ६ ॥ ९ ॥

## भाषायाम्.

६. [ हे मरुतः, ] युष्माकं रघुष्यदः सप्तयः ( =शीघ्रम् उत्पतन्तोऽश्वा ) [ अस्माकं यज्ञं ] वः आ वहन्तु ( =युष्मान् आनयन्तु ) । रघुपत्वानः ( =शीघ्रपतनाः=शीघ्रपक्षाः=पक्षिवच्छीघ्रपतना ) [ यूयं ] बाहुभिः ( =बाहुरूपैः पक्षैः) प्र जिगात (=अस्मद्यज्ञम् आगन्तुं युष्माकं स्थानेभ्यो निर्गच्छत ) । [ आगत्य च ] आ बर्हिः सीदत ( =बर्हिरुपरि निषीदत ) । वः ( =युष्मदर्थम् ) [ अस्माभिः ] उरु सदः कृतम् ( =विस्तीर्णम् आसनं निर्मितम् ) [ अस्ति ] । [ अतः कारणात् ] हे मरुतः, [ अस्माभिः प्रार्पितस्य ] मध्वः अन्धसः ( =मधुरस्य सोमलक्षणस्यान्नस्य भागं भक्षयित्वा ) मादयध्वं ( =तृप्ता भवत ) ॥

रघुपत्वान इत्यत्रैतदनुसंधेयम् । मरुतः खलु पक्षिवच्छीघ्रं गच्छन्तीति तथैव विशब्दो मरुद्वाचको भवतीति दृष्टं मन्त्रान्तरेषु । यथा वय इव मरुतः केनचित् पथा १. ८७. २; आ यात......मरुतः सुअर्कैः......रथेभिः अश्वपर्णैः १. ८८. १; अंसेषु एताः पविषु क्षुरा अधि वयो न पक्षान् वि अनु श्रियो धिरे १. १६६. १०; वयश्चन सुभ्वः आ अव यन्ति ५. ४१. १३; वयो न श्रेणीः पप्तुरोजसा अन्तान् दिवो बृहतः सानुनः परि ५. ५९. ७; तदिन्द्र प्रेव वीर्यं चकर्थ यत्ससन्तं वज्रेणाबोधयोहिम् । अनु त्वा पत्नीर्हृषितं वयश्च विश्वे देवासो अमदन्ननु त्वा १. १०३. ७ ॥

न्दन्ति.' प्रथम पादांत द्वितीयपुरुषीं निर्देश असून चतुर्थ पादांत तृतीयपुरुषीं आहे. पण असे प्रयोग वेदांत पुष्कळ सांपडतात.

या मंत्राचा दुसरा आणि तिसरा हे चरण जरा खडबडीत लागतातः—

प्र यद्रथेषु पृषतीरयुग्ध्वं
वाजे अद्रिं मरुतो रंहयन्तः ।
उतारुषस्य वि ष्यन्ति धाराश्
चर्मेवोदभिर्व्युन्दन्ति भूम ॥

६. [हे मरुतांनो], बाहुरूप पक्षांच्या योगानें [तुमचे] शीघ्रगामी घोडे तुम्हांला घेऊन येओत. सवेग उडत जाणारे [जे तुम्ही ते] यावयाला निघा. [तुम्ही येऊन] दर्भावर बसा. तुम्हांसाठीं प्रशस्त आसन घातलें [आहे]. [आणि] हे मरुतांनो, [हा आमचा] मधुर सोमरस पिऊन आनंदित व्हा.

6. May [your] swift-flying steeds bring you hither. Start ye forth with the [wings of your arms], ye swift-winged ones. Sit ye on the *Kus'a*. A wide seat [is] prepared for ye. Be ye delighted with the sweet oblation.

६. ऋषि मरुतांला म्हणतो, 'हे मरुतांनो, तुम्ही पक्ष्यांप्रमाणें शीघ्र उडत जात असतां, तर तुमचे पक्ष्यांप्रमाणें चपळ असे जे घोडे ते तुम्हांला आमच्या यज्ञांत घेऊन येओत, तुम्ही आपल्या पक्षरूप बाहूंच्या योगानें उडत आम्हांकडेस सत्वर या. आणि हें जें लांबरुंद आसन तुम्हांसाठीं आम्हीं घातलें आहे त्यावर येऊन बसा, आणि आम्ही तुम्हाला अर्पण करितों तो मधुर सोमरस पिऊन आनंद पावा.'

'शीघ्रगामी'='रघुष्यदः.' अक्षरशः अर्थ 'वेगानें उडणारे,' पक्ष्यांसारिखे उडत जाणारे, किंवा पाण्याप्रमाणें वाहत जाणारे. स्यन्द् धातूचा प्रयोग वेदांत बहुतकरून पाण्याप्रमागें किंवा पक्ष्याप्रमाणें जी चपळ गति तिजविषयीं होत असतो.

'बाहुरूप पक्षांच्या योगानें'='बाहुभिः.' मरुत् हे पक्ष्यांप्रमाणें उडत जात असतात असें पुष्कळ मंत्रांत सांगितलें आहे, आणि त्याच कारणास्तव त्यांला 'वयः' (पक्षी) असें नांव दिलेलें आहे. (भाषा पहा). मरुतांला पक्षी असें म्हटल्यानंतर त्यांणीं आपल्या बाहुरूप पक्षांनीं उडत यावें अशी प्रार्थना करणें हें स्वाभाविक दिसतें.

'सवेग उडणारे'='रघुपत्वानः.' अक्षरशः अर्थ 'चपळ पक्ष आहेत ज्यांला ते,' 'शीघ्रपक्ष;' अर्थात् चपळ पक्ष्यांप्रमाणें उडत जाणारे.

**तेऽवर्धन्त स्वतवसो महित्वना नाकं तस्थुरुरु चक्रिरे सदः ।**
**विष्णुर्यद्धावद्वृषणं मदच्युतं वयो न सीदन्नधि बर्हिषि प्रिये ॥७॥**

ते । अवर्धन्त । स्वऽतवसः । महिऽत्वना । आ । नाकम् । तस्थुः । उरु । चक्रिरे । सदः ।
विष्णुः । यत् । ह । आवत् । वृषणम् । मदऽच्युतम् । वयः । न । सीदन् । अधि । बर्हिषि । प्रिये ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. यत् ह ( =यदा खलु ) विष्णुः ( =एतन्नामको देवो) मदच्युतं वृषणं(=विजयिनं वीरम्=इन्द्रं ) [ वृत्रहनने ] आवत् ( =अरक्षत्=तस्य साहाय्यम् अकरोत् ) [ तदा ] ते ( =मरुतः ) महित्वना स्वतवसः अवर्धन्त ( =महत्त्वविषये प्रवृद्धा भूत्वा स्वतवसः=स्वबलवन्तः अभवन् ) [ तथा तदैव ते ] आ नाकं तस्थुः ( =द्युलोकम् आरूढा अभवन् ) [ अपि च ] उरु सदः ( =विस्तीर्णं स्थानं स्वनिवासस्थलं ) चक्रुः । [ अपि च ] वयो न ( =पक्षिण इव ) [ आगत्य ] अधि प्रिये बर्हिषि ( =प्रीतिकरे कुशासने=यजमानैरास्तृते बर्हिरासने ) सीदन् ( =न्यषीदन् ) ॥

एतदुक्तं भवति । यदा विष्णुना सह मरुत इन्द्रस्य वृत्रहनने साहाय्यं चक्रुस्ततःप्रभृति ते महत्त्वमापुः स्वबलवन्तश्च बभूवुः श्रेष्ठा देवाश्च भूत्वा स्वर्गमधिष्ठितवन्तः । ततःप्रभृति च यजमानास्तेषामर्थे यज्ञं कुर्वन्ति ते च यजमानानां यज्ञं पक्षिवच्छीघ्रमागत्य बर्हिषि निषीदन्तीति ॥ वृत्रहनने विष्णुना कृतमिन्द्रस्य साहाय्यं हि "सखे विष्णो वितरं विक्रमस्व द्यौर्देहि लोकं वज्राय विष्कभे । हनाव वृत्रं रिणचाव सिन्धून् इन्द्रस्य यन्तु प्रसवे विसृष्टाः (ऋ. ८. १००. १२) अहिं यद् वृत्रम् अपो वव्रिवांसं हन् ऋजीषिन् विष्णुना सचानः" ( ऋ. ६. २०. २ ) इत्यादिषु मन्त्रेषु श्रुतम् ॥

७. ते मोठेपणानें वाढून स्वतःशक्तिमान् झाले. ते द्युलोकाच्या शिखरावर चढले [ आणि ] [ तेथें ] [ आपलें ] विस्तीर्ण निवासस्थान करिते झाले. विजयशाली सुवीर [ इन्द्रा ]ला जेव्हां विष्णूनें साहाय्य केलें [ त्या दिवसापासून ] [ मरुत् ] पक्ष्यांप्रमाणें येऊन [ आपल्या ] प्रिय दर्भासनावर बसूं लागले.

7. When as is well-known Vishnu aided the vanquishing Hero ( Indra ) [ then ] they [ the Maruts ] grew in greatness and became self-powerful, they mounted on the top of Heaven, they made [ there ] a wide home [ for themselves ], [ and ] began to [ come and ] sit on the beloved Kus'a-grass like birds.

---

७. ह्या ऋचेचा भावार्थ असा आहे कीं, 'मरुतांचा महिमा त्यांणीं आणि विष्णूनें मिळून इंद्राला साहाय्य करून वृत्रहनन करविलें त्या दिवसापासून वाढला. तो असा कीं ते त्या दिवसापासून मोठे देव झाले आणि स्वतःसिद्ध बलवान् झाले, आणि स्वर्गी चढले आणि तेथें आपलें निवासस्थान करून राहिले; आणि त्या दिवसापासून त्यांजप्रीत्यर्थ लोक यज्ञ करूं लागले आणि त्या दिवसापासून यज्ञांत मरुत् येऊन प्रिय दर्भासनावर बसूं लागले.'

'स्वतःशक्तिमान् झाले' = 'स्वतवसः.' म्हणजे दुसऱ्याच्या संबंधानें शक्तिमान् नव्हेत, तर त्यांच्या आंगीं स्वताहाची शक्ति आली.

'द्युलोकाच्या शिखरावर'='नाकम्.' सू. ३४, मं. ८ आणि त्याजवरील टीप पहा.

'विष्णूनें साहाय्य केलें'='विष्णुः आवत्.' वृत्राला मारतांना इंद्राला विष्णूनें साहाय्य केलें असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. पुराणादिक जे आधुनिक ग्रंथ त्यांत विष्णूचें माहात्म्य मोठें आहे; प्रसंग आला म्हणजे इंद्रादि देव विष्णूची प्रार्थना करितात आणि विष्णूच सकळ देवांचें रक्षण करितो असें सांगितलें आहे. पण वेदांत त्याच्या उलट प्रकार आहे. वेदांत सांगितलें आहे कीं इंद्रानें वृत्रहननादिक मोठे पराक्रम केले तेव्हां त्याला विष्णूनें आणि मरुतांनीं साहाय्य केलें. ऋ. ६. २०. २; १०. ११३. २; ८. १००. २; १. १०३. ७.

वेदांत इंद्र, मरुत्, आणि विष्णु यांला एकत्रच सोम प्यावयाला येण्याविषयीं प्रार्थना आहे असे मंत्र पुष्कळ आहेत; आणि केवळ विष्णु आणि मरुत् यांसच ज्यांत प्रार्थना आहे आणि सोम अर्पण केला आहे असेहि मंत्र बरेच

शूरा॑ इ॒वेद्युयु॑धयो॒ न जग्म॑यः श्र॒व॒स्यवो॒ न पृत॑नासु येतिरे ।
भय॑न्ते॒ विश्वा॒ भुव॑ना म॒रुद्भ्यो॒ राजा॑न इव त्वे॒षसं॑दृशो॒ नरः॑ ॥८॥

शूरा॑ःऽइव । इत् । युयु॑धयः । न । जग्म॑यः । श्र॒व॒स्यवः॑ । न । पृत॑नासु । येतिरे ।
भय॑न्ते । विश्वा॑ । भुव॑ना । म॒रुत्ऽभ्यः॑ । राजा॑नःऽइव । त्वे॒षऽसं॑दृशः । नरः॑ ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८· [ मरुतः ] शूरा इवेत् (=शूरा इवैव), [अथवा] जग्मयो युयुधयो न (=शीघ्रं गच्छन्तो वीरा इव), [ अथवा ] श्रवस्यवो न (=शत्रुभ्यो धनमिच्छन्तो योद्धार इव), पृतनासु येतिरे (=संग्रामेषु प्रयतन्ते=“ वृत्रादिभिर्युद्धे व्याप्रियन्ते”) । विश्वा भुवना (=विश्वानि भुवनानि=सर्वाणि वस्तूनि पृथिव्यादीनि) मरुद्भ्यो भियन्ते (=मरुद्भ्यो बिभ्यति=भीत्वा कम्पन्ते) । [ते] नरो [हि] (=ते शूरा मरुतो हि) राजान इव त्वेषसंदृशः (=राजान इव भयंकररूपा) [भवन्ति] ॥

---

आहेत· (ऋ. ८. २७. ८; ८.८३.७; १०. ९२. ११; ९. ३३. ३; ९. ३४. २; ९. ५६. ४; ९. ६३. ३; ९. ६५. २०; ७. ३७. ९; ८. १२. १६; ५. ८७. १ आणि ५. ८७. ८ हे मंत्र पहा. याशिवाय दुसरेहि मंत्र आहेत· )

वृत्तानुरोधेंकरून ही ऋचा खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटली पाहिजेः–

तेवर्धन्त स्वतवसो महित्वना
आ नाकं तस्थुः उरु चक्रिरे सदः ।
विष्णुर्यद्धावद्वृषणं मदच्युतं
वयो न सीदन्नधि बर्हिषि प्रिये ॥

८. [युद्धाविषयीं उत्सुक असलेल्या] वीरांप्रमाणें, [शत्रूंच्या अंगावर] धांवत जाणाऱ्या योद्धयांप्रमाणें, [आणि] लूट मिळविण्याविषयीं झटणाऱ्या [वीरां]-प्रमाणें [मरुत्] समरांगणांत युद्ध करितात. मरुतांला सर्व वस्तु भीतात. शूर [मरुत्] राजांप्रमाणें उग्ररूपी [होत].

8. [The Maruts] struggle in battles like heroes, like impetuous warriors, like fighters eager for spoil. All things fear the Maruts, brave [Maruts who are] of awful appearances like kings.

---

८. मरुत् वृत्रादिकांशीं युद्ध करीत असतांना कसें युद्ध करितात तें या मंत्रांत सांगितलें आहे. 'शूर वीरांप्रमाणें ते लढतात; एकदम शत्रूच्या आंगावर हल्ला करून जाणाऱ्या योद्ध्यांप्रमाणें ते युद्धांत धांवतात; अथवा शत्रूचें सर्व द्रव्य लुटून आणण्याला धांवून जाणाऱ्या वीरांप्रमाणें ते आवेशानें झुंजतात. त्या वेळीं पृथिवी, पर्वत इत्यादि सकळ मोठमोठे पदार्थहि मरुतांचें तें शौर्यपरिपूर्ण स्वरूप पाहून भीतात आणि कांपूं लागतात. कारण कीं हे शूर मरुत् राजांप्रमाणें भयंकर दिसत असतात.'

'लूट मिळविण्याविषयीं झटणाऱ्या वीरांप्रमाणें'='श्रवस्यवो न.' ऋ. ९. १०. १ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'मरुतांला सर्व वस्तु भीतात.' सू. ३७, मं. ६, ७, ८; सू. ३८, मं. १० आणि टीका पहा.

श्लोकीकरणः—

शूरा इवेद्युयुधयो न जग्मयः
श्रवस्यवो न पृतनासु येतिरे ।
भयन्ते विश्वा भुवना मरुद्भ्यः
राजान इव त्वेषसंदृशो नरः ॥

**त्वष्टा यद्वज्रं सुकृतं हिरण्ययं सहस्रभृष्टिं स्वपा अवर्तयत् ।**
**धत्त इन्द्रो नर्यपांसि कर्तवेऽहन्वृत्रं निरपामौब्जदर्णवम् ॥ ९ ॥**

त्वष्टा । यत् । वज्रम् । सुऽकृतम् । हिरण्ययम् । सहस्रऽभृष्टिम् । सुऽअपाः । अवर्तयत् ।
धत्ते । इन्द्रः । नरि । अपांसि । कर्तवे । अहन् । वृत्रम् । निः । अपाम् । औब्जत् । अर्णवम् ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

९. यद् ( =यदा ) सुअपाः ( =शोभनकर्मा=कर्मकुशलस् ) त्वष्टा ( =एतन्नामको देवः ) सुकृतं ( =सुष्ठु कृतं=सुनिर्मितं ) हिरण्ययं ( =सुवर्णमयं ) सहस्रभृष्टिं ( =सहस्रधारं ) वज्रम् अवर्तयत् ( =निरवर्तयत्=निर्मितवान् ) [ तदा ] इन्द्रो नरि अपांसि कर्तवे ( =नर्या अपांसि कर्तुं=नर्याणि मनुष्येभ्यो हितानि वृत्रहननादीनि महाकर्माणि कर्तुं ) [ तद् ] धत्ते ( =धारयति=धारितवान् ) [ धृत्वा च ] वृत्रम् अहन् ( =वृत्रं जघान ) [ वृत्रं हत्वा च ] अपाम् अर्णवं ( =उदकवन्तं मेघं=मेघोदकानां संचयं ) निरौब्जत् ( =अधोमुखमपातयत्=अपः प्रवृष्टा अकरोत् ) ॥

नरि अपांसीति पदद्वयं नर्या अपांस्यर्थाति सम्यङ् मोक्षमूलरः । उक्तं हि कृण्वन्नपांसि नर्या पुरूणि ( ऋ. ८. ९६. २१ ); अपांसि विश्वा नर्याणि विद्वान् ( ऋ. ६. २१. ४ ) इति च ॥

९. जेव्हां परमकुशल त्वष्टा सुघटित, सुवर्णमय, [ आणि ] सहस्रधारांचें वज्र निर्माण करिता झाला [ तेव्हां ] इंद्रानें मनुष्यांला हितकारक अशीं कृत्यें करण्यासाठीं [ तें ] हातांत घेतलें, [आणि] तो वृत्राला मारिता झाला [ आणि ] उदकांचा संचय सोडून देता झाला.

9. When skilful Tvashṭâ made the well-formed, the golden [and] the thousand-edged thunderbolt, Indra held [ it in his hand ] for performing deeds beneficial to mankind : he slew Vṛitra, he sent down a flood of the waters.

---

९. 'इंद्राला पूर्वी वज्र नव्हतें तें त्वष्टा या नांवाच्या देवानें करून दिलें. तें इंद्रानें घेऊन मनुष्यजातीला हितकारक अशीं जीं वृत्रहननादिक कर्मे तीं करण्यासाठीं निघाला आणि वृत्राला त्या वज्राच्या योगानें मारून टाकून, वृत्रानें कोंडून ठेविलेलीं जीं उदकें तीं आकाशांतून खालीं पृथिवीवर सोडून देता झाला,' असा भावार्थ आहे.

त्वष्टा देव हा देवांचा सुतार. सू. १३, मंत्र १० आणि त्याजवरील टीप पहा.

'मनुष्यांला हितकारक अशीं कृत्यें '=' नरि अपांसि.' हे दोन शब्द 'नर्या अपांसि' याऐवजीं आहेत अशी मोक्षमूलर यांणीं युक्ति काढिली आहे तिला अनुसरून आम्हीं भाषांतर केलें आहे. ' नर्या अपांसि ' हे शब्द ऋग्वेदांत तीन चार वेळ आले आहेत. आणि ऋ. ७. २१. ४ यांत 'अपांसि विश्वा नर्याणि विद्वान्' (=मनुष्यांला हितकारक अशीं सर्व कामें जाणणारा इंद्र) असें म्हटलें आहे. प्रस्तुत मंत्रांत 'नरि' शब्दाचा अर्थ 'युद्धांत' असा सायणांनीं केला आहे. आणि ऋ. ८. ९६. १९ 'य एक इत् नरि अपांसि कर्ता' असें इंद्राविषयीं म्हटलें आहे तेथें 'नरि' म्हणजे 'मनुष्याविषयीं' (मनुष्यहितार्थ ?) असा सायणाचार्य अर्थ करितात, पण तेथेंहि 'नरि अपांसि' म्हणजे 'नर्या अपांसि' असें समजलें तर बरें होईल आणि तसें केल्यास सायणालाहि सोडल्यासारिखें होणार नाहीं असें त्याच मंत्रावरचें भाष्य पाहिल्यास समजून येईल.

'उदकांचा संचय '=' अपाम् अर्णवम्.' ज्यांत उदक आहे तो, म्हणजे मेघ, अथवा जलसंचय. अर्णव म्हणजे ज्यांत पाणी आहे तें. त्यावरून वेदांत मेघाला अर्णव असें नांव दिलेलें आढळतें. येथें उदकांचा संचय असा पर्यवसानीं अर्थ दिसतो.

मरुतांवरच्या सूक्तांत मध्येंच ही ऋचा इंद्राविषयीं येण्याचें कारण असें कीं वज्र हातांत घेऊन वृत्राला मारण्याचा

ऊर्ध्वं नुनुद्रेऽवतं त ओजसा दादृहाणं चिद्बिभिदुर्वि पर्वतम् ।
धमन्तो वाणं मरुतः सुदानवो मदे सोमस्य रण्यानि चक्रिरे॥१०

ऊर्ध्वम् । नुनुद्रे । अवतम् । ते । ओजसा । दादृहाणम् । चित् । बिभिदुः । वि । पर्वतम् ।
धमन्तः । वाणम् । मरुतः । सुऽदानवः । मदे । सोमस्य । रण्यानि चक्रिरे ॥ १० ॥

## भाषायाम्.

१०. ते (=मरुतः) ओजसा (=बलेन) अवतम् ऊर्ध्वं नुनुद्रे (=कूपमुदग्यथा तथा प्रेरितवन्तः=मेघरूपात्कूपादप उत्क्षिप्तवन्तः) [तथा कृत्वा च] दादृहाणं चित् पर्वतम् (=अतिप्रवृद्धमपि मेघं) वि बिभिदुः (=विशेषेण बभञ्जुः=विभिद्य गतवन्तः) । वाणं धमन्तः (=नालं वाद्यविशेषं वादयन्तः) सुदानवः (=सुदाना) मरुतः सोमस्य मदे (=सोमपानेन हर्षे जाते सति) रण्यानि चक्रिरे (=रणयोग्यानि कर्माणि=शौर्ययुक्तानि कर्माणि वृत्रवधादीनि) चक्रिरे (=कृतवन्तः) ॥

सोमं पीत्वा शोभनदाना गायन्तो मरुतो निर्गत्य पर्वतसदृशमतिदृढमपि वृत्रं विभिद्य तेनावृतं जलाशयमुत्क्षिप्तवन्तः एवं च शौर्योपेतान्यनेकानि कर्माणि ते चक्रिर इति भावः ॥

सायणास्तु मन्त्रमेतमेवं व्याचक्षते । अत्रेयमाख्यायिका । गोतम ऋषिः पिपासया पीडितः सन् मरुत उदकं ययाचे । तदनन्तरं मरुतोऽदूरस्थं कूपमुद्धृत्य यत्र स गोतम ऋषिस्तिष्ठति तां दिशं नीत्वा ऋषिसमीपे कूपमवस्थाप्य तत्पार्श्वे आहावं च कृत्वा तस्मिन्नाहावे कूपमुत्सिच्य तमृषिं तेनोदकेन तर्पयांचक्रुः । अयमर्थोऽनयोत्तरया च प्रतिपाद्यते ॥ ते मरुतोऽवतम् । अवस्तात्तलो भवतीत्यवतः कूपः । कूपनामसु चावतोऽवट इति पठितम् । तमूर्ध्वमुपरि यथा भवति तथौजसा । स्वकीयेन बलेन नुनुद्रे । प्रेरितवन्तः उत्खातवन्त इत्यर्थः । एवं कूपमुत्खाय ऋषेराश्रमं प्रति नयन्तो मरुतो मार्गमध्ये दादृहाणं प्रवृद्धं गतिनिरोधकं पर्वतं चित् पर्ववन्तं शिलोच्चयमपि वि बिभिदुः । विशेषेण बभञ्जुः । सुदानवः शोभनदानास्ते मरुतो वाणं शतसंख्याभिस्तन्त्रीभिर्युक्तं वीणाविशेषं धमन्तो वादयन्तः सोमस्य मदे सोमपानेन हर्षे सति रण्यानि स्तुत्यानि रमणीयानि धनानि चक्रिरे । स्तोतृभ्यः कुर्वन्तीति ॥

१०. ते [ आपल्या ] पराक्रमानें झरा वर उडविते झाले; अति कठिण [ अशा ] पर्वताला सुद्धा ते भेदून जाते झाले. मुरली वाजविणारे दानशाली मरुत् सोमाच्या हर्षामध्यें शौर्यकृत्यें करिते झाले.

10. They sent up the spring with their might; they clove asunder even the high mountain. The liberal Maruts, blowing the flute, performed warlike deeds in the exhilaration of the Soma.

आणि मेघोदकें खालीं सोडण्याचा पराक्रम इंद्रानें केला तो मरुतांच्या साहाय्यानें केला अशी मंत्रकर्त्या ऋषीची विवक्षा आहे.

खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटला तर हा मंत्र श्लोकाप्रमाणें लागतो:–

त्वष्टा यॆद्वज्रं सुकृतं हिरण्ययं
सहस्रभृष्टिं सुअपा अवर्तयत् ।
धत्ते इॅन्द्रो नॅरि अपांसि कर्तवे
अहन्वॄत्रं निरपॉमौब्जदर्णवम् ॥

१०. 'मरुत् जाऊं लागले म्हणजे मेघरूपी जो पाण्याचा झरा त्याला आपल्या पराक्रमेंकरून फोडून त्यांतील पाणी कारंज्यासारिखें वर उडवून देतात, आणि तसें करून पर्वतासारिखा जो अतिकठोर वृत्र त्याला फोडून पलीकडेस जातात. या प्रकारेंकरून पराक्रमाचीं कृत्यें जीं मरुत् करितात तीं सोम पिऊन आनंदित झाल्यावर करितात. महा उदार मरुत् जाऊं लागले म्हणजे आलगुजाच जणुं वाजवीत जात असतात.'

'झरा वर उडविते झाले'=' ऊर्ध्वं नुनुद्रे अवतम्.' म्हणजे जेव्हां जेव्हां ते जाऊं लागतात तेव्हां तेव्हां उडवीत असतात. मेघामध्यें जीं उदकें कोंडून ठेविल्यासारिखीं दिसतात आणि मागाहून झऱ्यामधून वाहणाऱ्या प्रवाहाप्रमाणें वाहूं लागतात तीं झऱ्यापासून वाहतात, आणि मेघ हा झरा होय, असें रूपक वेदांत पुष्कळ ठिकाणीं येतें. ऋ. २. २४. २ यांत गृत्समद ऋषीनें म्हटलें आहे, 'पाषाणाप्रमाणें ज्याचें तोंड कठोर, आणि ज्याची धार गोड होय, अशा मेघरूप ज्या झऱ्याला आपल्या पराक्रमेंकरून ब्रह्मणस्पतीनें फोडून उघडिलें' ( अश्मास्यम् अवतं ब्रह्मणस्पतिः मधुधारमभि यम् ओजसा अतृणत् ). पर्जन्यवृष्टि होऊं लागली म्हणजे मेघरूपी झरा उघडला जाऊन कारंज्याप्रमाणें उडतो अशी कल्पना करणें यांत विशेष ओढाताण नाहीं.

'मुरली वाजविणारे'=' वाणं धमन्तः.' मरुत् गात असतात असें जसें सांगितलेलें वेदांत आढळतें ( सू. १९, मंत्र ४ आणि टीप पहा ) तसेंच ते वाद्य वाजवितात असेंहि म्हटलेलें दृष्टीस पडतें, परंतु हें वाद्य कोणतें त्याविषयीं निश्चय होत नाहीं. सायणाचार्य

जिह्मं नुनुद्रेऽवतं तया दिशासिञ्चन्नुत्सं गोतमाय तृष्णजे ।
आ गच्छन्तीमवसा चित्रभानवः कामं विप्रस्य तर्पयन्त धामभिः ११

जिह्मम् । नुनुद्रे । अवतम् । तया । दिशा । असिञ्चन् । उत्सम् । गोतमाय । तृष्णऽजे ।
आ । गच्छन्ति । ईम् । अवसा । चित्रऽभानवः । कामम् । विप्रस्य । तर्पयन्त । धामऽभिः ॥ ११ ॥

## भाषायाम्.

११. [ ते मरुतः ] अवतं ( =कूपं मेघरूपं ) तया दिशा जिह्मं नुनुद्रे ( =जिह्मं नुनुदिरे=वक्रं यथा तथा प्रेरितवन्तः=मेघरूपात्कूपाद् वक्रं यथा तथा जलमपातयन् ) । [ ते ] तृष्णजे गोतमाय ( =तृषिताय गोतमाय मह्यं स्तोतकर्त्रे ) उत्सम् असिञ्चन् ( =उदकगर्भं मेघं प्रावाहयन् ) । चित्रभानवः ( =विचित्रदीप्तयो ) [ मरुतः ] अवसा ( =रक्षणेन सार्द्धम् ) ईम् ( =एनं गोतमम् ) आगच्छन्ति [ अपि च ] धामभिः ( =स्वैस्तेजोभिः=स्वैर्बलैः ) विप्रस्य कामं ( =मेधाविनो गोतमस्यर्षेः कामनां मेघोदकादिविषयां ) तर्पयन्त ( =अतर्पयन्त=अपूरयन् ) ॥

जिह्मं नुनुद्रे तया दिशेत्यत्र सायणास्तु यस्यां दिशि ऋषिर्वसति तया दिशा जिह्मं वक्रं तिर्यञ्चं नुनुद्रे प्रेरितवन्त इति ॥

त्याला कोठें कोठें वीणा आणि कोठें कोठें मुरली असें म्हणतात. प्रस्तुत मंत्रांत ते शंभर तारांचा वीणा असा अर्थ करितात. ( ऋ. ८. २०. ८ हाहि मंत्र पहा ). परंतु ऋ. ९. ५०. १ याजवरील भाष्यांत ते मुरली किंवा आलगुजा, कीं जें तोंडानें फुंकून वाजवावयाचें असतें, तसलें वाद्य असा अर्थ करितात. शिवाय ' धमन्तः' ( =फुंकतात ते ) या शब्दावरून पहातां वीणा नसावा, मुरलीसारिखें वाद्य असावें असें दिसतें. वातरूपी देव जे मरुत् ते गातात आणि वीणा किंवा मुरली वाजवीत वाजवीत जातात असें म्हणणें यांत कांहीं नवल नाहीं, अगदी स्वाभाविक आहे.

' दानशाली '=' सुदानवः.' म्हणजे उदार. पाण्याची वृष्टि पुष्कळ करवितात म्हणून हें विशेषण लाविल्याप्रमाणें दिसतें. सू. ३९, मं. १० आणि त्याजवरील टीप पहा.

श्लोकीकरणः—

ऊर्ध्वं नुनुद्रे अवतं त ओजसा
दादृहाणं चिद्बिभिदुर्वि पर्वतम् ।
धमन्तो वाणं मरुतः सुदानवो
मदे सोमस्य रणिआनि चक्रिरे ॥

११. [ते] झऱ्याला त्या दिशेला आडवा उडविते झाले. [ते] ताहानेल्या गोतमाकडे प्रवाह वाहविते झाले. सुप्रकाश मरुत् आपलें साहाय्य घेऊन त्याजप्रत येतात आणि [आपल्या] तेजांच्या योगानें [त्या] स्तोत्याची मनकामना पूर्ण करितात.

11. They sent the spring crookedly this way. They poured the fountain to thirsty Gotama. The bright, shining [Maruts] come to him with help. They satisfied the seer's desire with their powers.

११. 'मरुत् जातां जातां मेघरूप झऱ्याला वरच उडवितात असें नाहीं, तर आडवाहि सोडून देतात. गोतमाला ताहान लागली असतां त्याला पाणी मिळावें म्हणून ते वृष्टि करितात. मरुत् येऊन गोतमासारिखे (म्हणजे मजसारिखे) जे त्यांचे उपासक त्यांचें साहाय्य करितात आणि आपल्या पराक्रमांच्या योगानें त्यांच्या मनकामना पूर्ण करितात.'

'झऱ्याला'='अवतम्.' हा झरा म्हणजे मेघच समजावयाचा आहे.

'तेजांच्या योगानें'='धामभिः.' म्हणजे आपल्या बळानें, पराक्रमानें. 'धाम' शब्दाचा अर्थ येथें कितीएक विद्वान् गण असा करितात. परंतु धाम शब्द ऋग्वेदांत ज्यांत आला आहे असे मंत्र ऋग्वेदांत पुष्कळ आहेत ते सर्व पाहून त्यांचा विचार केला तर 'गण' असा अर्थ सायणांनीं कोठेंच केलेला नाहीं आणि कोठेंच फार इष्ट आहे असेंहि नाहीं. जर तसा अर्थ असता तर सायणांनीं तो कल्पून तरी केला असता. जर हा अर्थ अतिप्राचीन असता तर सायणांला तो ठाऊक असता आणि त्यांणीं तसा कोणत्या तरी मंत्रांत केला असता; कारण पुरातनव्याख्यापरंपरेनें आलेला अर्थ जसा त्यांजला उपलब्ध असेल तसा आधुनिक व्याख्यान करणाऱ्यांस उपलब्ध नाहीं म्हणून सांगावयास नकोच. परंतु जर तो परंपरागत नाहीं तरी पुष्कळ ठिकाणीं इष्ट दिसतो आणि इष्ट आहे असें सहज दिसून येतें असें म्हणणें असेल, तर पुष्कळ मंत्रांत सहज दिसून येणारा अर्थ, आधुनिक त्यांतहि (परदेशस्थ) व्याख्याकारांस समजून येतो आणि सायणाच्या लक्षांत तो कधींहि आला नाहीं हें अगदीं असंभाव्य दिसतें.

दाहवा आणि अकरावा ह्या मंत्रांचें सायणाचार्यांनीं कांहीं एका कथेला अनुलक्षून भाष्य केलें आहे. ते म्हणतातः— "अशी कथा आहे कीं, गोतम ऋषीला एका प्रसंगीं ताहान लागून तो व्याकूळ

या वः शर्म शशमानाय सन्ति त्रिधातूनि दाशुषे यच्छताधि ।
अस्मभ्यं तानि मरुतो वि यन्त रयिं नो धत्त वृषणः सुवीरम् ॥
॥ १२ ॥ १० ॥

या । वः । शर्म । शशमानाय । सन्ति । त्रिऽधातूनि । दाशुषे । यच्छत । अधि ।
अस्मभ्यम् । तानि । मरुतः । वि । यन्त । रयिम् । नः । धत्त । वृषणः । सुऽवीरम् ॥ १२ ॥ १० ॥

## भाषायाम्.

१२. [ हे मरुतः ], वः ( =युष्माकं=युष्माभिर्दत्तानि ) या शर्मा (=यानि शर्माणि=यानि यानि सुखानि ) सन्ति,–[ यूयं हि ] दाशुषे ( हविर्दत्तवत उपासकजनाय ) त्रिधातूनि ( =त्रिप्रकाराणि ) [ शर्माणि ] अधियच्छत ( =अधिकं प्रयच्छथ ) [ इति प्रसिद्धमेवास्ति ],–तानि [शर्माणि ] हे मरुतः, अस्मभ्यं वि यन्त (=विशेषेण प्रयच्छत ) । हे वृषणः ( =वीर्योपेता ) [ मरुतः ], [ यूयं ] नः (=अस्मभ्यं ) सुवीरं रयिं ( =शोभनवीरैरुपेतं धनं=सुसंततिं सुसंपत्तिं च ) धत्त ( =दत्त ) ॥

त्रिधातूनीत्यत्र पृथिव्यादिषु त्रिषु स्थानेष्ववस्थितानीति सायणाः । स्यात् तथा ॥

झाला असतां त्याणें पाणी मिळावें या इच्छेनें मरुतांचें स्तवन केलें. तेव्हां मरुतांनीं तेथून जवळच असलेला एक कूप उपटून काढून गोतम होता त्या दिशेला नेऊन स्थापिला, आणि त्याजवळ डोणी उत्पन्न करून तींत त्या कूपाचें पाणी ओतविलें आणि त्या पाण्यानें ऋषीची ताहान भागविली, या कथेविषयीं या दोनहि मंत्रांत उल्लेख आहे." परंतु अशी कथा न घेतली तरी अर्थ चांगला जुळतो. मरुत् जाऊं लागतात तेव्हां म्हणजे पाऊस मोठा पडतो आणि त्याजबरोबर वारा मोठ्या झपाट्यानें वाहतो तेव्हां, मेघरूपी झरा वाऱ्याच्या गतीप्रमाणें एकदा वर उडाल्याप्रमाणें दिसतो, एकदा वांकडा वाहतो आहे असा दिसतो, एकदा या दिशेनें वाहतो, एकदा त्या दिशेनें वाहतो, अशी जी या मेघरूप कूपाची आणि झऱ्याची लीला दृष्टीस पडते, ती गोतमादिक देवभक्तांस उदकाचा अमोल्य लाभ व्हावा म्हणून आणि तेणेंकरून अन्नप्राप्तीविषयींच्या वगैरे ज्या त्यांच्या मनकामना त्या पूर्ण व्हाव्या म्हणून मरुतांच्या पराक्रमाच्या योगेंकरून होत असते, असें तात्पर्य समजून अर्थ करावा.

१२. हे मरुतांनो, जीं तुमचीं सुखें स्तोत्याला प्राप्त होतात– [ तुम्ही ] उपासकाला त्रिविध [सुखें] प्राप्त करून देतां– तीं आम्हांला प्राप्त करून द्या. हे शूर [ मरुतांनो ], सुवीरांनीं परिपूर्ण [ अशी ] संपत्ति [ तुम्ही ] आम्हांला द्या.

12. What blessings exist with you for the praiser—[ and ] you confer the three-fold [ blessings ] on the sacrificer—those [blessings ] give ye, Maruts, unto us. Give unto us, brave [ Maruts ], wealth accompanied by brave sons.

---

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजेः–

जिह्मं नुनुद्रे अवतं तया दिशा
असिञ्चन् उत्सं गोतमाय तृष्णजे ।
आगच्छन्तीमवसा चित्रभानवः
कामं विप्रस्य तर्पयन्त धामभिः ॥

---

१२. 'हा या सूक्ताचा उपसंहार आहे आणि ऋषीच्या मनांत जो वर मागावयाचा होता तो यांत मागितला आहे. गोतम ऋषि म्हणतो.–' हे मरुतांनो, तुम्ही आपल्या उपासकांस त्रिविध सुखाची प्राप्ति करून देत असतां अशी प्रसिद्धि आहे. तर जीं जीं सुखें तुम्हीं आपल्या उपासकांस प्राप्त करून देतां, तीं सर्व सुखें आम्हांस प्राप्त होतील असें करा. आणि विशेषेंकरून अशी प्रार्थना आहे कीं, आम्हांस शूर पुत्र-पौत्रादिक संतति आणि संपत्ति प्राप्त होओ.'

'त्रिविध सुखें '=' त्रिधातूनि [ शर्माणि ].' 'त्रिविध ' म्हणजे सायणाचार्य पृथिवीसंबंधी, आकाशसंबंधी, आणि द्युलोकसंबंधी अशीं मिळून तीन प्रकारचीं असें म्हणतात. 'त्रिधातु शर्म ' ( त्रिविध सुख ) हे शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आले आहेत. ते सर्व वाचून पाहिले तरी त्रिविध सुख कोणतें तें निश्चयानें समजत नाहीं.

ह्या मंत्राच्या शेवटीं ऋषि काय प्रार्थितो त्याचा नीट विचार करावा. जर प्राचीन ऋषि गिरिगह्वरीं राहून आपलें सर्व आयुष्य तप आचरण्यांत घालविणारे असते, तर त्यांला शूर म्हणजे युद्ध करण्याविषयीं समर्थ अशा पुत्रपौत्रांची अवश्यकता नसती आणि त्यांला संपत्तीचीहि वांछा झाली नसती. ज्या ऋषींचीं वचनें पाळणें हाच धर्म आहे असें समजून आपण वर्ततों, ते ऋषि खरोखर कसे होते त्याचा विचार करणें ही गोष्ट मोठ्या महत्त्वाची आहे.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला तर श्लोकवृत्ताला लागतो:–

## सूक्तम् ८६.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । मरुतो देवता । गायत्री च्छन्दः ।

**मरुतो यस्य हि क्षये पाथा दिवो विमहसः ।**
**स सुगोपातमो जनः ॥ १ ॥**

मरुतः । यस्य । हि । क्षये । पाथ । दिवः । विऽमहसः ।
सः । सुऽगोपातमः । जनः ॥ १ ॥

**यज्ञैर्वा यज्ञवाहसो विप्रस्य वा मतीनाम् ।**
**मरुतः शृणुता हवम् ॥ २ ॥**

यज्ञैः । वा । यज्ञऽवाहसः । विप्रस्य । वा । मतीनाम् ।
मरुतः । शृणुत । हवम् ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

१. हे विमहसः (=विशिष्टप्रकाशवन्तो) मरुतः, यस्य क्षये हि (=यस्य जनस्य गृहे खलु) [यूयं] दिवः पाथ (=द्युलोकाद् आगत्य सोमं पिबथ) स जनः सुगोपातमः (=शोभनतमेन रक्षकेण युक्तो) [भवति] ॥

दिव इति पदम् अस्पष्टसंबन्धम् आगत्येति पदस्य कृच्छ्रेणैवाध्याह्रियमाणत्वात् । मूलरस्तु दिवो विमहसः द्युलोकस्य विशिष्टबलवन्तः पुत्रा मरुत इति संयोजयति ॥

२. हे यज्ञवाहसः (=यज्ञस्य यज्ञद्रव्यस्य हविषो वोढारो=हविर्ग्रहीतारो) मरुतः, यज्ञैर्वा (=यजमानानां यज्ञैः) [कृतम्] [अथ] वा विप्रस्य मतीनां (=मेधाविनः स्तोतुः स्तुतीनां) [स्तुतिभिः कृतं] हवं (=आह्वानं) हे मरुतः, [यूयं] शृणुत ॥

यज्ञैर्वा यज्ञवाहसो विप्रस्येति पाठः समीचीनतरः । सत्येवं पाठे हि यजमानस्य यज्ञैः कृतं यद्धवं तेन सह विप्रस्य मतिभिः कृतस्य हवस्य विवक्षितो विरोधः स्पष्टो भवेत् । यज्ञवाहःशब्दस्य यजमानशब्दार्थकत्वं तु "वर्चो धा यज्ञवाहसे" इति (ऋ. ३. ८. ३; ३. २४. १) मन्त्रान्तरे दृष्टमेव ॥

---

या वः शर्म शशमानाय सन्ति
त्रिधातूनि दाशुषे यच्छताधि ।
अस्मभ्यं तानि मरुतो वि यन्त
रयिं नो धत्त वृषणः सुवीरम् ॥

## सूक्त ८६.

**ऋषि–गोतम. देवता–मरुत्. वृत्त– गायत्री.**

१. हे अतितेजस्वी मरुतांनो, ज्याच्या घरीं द्युलोकापासून [ येऊन] [तुम्ही ] [सोम ] पितां तो जन उत्तम सुरक्षकवान् होय.

२. हे हविर्वाहक [मरुतांनो], [तुम्ही आमचा ] धांवा ऐका– मग तो [हविर्दात्या यजमानानें आपल्या ] यज्ञांच्या योगानें [ केलेला असो] अथवा स्तोत्यानें [आपल्या] स्तोत्रांच्या योगानें [केलेला असो].

## HYMN 86.

To the *Maruts*. By *Gotama*. Metre—*Gâyatrî*.

1. That person, O most shining Maruts, to whose house ye come from heaven to drink [ the Soma], is the best-championed.

2. [ Whether made ] through sacrifices, O carriers of oblation, or consisting of the hymns of a poet, hear the invocation, O Maruts.

---

१. हेंहि सूक्त गोतमाचेंच आहे, आणि देवता सुद्धा मरुतच होत. ऋषि म्हणतो कीं, मरुत् कृपा करून ज्या उपासकाच्या घरीं येऊन सोम पितात, त्याच्या भाग्याला सीमा नाहीं, त्याला कोणाची भीति नाहीं; आणि त्यालाच उत्तम पाठबळ आहे असें लोक समजतात.

गोतमासारिख्या महर्षींचें स्वरूप पुराणादिक आधुनिक ग्रंथांत असलेल्या कथांसारिखें आहे किंवा भिन्न आहे याचा विचार करण्यास गोतमाचीं यापूर्वील सूक्तें जशीं उपयोगीं पडलीं तसें हेंहि पडेल; आणि असें स्पष्ट दिसून येईल कीं या सूक्ताचा कर्ता गोतम ऋषि आधुनिक मनुष्यांप्रमाणेंच दीन, अल्पशक्ति, अल्पज्ञानी, निर्धन, धनेच्छु पण देवांविषयीं अतिशयेंकरून भक्तिपरायण आणि दृढनिश्चय असा होता.

शांतिसूक्त म्हणून जो जप करितात त्यांत हा मंत्र येतो.

वृत्तसुखार्थ द्वितीयचरणांत 'विमहसः' असा उच्चार करावा लागतो. वृत्तसुखासाठींच 'पाथ' अशा रूपाच्या ऐवजीं संहितेंत 'पाथा' असा पाठ झाला आहे त्याजकडे लक्ष द्यावें.

२. 'हे मरुतांनो, तुम्ही आमची हाक ऐका, मग ती हाक यजमानांनीं यज्ञ करून त्या द्वारें मारिली असो, किंवा स्तोत्यानें स्तोत्रें रचून मारिली असो.' असें म्हणण्याचा भावार्थ असा आहे कीं, केवळ यज्ञ केला आणि त्यांत स्तोत्रें म्हटलीं तरी तसलाहि यज्ञ तुम्हांला ग्राह्य

उत वा यस्य॑ वा॒जिनोऽनु॒ विप्र॒मत॑क्षत ।
स ग॒न्ता गोम॑ति व्र॒जे ॥ ३ ॥

उ॒त । वा॒ । यस्य॑ । वा॒जिन॑ः । अनु॑ । विप्र॑म् । अत॑क्षत ।
सः । ग॒न्ता । गोऽम॑ति । व्र॒जे ॥ ३ ॥

---

भाषायाम्.

३. उत वा ( =अपि च ) [ हे मरुतः ], यस्य वाजिनो (=यस्य हविर्लक्षणान्नवतो यजमानस्य ) [ यूयं ] विप्रम् अनु तक्षत ( =मेधाविनं कविम् अतक्षत=कविं कृतवन्तः स्थ ) स [ यजमानो ] गोमति व्रजे ( =गोभिः पूर्णे गोष्ठे प्राप्नोति=गोभिः पूर्णं गोष्ठं प्राप्नोति ) ॥

यं कविसामर्थ्यरहितम् अकविं सन्तं यजमानं यूयं पश्चाद् मन्त्रकरणसमर्थं कविं कुरुथ स तु स्वकृतैर्मन्त्रैर्युष्मान् प्रसाद्य यथाकामं गाः प्राप्नोतीत्यर्थः ॥

सायणास्तु यस्य यजमानस्य वाजिनो हविर्लक्षणान्नोपेता ऋत्विजो विप्रं मेधाविनं मरुद्गणमन्वतक्षत हविःप्रदानादिना तीक्ष्णीकुर्वन्ति । स यजमानो गोमति इ० । अतक्षत । ......व्यत्ययेन मध्यमः । इति ॥

यस्य वाजिनः यस्मै वीराय विप्रम् अनु तक्षत कविमदत्तेति मूलरः ॥

---

असो; आणि केवळ स्तोत्रेंच म्हटलीं पण त्यांजवरोबर यज्ञ करून हवि अर्पण केलें नाहीं तरी तींहि तुम्हांला मान्य होओत, हवि नाहीं म्हणून तुम्ही त्याचा अव्हेर करूं नका. यावरून प्राचीनकाळीं जो यज्ञ करीत त्याला आणि आधुनिक यज्ञाला पुष्कळ अंतर आहे असें सहज सिद्ध होतें. प्राचीनकाळचा यज्ञ म्हणजे केव्हां केव्हां हविष अर्पण केलें म्हणजे पुरे असे. त्याजवरोबर स्तोत्रें म्हटलींच पाहिजेत असें नव्हतें, म्हटलींच तर उत्तम, पण अवश्य नव्हतें. यावरून प्राचीन यज्ञ म्हणजे 'पूजा' इतकाच अर्थ केव्हां केव्हां होत असावा. सांप्रत तरी ज्यांला मंत्रतंत्र कांहीं येत नाहीं आणि ज्यांला उपाध्या नाहीं आणि भटहि नाहीं अशा सहस्रावधि स्त्रिया आणि शूद्र वैश्य इत्यादि ब्राह्मणव्यतिरिक्त जातींतील असंख्य जन नैवेद्य दाखवून ( म्हणजे आधुनिक कालचें हवि देऊन ) मुकी पूजा ( मंत्रांशिवायच ) करितात. तशी पूजा असली तरी देवांला प्रिय होओ असें कवीचें हृद्य आहे.

वृत्तसुखासाठीं दुसरा चरण 'विप्रस्यं वा मतीनआम्' असा म्हटला पाहिजे. आणि वृत्तसुखासाठींच तिसऱ्या चरणांत 'शृणुत' अशा रूपाचें 'शृणुता' असें संहितेंत झालें आहे.

याहि मंत्राचा शांतिसूक्तांत जप करीत असतात.

३. आणि [ हे मरुतांनो ], ज्या यजमानाला [ तुम्ही ] कवि करितां तो तर गाईंनीं भरलेल्या गोठ्याचा धनी होतो.

3. And that sacrificer of whom you, Maruts, make a poet, shall attain to a cowfold full of cows

३. वरच्या मंत्रांत सांगितलें कीं स्तोत्रांनीं युक्त असा यज्ञ मरुतांस मान्य होतोच पण ज्याला स्तोत्र करण्याची शक्ति नसल्यामुळें यज्ञच मात्र करितां येतो त्याचा नुसता यज्ञहि मरुतांस मान्य होईल. आतां म्हणतो कीं, ' हे मरुतांनो, ज्या यज्ञ करणाऱ्याला तुम्ही ऋषि करितां, म्हणजे ज्या यजमानाला सूक्तें रचण्याची शक्ति नसलेली तुम्ही उत्पन्न करितां त्याला ती शक्ति आल्यावर तुमचीं स्तोत्रें तो गातो आणि मग तुम्ही प्रसन्न होऊन त्याला यथेच्छ गाई प्राप्त करून देत असतां. ' यावरून स्तोत्र देवांस फार प्रिय आहे असें दर्शविलें आहे.

' ज्या यजमानाला तुम्ही कवि करितां '=' यस्य वाजिनो विप्रम् अनु तक्षत.' म्हणजे ज्याला प्रथम स्तोत्र रचण्याची शक्ति नसतां मागाहून ( अनु ) ती शक्ति त्याच्या आंगीं उत्पन्न करितां. सायणाचार्य किंचित् निराळा अन्वय घेऊन अर्थहि किंचित् निराळा करितात. भाषा पहा. मोक्षमूलर ' वाजिन् ' शब्दाचा अर्थ येथें ' वीर' असा करितात. संभवतो. पुढचा मंत्र पहा.

वृत्तानुरोधानें 'उत वा यस्य वाजिनः अनु विप्रमतक्षत ' असा पाठ म्हटला पाहिजे.

**अस्य वीरस्य बर्हिषि सुतः सोमो दिविष्टिषु ।**
**उक्थं मदश्च शस्यते ॥ ४ ॥**

अस्य । वीरस्य । बर्हिषि । सुतः । सोमः । दिविष्टिषु ।
उक्थम् । मदः । च । शस्यते ॥ ४ ॥

**अस्य श्रोषन्त्वा भुवो विश्वा यश्चर्षणीरभि ।**
**सूरं चित्सस्रुषीरिषः ॥ ५ ॥ ११ ॥**

अस्य । श्रोषन्तु । आ । भुवः । विश्वाः । यः । चर्षणीः । अभि ।
सूरम् । चित् । सस्रुषीः । इषः ॥ ५ ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

४. अस्य वीरस्य (=पूर्वोक्तस्य शौर्योपेतस्य यजमानस्य) बर्हिषि (=यज्ञे=तेन कृते यज्ञे) सोमो दिविष्टिषु (=द्युलोकेच्छया यजनीयेषु दिवसेषु सर्वेष्वपि यज्ञोत्सवदिवसेषु) सुतः (=अभिषुतो) [भवति]। उक्थं मदश्च शस्यते (=स्तोत्रं मादकारी सोमरसश्च प्रशस्यते=मादकारी प्रशस्यः सोमो युष्मभ्यमर्पितो भवति युष्माकं स्तोत्रं च गीयते) ॥

सायणस्तु वीरस्य शत्रुक्षेपणकुशलस्यास्य मरुद्गणस्य यागाय सोमः सुतः। ऋत्विग्भिरभिषुतो भवति। उक्थं मरुद्देवताकं शस्त्रं मदश्च। मदिधातुना युक्ता मरुतो देवाः सोमस्य मत्सन्नित्यादिका मारुती निविच्चास्य मरुद्गणस्य हर्षाय शस्यते। होत्रा पठ्यत इति ॥

५. [ते मरुतः] अस्य (=मद्रूपस्योपासकस्य) [हवं] श्रोषन्तु (=शृण्वन्तु) यो [मरुद्गणो] विश्वाश्चर्षणीः (=सकला अपि प्रजा) आ अभि भुवः (=साकल्येन अभिभवति)। सूरं चित् (=सूरमेव=सूरिमेव=यजमानमेव) सस्रुषीः इषः (=सस्रुष्य इषः=प्रवहन्त्यः अन्नसंपदः=अन्नप्रवाहाः) [प्रवहन्तु]॥

आ भुवः इत्यस्य स्थले मूलराचार्यः आभुवः इति पाठमिच्छति। भुवः इत्येतस्य, सत्यपि भुवत् इति पुरुषव्यत्यये पूर्वचरणस्थितत्वात्। आभुवः इति तु मरुतां विशेषणमिति लिखति ॥

सूरशब्दस्य यजमान इत्यर्थो न स्यादिति न। विवस्वच्छब्दस्य हि सत्यपि सूर्य इत्यर्थे प्रसिद्धे यथा यजमान उपासक इत्यर्थो भवति क्वचित् तथैव सूर्यवत्प्रज्ञायुक्तो हविषां वा प्रेरक इति व्युत्पत्त्या कयाचिदन्यया वा संभाव्यत एव यजमानः इत्यर्थः 'सूर' शब्दस्येति नः संमतम् ॥

४. तसल्या वीराच्या यज्ञांत [ सर्व ] उत्सवांच्या प्रसंगीं सोम काढिला जातो; स्तोत्र आणि माद गायिले जातात.

९. जो [ मरुद्गण ] सकळ लोकांचा पराजय करणारा होय [ तो मरुद्गण ] या उपासकाची [ स्तुति ] ऐकून घेओ. आणि अन्नाचे प्रवाह स्तोत्याप्रतच धांवत येओत.

4. In the sacrifice of that hero [ is ] Soma expressed in all festivals, [ and ] is praise and exhilaration sung.

5. May they hear [the invocation ] of this [ worshipper ]–[ the troop of the Maruts ] that vanquishes all people. To the pious worshipper alone may food run in streams.

४. 'हा जो वर यजमान सांगितला तसल्या यजमानाचे घरीं, तुमची कृपा त्याला होऊन तो ऋषि झाल्यावर, प्रत्येक उत्सवाच्या दिवसीं तुम्हांकारणें यज्ञ होत असतो, आणि त्या यज्ञांत केवळ हविच तुम्हांला अर्पण न होतां सोमहि काढिला जातो, आणि तो तुम्हांला अर्पण केला जातो; आणि तुम्हांप्रीत्यर्थ स्तोत्र रचून गाइलें जातें; आणि अर्पण केलेल्या मादकारक सोमाची प्रशंसा केली जाते.'

'वीराच्या यज्ञांत'='वीरस्य बर्हिषि.' 'वीराच्या यज्ञांत' हे शब्द आपल्या कानांला जरा विलक्षण लागतील. कारण अर्वाचीन काळीं यज्ञ करणें हें वीराचें काम नव्हे, आणि युद्ध करणें हें यजमानाचें काम नव्हे असें आपण समजतों. परंतु प्राचीन काळीं तसा प्रकार नव्हता. सगळे वीर यज्ञ करीत, म्हणजे सोम, हवि आणि स्तोत्रें अर्पण करून उपास्य देवतांला भजत; ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि जातिभेदाच्या संबंधानें कांहीं अडचण नसे. आणि प्रत्येक यजमान प्रसंग येतांच युद्ध करी. युद्ध करणें हा आपला अधिकार आहे असें सर्वजण मानीत.

'स्तोत्र आणि माद गायिले जातात'=' उक्थं मदश्च शस्यते.' म्हणजे माद आणणारा सोम अर्पण करून त्याजवरोबर त्या सोमाची प्रशंसा करणारें असें स्तोत्र म्हटलें जातें. हेच शब्द ऋ. ४. ४९. १ या मंत्रांत पुनः असेच आले आहेत.

५. ही मरुद्गणाला प्रार्थना आहे. गोतम म्हणतोः–' हा जो मी मरुतांचा सेवक स्तुति करीत आहें, त्याची स्तुति मरुत् ऐकून घेओत. कारण मरुद्गण सामान्य नव्हे, तर सकळ लोकांवर त्याचें आधिपत्य आहे. तर तो आमची प्रार्थना ऐको आणि विपुल अन्नाचे प्रवाह जे

**पूर्वीभिर्हि ददाशिम शरद्भिर्मरुतो वयम् ।**
**अवोभिश्चर्षणीनाम् ॥ ६ ॥**
पूर्वीभिः । हि । ददाशिम । शरत्ऽभिः । मरुतः । वयम् ।
अवःऽभिः । चर्षणीनाम् ॥ ६ ॥
**सुभगः स प्रयज्यवो मरुतो अस्तु मर्त्यः ।**
**यस्य प्रयांसि पर्षथ ॥ ७ ॥**
सुऽभगः । सः । प्रऽयज्यवः । मरुतः । अस्तु । मर्त्यः ।
यस्य । प्रयांसि । पर्षथ ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. हे मरुतः, चर्षणीनां (=द्रष्टृणां सर्वज्ञानां) [भवताम्] अवोभिः (=संरक्षणैः) [संरक्षिता] वयं पूर्वीभिः शरद्भिः (=बहून् संवत्सरान्) ददाशिम हि (=युष्मभ्यं हवींषि दत्तवन्तः स्मः खलु) ॥

" यस्मादेवं तस्मादिदानीमप्यस्मदीयहविःस्वीकरणायागच्छतेत्यर्थः ॥ "

चर्षणिशब्दस्य सायणाचार्यैः कृतोर्थ एव साधीयान् । ते हि सर्वेषु स्थलेषु एकेनैव प्रकारेण व्याचक्षते । स चार्थो व्याख्यातृपरंपरागतोस्तीति भाति ॥

७. हे प्रयज्यवो मरुतः (=प्रकर्षेण यष्टव्या मरुतः), यस्य [मर्त्यस्य] प्रयांसि (=हवींषि) [यूयं] पर्षथ (=स्वीकुरुथ) स मर्त्यः सुभगः (=शोभनधनः) अस्तु (=भवतु) ॥

---

आहेत ते मरुतांचे जे स्तोते मजसारिखे उपासक जन त्यांच्याच घरीं वाहून येओत. त्यांची भक्ति न करणाऱ्या अभक्ताच्या घरीं न वाहून येओत.' असा हा अर्थ आम्हीं सायणांला अनुसरून केला आहे. पण 'भुवः' हें क्रियापद पूर्वपादांत असून 'यश्चर्षणीः' हें कर्तृपद आणि कर्मपद उत्तरपादांत आलें आहे. ही एक अडचण दिसते. आणि 'सूर' शब्दाचा अर्थ 'सूरि' (=यजमान) असा करावा लागतो ही दुसरी अडचण दिसते. तथापि 'सूर' शब्दाचा 'सूर्य' हा अर्थ बहुतकरून होत असतो असें. असतांहि 'प्राज्ञ,' 'ऋत्विज्' असा सायणांनीं इतर ठिकाणींहि केल्याचें दिसून येतें. (ऋ. १. १२१. ७; ८. २६. २५ पाहा). शिवाय सकळ लोकांचा पराभविता हें विशेषण मरुतांस लावणें योग्य आहे, उपासकाला लावणें योग्य दिसत नाहीं. ऋ. ४.७.४ यांतहि 'विश्वा यश्च-

६. हे मरुतांनो, सर्वज्ञानी [असे जे तुम्ही त्या तुम]च्या प्रसादांच्या योगेंकरून आम्ही पुष्कळ वर्षांपासून [तुम्हांला हवि] देत आलों आहों.

७. हे पूजनीय मरुत् हो, ज्याचीं हव्यें तुम्ही स्वीकारीत असतां तो मर्त्य श्रीमंत होओ.

6. Since many autumns, O Maruts, have we under the auspices of [you] [who are] wise, offered oblation [unto you].

7. May that mortal, O most worshipful Maruts, be prosperous, whose oblations you receive.

---

र्षणीरभि' हे शब्द आले आहेत ते तेथें मनुष्यास लाविलेले नसतां अग्नीला लाविलेले आहेत. मात्र ५. २३. १ यांत धनाला लाविले आहेत ते तेथें जुळतात. पण लोकांस जिंकणाऱ्याची हाक ऐकू, दुसऱ्यांचीं ऐकू नये हा अभिप्राय वैदिक ऋषींच्या अभिप्रायाप्रमाणें दिसत नाहीं.

वृत्तानुरोधानें प्रथम चरणांत 'अस्म श्रोषन्तु आ भुवः' असें म्हटलें पाहिजे.

---

६ 'हे सर्वज्ञानी मरुत् हो, तुमच्या कृपेनें आज पुष्कळ वर्षेंपर्यंत आम्ही निर्वेधपणें तुमची उपासना करीत आलों आहों आणि आम्हीं समर्पिलेलें हवि तुम्ही ग्रहण करीत आलां आहां; त्याप्रमाणेंच आज आमचें हवि स्वीकारून घेण्याकरितां तुम्ही या.'

'सर्वज्ञानो'=' चर्षणीनाम्.' कितीएक विद्वान् चर्षणिशब्दाचा हा सायणांनीं सर्वत्र दिलेला अर्थ टाकून चृ धातूपासून या शब्दाची व्युत्पत्ति कल्पून 'चालणारे', 'चपळ', 'शीघ्र' असा अर्थ करितात. परंतु सायणांनीं केलेला अर्थ अतिपुरातन दिसतो इतकेंच नव्हे पण बहुतकरून सर्व ठिकाणीं उत्तम जुळतो.

वृत्तानुरोधेंकरून 'अवोभिश्चर्षणीनआम्' असा तिसरा चरण वाचला पाहिजे.

७. भावार्थ स्पष्टच आहे. श्रीमंत होओ असें जरी म्हटलें आहे तरी श्रीमंत होत असतो असा मनांतील अर्थ आहे. 'स्वीकारीत असतां' हा 'पर्षथ' याचा अक्षरशः अर्थ नाहीं. अक्षरशः अर्थ 'पार पाडित असतां' असा दिसतो.

वृत्तानुरोधेंकरून दुसरा चरण 'मरुतो अस्तु मर्तिअः' असा म्हटला पाहिजे.

शशमानस्य वा नरः स्वेदस्य सत्यशवसः ।
विदा कामस्य वेनतः ॥ ८ ॥

शशमानस्य । वा । नरः । स्वेदस्य । सत्यऽशवसः ।
विद । कामस्य । वेनतः ॥ ८ ॥

यूयं तत्सत्यशवस आविष्कर्त महित्वना ।
विध्यता विद्युता रक्षः ॥ ९ ॥

यूयम् । तत् । सत्यऽशवसः । आविः । कर्त । महिऽत्वना ।
विध्यत । विऽद्युता । रक्षः ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. वा ( =अपि च ) हे सत्यशवसो नरः ( =सत्यबलाः शूरा ) [ मरुतः ], [ यूयं ] [ युष्मान् ] शशमानस्य ( =स्तुतिभिः संभजमानस्य ) वेनतः ( =कामयमानस्य=भृशं युष्मान् इच्छतः ) [ कवेः ] स्वेदस्य कामस्य [ च ] ( =स्वेदं कामनां च ) विद ( =जानीत ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे मरुतः, युष्मान् स्तुत्वा स्तुत्वा जातघर्मस्य युष्माकं स्तोतुः कामं ज्ञात्वा तं पूरयतेति ॥ यथा यूयं दत्तहविष्काणां यजमानानां कामं ज्ञात्वा पूरयथ तथैव युष्मान् स्तुवतोपि कामं पूरयतेति भावः ॥

स्वेदस्य कामस्य [ च ] विदेति षष्ठी तु एष वेद निधीनाम् ( ऋ. ८. २९. ६ ) इतिवज्ज्ञेया ॥

९. हे सत्यशवसः ( =सत्यशुष्माः =सत्यबला ) [ मरुतः ], यूयं तद् [ युष्माकं सत्यं बलं ] महि त्वना (=युष्माकं महत्त्वेन=माहात्म्येन ) आविष्कर्त ( =आविष्कुरुत=प्रकटयत ) । विद्युता [ च ] रक्षः ( =राक्षसादिकं ) विध्यत ( =मारयत=विनाशयत ) ॥

८. आणि हे सत्यबल शूर [मरुत्] हो, [तुमची] स्तुति गाऊन कवि [थकल्यानें] घाम येतो त्याजकडे [आणि] [तुमच्या] उत्कंठित कवीच्या मनकामनेकडेस [तुम्ही] चित्त द्या.

8. And know ye, brave Maruts of true strength, the sweat of [your] anxious singer [and] his desire.

९. हे सत्यबल [मरुत्] हो, तुम्ही [आपल्या] मोठेपणानें [तुमचें] जें [बळ] तें प्रगट करा. [आणि] विद्युल्लतेनें राक्षसांला मारून टाका.

9. O [Maruts] of true strength, may you with [your] greatness manifest that [your strength]. Strike ye the demon with the lightning.

---

८. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे मरुतांनो, हवि देणारा उपासक सुदैववान् होओ असें वरच्या मंत्रांत सांगितलें आहेच; आतां अशी प्रार्थना आहे कीं, जो हवि न देतां तुमची स्तुति गाऊन गाऊन थकून जातो आणि श्रमानें त्याच्या आंगाला घाम येतो आणि तुमची वांछा करितो असा जो मजसारिखा ऋषि म्हणजे कवि त्याचीहि मनकामना काय आहे ती जाणून घेऊन ती तुम्ही पूर्ण करा.'

'सत्यबळ'='सत्यशवसः.' सत्य आहे बळ ज्यांचें ते. हें विशेषण देवांविषयीं वेदांत पुष्कळ येत असतें. याच अर्थाचीं 'सत्यशुष्म' आणि 'सत्यसत्त्वा' हींहि विशेषणें देवांला (विशेषेंकरून इंद्रास) लाविलेलीं आढळतात.

वृत्ताकरितां दुसरा चरण 'स्वेदस्य सत्यशवसः' असा म्हटला पाहिजे.

या मंत्रावरून हवि देऊन यज्ञ करून देवांला भजणारा यजमान निराळा असे आणि जो स्वतःकरितां अथवा तशा यजमानाकरितां स्तोत्रें रचून देत असे तो कवि निराळा असे असें अनुमान काढण्यासारिखें आहे असें दिसतें.

९. हा मंत्र उपसंहाराजवळ असल्यामुळें मरुतांपाशीं ऋषि वर मागत आहे. 'हे सत्यबळाचे मरुतांनो, तुमचें जें सत्यबळ आहे तें तुम्ही आपल्या माहात्म्याच्या योगानें प्रगट करा, आणि आम्हांला उपद्रव करणारे जे राक्षसादिक त्यांला तुम्ही वीज पाडून मारून टाका.'

'राक्षसांला'='रक्षः.' सूक्त ७६, मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा.

वृत्तानुरोधेंकरून 'विध्यत' याच्या स्थ-

गूहता गुह्यं तमो वि यात विश्वमत्रिणम् ।
ज्योतिष्कर्ता यदुश्मसि ॥ १० ॥ १२ ॥

गूहत । गुह्यम् । तमः । वि । यात । विश्वम् । अत्रिणम् ।
ज्योतिः । कर्त । यत् । उश्मसि ॥ १० ॥ १२ ॥

## भाषायाम्.

१०. [हे मरुतो], गुह्यं तमः (=गुहायां स्थितम् अज्ञानादिकम् अन्धकारं) गूहत (=गुहायामेव स्थापयत=लोके यथा न प्रादुर्भवति तथा कुरुत ) विश्वम् अत्रिणं ( =सति सर्वत्र प्रसृते तमसि इतस्ततः संचरन्तं भीतिक्रोधादिकं मनुष्याणां भक्षकं राक्षसं) वि यात(=विभिन्न-गच्छत=विभिन्न नाशयत) । [अपि च] यत् ज्योतिः(=सूर्यप्रकाशादिकं ज्ञानादिकं वा यं प्रकाशम्) उश्मसि (=वयम् इच्छामः) [तत्] कर्त (=आविष्कुरुत) ॥

ळीं 'विध्यता' असा पाठ संहितेंत झाला आहे यावरून गायत्रीच्या तिसऱ्या पादांतील तिसरें अक्षर दीर्घ असावें असा छांदस नियम दिसतो. तरीहि याच सूक्ताचा चवथा मंत्र पाहा. प्रस्तुत मंत्राच्या तिसऱ्या पादांत उपांत्य अक्षर दीर्घ आहे हें कानाला कर्कश लागतें. प्राचीन काळीं क्षचा उच्चार खसारिखा करीत असतील कीं काय ? गुजराथ प्रांतांत षच्या ठिकाणीं ख म्हणतात हें प्रसिद्ध आहेच.

१०. [ हे मरुतांनो ], कोनाकोपऱ्यांत राहणारा [ जो ] अंधकार [ तो ] [ तुम्ही ] [ कोनाकोपऱ्यांतच] झांकून ठेवा. सकळ राक्षसांला [ तुम्ही ] भेदून टाका. जो प्रकाश [ आम्ही ] इच्छितों तो [ तुम्ही ] प्रगट करा.

10. Conceal ye Maruts, the darkness that lies hidden in the caves. Split to destruction every hungry fiend, manifest the light that we desire.

---

१०. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. आणि ऋषि आपल्या मनांतला वर मागत आहे. गोतम ऋषि म्हणतोः—' हे मरुतांनो, गुहांमध्येंच सतत राहाणारें जें तम म्हणजे अंधकार त्याला गुहेंतच ठेवा. बाहेर पसरूं देऊं नका. आणि अंधकाराचा जिकडे तिकडे प्रसार झाला म्हणजे उपासकांला खाऊन टाकण्याकरितां बाहेर फिरत असणारे जे राक्षस त्यांचा नाश करून टाका आणि ज्याची आम्ही वांच्छा करीत असतों त्या प्रकाशाचा जिकडे तिकडे प्रसार करा. '

यांत सांगितलेला अंधकार म्हणजे साधारण दृष्टीस पडणारा काळोख समजावयाचा नाहीं असें आम्हास दिसतें; तर अज्ञान, भीति इत्यादिक जे औपचारिक अंधकार ते समजावयाचे आहेत आणि गुहा म्हणजे वाईट वर्तनाविषयीं वगैरे वाईट मनुष्यांच्या ज्या इच्छा अथवा अंतःकरणें तीं होत; आणि राक्षस म्हणजे अज्ञानाचा प्रसार झाल्यामुळें मनुष्याच्या साधुत्वाचा नाश करणारे जे क्रोधादिकांचे परिणाम ते होत आणि प्रकाश म्हणजे ज्ञान होय असा ऋषीच्या मनांतील भावार्थ दिसतो.

या सर्व सूक्ताचा उच्चार शांतिसूक्तांत करीत असतात. शांतिसूक्त अनिष्ट परिणाम निवारण्यासाठीं अनेक संकटप्रसंगीं म्हणत असतात. उदाहरणार्थ गर्भिणी स्त्रीची सहज सुटका व्हावी म्हणून प्रसूतीच्या वेदनांसमयीं शांतिसूक्त म्हणतात. तर अशा प्रसंगीं मरुतांविषयीं प्रस्तुत सूक्तासारिख्या अतिप्राचीन सूक्ताचा काय संबंध आहे त्याचा विचार करणें अवश्य दिसतें.

वृत्तानुरोधेंकरून पहिला चरण 'गूह्ता गुह्अं तमो' असा म्हटला पाहिजे.

## सूक्तम् ८७.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । मरुतो देवता । जगती च्छन्दः ।

**प्रत्वक्षसः प्रतवसो विरप्शिनोऽनानता अविथुरा ऋजीषिणः ।**
**जुष्टतमासो नृतमासो अञ्जिभिर्व्यानज्रे के चिदुस्रा इव स्तृभिः ॥१**

प्रऽत्वक्षसः । प्रऽतवसः । विऽरप्शिनः । अनानताः । अविथुराः । ऋजीषिणः ।
जुष्टऽतमासः । नृऽतमासः । अञ्जिऽभिः । वि । आनज्रे । के । चित् । उस्राःऽइव । स्तृऽभिः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. प्रत्वक्षसः (=प्रकृष्टेन बलेन युक्ताः) प्रतवसः (=प्रकर्षेण शक्तिमन्तो) विरप्शिनः (=विशेषेण महान्तः) अनानताः (=न नमिताः=केनाप्यधृष्टा) अविथुराः (=अहीनाः=सप्तसंघात्मकत्वेनैव गच्छन्तः) ऋजीषिणः (=ऋजीषोद्भवं सोमं पिबन्तो) जुष्टतमासः (=उपासकैरतिशयेन सेविताः=प्रियतमा) नृतमासः (=नृतमाः =अतिशयेन शौर्योपेताः) [एतादृशा मरुतः] स्तृभिः अञ्जिभिः (=तारकासदृशैराभरणैः) वि आनज्रे (विशेषेण नभसि व्यक्ता भवन्ति)। केचित् उस्रा इव (=बालसूर्यस्य केचनैव संघीभूताः किरणा इव)॥

बालसूर्यस्य यथा प्रातःकाले केचिदेव किरणाः प्रथमं दृश्यमानास्तेजस्विनः अन्योन्याहीनाः सन्तो युगपत् प्रादुर्भवन्ति तद्वद् इमे मरुतः प्रादुर्भवन्ति दृश्यतां भो इति भावगतं कवेः॥ मरुतो यदा गच्छन्ति तदा सूर्यकिरणवद्गच्छन्तीति शोचिर्न मानमस्यथेति (ऋ. १. ३९. १) मन्त्रान्तरेपि दृश्यते। दृश्यतां तत्रत्या नो महाराष्ट्रटीका॥

ऋजीषिण इत्यत्र विषये घृषुं पावकं वनिनम् इत्यस्य व्याख्याने यदुक्तं तद् दृश्यताम्। केचित् उस्राः इव स्तृभिः इत्यत्र मरुतः सर्वेपि संगता न युगपत् प्रादुर्भवन्ति तर्हि केचित् केचनैव प्रथमम् आगच्छन्ति ते च उस्रा दीप्तिमन्तो द्युलोकस्य प्रदेशाः द्युलोका यथा नक्षत्रैस्तथा स्वैराभरणैः शोभन्त इति भट्टमूलरः। मरुतः पुनः केचित् प्रथमं केचित् अनन्तरं प्रादुर्भवन्तीति नालं प्रसिद्धिः। अपि च मरुतां चित्रभानवः विद्युतः विद्युद्धस्ताः विद्युद्रथाः विद्युन्महसः विश्वभानवः स्वभानवः स्वरोचिषः स्वर्काः इत्यादिभिस्तेजःपुञ्जत्वदर्शकैर्विशेषणैर्विशिष्टत्वात् न तेषां नक्षत्रयुक्तेन तमोवृतेन दिवा सह युज्यत उपमा॥

## सूक्त ८७.

ऋषि—गोतम. देवता—मरुत्. वृत्त—जगती.

१. महाप्रतापी, महाबलिष्ठ, महान्, अप्रतिहत, संघात्मक, सोमपी, अतिशयेंकरून प्रियकर, अतिशयेंकरून शौर्ययुक्त [असे जे] मरुत् [ ते ] कितीएक किरणांप्रमाणें [ आपल्या ] नक्षत्रसदृश आभरणांनीं आविर्भूत होत आहेत.

## Hymn 87.

To the *Maruts*. By *Gotama*. Metre—*Jagatî*.

1. Most mighty, most impetuous, most high, unsubdued, unscattered, drinkers of Soma, most beloved, most valorous,—the Maruts manifest themselves with their starry ornaments, like the few rays [ of the morning sun ].

१. हेंहि सूक्त गोतमाचेंच आहे आणि देवताहि मरुत् होत. हा मंत्र समजण्यास अशी कल्पना केली पाहिजे कीं, मरुत् आपले सर्व अलंकार घालून मोठ्या वेगानें येत आहेत, ते आपणास दृष्टी पडत आहेत असें समजून गोतम ऋषि म्हणतो कीं, 'सूर्योदयसमयीं सूर्याचे थोडेसेच किरण इकडे तिकडे न पसरतां एकत्र बांधल्याप्रमाणें पूर्वेकडून सुटून तेजःपुंज कांतीनें एका झोकानें येत असतात त्याप्रमाणें हे मरुत् येत आहेत ते पहा.'

याशिवाय मंत्रांत जे शब्द आहेत तीं केवळ मरुतांचीं विशेषणें आहेत. त्यांच्या संबंधानें कांहीं कठीण नाहीं. मरुत् आपलीं आभरणें घालून येत आहेत ( अक्षरशः प्रगट होत आहेत ) इतकाहि अर्थ उघडच आहे. परंतु 'कितीएक किरणांप्रमाणें' ही उपमा वादग्रस्त आहे; तिचा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे. मोक्षमूलर यांणीं 'केचित्' हे शब्द मरुतांकडेस लावून ' सगळे मरुत् एकदम प्रगट न होतां कितीएक थोडेच मरुत् प्रथम येतात आणि ते द्युलोक नक्षत्रांनीं शोभतो तसे आपल्या आभरणांनीं शोभतात' असा अर्थ केला आहे. परंतु ' उस्र' शब्दाचा अर्थ द्युलोक असा केला तरी नक्षत्रांनीं द्युलोक शोभतो तो रात्रीच्यावेळीं शोभतो. आणि मरुतांस जीं विशेषणें लाविलेलीं वेदांत आढळतात त्यांचा विचार केला असतां नक्षत्रांनीं शोभणारा जो काळा द्युलोक त्यासारिखे मरुत् शोभतात असें म्हणतां येणार नाहीं. उदाहरणार्थ, ' चित्रभानवः' (= सुंदरतेजस्क ), 'विद्युतः' (= तेजःपुंज ), ' विद्युद्धस्ताः' (= विजा

उप॒ह्व॒रेषु॒ यदचि॑ध्वं य॒यिं वय॑ इव मरुतः॒ केन॑ चित्प॒था ।
श्चोत॑न्ति॒ कोशा॒ उप॑ वो॒ रथे॒ष्वा घृ॒तमु॑क्षता॒ मधु॑वर्ण॒मर्च॑ते ॥ २ ॥

उप॒ऽह्व॒रेषु॑ । यत् । अचि॑ध्वम् । य॒यिम् । वयः॑ऽइव । म॒रु॒तः॒ । केन॑ । चि॒त् । प॒था । श्चोत॑न्ति । कोशाः॑ । उप॑ । वः॒ । रथे॑षु । आ । घृ॒तम् । उ॒क्ष॒त॒ । मधु॑ऽवर्णम् । अर्च॑ते ॥ २ ॥

## भाषायाम्.

२ हे मरुतः, यद् (=यदा) [यूयम्] उपह्वरेषु (=पृथ्वीसमीपवर्तिषु अन्तरिक्षप्रदेशेषु), वय इव (=पक्षिण इव) केनचित्पथा (=केनचिद्यथाकामं मार्गेण) [गन्तुं], ययिम् अचिध्वं (=रथम् अश्वादिभिः साधनैरुपचितं कुरुथ=अश्वादिभिः सिद्धं कुरुथ) [तदा] वो रथेषु उप आ (=युष्माकं रथेषु) कोशाः श्चोतन्ति (=मेघा वृष्टिरूपेण पतन्ति)। [यूयम्] अर्चते (=युष्मान् पूजयते युष्माकम् उपासकार्थे) मधुवर्णं घृतं (=मधुसदृशरूपं पोषकरं मेघोदकम्) उक्षत (=औक्षत=सिञ्चथ) ॥

यदा यूयं रथारूढाः सन्तः आकाशप्रदेशेषु पक्षिवद्यथाकामं केनापि मार्गेण गच्छथ तदा युष्माकं रथाः मेघोदकैरभिवृष्टा भवन्ति यूयं च तदुदकं युष्माकम् उपासकजनहिताय भूमौ पातयथेति भावः ॥

उपह्वरेषु ययिम् अचिध्वम् इति वादग्रस्तम् । सायणा एवम् आहुः हे मरुतः उपह्वरेषूपह्वर्तव्येषु गन्तव्येष्वस्माकं संनिकृष्टेषु नभसः प्रदेशेषु यद्यदा ययिं गतिमन्तं मेघमचिध्वम् । वर्षणसामर्थ्येनोपचितं कुरुथ । किं कुर्वन्तः । वय इव पक्षिण इव केनचित्पथा केनचिदाकाशमार्गेण शीघ्रं गच्छन्तः । नभसि शीघ्रं वर्षणार्थं प्रवर्तमानैर्मरुद्भिर्मेघा उपचीयन्त इत्यर्थ इति । भट्टमोक्षमूलरस्तु ययिं गन्तारं मार्गं यद्यदा अचिध्वं पश्यथ तदेति ॥

उक्षतेति औक्षतेत्यर्थो । अथवा लडर्थे लोट् ॥

ज्यांच्या हातीं चमकतात ते), 'विद्युद्रथाः' (=ज्यांच्या रथांवर विजा आहेत ते), 'विद्युन्महसः' (=विजांसारिखें ज्यांना तेज आहे ते), 'विश्वभानवः' (=ज्यांचें तेज आसपास सर्व फांकत असतें ते), 'स्वभानवः' आणि 'स्वरोचिषः' (=ज्यांच्या अंगीं स्वताहाचें तेज आहे ते), 'स्वर्काः' (=ज्यांचें तेज उत्तम आहे ते). तर ज्यांचा प्रकाश जिकडे तिकडे पसरतो आणि जे प्रकाशानें जणूं परिपूर्ण आहेत ते ताऱ्यांनीं शोभणाऱ्या रात्रीच्या वेळच्या आकाशासारिखे आहेत असें म्हटलें तर उपमा चांगली जुळत नाहीं, आणि त्यामुळें प्रोफेसर मूलर

२. हे मरुतांनो, जेव्हां [तुम्ही] आकाशांतील प्रदेशांत पक्ष्यांप्रमाणें कोणत्याहि मार्गानें [जाण्याला] तुमचा रथ सिद्ध करितां [तेव्हां] तुमच्या रथांवर मेघ गळतात. तुम्ही [तुमच्या] उपासकांकरितां मधूसारिखें उदक ओतीत असतां.

2. When O Maruts, you prepare [your] car [to go] like birds by any path on the slopes [of the sky], the clouds shower on your chariots. Sprinkle ye for [your] worshipper the honey-like water.

यांचा अर्थ संभवत नाहीं असें आम्हांस वाटतें.

'अप्रतिहत'=' अनानताः.' अक्षरशः अर्थ 'ज्यांनां कोणीं वांकविले नाहींत म्हणजे जिंकून नम्र केले नाहींत ते,' ज्यांच्या विरुद्ध कोणीं येऊं शकत नाहींत ते.

'संघात्मक'='अविथुराः'. मरुत् एक एक न जातां गणांनीं फिरत असतात, ते गण सात आहेत असें सायणाचार्य म्हणतात. (सूक्त ५, मंत्र ४ यावरील टीका पहा.)

प्रातःकाळीं अरुणोदय होतांच सूर्याच्या कितीएक किरणांचा झुबका जसा येतो आणि सगळे किरण एकत्रच मिळून पण एकमेकांच्या जवळ जवळ असून जणूं येत आहेत असें वाटतें, तसे मरुत् आपली फुटाफूट न होऊं देतां गणांनीं येत आहेत असें तात्पर्य. सू. ३९, मं. १ ह्यांतहि मरुत् सूर्यकिरणांप्रमाणें येतात असें सांगितलें आहे, तें पहा.

'सोमपी'='ऋजीषिणः.' सू. ६४, मं. १२ याजवरील आमची टीका पहा. 'ऋजीषि' शब्दाचा आम्हीं सायणाप्रमाणें अर्थ केला आहे आणि तो अति प्राचीनकाळापासूनच व्याख्यानपरंपरागत असल्यामुळें संमाननीय दिसतो.

'नक्षत्रसदृश आभरणांनीं'='स्तृभिः अञ्जिभिः.' 'स्तृभिः' यांत लुप्तोपमा आहे असें आम्हांस दिसतें.

हा मंत्र श्लोकवृत्ताला खालीं लिहिल्याप्रमाणें बसतोः—

प्रत्वक्षसः प्रतवसो विरप्शिनः
अनानता अविथुरा ऋजीषिणः ।
जुष्टतमासो नृतमासो अञ्जिभिर्
वि आनॅज्रे के चिदुॅस्राइव स्तृभिः ॥

२. हा मंत्र कठीण आहे. आम्हीं केलेल्या भाषांतराचा भावार्थ असा आहेः—' हे मरुतांनो, जेथें जेथें तुम्ही आकाशांत रथांत बसून पाहिजे त्या मार्गानें पक्ष्यांप्रमाणें जातां, जिकडे जिकडे म्हणजे जाल तिकडे तिकडे मेघवृष्टि तुमच्या रथांवर होते; आणि त्या वृष्टीपासून तुम्ही मरुत् आपल्या उपासकाकरितां भू-

प्रैषामज्मेषु विथुरेव रेजते भूमिर्यामेषु यद्ध युञ्जते शुभे ।
ते क्रीळयो धुनयो भ्राजदृष्टयः स्वयं महित्वं पनयन्त धूतयः॥३॥

प्र । एषाम् । अज्मेषु । विथुराऽइंव । रेजते । भूमिः । यामेषु । यत् । ह । युञ्जते । शुभे ।
ते । क्रीळयः । धुनयः । भ्राजत्ऽऋष्टयः । स्वयम् । महिऽत्वम् । पनयन्त । धूतयः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. यत् ह (=यदा खलु) [ते मरुतः] शुभे युञ्जते (=शोभायै रथेषु अश्वान् योजयन्ति=यदा रथारूढा भूत्वा शोभन्ते) [तदा] एषां (=तेषाम्) अज्मेषु यामेषु [च] (=उत्क्षेपणेषु गमनेषु च सत्सु) भूमिः (=पृथ्वी) विथुरेव प्र रेजते (=आश्रयहीनेव भूत्वा प्रकर्षेण कम्पते)। ते क्रीळयः (=क्रीडाशीला) धुनयः (=चलनस्वभावा) भ्राजदृष्टयः (=दीप्यमानायुधा) धूतयः (=पृथिव्यादीनां कम्पयितारो) [मरुतः] [स्वकीयं] महित्वं (=महत्त्वं) स्वयं (=स्वयमेव मादृशात्कवेर्ऋत एव) पनयन्त (=स्तुवन्ति)॥

भ्राजदृष्टीभूतत्वादिगुणविशिष्टानां मरुतां महत्त्वं मादृशान् अल्पकवीन् नापेक्षते स्वयमेव तत्स्तुतमिव वर्तत इति भावः॥

मीवर मेघोदकाचा वर्षाव करितां.' दुसरी आश्री उघड आहे; पण प्रथमार्धाचा अर्थ अगदीं स्पष्ट आहे असें नाहीं. त्यांत 'ययिम् अचिध्वम्' हे शब्द कठिण आहेत. त्यांचा अर्थ सायणाचार्य 'मेघाला वर्षवितां' असा करितात; आणि मोक्षमूलरादिक कितीएक नवीन विद्वान् 'मार्गाला पाहतां' असा करितात. आम्हीं केलेल्या अर्थाला ऋ. ८. ७. २; ८. ७. १४ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य ह्यांचा आधार आहे. परंतु एक दोन शब्दांविषयीं अडचण असली तरी जेथें जेथें मरुत् जातात तेथें तेथें ते मेघवृष्टि करितात आणि ती वृष्टि मरुत् उपासक जनांसाठीं करवितात, इतका अर्थ स्पष्ट आहे. मरुत् जिकडे जातात तिकडे पाऊस पडत असतो असें मरुत्सूक्तांमध्यें पूर्वी आलेंच आहे. सू. ३७, मं. १०; सू. ३८, मं. ७, ९ आणि त्यांजवरील भाष्य पहा.

'ओतीत असतां'=' उक्षत.' अक्षरशः अर्थ 'ओता' असा आज्ञार्थ आहे. पण रीतिवर्तमानाच्या स्थळीं आज्ञार्थी क्रियापदें वेदांत पुष्कळ ठिकाणीं येत असतात.

'मधूसारिखें उदक '=' घृतं मधुवर्ण-

३. [ हे ] जेव्हां [ आपले रथ ] जोडितात आणि शोभतात तेव्हां यांच्या धांवण्याला [आणि] गमनांला भिऊन पृथिवी दीनासारिखी थरथर कांपत असते. ते खेळाडू, चंचळ, लकलकीत भाले धारण करणारे, आणि कंपविणारे [ मरुत् ] [ आपलें ] मोठेपण आपणच [ जणूं ] स्तवीत असतात.

3. When they yoke [ their chariots ] and shine, the earth trembles violently as if forlorn, in their courses [ and ] in their progress. They the frolicsome, the impetuous, the wearers of brilliant spears, the shakers, themselves glorify their own greatness.

---

म्.' अक्षरशः अर्थ ' मधूसारिखें दिसणारें आणि तूपाप्रमाणें पौष्टिक ' पाणी. मेघोदकाविषयीं आपल्या आर्य पूर्वजांची भक्ति कशी होती तें या आणि अस्त्याच दुसऱ्या अनेक विशेषणांवरून दिसून येतें. मेघ, उदक, वृष्टि, अवर्षण, हे जे आकाशप्रदेशांच्या संबंधानें होणारे चमत्कार त्यांजविषयींच बहुतकरून वेदांत पुष्कळ सांगितलें आहे त्यावरून आपले आर्य पूर्वज मेघाविषयीं सदा आतुर असत आणि सदैव अवर्षणावरून होणाऱ्या दुष्काळापासून जणूं त्यांस पीडा होत असे असें दिसतें.

हा मंत्र वृत्तानुरोधानें असा म्हटला पाहिजे:—

उपह्वरेषु यदचिध्वं ययिं
वयः इव मरुतः केन चित्पथा ।
श्चोतन्ति कोशा उप वो रथेषु आ
घृतम् उक्षत मधुवर्णमर्चते ॥

---

३. ' जेव्हां मरुत् रथारूढ होऊन शोभतात आणि जाऊं लागतात तेव्हां पृथ्वी निराश्रित जणूं होऊन थरथर कांपूं लागते. मरुतांचा वेग, त्यांचें स्वरूप, त्यांची शक्ति हीं इतकीं प्रसिद्ध आणि मोठीं आहेत कीं त्यांची स्तुति करण्याला मजसारिख्या कवीची अवश्यकता नाहीं; ते सर्व गुण जगापुढें आपणच आपणास जणूं स्तवीत आहेत.

' रथ जोडितात आणि शोभतात '= ' युञ्जते शुभे.' अक्षरशः अर्थ शोभेकरितां जोडितात.

या मंत्रांत मरुतांचीं जीं विशेषणें आहेत तीं मरुतांविषयींच्या सूक्तांत पूर्वी आलींच आहेत. सू. ३७, मं. २,५, ६, ८; सू. ३९, मं. ६. १० हे मंत्र आणि त्यांजवरील मराठी टीका पाहा.

श्लोकवृत्तानुरोधेंकरून हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें वाचावाः—

स हि स्वसृत्पृषदश्वो युवा गणो३ऽया ईशानस्तविषीभिरावृतः ।
असि सत्य ऋणयावाऽनेद्योऽस्या धियः प्राविताथा वृषा गणः॥४

सः । हि । स्वऽसृत् । पृषत्ऽअश्वः । युवा । गणः । अया । ईशानः ।
तविषीभिः । आऽवृतः ।
असि । सत्यः । ऋणऽयावा । अनेद्यः । अस्याः । धियः । प्रऽअविता ।
अथ । वृषा । गणः ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. हि (=यस्मात् कारणात्) स स्वसृत् (=स्वयमेव सरन्=अन्यैरप्रेरितः) पृषदश्वः (=पृषत्यः श्वेतविन्द्वङ्किता हरिण्य एवाश्वा यस्य स) युवा (=नित्यतरुणः) ईशानः (=सर्वेषां प्रभुः) [एतादृशो] [मरुतां] गणः अया (=अनया) [स्तुत्या] तविषीभिरावृतः (=बलैर्वेष्टितो) [भूतोस्ति]। [हे मरुद्गण], [त्वं] सत्यः (=सत्यपराक्रमः) ऋणयावा (=ऋणस्य तवोपासकैर्देयस्य यापयिता हन्ता) अनेद्यः (=अनवद्यः=दोषरहितः=प्रशंस्यः) असि। अथ (=अनन्तरं=तस्मात् कारणात्) [त्वं] गणः अस्या धियः (=अस्माकम् अस्य कर्मणो) वृषा प्राविता (=शौर्योपेतो रक्षिता) [भव]॥

अया इत्यत्र विषये अस्य सर्वस्य जगत ईशान ईश्वरशीलो भवतीति सायणाचार्याः। अयाशब्द एवमर्थ इति मूलरभट्टाः। अयाशब्दयुक्तान्मन्त्रान्सर्वानपि दृष्टवन्तो वयम् अया अनया स्तुत्येति व्याख्यानं वरं मन्यामहे।

ऋणयावेति पदमपि वादग्रस्तं भाति। स्तोतृणाम् ऋणस्यापगमयितेति हि सायणः। स्तोतृणामृणस्य पाप्मनो हन्तेति रोधमूलरौ। मन्त्रान्तरभाष्ये पुनः सायणः क्वचिदप्येतमर्थं न ज्ञापयति। सति च तादृशेर्थे विद्यमाने जानीयात्सुखमेव स आर्यावर्तव्याख्यातेति भाति॥

प्रैषामज्मेषु विथुरेव रेजते
भूमिर्यामेषु यद्ध युञ्जते शुभे।
ते क्रीळयो धुनयो भ्राजदृष्टयः
स्वयं महित्वं पनयन्त धूतयः॥

४. कारण कीं, जो स्वगतिमान् होय, आणि पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी हेच ज्याचे घोडे होत, जो नित्यतरूण, असा जो प्रभु मरूद्गण तो या स्तुतीच्या योगेंकरून सकळ बळांनीं वेष्टित झाला आहे. [हे मरूद्गणा], तूं सत्य होस, तूं ऋणनाशक, आणि अनिंद्य आहेस. तर तूं गण या आमच्या कर्माचा प्रबळ संरक्षिता हो.

4. For the troop of Maruts, which is self-moved, which has spotted deer for its horses, which is ever-youthful, and which is the lord of all, is through this our prayer surrounded by all powers.— Thou art, O troop, true, thou art the destroyer of debt, and thou art stainless. Do thou therefore [become] the mighty champion troop of this our rite.

४ ऋषि म्हणतोः—' स्वताहाची ज्याला शक्ति आहे म्हणजे मनुष्याप्रमाणें ज्याला हालविण्याला अथवा जीवंत राखण्याला दुसऱ्याची अवश्यकता नाहीं असा जो मरुद्गण; ज्याच्या रथाला घोड्यांच्या ऐवजीं पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी जोडिल्या आहेत; जो सदैव तरूण; जो सर्वांचा प्रभु; तो मरुतांचा गण या आमच्या स्तोत्राच्या योगानें बलिष्ठ झाला आहे. हा गण सत्यपराक्रमी, उपासकांचीं ऋणें नाहींसीं करणारा आणि स्तवनीय होय. तर तो आमच्या या कर्माचा संरक्षणकर्ता होओ.'

' पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी हेच ज्याचे घोडे होत '=' पृषदश्वः.' सू. ३७, मं. २ आणि ६४. ८ हे मंत्र आणि त्यांजवरील टीप हीं पहा.

' नित्यतरूण '=' युवा '. वेदांत देवांला बहुतकरून तरूण अशी संज्ञा पुष्कळ ठिकाणीं दिली आहे. विशेषेंकरून इंद्र, मरुत्, अग्नि, रुद्र, सोम, आदित्य (म्हणजे मित्र, वरुण, अर्यमा, भग, इत्यादिक आठजण), सकल देव, सविता, विष्णु, अश्वी, मित्रावरुण, विश्वेदेव यांस तरूण असें विशेषण पुष्कळ ठिकाणीं लाविलेलें आढळतें. याचें तात्पर्य इतकेंच कीं ते जसे अमर म्हणजे कधींहि न मरणारे होत तसेच ते कधींहि वृद्ध न होणारे होत. म्हणूनच त्यांला वेदांच्या आलीकडील ग्रंथांत ' अजर ' असें नांव पडलें आहे.

' या स्तुतीच्या योगेंकरून सकळ बळांनीं वेष्टित झाला आहे '=' अया तविषीभिरावृतः'. स्तुतीच्या योगानें देवतांचें बळ वाढतें असें पूर्वी पुष्कळ वेळ सांगितलेंच आहे.

' या [ आमच्या ] कर्माचा '=' अस्या धियः'. म्हणजे जें आम्ही तुम्हां मरुतां-

पितुः प्रत्नस्य जन्मना वदामसि सोमस्य जिह्वा प्र जिगाति चक्षसा ।
यदीमिन्द्रं शम्यृक्वाण आशतादिन्नामानि यज्ञियानि दधिरे ॥५॥

पितुः । प्रत्नस्य । जन्मना । वदामसि । सोमस्य । जिह्वा । प्र । जिगाति । चक्षसा ।
यत् । ईम् । इन्द्रम् । शमि । ऋक्वाणः । आशत । आत् । इत् । नामानि । यज्ञियानि । दधिरे ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. [वयं] प्रत्नस्य पितुः (=पुराणस्यास्माकमुत्पादयितू रहूगणस्य) जन्मना (=तस्माद् यज्जन्म तेन) वदामसि (=वदामः=वक्ष्यमाणं वृत्तान्तं कथयामः) [तद्यथा] सोमस्य चक्षसा (=सोमरसस्य दर्शनेन=अभिषुतं सोमं दृष्ट्वा) [मरुतां] जिह्वा प्र जिगाति (=तं पातुं प्रकर्षेण गच्छति=पुरतो गच्छति), [अपि च] यद् (=यदा) ऋक्वाणः (=स्तुतिं कुर्वाणा) [मरुतः] शमि (=वृत्रवधकर्मणि) ईम् इन्द्रम् (=एनमिन्द्रम्) आशत (=प्राप्नुवन्=तस्य साहाय्यमकुर्वन्) आत् इत् (=तस्मात्कालात्प्रभृत्येव) [ते मरुतो] यज्ञियानि नामानि दधिरे (=यज्ञयोग्यानि नामानि धारितवन्तः=यजनीयेषु देवेषु गणितत्वं प्राप्नुवन्) [इति] ॥

अत्रेदमुक्तं भवति । वयमेतद्वक्ष्यमाणं पितुः प्रत्नस्य पुराणस्यास्माकं रहूगणस्य कुले जाता यस्मात्तस्माद् ब्रूमः । यथा मरुतः सोमरसं दृष्ट्वा तं पातुं प्रधावन्ति ते च प्रथमं देवा नासन् तर्हि वृत्रहननरूपे महाकर्मणि देवमिन्द्रं स्तुत्वा तस्य साहाय्यं यदाकुर्वंस्तस्मात्कालात्प्रभृत्येव देवत्वमापुः इतरदेवैश्च सह यज्ञियेषु परिगणनां प्राप्नुवन्निति ॥ रहूगणेन यदस्माकमुक्तं तद्वदामः नत्वन्यथा वदाम इति भावः ॥ मूलरप्रभृतयः पुनः पितुर्जन्मना पितुः प्रकारेण पिता यथावदत्तथा वदाम इति व्याचक्षते ।

सोमस्य जिह्वा प्र जिगाति चक्षसेत्यत्र "सोमस्य यज्ञेष्वभिषुतस्य सोमद्रव्यस्य "चक्षसा प्रकाशमानयाहुत्या सहिता जिह्वा स्तुतिरूपा वाक् प्र जिगाति । मरुद्भ्यः "प्रकर्षेण गच्छति । यज्ञेषु सोमाहुतिः स्तुतिश्च मरुद्भ्यः क्रियते" इति सायणः ॥

प्रीत्यर्थ यजनरूपी कर्म करीत आहों त्याचे. तें कर्म करण्याला आम्हांस कधींहि प्रत्यवाय होऊं नये अशी ऋषीची प्रार्थना दिसते.

शंकीकरणः—

स हि स्वसृत्पृषदश्वो युवा गणः
अया ईशानस्तविषीभिरावृतः ।
असि सत्यः ऋणयावा अनेदिअः
अस्या धियः प्रावितॉथा वृषा गणः॥

५. [ आम्ही आमच्या ] पुराण पित्यापासून जन्म पावून बोलतों [ कीं ];—सोमाला पाहून [ मरुतांची ] जिव्हा पुढें सरसावते; [ आणि ] जेव्हां [ मरुत् ] [ वृत्रवधाच्या ] कामीं स्तुति करीत करीत इंद्राला जाऊन मिळाले, तेव्हांपासूनच [ ते ] पूज्यत्व धारण करिते झाले.

5. We speak through our birth from [ our ] ancient father: at the sight of the Soma the tongue [of the Maruts] goes forth; when they, singing the praises [ of Indra ], joined, Indra in the great deed, from thence for the first time did they attain to names worthy of worship.

---

५. ऋषि म्हणतोः—' रहूगण जो आमचा पुरातन वंशज त्याच्या कुळांत आमचा जन्म असल्यामुळें जें आम्हीं ऐकिलें आहे तें आम्ही बोलतों. आणि तें हें कीं, मरुतांस सोमाविषयीं फार आसक्ति आहे, सोमरस पाहतांच तो पिण्याकरितां त्यांची जिव्हा जणुं पुढें सरसावते; आणि मरुत् प्रथम देव नव्हते, ते इंद्राला वृत्रहननाच्या कामीं मोठें साहाय्य करून नंतर देवत्व पावले, आणि त्या वेळापासून लोक त्यांजप्रीत्यर्थ यज्ञ करूं लागले. याप्रमाणें आम्हांस आमच्या कुळांत कथा समजली आहे.'

' जन्म पावून '=' जन्मना.' अक्षरशः अर्थ ' जन्मानें.' म्हणजे पुराण पिता जो त्याजपासून आमचें जन्म झालें आहे या कारणावरून. ' प्रत्नस्य पितुः' या षष्ठीचा अर्थ पंचमीप्रमाणेंच पर्यवसानीं घेतला पाहिजे.

' तेव्हांपासूनच '=' आद् इत्.' मरुत् प्रथम देव नव्हते ते मागाहून देव झाले आणि ते इंद्राला साहाय्य केल्यामुळें झाले असें इतर मंत्रांतहि सांगितलेलें आढळतें. सू. ८५, मं. २, ७ पहा. सू. ७२, मं. ३ यांत तीन वर्षेंपर्यंत अग्नीची उपासना करून मरुतांला देवत्व आलें असें सांगितलें आहे, तें पहा.

या मंत्राचा पूर्वार्ध बहुतकरून सर्व श्लोकवृत्ताला नीट बसतो, पण उत्तरार्ध किंचित् खडवडीत आहेः—

पितुः प्रत्नस्य जन्मना वदामसि
सोमस्य जिह्वा प्र जिगाति चक्षसा ।
यदीमिन्द्रं शम्यृक्वाण आशत
आदिन्नामानि यज्ञियानि दधिरे ॥५॥

श्रियसे कं भानुभिः सं मिमिक्षिरे ते रश्मिभिस्त ऋक्वभिः सुखादयः ।
ते वाशीमन्त इष्मिणो अभीरवो विद्रे प्रियस्य मारुतस्य धाम्नः ॥ ॥ ६ ॥ १३ ॥

श्रियसे । कम् । भानुऽभिः । सम् । मिमिक्षिरे । ते । रश्मिऽभिः । ते । ऋक्वऽभिः । सुऽखादयः ।
ते । वाशीऽमन्तः । इष्मिणः । अभीरवः । विद्रे । प्रियस्य । मारुतस्य । धाम्नः ॥ ६ ॥ १३ ॥

## भाषायाम्.

६. [ मरुतो ] भानुभिः श्रियसे कं सं मिमिक्षिरे (=शोभार्थं तेजोभिः संजग्मिरे=तेजोभिः संगता भूत्वा दीप्यमाना बभूवुः) सुखादयः (=शोभनाभरणधारिणस्) ते [ मरुतो ] रश्मिभिः ऋक्वभिः (=किरणैः स्तोतृभिश्च) [ सं मिमिक्षिरे=संजग्मिरे ] ते वाशीमन्तः (=आराख्यायुधैर्युक्ता ) इष्मिणः (=गतिमन्तः) अभीरवः (=भयरहिता ) [ मरुतः ] प्रियस्य मारुतस्य धाम्नः (=प्रियकरस्य मरुत्संबन्धिनः पदस्य ) विद्रे (=वेत्तारो बभूवुः=तल्लब्धवन्तः ) ॥

इन्द्रस्य वृत्रहननमहाकर्मणि कृतसाहाय्या मरुतो देवत्वं प्राप्तवन्तः सन्तः सूर्य इव किरणैस्तेजोभिश्च संगता बभूवुः । अपि च प्रियं यज्ञेषु स्वर्गादिषु च लोकेषु मरुतां स्थानं तद्धारितवन्तः । तस्मात् कालात् प्रभृत्येव कवयस्तान्स्तुवन्ति तेषामर्थे च हवींषि प्रार्पयन्तीति भावगतं गोतमस्य ॥

सं मिमिक्षिरे । मिम्यक्ष येषु सुधिता घृताची ( ऋ. १. १६७. ३ ) इत्यत्र म्यक्षतिर्गतिकर्मेति सम्यक् सायणाचार्याः ॥

६. [मरुत्] तेजांप्रत पावले आणि शोभले. ते किरणांप्रत [पावले]. त्या उत्तमाभरणालंकृत [मरुतां]ला स्तोते [प्राप्त झाले]. ते कुठार धारण करणारे, गतिमान्, निर्भय [असे जे मरुत्] ते प्रिय मारुत पदाप्रत पावले.

6. They obtained splendor, and shone. They obtained rays. They the wearers of good ornaments obtained praisers [for themselves]. They the wearers of axes, impetuous [and] fearless, attained to the dear Home of Maruts.

६. मरुतांनीं इंद्राला वृत्र मारण्याच्या कामीं साहाय्य केल्यानंतर ते देव झाले असें वरच्या मंत्रांत सांगितलें. त्यालाच अनुसरून ऋषि म्हणतो कीं, ' त्यांला देवत्व प्राप्त झाल्यावर त्यांच्या अंगीं किरण आणि महातेज हीं आलीं; आणि नंतर त्यांची स्तुति करावयाला मजसारिखे कवि मिळाले. आणि मग आम्ही त्यांचें स्थान अमुक ठिकाणीं आहे, ते असे आहेत, ते चांगले आहेत, ते महाप्रतापी आहेत अशी जी त्यांची प्रतिष्ठा ती वाढवूं लागलों.'

' तेजाप्रत पावले आणि शोभले '=' श्रियसे कं भानुभिः सं मिमिक्षिरे.' अक्षरशः अर्थ, ' शोभेकरितां तेजांप्रत पावले.' ' श्रियसे ' याच्या अर्थाविषयीं ऋ. ५. ५९. ३ हा मंत्र आणि त्याजवरील भाष्य पहा. ' कम् ' हें पादपूरण अव्यय आहे.

' उत्तमाभरणालंकृत '=' सुखादयः'. ऋ. ५. ८७. १ याजवरील सायणभाष्य पहा.

' कुठार धारण करणारे '=' वाशीमन्तः'. सू. ३७, मं. २ आणि त्याजवरील आमची टीका पहा.

येथें हें सत्याऐशींवें सूक्त संपलें. यांत गोतम ऋषीनें आपल्या उपास्य देवतांच्या स्वरूपाबरोबर आपलेंहि खरें स्वरूप प्रगट केलें आहे. त्याचें स्वरूप पुराणादिक ग्रंथ जसें असावें असें आम्हांस शिकवितात त्या प्रकारचें आरोपित स्वरूप प्रगट केलेलें नाहीं. यांत तपोबळाचें नांव नाहीं; ब्रह्मवर्चस्वाचा लेश नाहीं; तामस स्वभावाचें वारेंहि नाहीं. युगांचीं युगें जगण्याच्या शक्तीचा गंधहि नाहीं, मग सर्वज्ञतेचा डौल कोठून येईल ?

वृत्तानुरोधेंकरून हा मंत्र असा वाचला पाहिजे:—

श्रियँसे कं भानुभिः सं मिमिक्षिरे
ते रश्मिभिस्ते ऋक्वभिः सुखादयः ।
ते वाशीमन्तः इ॑ष्मिणो अभीरवो
विद्रे प्रियस्य मॅारुतस्य धामनः ॥

## सूक्तम् ८८.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । मरुतो देवता । आद्यान्ते प्रस्तारपङ्क्ती । आद्यौ पादौ जागतौ तृतीयचतुर्थौ गायत्रौ यस्याः सा प्रस्तारपङ्क्तिः । पञ्चमी विराड्रूपा । आदितस्त्रयः पादा एकादशका अन्त्योष्टकः सा विराड्रूपा । शिष्टास्त्रिष्टुभः ॥

**आ विद्युन्मद्भिर्मरुतः स्वर्कै रथेभिर्यात ऋष्टिमद्भिरश्वपर्णैः ।**
**आ वर्षिष्ठया न इषा वयो न पप्तता सुमायाः ॥ १ ॥**

आ । विद्युन्मत्ऽभिः । मरुतः । सुऽअर्कैः । रथेभिः । यात । ऋष्टिमत्ऽभिः । अश्वऽपर्णैः ।
आ । वर्षिष्ठया । नः । इषा । वयः । न । पप्तत । सुऽमायाः ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

१. हे मरुतः, [ यूयं ] विद्युन्मद्भिः (=विद्युद्युक्तैः ) स्वर्कैः (=शोभनदीप्तिमद्भिः) ऋष्टिमद्भिः (=आयुधविशेषवद्भिः) अश्वपर्णैः (=अश्वरूपपक्षयुक्तैः ) रथेभिः (=युष्माकं रथैः) आ यात (=आगच्छत ) । हे सुमायाः (=सुप्रज्ञायुक्ता ) [ मरुतः ], [ यूयं ] वर्षिष्ठया इषा (=अतिशयेन प्रवृद्धया अन्नसंपदा ) [ सह ] वयो न (=पक्षिण इव ) नः आ पप्तत (=अस्मान् प्रति पतत=तादृशीमन्नसंपदं गृहीत्वा उत्पतन्तः सन्तोस्मान्प्रत्यागच्छत ) ॥

विद्युन्मत्सु तेजस्विषु अश्वरूपपक्षयुक्तेषु रथेषु आस्थाय युष्माकम् ऋष्टिनामकैरायुधैः सह यूयमागच्छत आगच्छन्तश्च सर्वोत्तमम् अन्नम् अस्मभ्यम् आनयत । पक्षवच्छीघ्राश्वयुक्ता युष्मद्रथा युष्मान् गृहीत्वा शीघ्रमेव नः समीपे पतिष्यन्तीति भावः ॥

## सूक्त ८८.

ऋषि–रहूगणाचा पुत्र **गोतम**. देवता–**मरुत्**. वृत्त–१ली आणि ६वी या ऋचांचें **प्रस्तारपंक्ति**; ५वीचें **विराड्रूप** वृत्त; उरलेल्या ऋचांचें **त्रिष्टुभ्**. प्रस्तारपंक्तीचें लक्षण असें कीं, पहिला आणि दुसरा हे चरण **जगती**वृत्ताचे असावे आणि तिसरा आणि चवथा हे **गायत्री**वृत्ताचे असावे. पहिले तीन पाद एकादशाक्षरी आणि चवथा अष्टाक्षरी असला म्हणजे **विराड्रूप** होतें.

## HYMN 88.

To the *Maruts*. By *Gotama* son of *Rahûgaṇa*. Metre—*Trishṭubh*, except as regards Verses 1 and 6, of which it is *Prastâra-Pankti*, the 5th is a *Virâḍrûpa*. The *Prastâra-Pankti* consists of four lines, the first and third of which belong to the *Jagatî*, and the second and the fourth to the *Gâyatri*, metre. The *Virâḍrûpa* consists of the first three Pâdas of eleven syllables each and the fourth of eight syllables.

१. हे मरुतांनो, तुम्ही आपल्या विद्युत्पूर्ण, तेजःपुंज, भाल्यांनीं भरलेल्या आणि अश्वपक्ष रथांच्या योगेंकरून या. हे सुप्रज्ञ मरुतांनो, तुम्ही अत्युत्तम अन्नसंपत्तीसह पक्ष्यांप्रमाणें आम्हांजवळ उडून या.

1. Come ye, Maruts, with [your] chariots full of lightnings, full of splendors, full of spears, [and] having horses for [their] wings. Fly unto us, O wise [Gods], like birds, bringing the mightiest food [for us].

१ हेंहि सूक्त मरुतांविषयींच आहे. या पहिल्या ऋचेंत गोतम ऋषि मरुतांला म्हणतो; 'हे मरुतांनो, तुम्ही विजांनीं चमकणाऱ्या आणि तेजःपुंज अशा तुमच्या रथांत बसून या, आणि येतांनां आपले भाले हातांत घ्या. तुमच्या रथांस पक्षांप्रमाणें उडणारे घोडे जोडलेले असतात. त्यांत बसून तुम्ही पक्ष्यांप्रमाणें उडून आम्हांजवळ या आणि येतांनां उत्तम अन्नसंपत्ति आम्हांकरितां घेऊन या.'

'विद्युत्पूर्ण'=' विद्युन्मद्भिः'. हें विशेषण जरी या ठिकाणीं मरुतांच्या रथांस लाविलें आहे तरी वस्तुतः विजा हातांत घेऊन येणारे असें तें मरुतांचेंच वस्तुतः विशेषण आहे. मरुत् आले म्हणजे बरोबर विजा घेऊन येतात असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. उदाहरणार्थ ऋ. ५. ५२. ६ हा मंत्र आणि

तेऽरुणेभिर्वरमा पिशङ्गैः शुभे कं यान्ति रथतूर्भिरश्वैः ।
रुक्मो न चित्रः स्वधितीवान्पव्या रथस्य जङ्घनन्त भूम ॥ २ ॥

ते । अरुणेभिः । वरम् । आ । पिशङ्गैः । शुभे । कम् । यान्ति । रथतूःऽभिः । अश्वैः ।
रुक्मः । न । चित्रः । स्वधितिऽवान् । पव्या । रथस्य । जङ्घनन्त । भूम ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. ते [मरुतः] अरुणेभिः (=आरक्तवर्णैः) वरम् आ (अभिमत्याभिमुख्येन=अथवा यथाकामं) पिशङ्गैः (=पिङ्गलवर्णैः) रथतूर्भिः (=रथान् वेगेन वहद्भिर्) अश्वैः शुभे कं यान्ति (=शोभायै खलु गच्छन्ति=गच्छन्ति गच्छन्तश्च शोभन्ते) । स्वधितिवान् (=वज्रसदृशायुधविशेषेण युक्तो) [मरुद्गणः] रुक्मो न चित्रः (=सुवर्णमिव अतिशयेन दर्शनीयो) [भवति] । [ते मरुतः] रथस्य पव्या (=रथस्य चक्रेण=रथचक्रनेमिसदृशेन स्वायुधेन) भूम जङ्घनन्त (=पृथिवीम् अत्यर्थं घ्नन्ति) ॥

"स्तोतृरक्षणार्थमागतानां तेषां मरुतां भारमसहमाना भूमिरतिपीडिता बभूवेत्यर्थः" इति सायणः ॥

वरम् आ इत्यत्र अथवा यथाकाममिति सम्यग् मोक्षमूलरप्रभृतयः पाश्चात्याः ॥

---

त्याजवरील सायणभाष्य पहा.

'तेजःपुंज'='स्वर्कैः.' हें सुद्धा विशेषण वरच्याप्रमाणेंच आहे; म्हणजे व्याकरणदृष्ट्या पाहातां जरी रथांचें विशेषण आहे तरीहि वस्तुतः तेजःपुंज असे जे मरुत् त्यांनीं आपल्या रथांत बसून यावें असें तात्पर्य आहे. मरुतांला तेजःपुंज, तेजस्वी इत्यादि अर्थाचीं प्रभादर्शक विशेषणें लाविलेलीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलीं आहेत त्यांतून कितीएक सू. ८७, मं. १ याजवरील टीपेंत आम्ही दिलीं आहेत तीं पहा.

'भाल्यांनीं भरलेल्या'='ऋष्टिमद्भिः.' हें विशेषण सुद्धा व्याकरणानें पाहिलें असतां रथांस लाविलें आहे तरी वस्तुतः मरुतांचेंच आहे. मरुत् आपल्या खांद्यांवर लकलकीत भाले घेऊन येतात अशीं पुष्कळ ठिकाणें सांगितलेलीं पूर्वीं आलींच आहेत. सू. ३७, मं. २ इत्यादि पहा.

'अश्वपक्ष'='अश्वपर्णैः.' म्हणजे घोडे हेच आहेत पंख ज्यांनां. मरुत् आपल्या रथांत बसून पक्ष्यांप्रमाणें उडत येणार त्यापेक्षां त्या रथांच्या घोड्यांस पंख असें

२. ते आरक्त अथवा मनास येईल तर पिवळ्या रथवाहक घोड्यांच्या योगेंकरून येतात आणि शोभतात. गदाधारी [ मरुद्गण ] सोन्याप्रमाणें लकलकतो. [ मरुत् हे ] रथाच्या चक्रानें भूमीला फोडून टाकितात.

2. They go beautifully on ruddy, or if they choose, on tawny horses that hasten the chariots. [The troop of Maruts] armed with swords is brilliant like gold. [The Maruts] break the earth with the felly of a chariot.

---

म्हटलें तें योग्यच आहे. मरुत् पक्ष्यांप्रमाणें उडत येतात याविषयीं सू. ८५, मं. ६ आणि टीप पहा.

या मंत्राचें वृत्त प्रस्तारपंक्ति असें वर सांगितलें आहे. म्हणजे पहिला आणि दुसरा हे चरण जगतीवृत्ताचे ( म्ह० द्वादशाक्षरी ) आणि तिसरा आणि चवथा हे गायत्रीछंदाचे ( म्हणजे अष्टाक्षरी). परंतु याप्रमाणें श्लोकवृत्ताला बसवण्यास हा मंत्र फारच खडबडीत आहे; खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटल्याशिवाय निर्वाह नाहीं असें आम्हांस वाटतें:—

आ विद्युन्मद्भिर्मरुतः स्वर्कै रथे-
भिर्यात ऋष्टिमद्भिरश्वपर्णैः ।
आ वर्षिष्ठया नेषा व-
यो न पप्तत सुमायाः ॥

यांतून तिसरा आणि चवथा हे चरण गायत्रीवृत्तांत आहेत असें सांगितलें आहे म्हणूनच असे म्हणावयाचे आहेत. परंतु खरोखर वृत्त कसें आहे याविषयीं संशय आहे. ऋचा अतिशय खडबडीत आहे इतकें मात्र निःसंशय आहे. परंतु याच सूक्ताच्या शेवटील मंत्रावरील टीप पहा.

---

२. मरुत् जाऊं लागले म्हणजे कसे जातात आणि कसे दिसतात तें या मंत्रांत सांगितलें आहे. ‘ ते जाऊं लागले म्हणजे सोन्याच्या कांतीप्रमाणें शोभतात. ते आरक्त म्हणजे किंचित् तांबूस रंगाच्या घोड्यांला अथवा मनास येईल तर पिवळ्या वर्णाच्या घोड्यांला रथांस जोडून जात असतात. ते घोडे फार चपळ असतात आणि रथ मोठ्या वेगानें ओढून घेऊन जातात. मरुत् जातांना रथचक्रानें पृथिवीला फोडून टाकितात.’

‘अथवा मनास येईल तर’=‘वरम् आ.’ ‘वरम् आ’ हे शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं आले आहेत. त्यांचा अर्थ सायणाचार्य निरनिराळ्या मंत्रांत निरनिराळा करितात. प्रस्तुत मंत्रांत आम्हीं केलेला अर्थ अन्वयास अवश्य असून सर्व मंत्र पाहून केला आहे.

‘ रथाच्या चक्रानें ’=‘ रथस्य पव्या.’ म्हणजे ज्या रथांत बसून ते जातात त्याच्या चाकाचा भार जमिनीवर पडून जमीन दुभागते असा सायणाचार्यांचा भा

श्रिये कं वो अधि तनूषु वाशीर्मेधा वना न कृणवन्त ऊर्ध्वा ।
युष्मभ्यं कं मरुतः सुजातास्तुविद्युम्नासो धनयन्ते अद्रिम् ॥ ३ ॥

श्रिये । कम् । वः । अधि । तनूषु । वाशीः । मेधा । वना । न । कृणवन्ते । ऊर्ध्वा ।
युष्मभ्यम् । कम् । मरुतः । सुऽजाताः । तुविऽद्युम्नासः । धनयन्ते । अद्रिम् ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. [हे मरुतः], वः (=युष्माकम्) अधि तनूषु (=शरीरेषु=अंसेषु) वाशीः (=वाश्यः=आराख्यान्यायुधानि) श्रिये कं (=शोभायै खलु) [वर्तन्ते], [ता] ऊर्ध्वा मेधा वना न (=ऊर्ध्वानि मेध्यानि वनानीव=उच्छ्रिता मेधसंबन्धिनो यूपा इव) कृणवन्ते (=कृण्वते=क्रियन्ते=अंसेषु ध्रियन्ते)। हे सुजाता मरुतः (=शोभनजननयुक्ता मरुतः), तुविद्युम्नासः (=तुविद्युम्नाः=प्रभूतधना उपासका) युष्मभ्यं कं (=युष्मदर्थमेव) अद्रिं धनयन्ते (=अद्रिसदृशं महान्तं ग्रावाणं धनं कुर्वन्ति=ग्रावभिः सोमम् अभिषुण्वन्ति) ॥

"मेधा वना न कृणवन्ते ऊर्ध्वा" इति वादग्रस्तं सायणा एवं विवृण्वन्ति। "मरुतो वना न। उच्छ्रितान् वृक्षसमूहानिव मेधा मेधान् यज्ञानूर्ध्वा ऊर्ध्वान् एकाहाहीनसत्ररूपेणोच्छ्रितान् कृणवन्ते। यजमानैः कारयन्ति" इति।

मोक्षमूलरस्तु मेधाः इति सविसर्गं पदं गृहीत्वा मरुतो वृक्षान् यथा ऊर्ध्वान् उद्बुद्धान् कुर्वन्ति तथा अस्माकं मेधाः बुद्धीः उद्बुद्धाः कुर्वन्त्विति भाष्यमिच्छति ॥

मेधापदं मेध्या इति आद्युदात्तमेध्यपदार्थकं सहनीयमर्थलाभायेति वयम् ॥

---

वार्थ आहे. पण 'पवि' अथवा 'रथस्य पविः' किंवा 'रथानां पविः' हें वज्रासारिख्या एका शस्त्राचें नांव आहे असें वेदांतील मंत्रांवरून दिसून येतें. अग्नीच्या शस्त्राला 'पवि' असें म्हटलें आहे. तसेंच इंद्राच्या वज्राला पवि असें नांव दिलें आहे. ऋ. १. १६६. १० आणि १. १६८. ८ यांत मरुतांच्या आयुधांला 'पवि' असें म्हटलें आहे. ऋ. ५. ५२. ९ आणि सायणभाष्य पहा. ऋ. १. १८०. १; ६. ८. ५; १०. २७. ६ आणि १०. १८०. २ हे मंत्र आणि सायणभाष्य पहा.

श्लोकीकरणः—

ते अरुणेभिर्वरमा पिशङ्गैः
शुभे कं यान्ति रथतूर्भिरश्वैः।

३. [ हे मरुतांनो, ] सौंदर्यासाठीं तुमच्या खांद्यावर कुठारी [ आहेत ]. त्या यज्ञांतील यूपदंडांप्रमाणें उभ्या धारण केलेल्या असतात. हे कुलीन मरुतांनो, महावैभवी [ उपासक ] तुम्हांसाठींच ग्राव्यानें सोम काढीत असतात.

3. For beauty, [ O Maruts, ] [ there are ] axes on your bodies [ They ] are held upright like sacrificial posts. For you, O well-born Maruts, affluent worshippers despoil the pressing-stone [ of the Soma ].

---

रुक्मो न चित्रः सुअधीतिईवान्
पव्या रथस्य जङ्घनन्त भूम ॥
यांत तिसऱ्या चरणांत स्वधितिवान् शब्द ' सुअधीतिईवान् ' असा उच्चारला पाहिजे. इतर भेद विशेष नाहीं.

---

३. ऋषि म्हणतो:—' मरुतांच्या खांद्यावर कुठारी असतात त्या सुंदर दिसतात. त्या कुठारी मरुत् आपल्या खांद्यावर उभ्या धरितात त्या यज्ञांतील यूप म्हणून जे दंड असतात त्यांसारिख्या दिसतात. वैभववन्त उपासक जन मोठमोठे ग्रावे लावून जे सोम काढितात ते मरुतांसाठींच काढितात.' ही मरुतांची प्रशंसा आहे, वस्तुतः मरुतांशिवाय दुसऱ्या देवांसाठीं उपासक जन सोम काढून अर्पण करीत नाहींत असें ऋषीच्या मनांत निश्चित नाहीं.

' सौंदर्यासाठीं तुमच्या खांद्यावर कुठारी आहेत '=' श्रिये कं वो अधि तनूषु वाशीः '. म्हणजे तुमच्या खांद्यावर कुठारी आहेत आणि त्या फार शोभतात.

' कुलीन '=' सुजाताः '. म्हणजे मोठ्या कुळांत जन्मलेल्याप्रमाणें दयाळु, उदार, विनययुक्त, सौजन्यपूर्ण असे. ' सुजात ' हें विशेषण ऋग्वेदांत अग्नीस ( ऋ. १. १९२. १५ इ० ), अश्वी देवांस ( ऋ. १. ११८. १० इ० ), मित्रावरुणांस ( ऋ. ८. २५. २ इ० ) आणि उषेला ( ऋ. १.१२३.३इ० यांत) लाविलेलें आढळतें.

श्लोकवृत्ताला हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें बसतोः—

श्रिये कं वो अधि तनूषु वाशीः
मेधा वना न कृणवन्त ऊर्ध्वा ।
युष्मभिअं कं मरुतः सुजाताः
तुविद्युम्नासो धनयन्त अद्रिम् ॥

अहानि गृध्राः पर्या व आगुरिमां धियं वार्कार्यां च देवीम् ।
ब्रह्म कृण्वन्तो गोतमासो अर्कैरूर्ध्वं नुनुद्र उत्सधिं पिबध्यै ॥४॥

अहानि । गृध्राः । परि । आ । वः । आ । अगुः । इमाम् । धियम् । वार्कार्याम् । च । देवीम् ।
ब्रह्म । कृण्वन्तः । गोतमासः । अर्कैः । ऊर्ध्वम् । नुनुद्रे । उत्सऽधिम् । पिबध्यै ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे मरुतः], गृध्राः (=वृष्टिमाकाङ्क्षमाणा ) [ गोतमा ] अहानि (=विश्वान्यहानि=दिने दिने ) वः परि आ आ अगुः (=युष्मान् आभिमुख्येन परितो जगुः=परिगीतवन्तः) [ अद्य दिने ] इमां धियं (=इमां प्रार्थनां ) देवीं वार्कार्यां च (=दिव्याम् उदकदात्रीं स्तुतिं च ) [ अगुः=जगुः] । ब्रह्म कृण्वन्तः (=युष्मदर्थं कर्म कुर्वन्तो ) गोतमासः (=गोतमाः) पिबध्यै (=उदकं पातुम् ) अर्कैः (=स्तोत्रैः) उत्सधिम् ऊर्ध्वं नुनुद्रे (=कूपम् उन्नतं यथा तथा प्रेरितवन्तः=स्तोत्रैर्मेघोदकम् अवर्षयन् ) ॥

अस्या आद्यौ पादौ सायणेनैवं व्याख्यातौ । तृषितैर्गोतमैः स्तुता मरुतस्तेभ्यो गोतमेभ्यो देशान्तरे वर्तमानं कूपमुत्खायानीय ददुः । एतद्दृष्ट्वा कश्चिदृषिर्ब्रूते । हे गोतमा गृध्रा जलाभिकाङ्क्षायुक्तान्वो युष्मानहानि शोभनोदकोपेतानि दिनानि पर्यागुः । पर्यागतानि । परित आभिमुख्येन प्राप्तानि । प्राप्य च वार्कार्यां वार्भिरुदकैर्निष्पाद्यां धियं ज्योतिष्टोमादिलक्षणं कर्म च देवीं द्योतमानमकुर्वन्निति ॥

४. [ हे मरुतांनो ], [ उदकाविषयीं] उत्सुक गोतम प्रतिदिनीं तुम्हांविषयीं गात असतात; [आणि त्यांनीं] [आज] ही प्रार्थना आणि हें दिव्य पर्जन्यस्तोत्र गाइलें आहे. स्तोत्र करणारे गोतम पाणी पिण्यासाठीं स्तोत्रांच्या योगेंकरून कूपाला वर उडवितात.

4. On [ all ] days have the thirsty [ Gotamas ], [ O Maruts ], sung about you [ and ] have [ this day ] sung this prayer and [this] divine water-giving hymn. The Gotamas, performing the rite, have with [ their ] songs sent up the spring for to drink.

---

४. उदकाविषयीं अतिशय उत्सुक असे जे आम्ही गोतमकुळांत जन्मलेले उपासक त्यांनीं प्रतिदिवसीं स्तोत्रें गाइलीं आहेत. आणि त्याप्रमाणेंच आजहि त्यांणीं हें स्तोत्र आणि ही उदक प्रार्थणारी स्तुति केली आहे. आम्ही गोतम स्तोत्रांच्या योगानें मेघरूप कूपाचें पाणी आपोआप वर उडे असें करीत असतों. तर त्याप्रमाणें आजहि या स्तोत्राच्या योगानें आम्हांला उदकाचा लाभ होओ.'

मरुतांविषयींचीं सूक्तें बहुतकरून दुर्बोध असतात. प्रत्येक मंत्रांत कांहींनाकांहीं तरी काठिन्य असतेंच. आणि या नियमाला अनुसरून हाहि मंत्र कठिण आहे. यांत 'अहानि' म्हणजे 'विश्वानि अहानि' याऐवजीं 'प्रतिदिनीं' या अर्थी असें समजणें हें निरुपायामुळेंच स्वीकारिलें पाहिजे. शिवाय 'गृध्राः परि आ व आ अगुः' याच्या अर्थाविषयीं संशय आहे. द्वितीय अर्धाच्या अर्थाविषयीं अडचण नाहीं, पण पहिला अर्ध आणि विशेषेंकरून पहिला चरण कठिण आहे तथापि सर्व मंत्राच्या भावार्थाविषयीं संशय नाहीं.

'कूपाला वर उडवितात'=' ऊर्ध्वं नुनुद्रे उत्सधिम्.' सू. ८५, मं. १०, ११ पहा.

वृत्तासाठीं हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजेः—

अहानि गृध्राः परि आ व आगुः
इमां धियं वार्कारिआं च देवीम् ।
ब्रह्म कृण्वन्तो गोतमासो अर्कैः
ऊर्ध्वं नुनुद्रे उत्सधिं पिबध्यै ॥

एतत्त्यन्न योजनमचेति सस्वर्ह यन्मरुतो गोतमो वः ।
पश्यन्हिरण्यचक्रानयोदंष्ट्रान्विधावतो वराहून् ॥ ॥ ५ ॥

एतत् । त्यत् । न । योजनम् । अचेति । सस्वः । ह । यत् । मरुतः । गोतमः । वः ।
पश्यन् । हिरण्यऽचक्रान् । अयःऽदंष्ट्रान् । विऽधावतः । वराहून् ॥५॥

## भाषायाम्.

५. हे मरुतः, त्यत् न योजनं ( =तत् न योजनं=तद् अयोजनं=तद् अयुजं=तद् अद्वितीयं ) [ स्तोत्रम् ] एतत् अचेति ( =एतद् प्राज्ञायि=एतद् भवति ) यत् ह (=यत् खलु ) वः (=युष्मदर्थं), हिरण्यचक्रान्(=हिरण्यचक्रयुक्तान्=सुवर्णमयकवचान् ) अयोदंष्ट्रान् (=लोहमयदंष्ट्रायुक्तान् ) विधावतः (=विविधं धावतः=इतस्ततः प्रवर्तमानान् ) वराहून् (=वराहान्=वराहसदृशान् ) [ युष्मान् ] पश्यन्, गोतमः सस्वः (=उच्चारितवान् ) ॥

न योजनमित्यसुबोधं पदं सायणा एवं व्याचक्षिरे । एतद्योजनं युज्यतेनेन देवतेति योजनमेतत्सूक्तसाध्यं स्तोत्रम् । त्यन्न त्यत्प्रसिद्धमन्यदुत्कृष्टं स्तोत्रमिवाचेतीति ॥

न योजनमिति नासत्यवत् नचिरमितिवद्वा अयुजमित्यर्थ इति वयम् । नेन सह योजनस्यासमस्तत्वं तु सहनीयम् ॥ यद्वा नशब्दः संप्रत्यर्थे । योजनं स्तोत्रम् गोतमः संप्रति यत्स्तोत्रमुच्चारितवांस्तदेतद्भवतीति योज्यम् ॥

५. हे मरुतांनो, तुम्हांप्रीत्यर्थ गोतमानें जें अप्रतिम [ स्तोत्र ] गाइलें तें हें [ होय ]. स्तोत्र रचतां रचतां त्याला सुवर्णचक्रयुक्त, लोहमय दाढांचे [ आणि ] इकडे तिकडे धांवणारे वराह [ जे तुम्ही ते ] दृष्टीस पडलां.

5. This [ is ] that unequalled [ hymn ] which, O Maruts, Gotama has sung for you, seeing [as he sung] [ you ] who, having golden wheels and iron jaws, run hither and thither [ like ] wild boars.

५. ऋषि म्हणतो:—' हे मरुतांनो, तुम्हांसाठीं गोतमानें सर्वोत्कृष्ट जें स्तोत्र म्हटलें आहे तें हेंच होय; म्हणजे मी गोतमानें तुम्हांसाठीं जें स्तोत्र अद्वितीय असें समजून रचिलें तें हेंच होय. हें स्तोत्र रचतां रचतां मला तुम्ही वराहांप्रमाणें धांवत धांवत दृष्टीस पडलां.' हा मंत्र सूक्ताच्या उपसंहाराजवळ आहे यास्तव हे तुम्ही मरुत् हो, हें माझें स्तोत्र अर्पण करून घ्या अशा अर्थानें बोलतो आहे. तुम्हाप्रीत्यर्थ मी गोतमानें हें स्तोत्र गायिलें आहे असें तात्पर्य.

' अप्रतिम '=' न योजनं.' हे शब्द कठिण आहेत. परंतु आम्हीं केलेल्या अर्थाशिवाय दुसरा निर्वाह दिसत नाहीं. वेदांत ' नासत्य ' या शब्दांत जसा 'न' शब्द आला आहे तसाच ' न योजनं ' यांतहि 'न' हें अक्षर अकारार्थक समजलें पाहिजे. अर्वाचीन संस्कृतांत तर 'नग' (न + ग), 'नचिरं' ( न + चिरं ), 'नच्युतं' (न + च्युतं), 'नपुंसकं' (न + पूंसकं), 'नभ्राज्' (न + भ्राज्, न प्रकाशणारा मेघ ), ' नातिदूर' (न + अतिदूर ) इत्यादिक अनेक समास सांपडतात. ऋग्वेदांत सुद्धा ' नवेदाः' हा शब्द 'न' आणि ' वेदाः' यापासून झाला आहे असें सायणाचार्य सू. ७९, मं. १ इत्यादि स्थळीं सांगतात. मात्र ' न योजनं ' यांचा समास ' नयोजनं ' असा न होतां 'न' ' योजनं ' अशीं व्यस्त पदें आहेत इतकी अडचण दिसते, ती निरुपायामुळें सहन केली पाहिजे. ' अयुज ', याचा जसा 'अप्रतिम' (अद्वितीय) असा अर्थ होतो ( ऋ. ८. ६२. २ ) तसा ' न योजनं ' याचा घेतला पाहिजे. अथवा 'न' शब्दाचा ' संप्रति ' म्हणजे ' आतां ' असा अर्थ घेऊन ( पुढच्या मंत्रावरील सायणभाष्य पहा ) ' योजनम् ' म्हणजे स्तोत्र असा अर्थ करावा आणि 'न' याचा संबंध ' सस्वः' याजकडेस घ्यावा.

' सुवर्णचक्रयुक्त '=' हिरण्यचक्रान्.' आम्हीं अक्षरशः भाषांतर केलें आहे, परंतु या विशेषणाचें प्रयोजन काय आहे तें नीट समजत नाहीं. ' हिरण्यचक्र ' हें विशेषण मरुतांच्या रथांस शोभलें असतें परंतु मरुतांस लाविलें आहे याव-

**एषा स्या वो मरुतोऽनुभर्त्री प्रति ष्टोभति वाघतो न वाणी ।**
**अस्तोभयद्वृथासामनु स्वधां गभस्त्योः ॥ ६ ॥ १४ ॥**

एषा । स्या । वः । मरुतः । अनुऽभर्त्री । प्रति । स्तोभति । वाघतः । न । वाणी ।
अस्तोभयत् । वृथा । आसाम् । अनु । स्वधाम् । गभस्त्योः ॥६॥१४॥

## भाषायाम्.

६. अत्र सायणाः । हे मरुतः स्या सैषास्मदीया स्तुतिर्वो युष्माकमनुभर्त्री युष्माननुहरन्ती युष्मद्गुणसदृशी प्रति ष्टोभति । प्रत्येकं स्तौति । स्तोभतिः स्तुतिकर्मा । तथा वाघतो न वाणी । नशब्दः संप्रत्यर्थे । तदुक्तं यास्केन । अस्त्युपमार्थस्य संप्रत्यर्थे प्रयोगः । नि० ७. ३१. । इति । इदानीमृत्विक्संबन्धिनी वागपि वृथानायासेन आसाम् आभिर्ऋग्भिरस्तोभयत् । अस्तौत् । इदानीमित्युक्ते कदेत्याह । गभस्त्योरस्मदीययोर्बाह्वोः स्वधाम् । अन्न नामैतत् । यदा बहुविधमन्नं मरुतः स्थापयन्ति तामनुलक्ष्येत्यर्थः । इति ॥

दुर्बोधतमैषा महतायासेनापि न बुध्यते । स्थितस्य गतिचिन्तनमिति न्यायेन सायणा अपि कथं कथमपि व्याचक्षत इति द्रष्टव्यम् ॥

रून चक्राकार गळ्यांत घालावयाचे हार किंवा त्यासारिखाच कवच इत्यादि आंगावर घालावयाचा किंवा घ्यावयाचा कांहीं तरी पदार्थ असावा असें दिसतें.

'लोहमय दाढांचे'='अयोदंष्ट्रान्.' दाढा म्हणजे येथें सुळे समजले पाहिजेत आणि मरुतांस वराह असें म्हटलें आहे त्यामुळें हें विशेषण येथें नीट जुळतें.

'वराह'='वराहून्.' म्हणजे सूकर, रानडुकर. मरुतांस डुकर असें म्हणण्याचें कारण असें दिसतें कीं ते डुकराप्रमाणें मुसंडी मारून भरधांव पळतात आणि ज्याच्या आंगावर जातात त्याचा डुकराप्रमाणें चुराडा करून टाकितात.

ऋ. १०. ६७. ७ यांतहि मरुतांला वराह असें म्हटलें आहे. ऋ. ९. ९७. ७ यांत सोम या देवाला 'वराह' असें म्हटलें आहे. ऋ. १०. ९९. ६ आणि ७. ७७. १० यांत मेघाला वराह म्हटलें आहे. त्याचें कारण मेघ (म्हणजे ढग) वराहांप्रमाणें काळे रंगाचे आणि पाण्यांत लोळणारे असे दिसतात.

या मंत्राचें वृत्त विराड्रूप आहे. खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटला पाहिजेः—

एतत्त्यिअन्न यॊजनम् अचेति
सस्वर्ह यन्मरुतॊ गोतमो वः ।
पश्यन्हिरण्यचक्रॉनियॉदंष्ट्रान्
विधावतो वराहऊन् ॥

## पौष ता. १ पासून ता. ३० नोवेंबरपर्यंत.

| | रु.आ. |
|---|---|
| रा. बा. रंगराव भिमाजी डे. क. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, अनंदराव भास्करजी डे. क. ... ... ... | १२-१२ |
| ,, ,, यशवंतराव मोरेश्वर केळकर. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, व्यंकटराव संतापा दप्तरदार. ... ... ... | ६- ६ |
| रा. सा. माधवराव वासुदेव बर्वे कारभारी. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, वामन गणेश परांजपे डे. ए. इ. ... ... ... | १२-१२ |
| ,, ,, श्रीनिवास बाळाजी मामलेदार. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, विनायक आपाजी खारकर स. ब. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, मोरो चिंतामण जोशी हेड अकौं. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, विष्णु बाळकृष्ण सोहनी डे. ए. इ. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, अण्णाजी व्यंकटराव स. अ. कान्सरवेटर आफ फारेष्ट... | ६- ६ |
| ,, ,, साबाजीराव चिंतामण चिटणीस. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, आबाजी विष्णु पुराणिक सब्रा. ज. ... ... ... | ६- ६ |
| रा. रा. कृष्णराव सुपरि० कमिशनर हपीस. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, नारायण बाबजी जोशी लोकलफंड इंजिनीयर.... ... | १२-१२ |
| ,, ,, रामजी सतुजी आवटी मुंबई. ... ... ... | ६- ० |
| सी. ऐफ. श्वार्झ साहेब मिशनरी ला० चेस० ... ... ... | ६- ६ |
| रा. रा. डा. सखाराम अर्जुन मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, बाबाजी लक्ष्मण वेलणकर मुंबई. ... ... ... | ६- ० |
| हिज् हायनेसराव आफ् कच्छ. ... ... ... | १५९- ६ |
| रा. रा. रामचंद्र गोविंद ओक अ. इ. ... ... ... | ६- ० |
| धी. इन्स्पेक्टर जनरल सेंट्रल प्राव्हिन्सिस नागपूर. ... ... | ३१-१४ |
| प्रोफेसर पी. पीटर्सन साहेब मुंबई. ... ... ... | ६- ० |
| रा. रा. महेंद्रनाथ भट्टाचार्य हुजुर डे. कलेक्टर. ... ... | ६- ६ |
| रेवरेंड डा. के. एम. बानर्जी. ... ... ... | ६- ६ |
| रा. रा. यल्लापा बाळाजी कंट्राक्टर मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, कृष्णनाथ गोपीनाथजी मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, सीतारामजी गोपीनाथ मुंबई. ... ... ... | ३- ० |
| ,, ,, वामनराव महादेव लेले. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, विनायक बापूजी भांडारकर. ... ... ... | ६- ६ |
| ए. जे. केर साहेब मुंबई. ... ... ... | ६- ६ |

Registered No. 98 of 1877.

| | रु. आ. |
|---|---|
| रा. रा. खंडुभाई गुलाबभाई अ० ई. ... ... ... | १२-१२ |
| ,, ,, गंगाधर रामकृष्ण किराणे अ० ई. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, डा. मोरेश्वर जनार्दन मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, भाऊ बाळाजी कांसार मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, आशना सायबु कंट्राक्टर मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, राजू बाळाजी कंट्राक्टर मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, कृष्णाजी लक्ष्मण दातार हेडमास्तर. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, बाबू नोबीचंद्रराय उर्फ नैरचंद्रराय पेमास्तर. ... ... | ६- ६ |
| ,, ,, चुनीलाल माणीकलाल मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, वासुदेवराव बाळकृष्ण लोटलीकर मा. ... ... | ६- ६ |
| सर. रिचर्ड मीड साहेब रेसिडेंट. ... ... ... | १२-१२ |
| जमशेटजी हारमसजी पाठक. ... ... ... | ५- ० |
| रा. रा. कृष्णाजी लक्ष्मण दातार हेडमास्तर. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, विष्णु घनश्याम वकील मुंबई. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, केशव बापूजी बाळ हेडमास्तर. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, कृष्णाजी बापूजी न्यायाधीश. ... ... ... | १२-१२ |
| कारभारी साहेब संस्थान कोलापूर. ... ... ... | ९५-१० |
| कारभारी साहेब संस्थान इचलकंजी. ... ... ... | ४४-१० |
| कारभारी साहेब संस्थान कागल. ... ... ... | ३८- ४ |
| कारभारी साहेब संस्थान विशाळगड. ... ... ... | १९- २ |
| कारभारी साहेब संस्थान बावडा. ... ... ... | १९- २ |
| डी. डब्ल्यु. सीलर साहेब. ... ... ... | ६- ६ |
| डा. ए. बरनेल साहेब. ... ... ... | १२-१२ |

---

**विशेष सूचना.**—आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षाची बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी.

तिकीटें पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्ताळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

---

THE

# VEDÂRTHAYATNA

OR

## AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

---

# वेदार्थयत्न.

---

## ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक ७. डिसेंबर सन १८७७. मासिक भाग २१.
Vol 2 Dec 1877 No 21

मुंबई:
"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.
(हें सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें नोंदलें आहे.)

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

६. तर हे मरुतांनो, ही आमची तुम्हांयोग्य अशी स्तुति तुम्हांतें प्रत्येकीं स्तवीत आहे, आणि तुम्ही आमच्या हातांत अन्न घातलें आहे तेव्हां ऋत्विजाची वाणीहि सांप्रत तुम्हांला प्रत्येकीं अनायासेंकरून या ऋचांच्या योगानें स्तवीत आहे.

6. This [ our prayer ], therefore, O Maruts, which is worthy of you is glorifying each [ of you ]; [ and ] [ as you have placed ] food in [ our ] hands, the speech of the poet has now with ease praised [ you ] with these [ hymns ].

---

६. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. आणि हो आम्हीं गोतमांनीं स्तुति केली आहे ती तुम्ही मरुतांनीं मान्य करून घ्यावी इतकें सांगण्याचा कवीचा उद्देश दिसतो. पण सगळा अर्थ खात्री होण्यासारिखा समजत नाहीं, आणि ऋचा एकंदरींत अति दुर्बोध आहे. यास्तव आम्हीं सायणभाष्याचेंच भाषांतर केलें आहे. सायण तरी या ऋचेच्या अर्थाविषयीं कसेंहि करून निर्वाह करितात असें त्यांच्या भाष्यावरून दिसतें. ऋग्वेदांत मरुतांविषयीं म्हणून जितकीं सूक्तें आहेत तितकीं बहुतकरून सर्व कठिण आहेत. त्यांतील प्रत्येक ऋचेंत कांहींनाकांहीं तरी दुर्बोध असतेंच. कितीएक ऋचांचा तर खरा भावार्थ सुद्धा कळत नाहीं असें म्हटल्यास चालेल. आणि त्यांतीलच ही सांप्रतची ऋचा आहे. पण कितीएक ऋचांचा तूर्त अर्थ समजत नाहीं इतक्यामुळेंच निराशेस कारण नाहीं.

या ऋचेचा खरा अर्थ काय आहे तो शोधून काढण्याकरितां कितीएक आधुनिक विद्वानांनीं वेगवेगळ्या युक्ति लढविल्या आहेत परंतु त्यांचे प्रयत्न सायणापेक्षां अधिक फलद्रूप झाले आहेत असें आम्हांस वाटत नाहीं.

या मंत्राचें वृत्त प्रस्तारपंक्ति आहे. आणि मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजे:—

एषा सिआ वो मरुतोनुभर्त्री
प्रतिष्टोभति वॅाघतो न वाअणी ।
अस्तोभयद्वृथा ऑसाम्
अनुस्वधां गभस्तिओः ॥

प्रस्तारपंक्तीचें जें लक्षण सांगितलें आहे ( या सूक्ताच्या पहिल्या ऋचेवरील सायणाचा उपोद्घात पहा ) त्याला अनुसरण्यासाठीं मात्र हा मंत्र वर लिहिल्याप्रमाणें म्हणावा; परंतु वस्तुतः पहिले दोन पाद जगती वृत्ताचे न समजतां त्रिष्टुभ् वृत्ताचे समजले तर मंत्र चांगला वाचतां येतो. तो असा:—

एषा सिआ वो मरुतोनुभर्त्री

## सूक्तम् ८९.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । विश्वे देवा देवता । आदितः पञ्चर्चः सप्तमी च जगत्यः । षष्ठी स्वस्ति न इन्द्रेत्येषा विराट्स्थाना । यस्या आद्यौ पादौ नवकौ स्तस्तृतीयो वैराजश्चतुर्थस्त्रैष्टुभो भवति सा विराट्स्थाना । अष्टम्याद्यास्तिस्त्रस्त्रिष्टुभः ॥

**आ नो भद्राः क्रतवो यन्तु विश्वतोऽदब्धासो अपरीतास उद्भिदः । देवा नो यथा सदमिद्वृधे असन्नप्रायुवो रक्षितारो दिवेदिवे ॥१॥**

आ । नः । भद्राः । क्रतवः । यन्तु । विश्वतः । अदब्धासः । अपरिऽइ-तासः । उत्ऽभिदः ।

देवाः । नः । यथा । सदम् । इत् । वृधे । असन् । अप्रऽआयुवः । रक्षितारः । दिवेऽदिवे ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. भद्राः क्रतवः ( =कल्याणाः प्रज्ञा ) नः ( =अस्मान् ) विश्वतः ( =सर्वस्मादपि दिग्भागात् ) आ यन्तु ( =आगच्छन्तु ) यथा ( =येन ) अदब्धासः ( अदब्धाः=अ-हिंसिता ) अपरीतासः ( =अपरीताः=शत्रुभिरपरिवेष्टिताः=अपराजिता ) उद्भिदः ( =शत्रूणाम् उच्छेत्तारः=शत्रुघातिनो ) देवाः (=विश्वे देवाः ) सदम् इत् ( =सदैव ) नो वृधे ( =अस्माकं वृद्धये=अस्माकं वर्धयितारः ) असन् ( =भवेयुः ), दिवेदिवे ( =प्रतिदिनम् ) [ अस्माकम् ] अप्रायुवो रक्षितारः ( =संरक्षणीयम् अत्यजन्तः संर-क्षितारश् ) [ च ] [ असन्=भवेयुः ] ॥

प्रति ष्टॉभंति वॉघतो न वाणी ।
अस्तोभयद्वृथा ऑसाम्
अनुस्वधां गभस्तिओः ।

याच सूक्ताचा पहिला मंत्रहि प्रस्तार-पंक्ति या वृत्तांतच आहे; तोहि पहिले दोन चरण त्रिष्टुभाचे आहेत असें समजून म्हणतां येतो, मात्र दुसऱ्या चरणांत दोन अक्षरें ('यात') आणि चवथ्या चरणांत एक अक्षर ('न') इतकीं अधिक आहेत तीं क्षणभर नाहींतच असें समजून चाललें पाहिजे. तीं आम्हीं न दाखवितां वृत्ताचें स्वरूप खालीं लिहिलें आहे;—

आ विद्युॅन्मद्भिर्मरुतः सुअर्कैः
रथेभिर्ऋष्टिमॅद्भिरश्वपर्णैः ।
आ वर्षिष्ठया न इषा
वयः पप्तत सुमॉयाः ॥

या मंत्रांतून ' यात ' हा दुसऱ्या पादांतील शब्द आणि 'न' हा चवथ्या पादांतील शब्द असे दोन जे आम्हीं गाळले ते अर्थसंदर्भालाहि अप्रयोजक आहेत. आतां वृत्ताला नकोच आहेत आणि अर्थाला अवश्य नाहींत असे जे शब्द असतात ते बहुतकरून मूळचे नसून मागाहून घातलेले असतात. त्यावरून हे दोनी शब्द कदाचित् मागाहून कोणी तरी घातले असतील अशी कल्पना करणें हें जरी वैदिकदृष्ट्या पाप होईल तरीहि अर्थेच्छूंच्या मतानें सयुक्तिक

## सूक्त ८९.

ऋषि–गोतम (पूर्वसूक्ताचा जो तोच). देवता–विश्वेदेव (म्हणजे सकळ देवांचा समूह). वृत्त–१-५ आणि ७ ह्या ऋचांचें जगती. ६वी विराट्स्थाना, आणि ८-१० या ऋचांचें त्रिष्टुभ्. विराट्स्थाना म्हणून जें वृत्त सांगितलें त्याचें लक्षण असें आहे कीं, पहिला आणि दुसरा हे चरण नऊ नऊ अक्षरांचे; तिसरा चरण विराट् वृत्ताचा, म्हणजे द्विपदा-विराट् म्हणून जें सू. ६५, मं. १ याजवर सांगितलें आहे त्या वृत्ताचा, आणि चवथा चरण त्रिष्टुभ् वृत्ताचा. येणेंप्रमाणें हें विराट्स्थान वृत्त मिश्रित आहे.

१. कल्याणकारक बुद्धि आम्हांला चोहोंकडून प्राप्त होओत; कीं जेणेंकरून अप्रतारणीय, अपराजित, [आणि] विजयी [असे जे] देव [ते] सदैव आमची वृद्धि करणारे होतील [आणि] नित्य [आमचे] अचल रक्षिते [होतील].

## HYMN 89.

To *Vis've Devâs.* (i. e. All the Gods taken collectively). By *Gotama* (author of the previous hymn). Metre—verses 1–5 and 7 are *Jagatîs,* verse 6 is *Virâṭsthânâ* (i. e. a metre of which the first two lines consist of nine syllables each, the third of ten, and the fourth of eleven syllables and makes a pâda of *Trishṭubh*), and verses 8–10 are of the *Trishṭubh* Metre. The third pâda of verse 6 is said to be *vairaja* i. e. belonging to the *Virâṭ Dvipadâ* metre, regarding the nature of which see Hymn 65, and our notes *ad loc.* The *Virâṭsthânâ* is thus a mixed metre.

1. May excellent wisdom come unto us from every side, so that the undeceivable, the unconquered [and] the victorious Gods may ever advance our happiness [and] [become our] firm champions from day to day.

---

आहे यांत संशय नाहीं. पहिल्या चरणांतील 'आ' याचा संबंध चवथ्या चरणांतील 'पप्तत' या क्रियापदाशीं घ्यावा; आणि मरुतांला पक्षी ('वयः') असें वेदांत (ऋ. १. १०३. ७ यांत) म्हटलेंच आहे त्यापेक्षां चवथ्या चरणांतील

'न' शब्द नसला तरी कांहीच अडचण होणार नाहीं. कदाचित् ऋग्वेदाचें सांप्रत अनुपलब्ध असें एकादें अतिपुरातन शाखान्तर हातास येईल तर आमचा तर्क खरा ठरण्यास एक साधन होईल.

मरुतांविषयीं यापुढें या प्रथम अष्टकांत आतां स्वतंत्र सूक्तें यावयाचीं नाहींत. (या मंडलाचें १६५ वें, १६६ वें, १६७, १६८, १७१ आणि १७२ हीं सूक्तें मरुतांविषयीं येतील). यास्तव मरुतांचें किंचित् दुर्बोध दर्शन आम्हांस आतां कितीएक महिनेपर्यंत होणार नाहीं. परंतु त्यांचें वेदांत सांगितलेलें स्वरूप कसें आहे तें झालेल्या सूक्तांवरून आपण पाहिलेंच आहे. त्यावरून आपले जे आर्य पूर्वज त्यांचे देव पाषाणमय अथवा धातुमय अथवा शुष्ककाष्ठमय, अथवा वृक्षमय मूर्तींचे नव्हते, आणि त्यांचा पूजा करण्याचा प्रकार बोधशून्य जुने मंत्र म्हणून गंधाक्षता अर्पणें इत्यादिक नव्हता; आणि ज्यांमध्यें शूद्रांनीं प्रवेश करूं नये व नमस्कार करणें झाला तर पूजारी लोकांस दक्षिणा देऊन त्यांच्या तोंडानें आणि त्यांच्या द्वारेंच केला पाहिजे अशीं देवालयेंहि नव्हतीं; इतकें तरी सिद्ध होतें.

१. हें सूक्त विश्वेदेवांविषयीं आहे. 'विश्वेदेव' म्हणजे सकळ देव. कितीएक सूक्तें कोणत्या तरी एकट्याच देवाविषयीं असतात. कितीएक दोन दोन (मित्रावरुण, इंद्राग्नी ऋ. १. १०८; अग्नीषोम ऋ. १. ९३ इत्यादि) देवांविषयीं आहेत. कितीएक दोहोंपेक्षां अधिक देवांविषयीं असतात आणि कितीएक तर समस्त देवांविषयीं आहेत. हीं समस्त देवांविषयींचीं सूक्तें ऋग्वेदांत बरींच आहेत (ऋ. १. १४, ८९, ९०, १०५, १०६, १०७, १२१, १२२; २. २९, ३१; ३. ५४; ४. ५५; ५. ४१, ४२, ४३, ४४, ४५, ४७, ४८, ४९, ५०, ५१; ६. ४९, ५०, ५१, ५२; ७. ३५, ३६, ३७, ३९, ४०, ४२, ४३; ८. २७, २८, २९, ३०, ५८, ८३; १०. ३१, ३२, ३५, ३६, ६४, ६५, ६६, ९२, ९३, १००, १०१, १०९, ११४, १२६, १२८, १३७, १४१, १५७, १८१ याप्रमाणें ५८ सूक्तें स्वतंत्र विश्वेदेवांविषयीं आहेत. शिवाय पुष्कळ सूक्तांतून मधून मधून मंत्र विश्वेदेवांविषयीं आले आहेत ते निराळेच). विश्वेदेव म्हणजे जरी सगळे देव असा साधारण अर्थ बहुतकरून सर्व मंत्रांत होतो तरी कितीएक ठिकाणीं विश्वेदेव म्हणजे कितीएक देवविशेषांचा वर्ग असा अर्थ होतो. प्रस्तुत मंत्रांत विश्वेदेव म्हणजे सगळे देव असा अर्थ आहे.— या मंत्रांतील भावार्थ असा आहे कीं, 'आम्हांला भाविक बुद्धि जिकडून तिकडून येओ कीं जेणेंकरून आम्ही देवांची उपासना करूं आणि मग ते आम्हांवर

प्रसन्न होतील आणि आमचे संरक्षक होतील आणि सदैव आमचें प्रतिपाळण करितील.'

'कल्याणकारक बुद्धि' =' भद्राः क्रतवः.' सायणाचार्य उत्तम फल प्राप्त करून देणारे यज्ञ असा अर्थ करितात. परंतु चोहोंकडून आम्हांस यज्ञ प्राप्त होओत असा अर्थ चांगला जुळत नाहीं.

'अप्रतारणीय' =' अदब्धासः.' म्हणजे ज्यांना कोणीहि ठकवूं शकत नाहीं ते. हें विशेषण वेदांत पुष्कळ ठिकाणीं देवांस लाविलें आहे. मनुष्यें कपट करितील तर तेणेंकरून मानवी प्राणी कदाचित् फसतील परंतु देव फसले जाणार नाहींत; कारण कीं त्यांस मनुष्याच्या मनांतलें समजतें. यास्तव ते 'अप्रतारणीय' होत.

'अचल रक्षिते' =' अप्रायुवो रक्षितारः.' म्हणजे आपल्या भक्तांजवळ जणूं उभे राहून त्यांचें संरक्षण करणारे, त्यांना सोडून न जाणारे.

हें सर्व सूक्त मोठ्या महत्त्वाचें आणि आधुनिक याज्ञिक कर्मांत मोठ्या प्रसिद्धीचें आहे. 'वर्धापन' अथवा वाढदिवस म्हणून जें प्रतिवर्षी जन्मतिथीच्या दिवसीं कर्म करितात त्यांत 'विश्वेदेवां' च्या नांवानें 'चरुहोम' करून हें सूक्त म्हणून आहुति देतात. या सूक्तांत देव आमचें कल्याण करोत, अनिष्ट न करोत, सर्व देव मिळून आम्हांस सन्मार्ग दाखवोत, इत्यादि अर्थाचेच मंत्र आहेत त्यामुळें हें 'वर्धापन' विधींत म्हणण्याची चाल पडली आहे यांत संशय नाहीं. शिवाय 'शान्तिपाठ' म्हणून जीं कितीएक सूक्तें म्हणतात त्यांत या सूक्ताचा समावेश करितात. जेथें 'शान्ति' करावयाची असते तेथें 'शान्तिपाठ' म्हणतात. उदाहरणार्थ स्त्रियांला प्रथम यौवनदशादर्शन अनिष्ट नक्षत्रावर वगैरे होईल तर त्याविषयीं 'शान्ति' करावी असा एक अतिनिंद्य प्रचार पडला आहे त्यांत 'शान्ति' सूक्तें ब्राह्मणांनीं म्हणावयाचीं त्यांत या सगळ्या सूक्ताचा पाठ म्हणतात. तो तरी या सूक्तांत कल्याण होओ अशा अर्थाचे पुष्कळ शब्द आणि प्रयोग असल्यामुळेंच म्हणतात. आणखी मार्गशीर्ष पौर्णिमेच्या दिवसीं 'प्रत्यवरोहण' म्हणून एक कर्म करावें असें गृह्यसूत्रांत आणि प्रयोगग्रंथांत सांगितलें आहे (हें प्रत्यवरोहण कोणीहि बहुतकरून आतां करीत नाहींत) त्यांत कितीएक 'स्वस्त्ययन' सूक्तें, म्हणजे अनिष्टनिवारणार्थ म्हणावयाचीं सूक्तें जपीत असतात त्यांत हें सूक्त म्हणत असतात. 'प्रत्यवरोहण' हें कर्म करण्याचा उद्देश पाण्यांतील आणि भूमीवरील सर्पांपासून बाधा होणार नाहीं असें अभय मिळावें आणि हेमंत ऋतूनें कृपा करावी ("जलस्थलचरसर्पबाधानिवृत्त्यभयहेमन्तसौमनस्य०" नारायणभट्टी प्रयोगरत्नाकर) इतका आहे. आणि 'दुष्टजननशान्ति', म्हणजे सृष्टिनियमांप्रमाणें कोणत्या तरी दिवसीं

**देवानां भद्रा सुमतिर्ऋजूयतां देवानां रातिरभि नो नि वर्तताम् ।**
**देवानां सख्यमुप सेदिमा वयं देवा न आयुः प्र तिरन्तु जीवसे॥२**

देवानाम् । भद्रा । सुऽमतिः । ऋजुऽयताम् । देवानाम् । रातिः ।
अभि । नः । नि । वर्तताम् ।
देवानाम् । सख्यम् । उप । सेदिम । वयम् । देवाः । नः । आयुः ।
प्र । तिरन्तु । जीवसे ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. ऋजूयताम् ( =ऋजु सम्यगाचरतां ) देवानां ( =देवानामेव ) भद्रा सुमतिः ( =कल्याणा सुष्टुमतिः ) [ तथा ] देवानां ( =देवानामेव ) रातिः ( =दानशक्तिः ) अभि नो नि वर्तताम् ( =अस्मान् आभिमुख्येन नितराम् आगच्छतु ) । देवानां (=देवानामेव ) सख्यं ( =मित्रत्वं ) वयम् उप सेदिम (=प्राप्नुयाम ) । देवाः ( =देवा एव ) नः आयुः ( =अस्माकमायुर्मर्यादां ) जीवसे ( =जीवितुं=जीवनाय ) प्र तिरन्तु ( =प्रकर्षेण वर्धयन्तु ) ॥

वयं यथा चिरं जीवेम तथास्माकमायुर्देवा एव वर्धयन्त्विति भावः ॥

---

कोणत्या तरी घटकेला मुलाचें जन्म व्हावयाचेंच पण त्यांतून अमुक दिवसीं होऊं नये, अमुक घटकेला होऊं नये इत्यादि ज्या समजुती आलीकडील आपल्या उपाध्यांनीं करून दिल्या आहेत तशा समयीं जन्म झालें तर तन्निमित्त 'शान्ति' करविण्यांत येते त्यांतहि हें सूक्त म्हणत असतात. त्याप्रमाणेंच ' व्यतीपात ' म्हणून जो अनिष्ट योग येतो म्हणून जोशी म्हणतात त्याच्या शान्त्यर्थ कर्म करावयाचें म्हणून उपाध्ये सांगून करवितात त्यांतहि या सूक्ताचा पाठ म्हणतात. त्याप्रमाणेंच कितीएक गोष्टी ' ज्येष्ठा ' नक्षत्रावर होऊं नयेत, होतील तर हानि होईल असें समजून ' शान्ति ' करवितात त्यांतहि ह्या सूक्ताचा पाठ करवितात. आणि ' रात्रीसूक्त ' म्हणून म्हणण्याचा प्रचार आहे त्यांतहि हें सूक्त म्हणत असतात.

हे जे वर याज्ञिक विनियोग सांगितले त्यांशीं या सूक्ताचा संबंध जुळावा या उद्देशानें सूक्तकर्त्या ऋषीनें हें सूक्त केलेलें नाहीं म्हणून सांगावयास नकोच. प्रसंगाला अनुसरून कांहीं शब्दांच्या उच्चाराचा अथवा अर्थाचा संबंध जुळतो असें वाटलें म्हणजे पाहिजे तें सूक्त घेऊन त्याचा पाहिजे तो विनियोग कल्पून त्याचा पाठ, जप, किंवा ध्यान करण्याची चाल आपल्या लोकांत पडली आहे.

२. सच्छील देवांचीच कल्याणकारक कृपा [आणि] देवांचीच उदारबुद्धि आम्हांकडेस वळून येओ. देवांचीच मैत्री आम्हांला प्राप्त होओ. देवच आम्ही चिरकाळ जगावें म्हणून आमचें आयुष्य वाढवोत.

2. Of the righteous Gods may the blissful benevolence, of the Gods may the liberality come upon us. Of the Gods may we obtain the friendship. May the Gods prolong our life that we may live.

---

२. 'देवांचीच कल्याणकारी कृपा आणि देवांचीच उदारबुद्धि आम्हांला प्राप्त होओ, मनुष्याची नको; देवांचीच मैत्रकी आम्हांला प्राप्त होओ, मनुष्यांची नको; देवच आमचें आयुष्य दीर्घ करोत,' असा ऋषीचा भावार्थ.

'देवांचीच.' यांत जो 'च' घातला आहे तो 'देवानाम्' हें पद पादारंभीं घातलें आहे त्यापासून गम्यमान आहे. त्यारहि पादांत 'देव' हें पद आरंभीं आहे, तें अन्यव्यावृत्तीसाठीं घातलें आहे. देवांच्या कृपेविषयीं आम्ही अभिलाषी आहोंत, मनुष्य कांहीं पाहिजे तें करोत असा कवीचा भावार्थ आहे.

हा मंत्र श्लोकवृत्ताला सहज वसतोः—

देवानां भद्रा सुमतिर्ऋजूयतां
देवानां रातिः अभि नो नि वर्तताम् ।
देवानां सख्यम् उप सेदिमा वयं
देवा न आयुः प्र तिरन्तु जीवसे ॥

तान्पूर्वया निविदा हूमहे वयं भगं मित्रमदितिं दक्षमस्त्रिधम् ।
अर्यमणं वरुणं सोममश्विना सरस्वती नः सुभगा मयस्करत् ॥३॥

तान् । पूर्वया । निऽविदा । हूमहे । वयम् । भगम् । मित्रम् । अदितिम् । दक्षम् । अस्त्रिधम् ।
अर्यमणम् । वरुणम् । सोमम् । अश्विना । सरस्वती । नः । सुऽभगा । मयः । करत् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. तान् ( =पूर्वोक्तान् विश्वान् देवान् ) वयं पूर्वया निविदा ( =पुरातनया वाचा ) हूमहे ( =आह्वयामः ), भगम् ( =एतन्नामकम् आदित्यं ) मित्रम् ( =अहरभिमानिनं देवम् ) अदितिम् ( =अखण्डनीयाम् एतन्नामकां देवमातरम् ) अस्त्रिधं दक्षम् ( =अहिंसकं दक्षम् एतन्नामकं देवम् ) अर्यमणम् ( =एतन्नामकं देवं ) वरुणं ( =रात्र्यभिमानिनं देवं ) सोमं ( =सोमाभिमानिनं देवम् ) अश्विना ( =अश्विनौ ) [ इत्येतान् हूमहे ] । सुभगा ( =शोभनधनोपेता ) सरस्वती ( =एतन्नामका काचिद्देवी ) [ च ] नः ( =अस्मभ्यं ) मयः करत् ( =सुखं करोतु ) ॥

भगादीन् विश्वान् देवान्वयं पुरातनम् ऋषिवचनशासनमनुसृत्य आह्वयामः । अतः कारणात्ते नः सुखं प्रापयन्त्विति भावः ॥

३. त्यांजला पुरातन शास्त्राप्रमाणें आम्ही बोलावितों–[म्हणजे] भगाला, मित्राला, अदितीला, उपकारी दक्षाला, अर्यमा याला, वरुणाला, सोमाला, [आणि] अश्वींला. धनसंपन्न सरस्वती आम्हांला सुख प्राप्त करो.

3. Them we invoke according to ancient precept, invoke Bhaga, Mitra, Aditi [and] beneficent Daksha, [and] Aryamâ, Varuṇa, Soma, [and] the As'vins. May fortunate Sarasvatî confer happiness upon us.

---

३. 'वरच्या मंत्रांत जे सकळ देव सांगितले, म्हणजे भग, मित्र इत्यादिक देव, त्यांचा आम्ही पुरातन रीतीला अनुसरून धांवा करीत आहोंत, तर ते सकळजण आमचें कल्याण करोत,' असें तात्पर्य.

'भग.' या देवाविषयीं सू. १४, मं. ३ आणि सू. ४४, मं. ८ आणि त्यांजवरील टीप पहा. 'भग' या देवाविषयीं ऋग्वेदांत स्वतंत्र सूक्तें नाहींत. परंतु मधून मधून पुष्कळ मंत्र त्याजविषयों आले आहेत. त्याचें नांव दुसऱ्या देवांबरोबर येत असतें.

'मित्र.' सू. ३६, मं. ४; सू. ४१, मं. १; सू. ४०, मं. ५ आणि त्यांजवरील टीप पहा.

'अदिति.' सू. ७२, मं. ९ आणि त्याजवरील टीप पहावी.

'उपकारी दक्षाला'=' दक्षम् अस्रिधम्.' सायणाचार्य 'अस्रिध्' शब्दाचा येथें मरुद्गण असा अर्थ करितात. पण 'अस्रिध्' शब्द जेथें जेथें आला आहे तीं सर्व स्थळें पाहतां तें कधींहि मरुतांचें विशेषण सुद्धा नाहीं, मग नांव तर नाहींच. बहुतेक ठिकाणीं निरनिराळ्या देवांचें विशेषण असून निरुपद्रव अथवा उपद्रव न करणारा अशा अर्थीं योजिलेलें आढळतें. दक्ष हा आदित्य या नांवाच्या देवांतून एक देव आहे. त्याविषयों वेदांत विशेष कांहीं सांगितलेलें नाहीं. च्यार पांच स्थळीं थोडासा उल्लेख आलेला आहे. दक्ष हा अदितीचा बाप होय असें ऋ. १०. ७२. ५ आणि १०. ५. ७ यांत सांगितलें आहे. ऋ. १०. ७२. ४ यांत दक्ष हा अदितीचा बाप आणि अदिति दक्षाची आई होय असें सांगितलें आहे. परंतु जेथें जेथें दक्षाविषयीं उल्लेख आला आहे तेथें तेथें सायणाचार्य 'दक्षप्रजापति' असा दक्षशब्दाचा अर्थ करितात. वेदोत्तरकालीन जे पुराणादिक ग्रंथ त्यांत दक्षप्रजापतीविषयीं पुष्कळ कथा सांगितल्या आहेत तें सर्वांस ठाऊकच आहे. प्रस्तुत मंत्रावरील भाष्यांत तरी सायणाचार्य 'सकल जगताचा उत्पन्नकर्ता' असा अर्थ करितात.

तन्नो वातो॑ मयो॒भु वा॑तु भेष॒जं तन्मा॒ता पृ॑थि॒वी तत्पि॒ता द्यौः ।
तद्ग्रावा॑णः सोमसुतो॑ मयो॒भुव॒स्तद॑श्विना शृणुतं धिष्ण्या युवम् ॥४

तत् । नः । वातः॑ । मयः॒ऽभु । वातु । भेष॒जम् । तत् । मा॒ता । पृ॒थि॒वी । तत् । पि॒ता । द्यौः ।
तत् । ग्रावा॑णः । सोम॒ऽसु॒तः॑ । मयः॒ऽभुवः॑ । तत् । अ॒श्वि॒ना । शृ॒णु॒तम् । धि॒ष्ण्या॒ । यु॒वम् ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. यद् [ भेषजं ] मयोभु (=सुखकारि) तद् भेषजम् (=औषधं) वातः (=वायुः) नः (=अस्मभ्यं) वातु (=यानेन प्रापयतु) तद् [ भेषजं ] माता पृथिवी, तद् [ भेषजं ] द्यौष्पिता (=द्युलोकरूपः पिता) तद् [ भेषजं ] सोमसुताः (=सोममभिषुण्वन्तो) मयोभुवः (=सुखकारिणो) ग्रावाणः (=एतन्नामकाः पाषाणा) [ नः प्रापयन्तु ], [ अपि च ] हे धिष्ण्या (=धिष्ण्यौ=स्तुत्यौ) अश्विना (=अश्विनौ), युवं (=युवां) तद् [ भेषजं ] शृणुतं (=प्रतिशृणुतम्=अस्माकं स्तोत्रं श्रुत्वा अस्मान् प्रापयतम्) ॥

तदिति तस्मादर्थ इति केचित् ॥ धिष्ण्यशब्दो दानशीलार्थक इति भट्टभास्मानः । स्तुत्यर्हार्थ इति यत् सायणस्तदेव साधीय इति वयम् ॥

'अर्यमा.' सू. २६, मं. ४; सू. ३६, मं. ४ इत्यादि मंत्रांवरील टीपांत या पुरातन देवाच्या स्वरूपाविषयीं आम्हीं सांगितलें आहे.

'वरुण.' सू. २४, मं. ११ इत्यादि मंत्रांवरील आमच्या टीपा पहा.

'सोम.' म्हणजे या ठिकाणीं सोमरसरूपी जो देव तो ध्यावयाचा आहे.

'अश्वी.' अश्वी देवांविषयीं सू. ३४ इत्यादि ठिकाणें पहा.

'सरस्वती.' सू. १३, मं. ९ आणि सू. ३, मं. १०, १२ यांजवरील टीपा पहा. सरस्वतीविषयीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं उच्चार आला आहे.—'सरस्वती आम्हांला सुख प्राप्त करो,' असें म्हटलें आहे यावरून सुख प्राप्त करून

४. [जें] कल्याणकारक औषध तें वायु आम्हांप्रत वाहून आणो, तें माता पृथिवी [आणि] तें पिता द्यु, तें सोम गाळणारे कल्याणकारी ग्रावे [ आम्हांला प्राप्त करून देओत]. [ आणि ] तें औषध हे स्तुत्य अश्वी [ देव ] हो, तुम्ही [ आमची ] प्रार्थना ऐकून घेऊन [आम्हांस] प्राप्त करून द्या.

4. May the Wind blow unto us that medicament [which is] healing, may mother Earth and father Heaven [and] the healing Soma-pressing stones grant unto us that medicament; and hear us, O praiseworthy As'vins, into granting us that same medicament.

देणें हें एका सरस्वतीचेंच काम आहे, इतर देवांचें नाहीं असें नाहीं; तर भग इत्यादि आणि सरस्वती या देवतांस आम्ही बोलावीत आहों त्या सर्व मिळून आम्हांस सुख प्राप्त करून देओत असा गोतम ऋषीचा भावार्थ आहे.

या मंत्रांत जे देव सांगितले त्यांतून 'भग,' 'अदिति,' 'दक्ष,' 'अर्यमा,' या देवांविषयीं स्वतंत्र सूक्तें ऋग्वेदांत नाहींत, दुसऱ्या देवांबरोबर त्यांविषयीं उद्गार येतो; तो केव्हां केव्हां पुष्कळच ठिकाणीं येत असतो. पण त्यांतून एकाविषयींहि सगळें कोणतेंहि सूक्त रचिलेलें आढळत नाहीं. 'मित्र' देवाविषयीं 'मित्रावरुण' या नावानें, म्हणजे मित्र आणि वरुण या दोघांविषयीं सूक्तें पुष्कळ आहेत. एकट्या मित्राविषयीं म्हटलें म्हणजे ऋ. ३. ५९ हें एकच सूक्त आहे. वरुणाविषयीं स्वतंत्र सूक्तें पुष्कळ आहेत (ऋ. १. २५; २. २८; ५. ८५; ७. ८६, ८९; ८. ४१ हीं सूक्तें पहा). सरस्वतीविषयीं वेगळें आणि स्वतंत्र असें सूक्त ७. ९५ हें आहे. सोम देवाविषयीं तर ऋग्वेदाचें सगळें नववें मंडलच आहे. त्याप्रमाणें दुसरींहि सूक्तें आणि सूक्तभाग आहेत. अश्वींविषयींहि पुष्कळ सूक्तें आहेत.

या मंत्राचा शेवटचा चरण तर अगदी आधुनिक श्लोकाप्रमाणें म्हणता येतो. मात्र पहिल्या तीन चरणांत थोडासा दीर्घह्रस्वांचा फेरफार करावा लागतो.

४. पूर्वीच्या ऋचेंत जे देव सांगितले त्यांशिवाय या मंत्रांत आणखी कितीएक देवांचीं नांवें घेऊन ऋषि म्हणतो, 'वायु, पृथिवी, द्यू, ग्रावे आणि अश्वी देव हे आम्हांला आरोग्यकारक औषधाचा लाभ करून देओत.'

'माता.' पृथिवीला माता असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे, आणि

तमीशा॑नं॒ जग॑तस्त॒स्थुष॒स्पतिं॑ धियंजि॒न्वमव॑से हूमहे व॒यम् ।
पू॒षा नो॒ यथा॒ वेद॑सा॒मस॑द्वृ॒धे र॑क्षि॒ता पा॒युरद॑ब्धः स्व॒स्तये॑॥५॥१५

तम् । ईशा॑नम् । जग॑तः । त॒स्थुषः॑ । पति॑म् । धि॒यम्ऽजि॒न्वम् । अव॑से ।
हू॒म॒हे । व॒यम् ।
पू॒षा । नः॒ । यथा॑ । वेद॑साम् । अस॑त् । वृ॒धे । र॒क्षि॒ता । पा॒युः । अ-
द॑ब्धः । स्व॒स्तये॑ ॥ ५ ॥ १५ ॥

## भाषायाम्.

५. वयं तं ( =प्रसिद्धं ) जगत ईशानं ( =जङ्गमस्य वस्तुमात्रस्येशं ) तस्थुषः पतिं ( =स्थावरस्य वस्तुमात्रस्य प्रभुं ) धियंजिन्वं ( =कर्मणां प्रीणयितारं=कर्मभिरानन्दितम् ) [ एतादृशं पूषणम् ] अवसे (=अस्मद्रक्षणाय ) हूमहे (=आह्वयामः ), यथा ( =येन प्रकारेण ) पूषा नो वेदसाम् ( =अस्माकं धनानां ) वृधे असत् ( =वृद्धये भवेत्=अस्माकं समृद्धीनां संवर्धको भवेत् ) [ यथा च ] स्वस्तये (=अस्मदविनाशाय ) [ अस्माकं ] रक्षिता अदब्धः पायुः ( =अहिंसितः पालकश् ) [ च ] [ भवेत् ] ॥

द्यूला पिता असें तर पुष्कळच मंत्रांत म्हटलें आहे. सू. ७१, मं. ५ आणि त्याजवरील आमची टीप पहा. खालीं पृथिवी आणि वर द्यू या दोघांच्या मध्यभागीं वस्तुमात्राची उत्पत्ति होते म्हणून त्यांस मातापितरें म्हणण्याचा प्रचार पडला.

'ग्रावे.' सू. २८, मं. १; सू. ८३, मं. ६; सू. ८४, मं. ३ आणि टीपा पहा. ज्या ज्या पदार्थांवर मनुष्यांची प्रीति वसते त्यांस देवाप्रमाणें समजणें हें स्वाभाविक आहे.

'स्तुत्य'=' धिष्ण्या.' ' धिष्ण्य ' शब्द वेदांत बहुतकरून अश्वींचें विशेषण असतें, आणि सायणाचार्य बहुतकरून स्तुत्य असा अर्थ करितात. तोच आम्हीं येथें घेतला आहे. कितीएक विद्वान् दानशाली असा अर्थ करितात, पण तो निराधार असें आम्हांस वाटतें.

या मंत्राचे पहिले दोन पाद खडबडीत आहेत, तिसरा आणि चवथा हे बरेच सरळ म्हणतां येतातः—

तन्नो वॉतो मयोभु वातु भेषजं
तन्मातआ पृथिवीं तत्पिता दिऔः ।
तद्ग्रावॉणः सोमसुतो मयोभुवः
तदश्विना शृणुतं धिष्णिआ युवम् ॥

५. जंगमाचा प्रभु [आणि] स्थावराचा पति [आणि] सत्कर्मापासून आनंद पावणारा [जो] पूषा त्याला रक्षणासाठीं आम्ही बोलावितों; कीं जेणेंकरून तो आमच्या संपत्तींचा वर्धक होईल [आणि] [आमच्या] कल्याणार्थ [आमचा] संरक्षक [आणि] अप्रतिहत पालक [होईल].

5. [Pûshâ]—that lord of whatever moves [and] master of whatever stands [and that] lover of prayers, we invoke for protection; that Pûshâ may advance our prosperity [and] [may become], for [our] good, [our] protector [and our] irresistible champion.

५. पूर्वींच्या दोनहि मंत्रांत आलेला नाहीं अशा पूषा या देवाचा धांवा या मंत्रांत केला आहे. 'पूषा देवानें येऊन आमचें रक्षण करावें, आमचा नाश होऊं देऊं नये आणि आमचें कल्याण करावें म्हणून पूषा देवाचा धांवा आम्ही करीत आहों.'—पूषा देव कोण आहे याविषयीं सू. २३, मं. ८ आणि ४२ वें सूक्त हीं पहा. पूषा देवाविषयीं ऋग्वेदांत १. १३८; ६. ५३, ५४, ५५, ५६, ५८ आणि १०. २६ हीं सूक्तें स्वतंत्र आहेत; शिवाय मधून मधून त्याजविषयीं पुष्कळ सूक्तभाग आणि मंत्र आले आहेत.

'जंगमाचा प्रभु आणि स्थावराचा पति.' म्हणजे स्थावरजंगमात्मक जें विश्व त्याचा प्रभु इतकेंच विवक्षित आहे.

वृत्तसुखार्थ 'स्वस्तये' याच्या ठिकाणीं 'सुअस्तये' असें म्हटलें पाहिजे. सर्व मंत्र एकंदरीनें पहातां श्लोकवृत्ताला बसावयास बराच अवघड आहे.

पहिल्या मंत्रावरील टीपेंत जे विनियोग या सगळ्या सूक्ताचे सांगितले त्यांत हा मंत्र येतोच, शिवाय ग्रहयज्ञांत आणि अन्त्येष्टींत (प्रथम दिवसीं पिण्डदानीं) या पांचव्या मंत्राचा उच्चार करीत असतात.

**स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ।**
**स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥ ६ ॥**

स्वस्ति । नः । इन्द्रः । वृद्धऽश्रवाः । स्वस्ति । नः । पूषा । विश्वऽवेदाः ।
स्वस्ति । नः । तार्क्ष्यः । अरिष्टऽनेमिः । स्वस्ति । नः । बृहस्पतिः ।
दधातु ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. वृद्धश्रवाः (=प्रवृद्धस्तोत्रः=प्रवृद्धस्तोत्रार्हत्व) इन्द्रो नः स्वस्ति (=अस्माकमविनाशं) [ दधातु=करोतु ], विश्ववेदाः (=विश्वधनयुक्तः) पूषा नः स्वस्ति [ दधातु ], अरिष्टनेमिः (=अहिंसितायुधस्) तार्क्ष्यः (=एतन्नामकः कश्चिद्देवो) नः स्वस्ति [ दधातु ], बृहस्पतिः (=एतन्नामको देवो) नः स्वस्ति दधातु (=विदधातु=करोतु) ॥

६. आमचें कल्याण महावैभवी इंद्र [ करो ], आमचें कल्याण सकलधनसंपन्न पूषा [ करो ], आमचें कल्याण अखंडितशस्त्र तार्क्ष्य [ करो ], आमचें कल्याण बृहस्पति करो.

6. [May] Indra of great glory [ do ] good unto us, [ may ] Pûshâ possessed of all riches [ do ] good unto us, [ may ] Târkshya of unbroken weapon [ do ] good unto us, may Brihaspati do good unto us.

६. यांत कितीएक दुसऱ्या देवांविषयीं उच्चार करून त्यांचा धांवा केला आहे. ते देव इंद्र, तार्क्ष्य, आणि बृहस्पति हे होत. पूषा या देवाचें नांव वरच्या मंत्रांत आलेंच आहे. ‘ इंद्र, पूषा, तार्क्ष्य आणि बृहस्पति या देवांचा आम्ही धांवा करीत आहों, तर ते आमचें कल्याण करोत ’ असा ऋषीचा भावार्थ.

‘ तार्क्ष्य.’ या देवाविषयीं येथपर्यंत उच्चार आलेला नाहीं. यास्तव तो आम्हांला नवा आहे. पण त्याविषयीं सांगण्यासारिखें वेदावरून विशेष कांहीं समजत नाहीं. तार्क्ष्य या देवाविषयीं दहाव्या मंडलांतील ( १७८ वें हें ) एकच सूक्त आहे. त्याशिवाय आणि प्रस्तुत मंत्राशिवाय दुसऱ्या ठिकाणीं ऋग्वेदांत उच्चार अथवा उल्लेख आलेला आढळत नाहीं. त्या सूक्ताचे तीनच मंत्र आहेत. त्यांजवरून आणि त्यांजविषयींच्या सायणभाष्यावरून इतकें समजतें कीं तार्क्ष्य हा बलवान् आणि रणशूर होय; त्याला देवांनीं सोम आणण्याकरितां पाठविलें; तो मोठ्या वेगानें जाणारा होय, आणि त्याच्या गतीला कोणीहि प्रतिबंध करूं शकत नाहीं; आणि तो इंद्राप्रमाणें मनुष्यांला पुष्कळ धन देणारा होय. प्रस्तुत मंत्रावरील भाष्यांत सायणाचार्य तार्क्ष्याला ‘ गरुत्मान् ’ ( अथवा ज्याला आपण अर्वाचीन काळीं गरुड असें म्हणतों तो ) असें नांव देतात. तार्क्ष्याचें आणि गरुडाचें एकीकरण पुराणादिक आधुनिक पुस्तकांत तर झालेंच आहे.

‘ अखंडितशस्त्र ’ =‘ अरिष्टनेमिः.’ ‘ नेमि ’ म्हणून एक आयुधाचें नांव आहे असें सायणाचार्य म्हणतात. ‘ ज्याच्याशीं युद्ध करण्याची कोणालाहि शक्ति नाहीं तो ’ इतकें तात्पर्य आहे.

‘बृहस्पति.’ सू. १४, मं. ३ यावरील आमची टीका पहा. बृहस्पति या देवाविषयीं ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. पण त्यांजविषयींचींच अशीं सूक्तें पांचच आहेत, तीं हीं:—

**पृषदश्वा मरुतः पृश्निमातरः शुभंयावानो विदथेषु जग्मयः ।**
**अग्निजिह्वा मनवः सूरचक्षसो विश्वे नो देवा अवसा गमन्निह ॥७**

पृषत्ऽअश्वाः । मरुतः । पृश्निऽमातरः । शुभंऽयावानः । विदथेषु । जग्मयः ।
अग्निऽजिह्वाः । मनवः । सूरऽचक्षसः । विश्वे । नः । देवाः । अवसा । आ । गमन् । इह ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. पृषदश्वाः ( =पृषत्यः श्वेतबिन्दुयुक्ता मृग्य एव अश्वा येषां ते ) पृश्निमातरः ( =पृश्नेः पुत्राः ) शुभंयावानः ( =शोभनं गच्छन्तो ) विदथेषु जग्मयः (=यज्ञेषु पुनः पुनर्गच्छन्तः=सर्वान् यज्ञान् गच्छन्तो ) मरुतः [ अपि च ] अग्निजिह्वाः ( =अग्निरेव जिह्वा येषाम्=अग्निरूपमुखेन हविर्भक्षयन्तो ) मनवः ( =सर्वस्य मन्तारः=मननशीलाः=प्रज्ञावन्तः ) सूरचक्षसः ( =सूर्यस्येव तेजो येषां ते ) विश्वे देवाः ( =सर्वे देवा ) नः ( =अस्मान् ) अवसा ( =रक्षणेन सह ) इह ( =अस्मिन् स्थले ) आ गमन् ( =आगच्छन्तु ) ॥

मरुदादिरूपा ये विश्वे देवास्ते रक्षणेन सह आगच्छन्त्विति भावः ॥

शुभंयावान इत्यस्य शुभस्य प्रापयितेति सायणोक्तिं कुत्रचिद्वर्तमानामनुसृत्य पण्डितो ग्रासमानः शुभस्य प्रापयितार इत्यर्थं करोति । अत्र पुनः शोभनं यान्ति गच्छन्तीति शुभंयावान इति यत्सायणेनैवोक्तं तत्साधीयः मरुतां शोभनगतित्वस्य शुभे कं यान्ति रथतूर्भिरश्वैरित्यत्रोक्तत्वात् ॥

---

ऋ. १. १९०; ६. ७३; १०. ६७, ६८, १८२.

हा मंत्र श्लोकवृत्ताला बसविण्याला ह्रस्वदीर्घांची अडचण बरीच आहे. ह्याचें वृत्त 'विराट्स्थान' आहे. पण ह्या वृत्तावर अर्वाचीन काळच्या संस्कृतांत श्लोक केलेले आढळत नाहींत. सूक्तारंभीं ( अनुक्रमणिकेवरून ) सांगितल्याप्रमाणें पहिला आणि दुसरा हे पाद नव नव अक्षरांचे आहेत आणि तिसरा दहा अक्षरांचा आहे खरा, पण ह्रस्वदीर्घक्रम समजत नाहीं. चवथा चरण मात्र अकरा अक्षरांचा असून त्रिष्टुभ् वृत्तावर म्हणतां येतो तो असाः—

सुअस्ति नो बृहस्पतिर्दधातु ।

७. पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी हेच ज्यांचे घोडे ते, सुंदर रीतीनें जाणारे, [आणि] यज्ञांप्रत येणारे पृश्नीचे पुत्र मरुत्, [आणि] अग्नीच्या जिव्हेनें खाणारे [आणि] सूर्याप्रमाणें प्रकाशणारे [जे] मननशील सकळ देव [ते] रक्षणासहित आम्हांप्रत येथें येओत.

7. May the Maruts having the spotted deer for their horses, born of Pṛis'ni, going gracefully, [and] visiting all sacrifices, [and] may All the Gods that have Agni for their tongue, that are wise, [and] resplendent like the sun, come unto us with [their] protection.

---

७. ' मरुत् आणि दुसरे देव मिळून जे सकळ देव ते येथें आम्हांजवळ येओत ' असा भावार्थ आहे. या मंत्रांत जीं मरुतांचीं विशेषणें आहेत तीं मरुतांविषयींच्या सूक्तांत पूर्वीं आलींच आहेत. मरुतांच्या रथाला पांढऱ्या टिपक्यांच्या हरिणी जोडिलेल्या असतात असें सांगितलेंच आहे. सू. ३७, मं. २ आणि त्याजवरील टीप पहा. ' सुंदर रीतीनें जाणारे '=' शुभंयावानः.' मरुत् जाऊं लागले म्हणजे सुंदर रीतीनें जातात आणि शोभतात याविषयीं सू. ८८, मं. २ आणि त्याजवरील टीप पहा. ' पृश्नीचे पुत्र.' सू. ३८, मं. ४ आणि टीप पहा.

' अग्नीच्या जिव्हेनें खाणारे '=' अग्निजिह्वाः.' म्हणजे अग्निरूप तोंडानें हवि भक्षणारे. सू. ४४, मं. १४ आणि टीप पहा.

' सूर्याप्रमाणें प्रकाशणारे '=' सूरचक्षसः'. सायणाचार्य ' अग्निजिह्वाः' आणि ' सूरचक्षसः' हीं विशेषणें मरुतांकडेस घेतात.

' मननशील '=' मनवः'. हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. पण ' मनु ' शब्द या अर्थीं देवांस लाविल्याचीं प्रयोगान्तरें मिळत नाहींत, आणि दुसरा सयुक्तिक उपाय तर दिसत नाहीं. हेंहि विशेषण सायणांनीं मरुतांकडेसच घेतलें आहे.

' रक्षणासहित आम्हांप्रत येओत '=' अवसा आ गमन्.' म्हणजे येऊन आमचें संरक्षण करोत, इतकें तात्पर्य.

हा जगतीवृत्ताचा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें श्लोकवृत्ताला बसतोः—

पृषदश्वा मरुतः पृश्निमातरः
शुभंयावानो विदथेषु जग्मयः ।
अग्निजिह्वा मनवः सूरचक्षसः
विश्वे नो देवा अवसा गमन्निह ॥

**भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।**
**स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ ८ ॥**

भद्रम् । कर्णेभिः । शृणुयाम । देवाः । भद्रम् । पश्येम । अक्षऽभिः । यजत्राः ।
स्थिरैः । अङ्गैः । तुस्तुऽवांसः । तनूभिः । वि । अशेम । देवऽहितम् । यत् । आयुः ॥ ८ ॥

**शतमिन्नु शरदो अन्ति देवा यत्रा नश्चक्रा जरसं तनूनाम् ।**
**पुत्रासो यत्र पितरो भवन्ति मा नो मध्या रीरिषतायुर्गन्तोः ॥ ९ ॥**

शतम् । इत् । नु । शरदः । अन्ति । देवाः । यत्र । नः । चक्र । जरसम् । तनूनाम् ।
पुत्रासः । यत्र । पितरः । भवन्ति । मा । नः । मध्या । रिरिषत । आयुः । गन्तोः ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. हे देवाः ( =विश्वे देवाः ), [ वयं ] कर्णेभिः ( =कर्णैः ) भद्रं शृणुयाम ( =भद्रमेव शृणुयाम=कल्याणं वचनं युष्मत्प्रसादाच्छ्रोतुं समर्थाः स्याम ), [ अभद्रं मा शृणुयाम ]; हे यजत्राः ( =यजनीया ) [ देवाः ], अक्षभिर्भद्रं पश्येम (=नेत्रैर्यद्भद्रं तदेव पश्येम ) [ अभद्रं मा पश्येम ] । [ अपि च ] तुष्टुवांसः ( =युष्मान् स्तुवन्तो ) [ वयं ] स्थिरैरङ्गैः ( =दृढैर्गात्रैस् ) तनूभिः ( =शरीरैश् ) [ च ] [ युक्ताः सन्तो ] यद् देवहितम् आयुः ( =देवैः स्थापितो य आयुःकालस्तं ) वि अशेम (=प्राप्नुयाम) ॥ भद्रं शृणुयामेत्यत्र अस्माकं बाधिर्यं कदाचिदपि मा भूदिति सायणः । भद्रं पश्येमाक्षभिरित्यत्र च अस्माकं दृष्टिप्रतिघातोपि मा भूदिति च सः ॥

९. हे देवाः, अन्ति ( =मनुष्याणां समीपे ) शतम् इत् नु शरदः (=शतमेव खलु वर्षाणि=मनुष्याणाम् आयुः शतवर्षप्रमाणमेव खलु ) । यत्र ( =यासु शरत्सु=यस्मिन्नायुषि ) [ यूयं ] नस्तनूनाम् ( =अस्माकं शरीराणां ) जरसं ( =जरां ) चक्र ( =कुरुथ ), यत्र ( =यस्मिन्नायुषि च=यस्यान्ते च ) पुत्रासः पितरो भवन्ति ( =ये पुत्राः सूनवः पालितास्ते पितृवत्पालका भवन्ति ) । [ तर्हि ] गन्तोर्मध्या ( =गमनस्य मध्य एव=आयुषि वर्तमाने सत्येव ) न आयुः ( =अस्माकम् आयुः ) मा रीरिषत ( =मा हिंसिष्ट ) ॥

८. हे देव हो, [आम्ही आपल्या] कानांनीं चांगलें ऐकूं असें करा; हे पूजनीय [देव] हो, [आम्ही आपल्या] डोळ्यांनीं चांगलें पाहूं असें करा. [आम्ही] स्तुति करीत करीत दृढ गात्रांनिशीं [आणि] शरीरांनिशीं देवांनीं नेमिलेलें जें आयुष्य तें उपभोगूं असें करा.

९. हे देव हो, [तुम्ही] ही [आयुष्याची मर्यादा] शंभर वर्षेंच [केली आहे]. तिच्या शेवटीं [तुम्ही] आमच्या शरीरांला वृद्धपण प्राप्त करीत असतां आणि पुत्र [जे आहेत ते] पितर होत असतात. [तर] आमचें आयुष्य चाललें आहे तें मध्येंच खुंटवूं नका.

8. May we, O Gods, hear the auspicious with [our] ears; may we, O revered ones, see the auspicious with our eyes. May we praising [you], live with firm limbs [and] bodies the whole life-time ordained by the Gods.

9, A hundred only, O Gods, are these years [of man's life]; at [the close of] which you cause old age to our bodies, [and] at [the close of] which the sons become the fathers. May ye then never destroy our life while it is yet running its course.

८. या मंत्रांत देवांला अशी प्रार्थना केली आहे कीं, 'जें चांगलें असेल तेंच आमच्या कानांत पडो, अभद्र कानीं न पडो; जें भद्र असेल तेंच आमच्या दृष्टीस पडो, अभद्र न पडो; आणि आमचे कान आणि डोळे हे सदैव आपआपलीं कार्यें करण्यास समर्थ राहोत. आणि देवांनीं नेमून दिलेलें जें आयुष्य तें भरेपर्यंत आमचीं सर्व गात्रें स्वाधीन राहून आम्ही तुमची कीर्ति गात गात जगूं असें करा.'

हा मंत्र फार सुंदर आहे. यांत ऋषीनें मनःपूर्वक आणि तपोबळादिकांचा मिथ्या डौल न घालतां दीन मनुष्याप्रमाणें प्रार्थना केली आहे. या मंत्रावरून प्राचीन ऋषि म्हणजे वेदमंत्रांचे कर्ते खरोखर कसे होते तें दिसून येतें. ब्राह्मणाचें वर्चस्व शूद्रादिकांवरच नव्हे पण देवाधिदेव जो विष्णु त्यासारिख्या देवांवरहि असे अशी जी समजूत तिला या प्रकारच्या मंत्रांनीं पुष्टि येते असें कोणीहि म्हणणार नाहीं. आणि युगांचींयुगें ब्रह्मांडीं प्राण चढवून चिरंजीव होण्याची शक्ति प्राचीन ऋषींस होती आणि ती शक्ति

अदितिर्द्यौरदितिरन्तरिक्षमदितिर्माता स पिता स पुत्रः ।
विश्वे देवा अदितिः पञ्च जना अदितिर्जातमदितिर्जनित्वम् ॥
॥ १० ॥ १६ ॥

अदितिः । द्यौः । अदितिः । अन्तरिक्षम् । अदितिः । माता । सः । पिता । सः । पुत्रः ।
विश्वे । देवाः । अदितिः । पञ्च । जनाः । अदितिः । जातम् । अदितिः । जनिऽत्वम् ॥ १० ॥ १६ ॥

## भाषायाम्.

१०. अदितिः (=अखण्डनीया एतन्नामा या देवमाता स एव) द्यौः (=द्युलोकः)। अदितिरन्तरिक्षम् ( =अदितिरेवान्तरिक्षं ) [भवति] । अदितिर्माता ( =अदितिरेव माता) [भवति] । स पिता (=अदितिर्या स एव पिता) स पुत्रः ( =अदितिर्या स एव पुत्रो) [ भवति ] । अदितिर्विश्वे देवाः ( =अदितिर्या त एव विश्वे देवा भवन्ति ) । अदितिः पञ्च जनाः (=अदितिर्या त एव पञ्च जनाः " गन्धर्वाः पितरो देवा असुरा रक्षांसि ") । अदितिर्जातम् ( =अदितिर्या तदेव जातपदार्थमात्रं ) [ भवति ] । अदितिर्जनित्वम् (=अदितिर्या तदेव जनिष्यमाणपदार्थमात्रं ) [ भवति ] ॥

पञ्च जना इत्यत्र सायण एवमाह । निषादपञ्चमाश्चत्वारो वर्णाः । यद्वा गन्धर्वाः पितरो देवा असुरा रक्षांसि। तदुक्तं यास्केन। गन्धर्वाः पितरो देवा असुरा रक्षांसीत्येके चत्वारो वर्णा निषादः पञ्चम इत्यौपमन्यवः। नि० ३. ७.। इति । ब्राह्मणे त्वेवमाम्नातम् । सर्वेषां वा एतत्पञ्चजनानामुक्थं देवमनुष्याणां गन्धर्वाप्सरसां सर्पाणां च पितॄणां चेति। तत्र गन्धर्वाप्सरसामैक्यात् पञ्चजनत्वम् । एवंविधाः पञ्च जना अप्यदितिरेवेति ॥

---

हरण करण्याचें सामर्थ्य देवांलाहि नव्हतें असेंहि हा मंत्र वाचून कोणी म्हणणार नाहीं. जर तितकें आयुष्य आमच्या पुरातन ऋषींस असतें तर देवांनीं दिलेलें आयुष्य भरेपर्यंत आम्हीं शिथिलगात्र न होतां निरोगी जगं असें करा म्हणून जी प्रार्थना गौतम ऋषीनें केली आहे ती त्याणें केली नसती.

हा मंत्र त्रिष्टुभ्वृत्ताचा असून खालीं लिहिल्याप्रमाणें श्लोकवृत्ताला बसतो.

भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा
भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्
वि अशेम देवहितं यदायुः ॥

९ 'हे देवहो, तुम्ही मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षेच केलें आहे. अधिक केलें नाहीं; आणि या शंभर वर्षांच्या आंतच वृद्धपण येतें, आणि तरुणपणीं ज्या पुत्रांचें आम्हीं पाळण केलेलें असतें तेच आमच्या म्हातारपणीं आमचें पाळण करणारे आमचे

१०. अदिति द्युलोक [होय], अदिति अंतरिक्ष [ होय ], अदिति माता [ होय ], तोच पिता, तोच पुत्र [ होय ]. अदिति [ हेच ] विश्वेदेव, अदिति [हेच] पंच जन, अदिति [ हेच ] जात पदार्थ, अदिति [ हेच ] भविष्य पदार्थ.

10. Aditi [ is ] Heaven, Aditi [ is ] the firmament, Aditi [ is ] the mother, she [is] father, she a son. Aditi [ is ] All the Gods, Aditi the five peoples, Aditi [ is ] what is born, Aditi [ is ] what shall be born.

बापच जणूं होतात. इतके संस्कार या लहानशा शंभर वर्षांच्या मर्यादेंतच होत असतात. त्यापेक्षां यांत तरी तुम्ही कमो करूं नका; तर शंभर वर्षेपर्यंत आम्हीं जगावें असें करा.'

हा मंत्र तर फारच महत्त्वाचा आहे. यावरून अतिप्राचीन जें कृतयुग ( वेदसूक्तांचें दर्शन ऋषींस झालें तें कृतयुगाच्या आलीकडे झालें असें म्हणतां येणार नाहीं ) त्यांत महर्षींचें सुद्धा आयुष्य शंभर वर्षांवर नव्हतें, आणि महर्षींला सुद्धा वृद्धत्वाची पीडा सुटली नव्हती. आम्हांप्रमाणेंच तेहि शंभर वर्षें जगावयास मिळालें तर मोठाच लाभ झाला असें म्हणत असत; आणि म्हातारपणाची जशी आम्हांला भीति आहे तशीच त्यांस होती आणि म्हातारपणांत पुत्रांनीं जसें बापाचें संरक्षण करावें असा आतां प्रचार आहे तसाच प्राचीन काळींहि प्रचार होता. आणि मरे तोंपर्यंत आपले हातपाय चांगले सुदृढ राहावे अशी जशी आतां इच्छा असते तशीच पूर्वी कृतयुगांतहि होती. आणि जसे आधुनिक खरे भाविक मनुष्य मरेपर्यंत आपले दिवस देवभजनांत जावोत अशी इच्छा करितात, तशीच कृतयुगांतहि करीत असत. यावरून पाहतां कृतयुग आणि कलियुग यांतील भेद कितीसा आहे तें दिसून येईल.

या मंत्राच्या पहिल्या पादाचा अर्थ अगदीच शब्दशः केल्यास असा होईलः— 'हे देवांनो, हीं शंभरच वर्षे.' पण मनुष्याच्या आयुष्याचीं जीं वर्षें तीं शंभरच आहेत असा कवीचा अर्थ उघड असलेला सायणांनींहि केला आहे तोच आम्हीं घेतला आहे.

'तिच्या शेवटीं '=' यत्र.' अक्षरशः, 'ज्यांत,' म्हणजे, 'ज्या शंभर वर्षांत.'

हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें श्लोकवृत्ताला बसतोः—

शतमिन्नु शरदो अन्ति देवा<br>
यत्रा नश्चक्रा जरसं तनूनाम् ।<br>
पुत्रासो यत्र पितरो भवन्ति<br>
मा नो मध्या रीरिषतायुर्गन्तोः ॥

१०. या मंत्रांत अदिति देवीच सर्व कांहीं आहे असें सांगितलें आहे. 'अदिति ही द्युलोक, अदिति अंतरिक्ष, अदिति हीच माता, पिता आणि पुत्र होय. अदिति म्हणजेच विश्वेदेव होत, अदिति म्हणजेच पंच जन होत, अदिति म्हणजे जे पदार्थ आजपर्यंत निर्माण झाले ते पदार्थ आणि यापुढें निर्माण होणारे

पदार्थ होय–याप्रमाणें अदितिच सर्व आहे.' अदिति ही देवांची माता देवी होय, तिचें खरें स्वरूप काय आहे याविषयीं सू. ७२, मं. ९ आणि त्याजवरील टीप पहा. प्रस्तुत मंत्रांत वर्णिलेलें अदितीचें स्वरूप खरोखर ईश्वरस्वरूपसदृश आणि सकलसमावेशि आहे.

हें विश्वेदेवांविषयींचें सूक्त येथें संपलें. आतां या विश्वेदेव ( सकळ समस्त देव ) या शब्दांत कोणकोणते देव आले तें पाहूं:-१ भग, २ मित्र, ३ अदिति, ४ दक्ष, ५ अर्यमा, ६ वरुण, ७ सोम, ८ अश्वी देवांचें जोडपें, ९ सरस्वती, १० वात, ११ पृथिवी, १२ द्यू. १३ ग्रावे, १४ पूषा, १५ इंद्र, १६ तार्क्ष्य, १७ बृहस्पति, १८ मरुद्गण; याप्रमाणें देव यांत आले आहेत. पण विश्वेदेव या शब्दांत याच देवांचा समावेश होतो, दुसऱ्यांचा होत नाहीं असें नाहीं; याविषयीं पुढचेंच सूक्त पहा. त्यांत विष्णु, सिंधु, उषा, सूर्य, गावः (=गाई), यूप, हे देव आलेले आहेत ते प्रस्तुतच्या सूक्तांत उच्चारिले नाहींत. यावरून 'विश्वेदेव' हे परिगणित दिसत नाहींत. जितके कवीच्या मनांत येतात तितक्यांविषयीं बोलतो, परंतु ज्यांचा उच्चार होत नाहीं असे पुष्कळ राहून जातात, ते दुसऱ्या वैश्वदेवसूक्तांत येत असतात.

प्रस्तुत सूक्तावरून दिसून येईल कीं हें सूक्त 'शांतिसूक्त,' 'विवाह,' 'वर्धापन,' 'प्रत्यवरोहण,' 'दुष्टजननशांति,' 'रात्रिसूक्त' इत्यादि अनेक संस्कारांच्या संबंधानें आणि पाठांच्या संबंधानें म्हणण्यांत येतें. त्याचें कारण असें आहे कीं त्यांत देवांला प्रार्थना करून कल्याण होओ, बरें होओ, आमचें रक्षण होओ इत्यादिक याचना केलेली आहे ती आशीर्वाद देण्याच्या कामीं चांगली उपयोगीं पडते.

'पंच जन.' म्हणजे शब्दशः पांच प्रकारचे लोक असा अर्थ आहे. परंतु पांच प्रकारचे लोक ते कोणकोणते याविषयीं फार विवाद अथवा मतभेद तरी आहे. आणि पंच जन ते कोण हें जाणण्याविषयीं इच्छा आणि तें समजण्याची अडचण हीं नवीं आहेत असें नाहीं, तर यास्काच्याहि पूर्वींचे जे औपमन्यव इत्यादिक व्याख्यानकर्ते त्यांलाहि या गोष्टीविषयीं पंचाईत पडली होती असें सायणभाष्यावरून समजतें ( भाषा पहा). सायणाचार्य–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र इत्यादिक च्यार वर्ण आणि निषाद ( पारधी, कोळी इत्यादिक ) पांचवा मिळून पांच प्रकारचे लोक ते पंच जन होत असें म्हणतात. पण 'पञ्च जनाः' ( अथवा त्याच अर्थाचे जे 'पञ्च कृष्टयः' आणि 'पञ्च क्षितयः') हे शब्द ज्या ज्या मंत्रांत आले आहेत ते सर्व धुंडून आणि विचारपूर्वक वाचून पाहतां 'पञ्च जनाः' म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि निषाद हे पांच लोक नव्हेत, तर देवगणांपैकींच कोणी आहेत असें दिसतें. त्याचीं उदाहरणें याप्रमाणें:– ऋ. १०

६०. ४ यांत असें सांगितलें आहे कीं, ‘ स्वर्गी जसे पंच जन सुखी असतात तसा इक्ष्वाकु सुखी आणि वैभववान् असे ’ ( =इक्ष्वाकुः......रेवान् मरायी एधते। दिवीव पञ्च कृष्टयः ). ऋ. १०. ५३. ४ यांत ऋषि म्हणतो, ‘हे हव्यभक्षक आणि यजनीय पंच जन हो, तुम्ही आमचें हव्य सेवन करा’ (=ऊर्जादः उत यज्ञियासः पञ्च जनाः मम होत्रं जुषध्वम् ). येथें पंच जनांला ‘ हविभक्षक ’ आणि ‘ यजनीय ’ हीं विशेषणें दिलीं आहेत यावरून ते पृथिवीवरील शूद्रवेश्यादिक लोक नव्हेत तर देवांपैकींच कोणी तरी असावेत. त्याच्या पुढच्याच मंत्रांत पंच जनांला हव्य सेवन करावयास प्रार्थना आहे आणि दुसऱ्या देवांबरोबर त्यांचीहि प्रार्थना केलेली आहे. ऋ. १०. ११९. ६ यांत असें म्हटलें आहे कीं ‘मी आतां सोम प्यालों आहें, तर पंच जन हे मजपासून कांहींच लपवून ठेवणार नाहींत, सगळें माझ्या दृष्टीस पाडितील ’ (=नहि मे अक्षिपत् चन अच्छांत्सुः पञ्च कृष्टयः। कुवित् सोमस्य अपामिति ). ऋषीच्या दृष्टीस सर्व कांहीं पडे असें करणारे ते कोणी देवगणांपैकींच असावे. त्याप्रमाणेंच ऋ. ६. ५१. ११ यांत इंद्र, पृथिवी, पूषा, भग, अदिति आणि ‘ पंच जन ’ यांणीं आपल्या घराची वृद्धि करावी, आपणास आश्रय द्यावा, आपलें रक्षण करावें, आपणांस चांगला मार्ग दाखवावा, आपणांस कधींहि सोडूं नये अशी ऋषीनें प्रार्थना केली आहे ( ते नः इन्द्रः पृथिवी क्षाम वर्धयन् पूषा भगो अदितिः पञ्च जनाः। सुशर्माणः सुअवसः सुनीथाः भवन्तु नः सुत्रात्रासः सुगोपाः ॥); तथापि सर्वच ठिकाणीं देवगणविशेष अथवा देवादि पंच जन हा अर्थ जुळत नाहीं. कितीएक मंत्रांत तरी मनुष्यांचे पांच प्रकार अथवा पांच प्रकारचे मनुष्य हा अर्थ विवक्षित दिसतो. ऋ. ८. ९. २ यांत ऋषि म्हणतो, ‘ हे अश्वी हो, जें धन अंतरिक्षांत, जें द्युलोकांत आणि जें पंच जन राहतात त्या लोकांत आहे तें तुम्ही आम्हांस द्या’ ( यद् अन्तरिक्षे यद् दिवि यत् पञ्च मानुषान्। नृम्णं तद्धत्तमश्विना); यावरून पंच जनांचा लोक म्हणजे पृथिवी असें दिसतें. शिवाय ऋ. ७. ७९. १ आणि ७. १५. २ हे मंत्र पहा. यांजवरून पंच जन म्हणजे पृथिवीवर जितकीं माणसें आहेत तीं सर्व असा अर्थ दिसतो. मग त्यांस पंच जन असें नांव पडण्याचें कारण काय असेल तें असो. सायण म्हणतात त्याप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि निषाद हे पर्यवसानीं विवक्षित असतील.

ऋ. १. १७६. ३ याच्या भाष्यावर सायणाचार्य ‘ पंच जनाः ’ याचा अर्थ देव, मनुष्य, पितर, पशु, आणि पक्षी हे पंच जन होत असें म्हणतात.

या सर्वांवरून असें उघड होतें कीं पंच जन ते कोणते याविषयीं प्राचीन काळापासून जिज्ञासा आणि वाद आहे. प-

## सूक्तम् ९०.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः। विश्वे देवा देवता। अन्त्यानुष्टुप्। शिष्टा गायत्र्यः।

ऋजुनीती नो वरुणो मित्रो नयतु विद्वान्।
अर्यमा देवैः सजोषाः ॥ १ ॥

ऋजुऽनीती। नः। वरुणः। मित्रः। नयतु। विद्वान्।
अर्यमा। देवैः। सऽजोषाः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. विद्वान् (=सर्वानपि मार्गान् जानन्) वरुणो, मित्रः, देवैः सजोषा अर्यमा [च] (=भगादिभिरन्यैर्देवैश्च सहितः अर्यमा एतन्नामको देवश्च) नः (=अस्मान्) ऋजुनीती (=ऋजुनीत्या=अकुटिलेन नयनेन) नयतु (=सन्मार्गान् प्रापयतु) ॥

रंतु अन्वय आणि अर्थसंदर्भ यांला अनुसरून केव्हां केव्हां पांच प्रकारचे मनुष्य लोक म्हणजे पांच जातींचे अथवा वर्णांचे लोक असा, आणि केव्हां केव्हां देव, गंधर्व, पितर, असुर आणि राक्षस असे किंवा यासारिखेच देवगणांपैकीं कोणी देवयोनींतील पांच प्रकारचे लोक असा अर्थ करून निर्वाह केला पाहिजे.

## सूक्त ९०.

ऋषि– **गोतम** ( पूर्व सूक्ताचा जो तोच). देवता–**विश्वे देव**. वृत्त–**गायत्री**; मात्र शेवटच्या ऋचेचें अनुष्टुभ्.

१. सर्वज्ञानी [ जे ] वरुण [ आणि ] मित्र [ ते ] [ आणि ] इतर देवांसहित अर्यमा [हा] सरळ नीतीनें आम्हांला मार्ग दाखवो.

## HYMN 90.

To the *Vis've Devas.* ( i.e. All the Gods taken collectively ). By *Gotama*, Metre—*Gâyatrî*; except the last verse which is *Anushṭup.*

1. May all-knowing Varuṇa [ and ] Mitra and Aryamâ accompanied by [ other ] Gods lead us by [ their ] straight guidance.

---

१. हेंहि सूक्त विश्वेदेवांविषयींच आहे. या मंत्रांत ऋषि म्हणतो कीं, सन्मार्ग कोणते आणि असन्मार्ग कोणते तें जाणणारे असे जे मित्र, वरुण, अर्यमा आणि दुसरे देव ते आम्हांला सन्मार्ग दाखवोत, असन्मार्गी आम्हीं न पडावें असें करोत.

दुसरा पाद 'मित्रो नयतु विद्वुआन् ' असा म्हटला पाहिजे. आणि तिसऱ्या पादांत 'देवैः सजोषाः' असें आहे त्यांतील 'वैः' आणि 'जो' हीं अक्षरें दीर्घ आहेत आणि 'स' हें ऱ्हस्व आहे त्यामुळें कानाला हा चरण किंचित् कर्कश लागतो. अक्षरें नियमाप्रमाणें आठ आहेत.

ते हि वस्वो वसवानास्ते अप्रमूरा महोभिः ।
व्रता रक्षन्ते विश्वाहा ॥ २ ॥
ते । हि । वस्वः । वसवानाः । ते । अप्रऽमूराः । महःऽभिः ।
व्रता । रक्षन्ते । विश्वाहा ॥ २ ॥
ते अस्मभ्यं शर्म यंसन्नमृता मर्त्येभ्यः ।
बाधमाना अप द्विषः ॥ ३ ॥
ते । अस्मभ्यम् । शर्म । यंसन् । अमृताः । मर्त्येभ्यः ।
बाधमानाः । अप । द्विषः ॥ ३ ॥
वि नः पथः सुवितायं चियन्त्विन्द्रो मरुतः ।
पूषा भगो वन्द्यासः ॥ ४ ॥
वि । नः । पथः । सुविताय । चियन्तु । इन्द्रः । मरुतः ।
पूषा । भगः । वन्द्यासः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

२. हि ( =यस्मात् कारणात् ) ते ( =पूर्वोक्ता ) वस्वो वसवानाः ( =वसुनः धनस्य वासयितारो=धनस्य दातारस्ः) ते अप्रमूराः (=अमूढाः=प्रज्ञावन्तो) [देवाः] महोभिः ( =स्वतेजोभिः ) विश्वाहा ( =विश्वान्यहानि=सदैव ) व्रता रक्षन्ते ( =व्रतानि रक्षन्ति=जगन्निर्वाहरूपाणि स्वकर्माणि पालयन्ति ) ॥

वातस्य वानं वरुणस्य पापदण्डनं मित्रस्य मार्गदर्शनम् इत्येतादृशानि यानि जगतो निर्वाहकाणि कर्माणि तानि तानि ते ते देवा न त्यजन्ति अपि तु नित्यमेव पालयन्तीत्यर्थः ॥

३. द्विषः ( =अस्माकं शत्रून् ) अप बाधमानाः ( =अपगमयन्तस् ) ते अमृताः ( =अमर्त्या ) [ देवा ] मर्त्येभ्यः ( =मरणधर्मभ्योस्मभ्यं ) शम यंसन् ( =सुखं प्रयच्छन्तु ) ॥

४. वन्द्यासः ( =वन्द्याः=वन्दनयोग्या ) इन्द्रो, मरुतः, पूषा, भगः [ इत्येते ] सुविताय ( =सुष्टुगमनाय=वयं यथा सुष्टु गच्छेम तथा=अस्माकं शोभनलाभाय ) नः पथः ( =अस्माकं मार्गान् ) वि चियन्तु ( =विचिन्वन्तु=" अशोभनेभ्यो मार्गेभ्यः पृथक्कुर्वन्तु " ) ॥

२. कारण कीं ते संपत्ति देणारे [आणि] ते प्रज्ञावंत [देव] आपल्या तेजांनीं [जगाचे] नियम सदैव चालवीत असतात.

३. ते अमर्त्य आम्हां मर्त्यांला सुख देओत आणि शत्रूंला हाकून लावोत.

४. वंदनीय इंद्र, मरुत्, पूषा, [आणि] भग [हे] [आमच्या] कल्याणार्थ आमचे मार्ग सुगम करोत.

2. For they the spreaders of wealth, they the wise, eternally preserve their laws with [their] splendors.

3. May they the immortals grant happiness unto us the mortals, driving away [our] enemies.

4. May the adorable Indra, Maruts, Pûshâ [and] Bhaga clear our paths for [our] welfare.

---

२. 'जगाचा क्रम जेणेंकरून चालतो अशीं जीं देवांचीं नियमबद्ध कामें, म्हणजे इन्द्रानें पाऊस पाडावा, वरुणानें रात्रीच्यावेळीं मनुष्यांचें संरक्षण करून पापी जनाला शिक्षा करणें, दिवसाच्यावेळीं मित्र देवानें प्रकाश पाडून मनुष्यांला सन्मार्ग दाखवावा, इत्यादिक नेमून घेतलेलीं कामें तीं ते ते देव जेव्हांचीं तेव्हां बिनचूक करीत असतात.' असा भावार्थ.

या मंत्राचा दुसरा चरण खडबडीत आहे. तो साधारण गायत्रीपादाप्रमाणें वाचला तर, 'तॆ अम्रमूरॉ मर्हॊभिः' असा म्हणावा लागतो.

३. 'वर जे देव सांगितले ते आमच्या शत्रूंला नाहींसे करून आम्हांला सुख देओत कारण कीं आम्ही क्षणभंगुर असून ते अमर आहेत; त्यामुळें आमची प्रार्थना मान्य करणें हें त्यांस कठीण नाहीं.' असा भावार्थ.

या मंत्रावरून प्राचीन काळचे ऋषि आपणांस अमर समजत नसत आणि पाहिजे त्या प्रकारची शक्ति आपणांस आहे, देवांची आपणांस अवश्यकता नाहीं; देवाधिदेव जो विष्णु तोहि आम्हांकडून लत्ताप्रहार करून घेऊन आनंद पावतो असें ते समजत नसत असें म्हणण्यास अडचण नाहीं.

वृत्तानुरोधानें दुसरा चरण 'अमृता मर्तिएभिअः' असा म्हटला पाहिजे.

४. 'इन्द्र, मरुत्, पूषा, आणि भग हे जे पूजनीय देव ते आमचे मार्ग आम्हांला दाखवोत; म्हणजे चांगले मार्ग कोणते आणि वाईट कोणते तें आम्हांला दाखवोत, कीं जेणेंकरून आम्हाला त्या मार्गानें जाण्यास प्रतिबंध होणार नाहीं, आमचें कल्याण होईल.'

उत नो धियो गोअग्राः पूषन्विष्णवेवयावः ।
कर्ता नः स्वस्तिमतः ॥ ५ ॥ १७ ॥
उत । नः । धियः । गोऽअग्राः । पूषन् । विष्णो इति । एवऽयावः ।
कर्त । नः । स्वस्तिऽमतः ॥ ५ ॥ १७ ॥
मधु वाता ऋतायते मधु क्षरन्ति सिन्धवः ।
माध्वीर्नः सन्त्वोषधीः ॥ ६ ॥
मधु । वाताः । ऋतऽयते । मधु । क्षरन्ति । सिन्धवः ।
माध्वीः । नः । सन्तु । ओषधीः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. उत (=अपि च) हे पूषन्, हे विष्णो, हे एवयावः [ मरुद्गण ] (=अश्वैरागच्छन् मरुतां गण ), नो धियो गोअग्राः [ कर्त ] (=अस्माकं कर्माणि=अस्माभिर्युष्मदर्थं कृतानि यज्ञयागादीनि कर्माणि गावः प्रमुखे यासां तादृशीः=गोरूपफलयुक्तानि कुरुत) । [अपि च] नः स्वस्तिमतः कर्त (=अस्मान् अविनाशयुक्तान् कुरुत) ॥

'एवयावः' इति विष्णोर्विशेषणमिति ग्रास्मानः । कर्तेति क्रियापदस्य पुनर्बहुवचनान्तत्वात्तृतीयदेवस्यापेक्षितत्वं दुर्निवारम् । अतः साधीयः सायणवचनमेवयावा मरुद्गण इति ॥

६. ऋतायते (=ऋतमात्मन इच्छते=यज्ञरूपसत्यपरायणायोपासकाय ) वाताः (=वायवो ) मधु (=मधुरं यथा तथा ) [ वहन्ति ] सिन्धवः (=नद्यो ) मधु (=मधुरं यथा तथा ) क्षरन्ति (=वहन्ति ) । ओषधीः (=ओषध्यो ) नः (=अस्मदर्थं ) माध्वीः (=माध्व्यः=मधुररसयुक्ताः ) सन्तु (=भवन्तु ) ॥

देवोपासकानामर्थे वातादयो मधुरा भवन्ति । अतोस्मदर्थमपि ते मधुराः सन्त्वित्यर्थः ॥

---

'कल्याणार्थ' = 'सुविताय.' 'दुरित' हा शब्द जसा 'दुः' आणि 'इत' यांपासून झाला आहे तसा 'सुवित' हा 'सु' आणि 'इत' यांपासून व्युत्पन्न झाला आहे. त्याचा अक्षरशः अर्थ 'चांगलें जाणें,' 'सुचरित.' म्हणजे चांगल्या मार्गानें जें जाणें तें. आणि वाईट मार्गानें जें जाणें तें 'दुरित,' अर्थात् पाप. 'सुविताय नः पथो विचियन्तु' याचा मूळ अर्थ 'सुचरितासाठीं (अथवा सदाचरणासाठीं ) आमचे मार्ग आम्हांला दाखवोत' असा आहे. यांत सांगितलेले

५. आणि हे पूषा, हे विष्णू, [ आणि ] हे अश्वगामी [ मरुद्गण ] हो, [ तुम्ही ] आमचीं कर्में गोसंपन्न करा [ आणि ] आम्हांला सुखी करा.

६. भजनपरायण उपासकाकरितां वायु मधुर [ वाहतात ] [ आणि ] नद्या मधुररसपूर्ण वाहतात. ओषधी आम्हांकरितां मधुर होओत.

5. And make our rites crowned with the wealth of cows, O Pûshâ, O Vishṇu, O equestrian [ troop of Maruts ]. Make us happy.

6. Sweetly do the winds [ blow ] for the pious worshipper, sweetly do the rivers flow. Sweet may the plants be for us.

---

मार्ग हे साधारण भौतिक मार्ग घ्यावयाचे नाहींत. तर चांगलें कोणतें, वाईट कोणतें, पुण्य कोणतें आणि पाप कोणतें तें जाणून ज्यांच्या योगानें वर्तन करावयाचें तीं सदसदाचरणाचीं मूळतत्त्वें होत.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजेः—

वि नः पथः सुविताय ।
चियन्तु इन्द्रो मरुतः ।
पूषा भगो वॅन्दिॲसः ॥

---

५. 'पूषा, विष्णु आणि मरुद्गण यांस ऋषि म्हणतो, आम्ही जीं यज्ञयागादिक कर्में तुम्हांप्रीत्यर्थ करितों तीं फलद्रूप करा आणि आम्हांस पुष्कळ गाई मिळतील असें करा, आणि आम्हांस सुखी करा.'

'गोसंपन्न'='गोअग्राः.' सू. ९२, मं. ७ आणि सायणभाष्य पहा. आपणांस गाई प्राप्त व्हाव्या याविषयीं प्राचीन ऋषींची प्रार्थना वेदांत भरली आहे. पुरातन काळीं गुरेंढोरें मिळण्याविषयीं लोकांला फार इच्छा असे, कारण कीं गुरेंढोरें हीच बहुतकरून त्यांची संपत्ति असे.

गायत्रीवृत्तासारिख्या सोप्या वृत्तांतच हा मंत्र आहे तरी ह्रस्वदीर्घांच्या संबंधानें वाचण्यास बराच अवघड आहे.

उत नो धिय गोअग्राः ।
पूषन्विष्णवेॅवयाॅवः ।
कर्ता नः सुॲस्तिमतः ॥

६. 'देवांची यज्ञादिकेंकरून उपासना करण्याविषयीं उत्सुक असे जे भक्त त्यांला सुख व्हावें म्हणून वायु, नद्या, वनस्पति इत्यादि पदार्थ मधुर रसांनीं पूर्ण होतात. त्याप्रमाणेंच आम्ही जे गोतमकुळांतील जन त्यांच्यासाठींहि मधुर होओत.'

यांत 'वात,' 'नद्या,' आणि 'ओषधी' यांजवर देवत्वारोपण करून त्यां-

**मधु नक्तमुतोषसो मधुमत्पार्थिवं रजः ।**
**मधु द्यौरस्तु नः पिता ॥ ७ ॥**

मधु । नक्तम् । उत । उषसः । मधुऽमत् । पार्थिवम् । रजः ।
मधु । द्यौः । अस्तु । नः । पिता ॥ ७ ॥

**मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँ अस्तु सूर्यः ।**
**माध्वीर्गावो भवन्तु नः ॥ ८ ॥**

मधुऽमान् । नः । वनस्पतिः । मधुऽमान् । अस्तु । सूर्यः ।
माध्वीः । गावः । भवन्तु । नः ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. [ नः=अस्मभ्यं ] नक्तं ( =रात्रिः ) मधु ( =माधुर्योपेतम् ) [ अस्तु ] उत ( =अपि च ) उषसः ( =उषःकाला ) [ माध्व्यः सन्तु ] पार्थिवं ( =पृथिवीसंबन्धि वस्तुमात्रं=पृथिवी ) मधुमत् ( =माधुर्योपेतम् ) [ अस्तु ] रजः ( =अन्तरिक्षं ) [ मध्वस्तु ], नः ( =अस्मभ्यं ) पिता द्यौः ( =द्युलोकरूपः पिता ) मधु [ यथा तथा ] अस्तु ॥

८. नः ( अस्मदर्थं ) वनस्पतिः ( =वृक्षो ) मधुमान् (=मधुररसोपेतो) [ भवतु ] सूर्यो मधुमान् अस्तु ( =सूर्यो माधुर्योपेतो भवतु ) । नः ( =अस्मदर्थं ) गावः (=धेनवो ) माध्वीः ( =माध्व्यः=मधुररसोपेता ) भवन्तु ॥

---

जविषयों निर्देश आहे. यांचाहि ' विश्वेदेवाः' यांत समावेश होतो हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

देवसेवेचें माहात्म्य मोठें आहे आणि देवसेवकाच्या हितासाठीं सर्व देव, सर्व योनिगण आणि सकळ पदार्थ नित्य सिद्ध असतात असा प्राचीन ऋषींचा जो योग्य विश्वास तो जसा या मंत्रावरून उघड दिसतो तसाच इतर पुष्कळ मंत्रांवरून उघड होतो.

तिसरा चरण ' माध्वीर्नः सन्तु ओषधीः' असा म्हटला पाहिजे.

७. [ आम्हांकरितां ] रात्र मधुर [ होओ ], आणि उषा [ मधुर होओत ], [ आम्हांकरितां ] पृथिवी [ आणि ] अंतरिक्ष [ हीं ] मधुर [ होओत ]; आम्हांकरितां पिता द्यू मधुर होओ.

८. आम्हांकरितां वृक्ष मधुर [ होओ ], सूर्य मधुर होओ. आम्हांकरितां गाई मधुर होओत.

7. Sweet [ may ] night [ be for us ], and [ sweet ] the Dawns, sweet [ may ] Earth [ and ] the Firmament [ be for us ]; sweet may father Dyaus ( Heaven ) be for us.

8. Sweet [ may ] the tree [ become ] for us, sweet may Sûrya be [ for us ]. Sweet may the cows become for us.

---

७. 'त्याप्रमाणेंच रात्र, दिवस, पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक हींहि आमच्या हितार्थ मधुर होओत.'

यांत रात्र, दिवस, पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक यांजवर देवत्वारोपण करून त्यांजविषयीं उद्गार आणि त्यांजकडेस प्रार्थना केलेली आहे, यास्तव 'विश्वेदेवाः' या नांवांत यांचाहि समावेश होतो असें समजावें.

'पृथिवी '=' पार्थिवम्.' 'पार्थिवम्' हें येथें नाम आहे, विशेषण नाहीं. ऋ. ५. ४१. १ याजवरील सायणभाष्य पहा. 'पार्थिव' शब्दाचा पृथिवीसंबंधी अवकाश ( म्हणजे पृथिवीच ) असा अर्थ पुष्कळ ठिकाणीं ऋग्वेदांत होत असतो.

'पिता द्यू '=' पिता द्यौः.' सू. ८९, मं. ४ आणि टीप पहा.

ही ऋचा मात्र केवळ प्राचीन गायत्री श्लोकाप्रमाणें म्हणतां येते.

८. 'वृक्ष, सूर्य आणि गाई ह्या आम्हांला मधुर होओत,' अशी या मंत्रांत ऋषि प्रार्थना करितो. वृक्ष म्हणजे येथें 'यूप' म्हणून जो काष्ठदंड यज्ञांत असतो, आणि ज्याला बळि बांधीत असतात, तो समजावयाचा असें सायणाचार्य म्हणतात. आम्हीं अक्षरशः अर्थ केला आहे.

सातवा आणि हा आठवा हे मंत्र अंत्येष्टिसंबंधी जें सपिंडीकरण म्हणून कर्म आहे त्यांत म्हणत असतात. मधु ( मद ) पिंडाच्या संबंधानें लागत असतो आणि या दोनोहि मंत्रांत 'मधु' शब्द आला आहे त्यामुळें हे दोनीहि मंत्र त्या प्रसंगीं म्हणत असतात. पण तसल्या प्रसंगाला या मंत्रांचा संबंध किती आहे हें सांगायाला पाहिजे असें नाहीं.

येथें वृक्ष, सूर्य आणि गावः यांजवरहि देवत्वारोपण करून प्रार्थना केली आहे.

द्वितीय चरणांत 'मधुमानस्तु सूरिअः' असें म्हणणें अवश्य आहे.

शं नो॑ मि॒त्रः शं वरु॑णः शं नो॑ भवत्वर्य॒मा ।
शं न॒ इन्द्रो॒ बृह॒स्पतिः॒ शं नो॒ विष्णु॑रुरुक्र॒मः ॥ ९ ॥ १८ ॥

शम् । नः॒ । मि॒त्रः । शम् । वरु॑णः । शम् । नः॒ । भ॒व॒तु॒ । अ॒र्य॒मा ।
शम् । नः॒ । इन्द्रः॑ । बृह॒स्पतिः॑ । शम् । नः॒ । विष्णुः॑ । उ॒रु॒ऽक्र॒मः ॥
॥ ९ ॥ १८ ॥

---

## भाषायाम्.

९. मित्रः (=अहरभिमानी देवो) नः शं [भवतु] (=अस्मभ्यं सुखकारी भवतु)। वरुणः शं [भवतु]। अर्यमा नः शं भवतु। इन्द्रो नः शं [भवतु]। बृहस्पतिः (=एतन्नामा स्तोत्राभिमानी देवो) [नः शं भवतु]। उरुक्रमः (=विस्तीर्णं यथा तथा पादौ विक्षिपन्) विष्णुः (=एतन्नामकः सूर्याभिमानी देवो) नः शं [भवतु] ॥

बृहस्पतिः । बृहतां देवानां पालयितेन्द्रश्च नोस्माकं शं सुखकरो भवत्विति सायणाचार्याः ॥

९. आम्हांकरितां मित्र कल्याणकारक [ होओ ], वरुण कल्याणकारक [ होओ ], आम्हांकरितां अर्यमा कल्याणकारक होओ; इंद्र आम्हांकरितां कल्याणकारक [ होओ ], बृहस्पति [ कल्याणकारक होओ ]; लांब लांब पावलें टाकणारा विष्णु आम्हांकरितां कल्याणकारक [ होओ ].

9. Auspicious [ may ] Mitra [ become ] for us, auspicious [ may ] Varuṇa [ be ]; auspicious may Aryamâ become for us. [ May ] Indra [ become ] auspicious for us, [and] Bṛihaspati. Auspicious may wide-striding Vishṇu ( the Sun-god ) become for us.

९. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. आणि मुख्य मुख्य जे देव त्यांला ऋषि प्रार्थितो कीं, ते आम्हांला सुखकारक होओत, म्हणजे आमचें कल्याण करोत. मित्र, वरुण, अर्यमा, इन्द्र आणि बृहस्पति यांविषयीं उच्चार पूर्वसूक्तांत आलाच आहे, आणि त्यांतील मंत्रांवरच्या टीपांत त्यांच्या स्वरूपाविषयीं लिहिलें आहे, आणि पूर्वीच्या टीपांला दाखले दिले आहेत ते पहा.

'लांब लांब पावलें टाकणारा विष्णु'=' उरुक्रमः विष्णुः.' सू. २२, मं. १६–२१ आणि त्यांजवरील आमची मराठी टीका पहा. विष्णु हा सूर्यरूपच देव होय, त्यामुळें त्याला 'उरुक्रम' हें विशेषण उत्तम शोभतें.

'बृहस्पति.' सू. १४, मं. ३ आणि टीप पहा.

या सूक्तांत जे देव सांगितले आहेत आणि ज्यांस विश्वेदेव असें म्हणावयाचें ते येणेंप्रमाणें:–१ वरुण, २ मित्र, ३ अर्यमा, ४ इंद्र, ५ मरुत्, ६ पूषा, ७ भग, ८ विष्णु, ९ वात, १० नद्या, ११ ओषधी, १२ रात्र, १३ उषा, १४ पृथिवी, १५ अंतरिक्ष, १६ द्युलोक, १७ वनस्पति, १८ सूर्य, १९ गाई, २० बृहस्पति. यांतून बहुतेक पूर्वीच्या सूक्तांत आलेच आहेत.

हा मंत्र अनुष्टुभ् छंदाप्रमाणें सरळ म्हणतां येतो, मात्र दुसरा चरण 'शं नो भवतु अर्यमा' असा म्हटला पाहिजे.

## सूक्तम् ९१.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । सोमो देवता । पञ्चम्याद्याः षोडश्यन्ता द्वादशर्चो गायत्र्यः । सप्तदश्युष्णिक् । शिष्टास्त्रिष्टुभः ॥

**त्वं सोम प्र चिकितो मनीषा त्वं रजिष्ठमनु नेषि पन्थाम् ।**
**तव प्रणीती पितरो न इन्दो देवेषु रत्नमभजन्त धीराः ॥ १ ॥**

त्वम् । सोम । प्र । चिकितः । मनीषा । त्वम् । रजिष्ठम् । अनु । नेषि । पन्थाम् ।
तव । प्रऽनीती । पितरः । नः । इन्दो इति । देवेषु । रत्नम् । अभजन्त । धीराः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे सोम, त्वं मनीषा ( =मनीषया=तव प्रज्ञया साधनेन ) प्र चिकितः ( =प्रकर्षेण पश्यसि=सर्वमपि जानासि ) । त्वं ( =त्वमेव ) [ तवोपासकान् ] अनु रजिष्ठं पन्थाम् (=अतिशयेन ऋजुं पन्थानमनुलक्ष्य ) नेषि ( =नयसि=प्रवर्तयसि ) । हे इन्दो ( =सोम), तव प्रणीती ( =प्रणीत्या=प्रकृष्टनयनेन=त्वं यत्प्रकृष्टं यथा तथा प्रवर्तयसि तेन कर्मणा ) नो धीराः पितरः ( =अस्माकं धीमन्तः पितरो ) देवेषु रत्नम् अभजन्त ( =देवेषु सर्वोत्कृष्टं हवीरूपं धनम् ) अभजन्त (=असेवन्त=प्राप्नुवन् ) ॥
सोमप्रसादादस्माकं पितरो देवत्वं प्राप्ता इति भावः ॥

## सूक्त ९१.

ऋषि–**गोतम** ( पूर्वी सूक्ताचा जो कर्ता तोच ). देवता–**सोम.** वृत्त–पहिल्या च्यार ऋचा **त्रिष्टुभ्** वृत्ताच्या, पांचपासून सोळापर्यंत बारा ऋचा **गायत्री** वृत्ताच्या, सतरावी **उष्णिक्** वृत्ताची, आणि अठरापासून पुढच्या सर्व **त्रिष्टुभ्** वृत्ताच्या होत.

१. हे सोमा, तूं आपल्या दिव्य प्रज्ञेनें सर्व जाणतोस. तूं अत्यंत सरळ मार्गानें वर्तवितोस. हे इंदू, तुझ्याच प्रसादेंकरून आमचे बुद्धिमंत वाडवडील देवांबरोबर उत्तम सुखाप्रत पावले.

## Hymn 91.

To *Soma* ( the god of the Soma-juice ). By *Gotama* son of *Rahûgaṇa* (the same as author of the previous hymn ). Metre—Verses 5–16 are *Gâyatrîs,* verse 17 is *Ushṇik,* and the rest are all *Trishṭubhs.*

1. Thou, O Soma, seest excellently with [thy] wisdom; thou guidest along the straightest path. Under thy guidance our wise fathers attained, O Indu, to excellent oblation in company with the Gods.

---

१. हें सूक्त सोमाविषयीं आहे. सोम म्हणजे येथें सोमरसरूप जो देव तो समजावयाचा आहे. सोमरसाचें माहात्म्य वेदांत मोठें आहे म्हणून सांगावयास नको. त्याला देव मानून त्याजविषयीं मोठी स्तुति केलेली आहे. नववें सगळें मंडळ या देवाविषयींच आहे. सू. २८, मं. ८ इत्यादि पुष्कळ स्थळीं आम्हीं त्याविषयीं दिग्दर्शन केलें आहे तें पहा.

या प्रथम मंत्रांत ऋषि म्हणतो, ‘ हे सोमा, मनुष्यांनीं काय करावें, भक्ति कशी करावी, कशाला सन्मार्ग म्हणावें, कशाला वाईट मार्ग म्हणावें ह्याचें तूं त्याला ज्ञान करून देतोस; कारण तूं मोठा प्रज्ञावंत असल्यामुळें तुला सर्व दिसत असतें. आणि तूंच दाखविलेल्या मार्गानीं चालल्यामुळें आमचे पूर्वज देवत्वाप्रत पावून देवांबरोबर हवि घेण्यास पात्र झाले.’ सोम प्याल्यानें सर्वज्ञान होतें आणि सर्व कांहीं दृष्टीला पडतें, आणि सोमपान करणारे उपासक ज्ञानी होऊन शेवटीं देवत्वाप्रत पावतात अशा समजुतीला अनुसरून हा मंत्र रचिला आहे.

‘ प्रज्ञेनें ’=‘मनीषा.’ सू. ५४, मं. ८ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

‘ इंदू.’ इंदु हें नांव सोमाचें आहे.

त्वं सोम क्रतुभिः सुक्रतुर्भूस्त्वं दक्षैः सुदक्षो विश्ववेदाः ।
त्वं वृषा वृषत्वेभिर्महित्वा द्युम्नेभिर्द्युम्न्यभवो नृचक्षाः ॥ २ ॥

त्वम् । सोम । क्रतुऽभिः । सुऽक्रतुः । भूः । त्वम् । दक्षैः । सुऽदक्षः । विश्वऽवेदाः ।
त्वम् । वृषा । वृषऽत्वेभिः । महिऽत्वा । द्युम्नेभिः । द्युम्नी । अभवः । नृऽचक्षाः ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. हे सोम, त्वं क्रतुभिः (=तव प्रज्ञाभिः) सुक्रतुर्भूः (=शोभनप्रज्ञोभवः=शोभनप्रज्ञो भवसि), त्वं दक्षैः (=तव बलैः) सुदक्षः (=शोभनबलो), विश्ववेदाः (=सर्वज्ञश्) [च] [भवसि]। त्वं वृषत्वेभिः (=वृषत्वैः=तव वीर्यैः) महित्वा (=महत्त्वेन) [च] वृषा (=वीरो) [भवसि]। नृचक्षाः (=नॄन् पश्यन् मनुष्यान् कृपार्द्रं पश्यन्) [त्वं] द्युम्नेभिः (=द्युम्नैः=अन्नसंपद्भिः) द्युम्नी (=अन्नादिसंपत्संपन्नः) अभवः (=जातोसि=भवसि) ॥

---

इंदु याचा मूळ अर्थ थेंब इतकाच आहे. त्यावरून सोमाच्या थेंबाला इंदु असें म्हटलें आहे असे मंत्र पुष्कळ आहेत. 'इन्दवः' (सोमाचे थेंब) हें अनेक वचनहि ऋग्वेदांत पुष्कळ मंत्रांत आलें आहे. सू. २, मं. ४; सू. १५, मं. १; सू. १६, मं. ६; सू. ४६, मं. ९ इत्यादि पहा. मग 'इन्दु' हें एकवचन सोम या अर्थीं योजण्यांत येऊं लागलें. पुढें चंद्राला 'सोम' असें नांव कांहीं कारणानें पडलें तेव्हां सोमाचें जें दुसरें नांव 'इंदु' तेंहि चंद्राला लावूं लागले, त्यामुळें संस्कृतांत 'इंदु' म्हणजे चंद्र असा अर्थ होत असतो.

'प्रसादेंकरून'=' प्रणीती.' अक्षरशः 'नयनानें,' तूंच 'मार्ग दाखविल्यानें.'

वृत्तसुखासाठीं हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजे.

तुअं सोम प्र चिकितो मनीषा
तुअं रजिष्ठम् अनु नेषि पन्थाम् ।
तव प्रणीती पितरो न इन्दो
देवेषु रत्नम् अभजन्त धीराः ॥

२. हे सोमा, तूं [ सकळ ] प्रज्ञांच्या योगेंकरून सुप्रज्ञ होस. तूं [सकल] बळांनीं महाबळ [आणि] सर्वज्ञ [होस]. तूं [ सकळ ] वीर्यांच्या योगेंकरून [ आणि ] मोठेपणाच्या योगेंकरून [ महा ] वीर [ होस ]. मनुष्यांवर [कृपा]-दृष्टि करणारा [ जो तूं तो ] वैभवांनीं [महा]वैभवी झाला आहेस.

2. Thou, O Soma, hast become most wise with [thy] wisdom; thou [hast become] most powerful with [ thy ] powers, [ hast become ] all-knowing; thou [ hast become ] a hero with [ thy ] heroisms [ and ] greatness. Favouring men, thou hast become rich with [ thy ] riches.

---

२. 'हे सोमा, तूं आपल्या उत्कृष्ट प्रज्ञानांनीं सुप्रज्ञ होस, तुला उत्तम बळ आहे म्हणून तुला चांगला बळवान् असा म्हणतात, आणि तूं सर्वज्ञ होस. तुझ्या आंगीं उत्तम वीर्य असल्यामुळें आणि मोठेपण असल्यामुळें तुला उत्तम वीर असें म्हणतात. तूं मनुष्यांवर कृपा करणारा आहेस; तूं आपल्या उत्तम वैभवांनीं मोठा वैभववान् आहेस.'

सोमाला एकदा सचेतन मानिला आणि देवत्वाचा त्याजवर आरोप केला म्हणजे देवाला जीं विशेषणें लाविलीं जातात तीं सर्व त्याला लागूं लागलीं, मग त्या विशेषणांचें तात्पर्य सोमरसाच्या गुणांला अनुसरून असो किंवा नसो. त्यामुळेंच 'वैभवांनीं महावैभवी' अशीं विशेषणें योजिलेलीं आहेत.

वृत्तानुरोधेंकरून हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजेः—

तुअं सोम क्रतुभिः सुक्रतुर्भूः
तुअं दक्षैः सुदक्षो विश्ववेदाः ।
तुअं वृषा वृषत्वेभिर्महित्वा
द्युम्नेभिर्द्युम्नी अभवो नृचक्षाः ॥

राज्ञो नु ते वरुणस्य व्रतानि बृहद्गभीरं तव सोम धाम ।
शुचिष्ट्वमसि प्रियो न मित्रो दक्षाय्यो अर्यमेवासि सोम ॥ ३ ॥

राज्ञः । नु । ते । वरुणस्य । व्रतानि । बृहत् । गभीरम् । तव । सोम । धाम ।
शुचिः । त्वम् । असि । प्रियः । न । मित्रः । दक्षाय्यः । अर्यमाऽइव । असि । सोम ॥ ३ ॥

या ते धामानि दिवि या पृथिव्यां या पर्वतेष्वोषधीष्वप्सु ।
तेभिर्नो विश्वैः सुमना अहेळन्राजन्त्सोम प्रति हव्या गृभाय ॥४॥

या । ते । धामानि । दिवि । या । पृथिव्याम् । या । पर्वतेषु । ओषधीषु । अप्ऽसु ।
तेभिः । नः । विश्वैः । सुऽमनाः । अहेळन् । राजन् । सोम । प्रति । हव्या । गृभाय ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. ते व्रतानि ( =जगतो निर्वाहरूपाणि तव कर्माणि ) राज्ञो वरुणस्य नु ( =राज्ञो वरुणस्य व्रतान्येव=राज्ञो वरुणस्य व्रतानीव) [भवन्ति] । हे सोम, तव धाम (=स्थानं) बृहत् ( =महत् ) गभीरं ( =गम्भीरम्=अगाधं=दुर्ज्ञेयं ) [ भवति ] । त्वं प्रियो मित्रो न ( =मित्रदेव इव ) शुचिः ( =शोचमानः=तेजस्वी ) असि । हे सोम, [ त्वम् ] अर्यमेव ( =एतन्नामा देव इव ) दक्षाय्यः ( =संवर्धकः ) असि ॥

४. [ हे सोम], ते ( =तव ) या धामानि ( =यानि स्थानानि ) दिवि ( =द्युलोके ) या पृथिव्यां ( =यानि भूलोके ) या पर्वतेषु ( =यानि शिलोच्चयेषु ) [ यानि च ] ओषधीषु अप्सु ( =उदकेषु ) [ च वर्तन्ते ] तेभिर्विश्वैः ( =तैः सर्वैः ) [ सहितस्त्वं ] हे राजन् सोम, नः सुमनाः अहेळन् ( =अस्मभ्यं शोभनमनस्कः सुप्रसन्नश्च ) [ सन् ] हव्या ( =हव्यानि ) प्रति गृभाय ( =प्रतिगृहाण=स्वीकुरु ) ॥

द्युलोकादिषु तव बहूनि स्थानानि । तेभ्यः सर्वेभ्य आगत्य नो हविः प्रतिगृहाणेति भावः ॥

३. हे सोमा, तुझीं शासनें राजा वरुणाच्याच शासनांप्रमाणें [होत]. तुझें स्थान मोठें [आणि] गंभीर [आहे]. तूं प्रिय मित्र देवाप्रमाणें तेजःपुंज आहेस. हे सोमा, तूं अर्यमाप्रमाणें संवृद्धि करणारा होस.

3. Thy ordinances [are] even [as those] of King Varuṇa. Great [and] deep [is] thy seat, O Soma. Thou art brilliant like dear Mitra. Thou art, O Soma, a prosperer like Aryamâ.

४. [हे सोमा], तुझीं द्युलोकीं जीं स्थानें, जीं पृथिवीवर, जीं पर्वतांत, [जीं] वनस्पतींत [आणि] उदकांत [जीं स्थानें आहेत] त्या सर्वांहींकरून [युक्त असा जो तूं] हे राजा सोमा, [तो] आम्हांविषयीं सुमनस्क [आणि] प्रसन्न [होत्साता] [आमचीं] हव्यें ग्रहण कर.

4. What seats thou hast in heaven, what on earth, what in mountains, plants [and] waters—with them accept thou, O king Soma, [our] oblations, being pleased [and] unoffended with us.

३. यांत ऋषि म्हणतो, 'हे सोमा, तूं वरुणासारिखा आहेस, कारण कीं त्याचे जे नियम आहेत त्यासारिखेंच तुझे नियम नित्य आणि अचल होत, आणि वरुणाप्रमाणें तुझी राहण्याची जागा अति विस्तीर्ण आणि अति गंभीर म्हणजे फार खोल आहे. तूं मित्र देवाप्रमाणें आहेस, कारण कीं तूं त्याजप्रमाणेंच तेजःपुंज आणि सर्वांला पावन करणारा आहेस. आणि तूं अर्यमा ह्या देवासारिखा आहेस, कारण तूंहि त्याजप्रमाणेंच मनुष्यांला समृद्ध करणारा होस.' या प्रकारेंकरून सोम हा वरुण, मित्र आणि अर्यमा या तीन देवांसारिखा आहे असें यांत सांगितलें आहे.

'शासनें'='व्रतानि.' म्हणजे नियम. जसा सोमपान करितांच मनुष्यांला ज्ञान प्राप्त व्हावें, सर्व पदार्थ दिसावे, शक्ति मोठी यावी इत्यादि नियम.

'तुझें स्थान मोठें आणि गंभीर होय.' या ठिकाणीं स्थान म्हणजे घर किंवा राहण्याची जागा. ती वरुणस्थानाप्रमाणें मोठी आणि दुर्ज्ञेय आहे असें कवीचें विवक्षित होय. वरुणाच्या स्थानाविषयीं सू. २४, मं. ७ आणि सू. २५, मं. १०, ११ हीं स्थळें आणि त्यांजवरील टीका पहा.

त्वं सोमासि सत्पतिस्त्वं राजोत वृत्रहा ।
त्वं भद्रो असि क्रतुः ॥ ५ ॥ १९ ॥

त्वम् । सोम । असि । सत्ऽपतिः । त्वम् । राजा । उत । वृत्रऽहा ।
त्वम् । भद्रः । असि । क्रतुः ॥ ५ ॥ १९ ॥

---

## भाषायाम्.

५. हे सोम, त्वं सत्पतिः ( =सतां पालकः ) असि । त्वं राजा उत वृत्रहा ( =शत्रूणां हन्ता च) [ असि ] । त्वं भद्रः क्रतुः ( =कल्याणः कर्मकारी=वीरः ) असि ॥

---

'संवृद्धि करणारा'=' दक्षाय्यः.' हा अर्थ सायणांला अनुसरून केला आहे. ज्या ज्या मंत्रांत हा शब्द आला आहे ते सर्व विचारपूर्वक पाहतां, वेगवेगळ्या मंत्रांत सायणांनीं वेगवेगळा अर्थ केला आहे, एकच केलेला नाहीं, त्यामुळें खरा अर्थ काय आहे तें निश्चयानें सांगवत नाहीं. पण येथें सायणांनीं दिलेला अर्थ जुळत नाहीं असें नाहीं आणि संभवतहि आहे.

श्लोकीकरणः—

राज्ञो नु ते वरुणस्य व्रतानि
बृहद्गभीरं तव सोम धाम ।
शुचिस्त्वमसि प्रियो न मित्रः
दक्षाय्यो अर्यमेव असि सोम ॥

४. सोमाला देव मानिल्यावर इतर देवांप्रमाणें त्यालाहि हवि देऊं लागले. यांत ऋषि म्हणतो कीं, 'हे सोमा, तुझीं राहण्याचीं स्थळें अनेक आहेत, त्यांतून कितीएक द्युलोकीं आहेत, कितीएक पृथिवीवर, कितीएक पर्वतांत, कितीएक वनस्पतींत, कितीएक उदकांत आहेत. तर यांतून तूं कोठेंहि अससील तेथून येऊन सुप्रसन्नमनानें आमचें हवि ग्रहण कर.' सोमाला देव मानिल्यावर तो पृथिवी इत्यादि अनेक लोकीं अनेक स्थळीं राहतो असें म्हणणें साहजिक आहे, आणि त्याचा क्रोध होणें हें अनिष्ट आहे असें समजणें हेंहि योग्यच आहे.

वृत्तानुरोधानें खालीं दाखविल्याप्रमाणें हा मंत्र म्हटला पाहिजेः—

या ते धामानि दिवि या पृथिव्यां
या पर्वतेषु ओषधीषु अप्सु ।
तेभिर्नो विश्वैः सुमना अहेळन्
राजन्सोम प्रति हव्या गृभाय ॥

या पाठांत 'पर्वतेषु' आणि 'ओषधीषु' या शब्दांतील 'षु' अक्षराचा पुढच्या स्वराशीं संधि होत नाहीं तें ध्यानांत ठेवावें. ऋग्वेदांतील मंत्र वृत्तानुरोधानें वाचले तर असले संधि होतच नाहीत असें समजावें लागतें. आणि वृत्तबद्ध जीं वाक्यें तीं वृत्तप्रमाणेंच म्हणत असतील यांत संशय नाहीं. यावरून पाहतां हे अस-

५. हे सोमा, तूं सज्जनांचा पाळक होस, तूं राजा आणि शत्रुघातक [ होस ]. तूं उत्तम वीर होस.

5. Thou, O Soma, art a protector of the good, thou [ art ] a king, and killer of enemies. Thou art an excellent hero.

ले संधि अतिप्राचीन काळीं कवितेंत सुद्धा होतच नसतील असें अनुमान होतें, मग गद्यांत तर होणेंच नाहींत. आणि हें खरेंच आहे कीं संस्कृतांत आतां जे संधि होतात तितके संस्कृत भाषा जीवंत होती ( म्हणजे सर्व लोक ती बोलत असतील) तेव्हां होत असते तर ती भाषा कोणास साधारण व्यवहारांच्या कामीं, शेतांत, बाजारांत, दुकानांत आणि कचेरींत बोलतां आलीच नसती. यास्तव संस्कृत भाषा अगदी कृतक आहे, ती लोक कधींहि बोलत नव्हते असें अनुमान काढिलें पाहिजे एक, नाहीं तर आतां जे फार अवघड संधि होत असतात तसे प्राचीनकाळीं होत नसत असें तरी म्हण केलें पाहिजे.

५. यांत सोमदेवाचे गुण वर्णिले आहेत. 'सोमदेव हा सज्जनांचा प्रभु, सकळांचा राजा आणि शत्रूंचा नाश करणारा आणि कल्याणकारक पराक्रम करणारा वीर होय.' आपले आर्य पूर्वज युद्धपरायण असल्यामुळें ते आपल्या देवांला वीरविशेषणें लावीत असत. आणि तीं सोमदेवाला तर चांगलींच शोभतात, कारण कीं सोमपान केल्यावर योद्ध्यांला मोठें शौर्य उत्पन्न होत असे आणि मग ते दुष्टांला, आणि शत्रूंला मारून पराक्रम करून सज्जनांचा प्रतिपाळ करीत असत अशी समजूत वेदांत प्रसिद्ध आहे.

'सज्जनांचा पालक '=' सत्पतिः.' कितीएक विद्वान् ' बळवान् ' असा अर्थ करितात, पण सायणांचा अर्थच खरा दिसतो म्हणून तो आम्हीं दिला आहे.

' शत्रुघातक '=' वृत्रहा.' ' वृत्रघातक' असाहि अर्थ होईल.

श्लोकीकरणः—

तुअं सोमासि सत्पतिः  
तुअं राजोत वृत्रहा।  
तुअं भद्रो असि क्रतुः ॥

त्वं च सोम नो वशो जीवातुं न मरामहे ।
प्रियस्तोत्रो वनस्पतिः ॥ ६ ॥

त्वम् । च । सोम । नः । वशः । जीवातुम् । न । मरामहे ।
प्रियऽस्तोत्रः । वनस्पतिः ॥ ६ ॥

त्वं सोम महे भगं त्वं यून ऋतायते ।
दक्षं दधासि जीवसे ॥ ७ ॥

त्वम् । सोम । महे । भगम् । त्वम् । यूने । ऋतऽयते ।
दक्षम् । दधासि । जीवसे ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. हे सोम, त्वं नो जीवातुं वशश्च (=त्वमस्माकं जीवनमिच्छसि चेत्=वयं जीवेमेति त्वं यदीच्छसि तदानीं) [वयं] न मरामहे (=वयं न म्रियामहे=न मरिष्यामः)। [यस्त्वं] प्रियस्तोत्रो वनस्पतिः (=प्रियं स्तोत्रं यस्य स तथोक्तो वृक्षो) [भवसि]॥

त्वदधीनमस्माकं जीवनम्। यदि त्वमस्मानमरान् कर्तुमिच्छसि तर्हि वयममरा भविष्याम इति भावः॥

७. हे सोम, त्वं महे [ऋतायते] (=वृद्धायोपासकाय] त्वं [च] यूने ऋतायते (=तरुणायोपासकाय) जीवसे (=जीवितुं=चिरजीवनाय) भगं दक्षं [च] (=धनं बलं च) दधासि (=ददासि)॥

ते यथा चिरं जीवन्ति तथा तेभ्यो धनं बलं च त्वं ददासीत्यर्थः।

६. हे सोमा, आम्हीं जगावें असें तूं इच्छिशील, तर [आम्ही] मरणार नाहीं. [ तूं ] स्तोत्रलुब्ध वनस्पति [ होस ].

७. हे सोमा, तूं वृद्ध [ उपासका]ला [ आणि ] तूं तरूण उपासकाला जीवनार्थ वैभव [आणि] बळ [ हीं ] देत असतोस.

6. O Soma, wish thou our life and we do not die, [ thou ] the plant fond of praise.

7. Thou, O Soma, givest to the old [ and ] thou to the youthful worshipper riches [ and ] strength that they may live [ long ].

---

६. 'हे सोमा, आमचें आयुष्य तुझ्या हातीं आहे. जर आम्हीं न मरावें असें तूं मनांत आणिशील, तर आम्ही चिरायु होऊं, मृत्यु आम्हांला गांठणार नाहीं. आणि तुला स्तुति आवडत असते असें समजून हें स्तोत्र तुजप्रीत्यर्थ आम्ही गात आहों. तर तूं प्रसन्न होऊन आम्हीं अमर व्हावें असें इच्छ, म्हणजे आम्हीं अमर होऊं' असा ऋषीचा भावार्थ आहे.

सोम हें देवांला अर्पण्याचें पेय होय, यास्तव तें जो पिईल तो अमर होईल अशी समजूत होणें हें, सोमरसाला देव मानिल्यावर, साहजिक आहे.

वृत्तासाठीं पहिला पाद, ' तुअं च सोम नो वशो ' असा म्हटला पाहिजे.

७. ' हे सोमा, तूं उपासक जनांला धन आणि बळ हीं देऊन त्यांला चिरकाळ जीवंत राखितोस, मग ते उपासक वृद्ध असोत अथवा तरूण असोत. ' सोमदेवाला भजण्याचा प्रचार पडल्यावर तो धन देतो अशी त्याची स्तुति करणें हें स्वाभाविक आहे.

पहिल्या आणि दुसऱ्या पादांत 'त्वं' असें आहे तें ' तुअं ' असें म्हटलें पाहिजे.

त्वं नः सोम विश्वतो रक्षा राजन्नघायतः ।
न रिष्येत्त्वावतः सखा ॥ ८ ॥

त्वम् । नः । सोम । विश्वतः । रक्ष । राजन् । अघऽयतः ।
न । रिष्येत् । त्वाऽवतः । सखा ॥ ८ ॥

सोम यास्ते मयोभुव ऊतयः सन्ति दाशुषे ।
ताभिर्नोऽविता भव ॥ ९ ॥

सोम । याः । ते । मयःऽभुवः । ऊतयः । सन्ति । दाशुषे ।
ताभिः । नः । अविता । भव ॥ ९ ॥

इमं यज्ञमिदं वचो जुजुषाण उपागहि ।
सोम त्वं नो वृधे भव ॥ १० ॥ २० ॥

इमम् । यज्ञम् । इदम् । वचः । जुजुषाणः । उपऽआगहि ।
सोम । त्वम् । नः । वृधे । भव ॥ १० ॥ २० ॥

---

## भाषायाम्.

८. हे राजन् सोम, त्वं नः (=अस्मान्) विश्वतः अघायतः (=सर्वस्मादपि दुःखकारिणः शत्रोः) रक्ष (=पालय)। त्वावतः सखा (=त्वत्सदृशस्य महादेवस्य सखिभूतः कोपि) न रिष्येत् (=मा हिंसितो भवतु=मा विनश्यतु)॥

९. हे सोम, दाशुषे (=हविर्दत्तवते यजमानाय=तस्य हितार्थं) यास्ते (=तव) ऊतयः (=रक्षाः) सन्ति (=याभिरूतिभिस्त्वं यजमानान्रक्षसि) ताभिस् [त्वं] नः (=अस्माकम्) अविता (=रक्षिता) भव॥

१०. [हे सोम], इमम् (=अस्माभिः क्रियमाणं) यज्ञम् इदम् (=अस्माभिर्गीयमानं) वचः (=स्तोत्रं) जुजुषाणः (=अतिशयेन सेवमानस्) [त्वम्] उपागहि (=अस्मान् आगच्छ)। हे सोम, त्वं नो वृधे (=अस्माकं समृद्धये) [कारणं] भव॥

८. हे राजा सोमा, तूं आम्हांला सकळ शत्रूंपासून तार. तुझ्या सारिख्याचा मित्र नाश पावूं नये.

९. हे सोमा, हवि देणाऱ्या उपासकासाठीं जे [जे म्हणून] तुझे सुखकारक आश्रय आहेत, त्यांहींकरून [तूं] आमचा त्राता हो.

१०. हा याग [आणि] हें स्तोत्र प्रीतीनें सेवन करून तूं आम्हांप्रत ये. हे सोमा, तूं आमचा उत्कर्ष कर.

8. Do thou, king Soma, save us from all enemies. A friend of one like thee shall not perish.

9. Whatever beneficent helps thou hast, O Soma, for the worshipper, with them do thou become our protector.

10. Accepting with pleasure this sacrifice [and] this prayer, come thou unto [us]. O Soma, do thou become our prosperer.

---

८. 'हे सोमा, तूं आमचें संरक्षण कर आणि कोणत्याहि शत्रूपासून आम्हांला उपद्रव न होई असें कर. आम्ही तुझे मित्र आहों, आणि तुझ्यासारिख्या देवांचा जो मित्र असेल त्याला कोणाकडूनहि उपद्रव होऊं नये. यास्तव आम्हांला कोणापासूनच त्रास अथवा उपद्रव न होई असें कर.'

हा मंत्र आधुनिक वृत्ताला नीट लागतो; मात्र 'त्वं' असें आहे तें 'तुअं' असें म्हणावें लागतें. वैदिक काळीं 'तुअं' असेंच म्हणत असतील यांत संशय नाहीं.

९. 'हे सोमा, कोणता कसाहि प्रसंग आला तरी जे जे उपाय करून तूं उपासकांचें रक्षण करीत असतोस त्या सर्व उपायांनीं तूं आमचें संरक्षण करीत जा.' सोमाला देव म्हणूं लागल्यावर तो मनुष्यांचें संरक्षण अनेक उपायांनीं करीत असतो असें मानणें यांत नवल नाहीं.

तिसरा चरण वृत्तानुरोधेंकरून 'ताभिर्नः अविता भव' असा म्हणणें अवश्य आहे.

१०. गोतम ऋषि हें स्तोत्र म्हणून सोमदेवाला हवि अर्पण करीत आहे, असें आपण मनांत आणिलें पाहिजे. गोतम म्हणतो, 'हे सोमा, तूं ये आणि हा जो आम्ही तुजप्रीत्यर्थ यज्ञ करीत आहों आणि हें जें तुजप्रीत्यर्थ स्तोत्र गात आहों तें तूं मान्य करून घे. आणि तूं आमचा उत्कर्ष होई असें कर.' हा मंत्र तर श्लोकवृत्ताला अगदी सरळ लागतो. ऱ्हस्वदीर्घांचा व्यत्यय नाहीं.

**सोम॑ गी॒र्भिष्ट्वा॑ व॒यं व॒र्धया॑मो वचो॒विदः॑ ।**
**सु॒मृ॒ळी॒को न॒ आ वि॑श ॥ ११ ॥**

सोम॑ । गी॒ःऽभिः॑ । त्वा॒ । व॒यम् । व॒र्धया॑मः । व॒चः॒ऽविदः॑ ।
सु॒ऽमृ॒ळी॒कः । न॒ः । आ । वि॒श॒ ॥ ११ ॥

**ग॒य॒स्फानो॑ अमी॒व॒हा व॑सु॒वित्पु॑ष्टि॒वर्ध॑नः ।**
**सु॒मि॒त्रः सो॑म नो भव ॥ १२ ॥**

ग॒य॒ऽस्फान॑ः । अ॒मी॒व॒ऽहा । व॒सु॒ऽवित् । पु॒ष्टि॒ऽवर्ध॑नः ।
सु॒ऽमि॒त्रः । सो॒म॒ । न॒ः । भ॒व॒ ॥ १२ ॥

**सोम॑ रार॒न्धि नो॑ हृ॒दि गावो॒ न यव॑से॒ष्वा ।**
**मर्य॑ इव॒ स्व ओ॒क्ये॑ ॥ १३ ॥**

सोम॑ । र॒र॒न्धि । न॒ः । हृ॒दि । गाव॑ः । न । यव॑सेषु । आ ।
मर्य॑ःऽइव । स्वे । ओ॒क्ये॑ ॥ १३ ॥

---

### भाषायाम्.

११. हे सोम, वचोविदः (=स्तोत्राणां वेदितारो) वयं गीर्भिः (=स्तुतिभिस्) त्वा (=त्वां) वर्धयामः (=प्रवृद्धं कुर्मः)। [अतः कारणात्त्वं] सुमृळीकः (=शोभनं सुखं कुर्वन्) [सन्] नः आ विश (=अस्मान् आगच्छ) ॥

१२. हे सोम, [त्वं] नः (=अस्मभ्यं) गयस्फानः (=गृहस्य वर्धयिता) अमीवहा (=रोगाणां हन्ता) वसुवित् (=धनानां लम्भयिता) पुष्टिवर्धनः (=संपदो वर्धयिता) सुमित्रः (=शोभनो मित्रश्) [च] भव ॥

१३. हे सोम, गावो न यवसेषु आ (=गावस्तृणयुक्तेषु स्थलेषु यथा) [रमन्ते तथा] [अथवा] मर्यः स्व ओक्य इव (=मनुष्यः स्वगृहे यथा) [रमते तथा] नो हृदि रारन्धि (=अस्माकं मनसि रमस्व=तिष्ठ=अन्यत्र मा गच्छ) ॥

११. हे सोमा, स्तोत्रकुशल [ असे जे ] आम्ही [ ते ] स्तुतींनीं तुला वर्धमान करीत आहों. तूं कृपाळु होऊन आम्हांप्रत ये.

१२. हे सोमा, [ तूं ] आम्हांला गृहवर्धक, रोगनाशक, धनदायक, प्रकर्षवर्धक [ आणि ] सुमित्र [ असा ] हो.

१३. हे सोमा, गाई कुरणांत [ रमतात ] तसा [आणि] मनुष्य आपल्या घरीं [रमतो] तसा [तूं] आमच्या अंत:करणांत रम.

11. O Soma, we well-versed in praising are glorifying thee with hymns. Bountiful come thou unto us.

12. Be thou unto us, O Soma, a prosperer of [ our ] home, a destroyer of diseases, a bestower of wealth, a promoter of prosperity, [ and ] a good friend.

13. Play thou, O Soma, in our hearts as cows in meadows, as a man in his own house.

---

११. ' हे सोमा, आम्ही स्तोत्र करण्याविषयीं कुशल आहों. आणि आम्ही हीं स्तोत्रें गाऊन तुम्हांला मोठे करीत आहों, तर तूं येऊन आम्हांवर प्रसाद कर ' असा भावार्थ.

स्तोत्राच्या योगानें देवांची वृद्धि होते, म्हणजे त्यांस विशेष शक्ति येते, त्यांचा प्रभाव वाढतो, त्यांला शौर्य उत्पन्न होतें याविषयीं ऋग्वेदांत आणि दुसऱ्या वेदग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे.

प्रथम चरणांत 'त्वा' आहे तें 'तुआ' असें म्हटलें पाहिजे, म्हणजे ही ऋचा साधारण आधुनिक गायत्रीवृत्ताला बसते.

१२. ' सुमित्र.' सायणाचार्य 'चांगले आहेत मित्र ज्याचे तो ' असा अर्थ करितात. त्याप्रमाणेंच ' गयस्फानः' याचा अर्थ 'धनवर्धक' असा करितात; पण ' गय ' म्हणजे घर आणि धन असे दोनहि अर्थ होत असतात.

१३. यांत सोमानें सोडून जाऊं नये, तर सतत आमच्याच जवळ राहावें अशी ऋषि प्रार्थना करीत आहे. येथें सोम म्हणजे सोमरस असा अर्थ घ्यावयाचा नाहीं इतकेंच नव्हे, तर सोमरसाविषयीं कोणतीहि विवक्षा नाहीं. सोमरूपी जो देव त्याविषयींच मंत्र आहे. इंद्राला जशी प्रार्थना करावी कीं त्याणें सतत आमच्या पाशींच राहावें, बरें वाईट काय आहे तें आम्हांस सांगावें, आमच्या हृदयांत नित्य वास करावा, तशी ही सोमाची प्रार्थना केली आहे.

वृत्तार्थ ' गावो न यवसेषु आ ' आणि ' मर्य इव स्व ओकिए' असा पाठ म्हटला पाहिजे.

यः सोम सख्ये तव रारणद्देव मर्त्यः ।
तं दक्षः सचते कविः ॥ १४ ॥
यः । सोम । सख्ये । तव । ररणत् । देव । मर्त्यः ।
तम् । दक्षः । सचते । कविः ॥ १४ ॥

उरुष्या णो अभिशस्तेः सोम नि पाह्यंहसः ।
सखा सुशेव एधि नः ॥ १५ ॥ २१ ॥
उरुष्य । नः । अभिऽशस्तेः । सोम । नि । पाहि । अंहसः ।
सखा । सुऽशेवः । एधि । नः ॥ १५ ॥ २१ ॥

आ प्यायस्व समेतु ते विश्वतः सोम वृष्ण्यम् ।
भवा वाजस्य संगथे ॥ १६ ॥
आ । प्यायस्व । सम् । एतु । ते । विश्वतः । सोम । वृष्ण्यम् ।
भव । वाजस्य । सम्ऽगथे ॥ १६ ॥

---

## भाषायाम्.

१४. हे देव सोम, यो मर्त्यः ( =मनुष्यस् ) तव सख्ये रारणत् ( =तव मित्रत्वे भृशं रमेत ) तं [ मर्त्यं ] दक्षः कविः ( =सर्वकर्मसमर्थः प्रज्ञावान् ) [ भवान् ] सचते ( =सेवते=तं त्वं तव बलेन प्रज्ञया च रक्षसि ) ॥

१५. हे सोम, [ त्वं ] नः अभिशस्तेः उरुष्य ( =अस्मान् शापाद् रक्ष ), अंहसः नि पाहि ( =पापात् नितरां रक्ष ) । [ अपि च ] नः ( =अस्माकं ) सुशेवः सखा एधि ( =सुखकारी मित्रो भव ) ॥

१६. हे सोम, [ त्वम् ] आ प्यायस्व (=प्रवृद्धो भव ) । ते ( =तुभ्यं ) विश्वतः ( =सर्वतः ) वृष्ण्यं समेतु ( =सामर्थ्यं संगतं भूत्वा आगच्छतु ) । [ त्वं ] वाजस्य संगथे ( =संग्रामस्य संगमने=युद्धस्य प्रसङ्गे ) भव ( =तिष्ठ=पुरतो भव ) ॥

१४. हे देवा सोमा, जो मर्त्य तुझ्या मैत्रींत रममाण होतो, त्याचें प्रबळ आणि प्रज्ञावान असा जो तूं तो पाठबळ करीत असतोस.

१५. हे सोमा, [तूं] आम्हांला शापापासून रक्ष, [तूं आम्हांला] पापापासून रक्ष, [तूं] आमचा सुखकारक सखा हो.

१६. हे सोमा, तूं प्रवृद्ध हो, तुला चोहोंकडून शौर्य प्राप्त होओ. तूं संग्रामाच्या प्रसंगीं उभा राहा.

14. That mortal, O Divine Soma, who lives in thy friendship,– him dost thou, mighty and wise, follow with aid.

15. Save us from imprecation, protect [us], O Soma, from danger. Be [thou] our beneficent friend.

16. Be thou strong. May puissance come to thee from all quarters, O Soma. Be thou in the conflict of battle.

---

१४. 'रममाण होतो'='रारणत्.' म्हणजे राहतो, राहून आसक्त होतो, दुसऱ्या ठिकाणीं जाऊं इच्छित नाहीं. ऋ. १. १२२. १२ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'पाठबळ करीत असतोस'='सचते.' हें 'सचसे' या द्वितीयपुरुष रूपाऐवजीं रूप आहे असें सायणाचार्य म्हणतात तें आम्हांला खरें दिसतें. 'त्वं' शब्द नसल्यामुळें 'दक्षः' आणि 'कविः' या सामान्य पुरुषरूपाच्या संयोगामुळें 'सचते' असें तृतीयपुरुषीं रूप योजिलें आहे असें आम्हांस वाटतें.

वृत्तासाठीं 'सखिए' आणि 'मर्तिअः' असा पाठ म्हटला पाहिजे.

१५. 'शापापासून'='अभिशस्तेः.' म्हणजे शत्रूनें किंवा आपलें अनिष्ट इच्छिणाऱ्यानें आमचें वाईट इच्छून आमचें वाईट होओ असें म्हटलें असेल त्यापासून, असें तात्पर्य.

'पापापासून'='अंहसः.' म्हणजे आम्हीं केलेल्या पापापासून असें सायणाचार्य भाष्य करितात.

हा मंत्र वृत्तानुरोधेंकरून खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजेः–

उरुषिआ नो अभिशस्तेः ।
सोम नि पाहि अंहसः । इ०

१६. यांत ऋषि सोमरूपी देवाला म्हणतो, 'हे सोमा, तूं प्रबल हो, तुला सर्व बाजूंनीं शौर्य प्राप्त होओ, आणि अशा प्रकारेंकरून प्रबळ झालेला जो तूं तो, युद्धांत लढावयाला उभा रहा.' म्हणजे सोमपान करणारे जे असतात ते प्रवृद्ध आणि शौर्यवंत होऊन युद्ध करण्यास नित्य पुढें सरसावतात असें तात्पर्य.

वृत्तासाठीं 'विश्वतः सोम वृष्णिअम्' असा पाठ म्हटला पाहिजे.

**आ प्यायस्व मदिन्तम सोम विश्वेभिरंशुभिः ।**
**भवा नः सुश्रवस्तमः सखा वृधे ॥ १७ ॥**

आ । प्यायस्व । मदिन्ऽतम । सोम । विश्वेभिः । अंशुऽभिः ।
भव । नः । सुश्रवःऽतमः । सखा । वृधे ॥ १७ ॥

**सं ते पयांसि समु यन्तु वाजाः सं वृष्ण्यान्यभिमातिषाहः ।**
**आप्यायमानो अमृताय सोम दिवि श्रवांस्युत्तमानि धिष्व ॥१८॥**

सम् । ते । पयांसि । सम् । ऊम् इति । यन्तु । वाजाः । सम् । वृष्ण्यानि । अभिमातिऽसहः ।
आऽप्यायमानः । अमृताय । सोम । दिवि । श्रवांसि । उत्ऽतमानि । धिष्व ॥ १८ ॥

---

## भाषायाम्.

१७. हे मदिन्तम सोम (=अतिशयेन मदवन् सोम), [त्वं] विश्वेभिरंशुभिः (=सकलैरपि सोमलताङ्गैः) आ प्यायस्व (=प्रवृद्धो भव)। सुश्रवस्तमः सखा (=अतिशयेन संप्रयुक्तो मित्रस्) [त्वं] नो वृधे भव (=अस्माकं समृद्ध्यै भव= अस्माकं वृद्धिर्यथा भवति तथा कर्ता भव)॥

१८. [हे सोम], पयांसि (=क्षीराणि) ते सं [यन्तु] (=तव सं यन्तु=त्वामागच्छन्तु), वाजाः समु यन्तु (=अन्नानि च समायान्तु), हे अभिमातिसहः (=शत्रोर्जेतः) [सोम], वृष्ण्यानि सं [यन्तु] (=वीर्याणि त्वां समायान्तु)॥

हे सोम, आप्यायमानः (=प्रवृद्धः सन्) [त्वम्] उत्तमानि श्रवांसि (=सर्वोत्कृष्टान्यन्नानि) अमृताय (=अमृतत्वाय=अस्मादृशान् मर्त्यान् अमरीकर्तुं) दिवि धिष्व (=द्युलोके धारय)॥

यानि कानि पेयानि भक्षणीयान्युत्तमान्यन्नानि वा शौर्याणि वा वर्तन्ते तानि सर्वाण्यपि सोममाविशन्ति स च तैः समृद्धो भूत्वा अस्मादृशान् मर्त्यान् अमरान् कर्तुं यत् समर्थं तादृशं बलं धारयन् सोमो द्युलोके तिष्ठतीति भावगतं कवेः॥

१७. हे परम मादकारी सोमा, तूं सकळ वल्लींच्या योगेंकरून प्रवृद्ध हो. परम संपत्तियुक्त मित्र असा जो तूं तो आमचा उत्कर्ष कर.

१८. हे सोमा, तुझ्या अंगीं चोंहोंकडून दुग्धें [ येऊन मिळोत ], अन्नें येऊन मिळोत. हे शत्रुनाशका [ सोमा ], वीर्यें तुझ्या आंगीं येऊन [ मिळोत ]. हे सोमा, [ तूं ] प्रवृद्ध [ होऊन ] अमरत्वासाठीं द्युलोकीं उत्तम अन्नें धारण कर.

17. Be thou strong, O most intoxicating Soma, through all plants. A most wealthy friend, be thou for our prosperity.

18. May milky juices [flow] in to Thee, may foods flow in to Thee, may all prowess, O conqueror of foes, flow in to Thee. [ Being ] nourished do thou, O Soma, hold in heaven all highest food for immortality.

---

१७. 'हे सोमदेवा, ज्यांपासून तुला उत्पन्न करितात अशा सोमवेलांच्या योगानें तूं प्रवृद्ध हो, आणि आमचा उत्कर्ष होई असें कर; आणि तसें करणें तुला कठिण नाहीं, कारण तूं अतिशय श्रीमंत आहेस, आणि आपल्या उपासकांला मित्रभावानें वागवून त्यांचें कल्याण करणारा आहेस.'

या मंत्राचें वृत्त 'उष्णिक्' आहे. उष्णिक् म्हणजे गायत्रीच, मात्र तिसरा चरण झाल्यावर च्यार अक्षरांचा एक चवथा चरण जोडिलेला असतो. सू. ७९ यांतील मंत्र ४, ५, ६ हे याच वृत्तांतील आहेत त्यांच्या वृत्ताविषयीं पृष्ठ २३३ याजवरील टीपेंत सांगितलेल्या लक्षणांचा पुनः विचार करतां तिसऱ्या चरणाला गायत्रीचरण समजून शेवटीं चार अक्षरें जोडिलीं म्हणजे गायत्री वृत्ताचें उष्णिक् वृत्त होत असतें असें समजणें हें योग्य दिसतें.

१८. ऋषीचा भावार्थ असा आहे कीं, 'जीं जीं म्हणून उत्तम दुग्धादि पेयें आणि अन्नें आणि जे जे म्हणून वीर्य उत्पन्न करणारे पदार्थ ते सर्व सोमाच्या आंगीं येऊन भरतात, आणि तेणेंकरून तो पुष्ट आणि सुदृढ होऊन आम्हांसारिख्या उपासकांला अमर करण्यास समर्थ होतो आणि अशा सामर्थ्यानें परिपूर्ण असा होत्साता स्वर्गीं निवास करितो.' मनुष्याचें भौतिक जीवन पिण्याच्या आणि खाण्याच्या पदार्थांवर अवलंबून असतें, आणि तेणें-

या ते धामा॑नि ह॒विषा॒ यज॑न्ति॒ ता ते॒ विश्वा॑ परि॒भूर॑स्तु य॒ज्ञम् ।
गय॒स्फान॑: प्र॒तर॑ण: सु॒वीरोऽवी॑रहा॒ प्र च॑रा सोम॒ दुर्या॑न् ॥१९॥

या । ते॒ । धामा॑नि । ह॒विषा॑ । यज॑न्ति । ता । ते॒ । विश्वा॑ । प॒रि॒ऽभूः । अ॒स्तु । य॒ज्ञम् ।
गय॒ऽस्फान॑: । प्र॒ऽतर॑ण: । सु॒ऽवीर॑: । अवी॑रऽहा । प्र । च॒र । सो॒म । दुर्या॑न् ॥ १९ ॥

## भाषायाम्.

१९. [हे सोम], ते या धामानि (=तव यानि धामानि=यानि कानि तेजांसि) [यजमाना] हविषा यजन्ति (=हविर्दत्त्वा पूजयन्ति) ता ते विश्वा (=तानि तव सर्वाणि) [धामानि=तेजांसि] यज्ञं परिभूरस्तु (=यज्ञं परितो भावयितॄणि=यज्ञं परितः स्थातॄणि भवन्तु=यज्ञं परिवेष्टयन्तु)। गयस्फानः (=गृहस्य वर्धयिता) प्रतरणः (=प्रकर्षेण तारयिता) सुवीरः (=शोभनवीरैरुपेतः=शोभनवीर्योपेतानां पुत्राणां प्रापयिता) अवीरहा (=पुत्राणाम् अहन्ता=पुत्राणां पालयिता) [त्वं] दुर्यान् प्र चर (=अस्माकं गृहान् आगच्छ)॥

यानि यानि सोमस्य तेजांसि यजमानाः पूजयन्ति तैः सर्वैः सह आगच्छन् सोमोऽस्माकं यज्ञं परिवेष्टयत्विति भावः सोम आगते हि अस्माकं गृद्धिर्भविष्यति, अस्माकं तारणं भविष्यति, अस्माकं पुत्राः संरक्षिता भविष्यन्तीति च॥

करूनच त्याला प्रथम वीर्य आणि मग शौर्य उत्पन्न होतें. आणि सकल वनस्पतींचा राजा सोम असल्यामुळें अमरत्वसाधक सर्व रस त्याच्या आंगीं जाऊन मिळतात अशी कल्पना स्वाभाविक होय.

श्लोकीकरणः—

सं ते पयांसि समु यन्तु वाजाः
सं वृष्णिआनि अभिमातिषाहः ।
आप्यायमानो अमृताय सोम
दिवि श्रवांसि उत्तमानि धिष्व ॥

संधि होऊन उत्पन्न झालेले जे 'य' आणि 'व' त्यांचा संधिविग्रह करून बहुतकरून वाचावें लागतें. प्रस्तुत मंत्रांत 'वृष्णिआनि' असें म्हटलें पाहिजे.

१९. हे सोमा, तुझ्या ज्या विभूतींला हवीनें भजतात त्या तुझ्या सर्व विभूति आमच्या यज्ञाला परिवेष्टून राहोत. हे सोमा, घरादाराची वृद्धि करणारा, उत्तम रक्षण करणारा, वीर्यसंपन्न पुत्र प्राप्त करून देणारा, वीर्यसंपन्न पुत्रांला न मारणारा असा जो तूं तो आमच्या घरीं ये.

19. Whatever abodes of thine they worship with oblation, may they all stand around our sacrifice. Do thou, the prosperer of the house, the great helper, the giver of brave sons [and] the saviour of brave sons, come to our doors.

१९. 'हे सोमा, तुला अनेक लोक अनेक रूपांनीं भजतात; कितीएक समजतात कीं, तूं पृथ्वीवर असतोस, कितीएक स्वर्गीं राहतोस असें समजून भजतात, कितीएक तूं सोमरसांत आहेस असें समजून चालतात. तर तूं जेथें कोठें असशील त्या सर्व विभूतींनीं येऊन आमच्या यज्ञाच्या सभोंतालीं उभा राहा आणि आम्हांकडून सत्कार गृहण करून घे, कारण तूं वीर्ययुक्त पुत्रांचा दाता आणि संरक्षिता आहेस आणि तूं ज्या ज्या घरीं जातोस त्या त्या घराचा उत्कर्ष होई असें करीत असतोस.'

'विभूतींला'=' धामानि.' अक्षरशः अर्थ 'स्थानें,' 'राहण्याचीं ठिकाणें.' सायणाचार्यांनीं 'तेजें' असा अर्थ केला आहे. पर्यवसानीं भावार्थ एकच आहे. सोमाचीं अनेक 'तेजें' म्हणजे प्रादुर्भाव आहेत अथवा त्याचीं राहण्याचीं ठिकाणें आहेत असें म्हटलें तरी अर्थ एकच आहे.

श्लोकवृत्ताला बसविण्यांत या मंत्राचा खालीं दाखविल्याप्रमाणें फेरफार करावा लागतोः—

या ते धॉमानि हविषा यजन्ति
ता ते विॅश्वा परिभूॅरस्ति यज्ञम् ।
गयस्फॉनः प्रतरणः सुवीरः
अवीरहा प्र चर सोम दुर्यान् ॥

सोमो धेनुं सोमो अर्वन्तमाशुं सोमो वीरं कर्मण्यं ददाति ।
सादन्यं विदथ्यं सभेयं पितृश्रवणं यो ददाशदस्मै ॥२०॥ २२ ॥

सोमः । धेनुम् । सोमः । अर्वन्तम् । आशुम् । सोमः । वीरम् । कर्मण्यम् । ददाति ।
सदन्यम् । विदथ्यम् । सभेयम् । पितृऽश्रवणम् । यः । ददाशत् । अस्मै ॥ २० ॥ २२ ॥

अषाळ्हं युत्सु पृतनासु पप्रिं स्वर्षामप्सां वृजनस्य गोपाम् ।
भरेषुजां सुक्षितिं सुश्रवसं जयन्तं त्वामनु मदेम सोम ॥ २१ ॥

अषाळ्हम् । युत्ऽसु । पृतनासु । पप्रिम् । स्वःऽसाम् । अप्साम् । वृजनस्य । गोपाम् ।
भरेषुऽजाम् । सुऽक्षितिम् । सुऽश्रवसम् । जयन्तम् । त्वाम् । अनु । मदेम । सोम ॥ २१ ॥

---

## भाषायाम्.

२०. य [ उपासकः ] अस्मै ( =सोमाय ) ददाशत् ( =हविर्दद्यात् ) [ तस्मै ] सोमो धेनुं [ ददाति ] ( =गां ददाति ), सोमस् [ तस्मै ] आशुम् अर्वन्तं ( =शीघ्रमश्वं ) [ ददाति ] सोमस् [ तस्मै ] कर्मण्यं सदन्यं ( =गृहकार्यकुशलं ) विदथ्यं ( =यज्ञकुशलं ) सभेयं ( =सभ्यं ) पितृश्रवणं ( =पितुः श्रावयितारं=पिता यथा प्रख्यातिमान्भवेत् तथा कर्तारं ) वीरं ( =कर्मकुशलं शौर्योपेतं पुत्रं ) ददाति ॥

२१. हे सोम, युत्सु अषाळ्हं ( =युद्धेष्वनभिभवनीयं ) पृतनासु पप्रिं ( =संग्रामेषु पारयितारं ) स्वर्षां ( =स्वर्गस्य सनितारं दातारम् ) अप्साम् ( =अपां सनितारम्=उदकानां दातारं ) वृजनस्य गोपां ( =बलस्य पालकं ) भरेषुजां ( =यज्ञेषु जातं ) सुक्षितिं ( =सुनिवासस्थानं ) सुश्रवसं ( =शोभनकीर्तिमन्तं ) जयन्तं ( =विजयिनम् ) [ एतादृशं ] त्वामनु ( =त्वाम् अनुलक्ष्य ) [ वयं ] मदेम ( =हर्षयुक्ता भवेम ) ॥

२०. सोमाला जो कोण भजतो त्याजप्रत तो धेनु [ देतो ], त्याला सोम चपळ घोडे देतो, त्याला सोम पराक्रमी पुत्र प्राप्त करून देतो—कीं जो पुत्र संसारिक, यज्ञकुशल, सभ्य, आणि पित्याची कीर्ति वाढविणारा होतो.

२१. हे सोमा, युद्धांत अजिंक्य, संग्रामांत पार पाडणारा, स्वर्गाची प्राप्ति करून देणारा, उदकें देणारा, बळाचें रक्षण करणारा, यज्ञांत जन्मलेला, सुस्थळीं राहणारा, सुकीर्तिमान्, [ आणि ] विजयी [ असा जो तूं त्या ] तुला पाहून [ आम्ही ] आनंद पावूं असें होओ.

20. To him who sacrifices unto Soma he giveth a cow, Soma giveth a swift horse, Soma giveth a valorous son, that is thrifty, sacrificing, gentle [and] the maker of his father's renown.

21, May we be delighted with thee, O Soma, who art unconquerable in fights, a saviour in battles, the giver of heaven, a bestower of the waters, the protector of might, born in sacrifices, abiding in good places, of great renown,[and] a conqueror.

२०. जो कोण मनुष्य सोमाला भजून आहुत्या देतो त्याचें भाग्य काय आहे तें या मंत्रांत ऋषि सांगतो. 'सोमभक्ताच्या घरीं गुरें ढोरें, घोडे इत्यादि विपुल असतात, आणि त्याला उत्तम पुत्राचा लाभ होतो, कीं जो पुत्र शूर असून पराक्रमी असतो, संसार चालविण्याविषयीं कुशल असतो, यज्ञ करून देवांला संतुष्ट करण्याविषयीं तत्पर असतो, आणि जो संभावित असून पित्याची कीर्ति जेणेंकरून होईल असें वर्तन करणारा असतो.'

'चपळ घोडे'='आशुम् अर्वन्तम्.' जात्येकवचन.

'पराक्रमी पुत्र'='कर्मण्यं वीरम्.' म्हणजे युद्धांत लढणें इत्यादिक जीं मोठीं कृत्यें तीं करणारा. आपले आर्य पूर्वज देवांपासून कोणते इष्ट पदार्थ मागून घेत असत त्याचें हें एक चांगलें उदाहरण होय. त्यांस वीर्यवान् आणि शौर्यवान् पुत्राविषयीं फारच इच्छा असे, आणि तसा पुत्र प्राप्त व्हावा अशाविषयीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं प्रार्थिलें आहे.

'यज्ञकुशल'='विदथ्यम्'. म्हणजे 'धर्मपरायण,' धर्मावर ज्याची आसक्ति आहे असा. प्राचीन काळीं यज्ञ करणें हा-

त्वमिमा ओषधीः सोम विश्वास्त्वमपो अजनयस्त्वं गाः ।
त्वमा ततन्थोर्व१न्तरिक्षं त्वं ज्योतिषा वि तमो ववर्थ ॥ २२ ॥

त्वम् । इमाः । ओषधीः । सोम । विश्वाः । त्वम् । अपः । अजनयः ।
त्वम् । गाः ।
त्वम् । आ । ततन्थ । उरु । अन्तरिक्षम् । त्वम् । ज्योतिषा । वि ।
तमः । ववर्थ ॥ २२ ॥

## भाषायाम्.

२२. हे सोम, त्वं (=त्वमेव) इमा विश्वा ओषधीः (=इमाः पुरोदृश्यमानाः सर्वा ओषधीः) [अजनयः=निर्मितवानसि] त्वम् अपः (=त्वमेव उदकानि) [निर्मितवानसि] त्वं गाः अजनयः (=त्वमेव गा निर्मितवानसि), त्वम् उरु अन्तरिक्षम् आ ततन्थ (=त्वमेव इदं विस्तीर्णमन्तरिक्षमासमन्तात् प्रसारितवानसि) त्वं (=त्वमेव) ज्योतिषा तमो वि ववर्थ (=प्रकाशेनान्धकारं विनष्टं कृतवानसि)॥

च मुख्य धर्म होय असें मानीत यास्तव यज्ञपरायण म्हणजे धर्मपरायण असा अर्थ झाला आहे.

श्लोकीकरणः—

सोमो धेनुं सोमो अर्वन्तमाशुं
सोमो वीरं कर्मणिअं ददाति ।
सादनिअं विदथिअं सभेयं
पितृश्रवणं यो ददाशदस्मै ॥

२१. यांत ऋषि म्हणतो, ' हे सोमा, तूं युद्धांत अजिंक्य, मोठमोठे संग्रामांतहि भक्तजनांला पार पाडणारा, इत्यादि गुणांनीं भरलेला आहेस; तर असा जो तूं त्या तुला पाहून आम्हांस नित्य आनंद होत जाओ.'

' स्वर्गाची प्राप्ति करून देणारा ', ' उदकें देणारा '=' स्वर्षाम् ', ' अप्साम्.' हे अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केले आहेत आणि बरोबर आहेत असें आमचें मत आहे. मात्र ' उदकें ' याचा अर्थ येथें भौतिक उदक असा न घेतां ' अंतरिक्ष ' असा घ्यावा. ' उदकें ' म्हणजे अभ्ररूपानें उदकें जेथें वास करितात ते अंतरिक्षप्रदेश असा अर्थ वेदांत प्रसिद्धच आहे. तेव्हां उदकें देणारा म्हणजे अंतरिक्षलोक प्राप्त करून देणारा असा अर्थ सहज होईल. स्वर्गी जसे देव राहतात तसे अंतरिक्षींहि राहतात असें सांगितलें आहे, यास्तव त्याची अपेक्षा मनुष्यांनीं करणें यांत नवल नाहीं.

' बळातें रक्षणारा '=' वृजनस्य गोपाः.' सायणांप्रमाणें हा अर्थ केला आहे. कितीएक विद्वान् गांवें अथवा नगरें रक्षणारा असा अर्थ करितात पण तो प्रमाणशुद्ध दिसत नाहीं.

२२. हे सोमा, तूं ह्या सकळ वनस्पति उत्पन्न केल्या आहेस, तूं उदकें आणि तूं गाई उत्पन्न केल्या आहेस. तूं हें विस्तीर्ण अंतरिक्ष पसरिलें आहेस, तूं प्रकाशांच्या योगानें हा अंधकार नाहींसा केला आहेस.

22. Thou [hast], O Soma, [created] all these plants, thou the waters, thou hast created the cows. Thou hast spread far and wide the expanded firmament, thou hast chased off the darkness with thy light.

'यज्ञांत जन्मलेला'=' भरेषुजाः'. म्हणजे सोम काढून यज्ञांत देवांला अर्पण करितात म्हणून त्याला यज्ञांत जन्मलेला असें विशेषण दिलें आहे.

श्लोकीकरणः—

अषाळ्हं युत्सु पृतनासु पप्रिं
सुअर्षामप्सां वृजनस्य गोपाम् ।
भरेषुजां सुक्षितिं सुश्रवसं
जयन्तं त्वामनु मदेम सोम ॥

२२. यांत ऋषि सोमाला म्हणतो, 'हे सोमा, या पृथिवीवर ह्या ज्या जिकडे तिकडे वनस्पति आपण पहातों त्या तूंच निर्माण केल्या आहेस, त्याप्रमाणेंच नद्या, समुद्र, इत्यादिकांत भरलेलीं उदकें तूंच निर्माण केलीं आहेस, आणि पृथिवीवर जो हा अतिविस्तीर्ण अंतरिक्ष-प्रदेश आहे तो तूंच निर्माण केला आहेस, आणि सर्वांच्या वर द्युलोकांत जो प्रकाश भरलेला आहे तोहि तुझाच प्रताप होय.

एकदा कोणत्याहि पदार्थाला देव असें म्हटलें म्हणजे देवांनीं करावयाचीं सर्व कार्यें तो देव करितो असें समजून त्याचें वर्णन करणें हें साहजिक आहे. सोम देवाला वनस्पतींचा राजा किंवा उत्पादक असें म्हटलें तर योग्यच होय, कारण कीं वनस्पति कुटून पिळून सोमरस निर्माण करीत. पण सोमरसरूप देवतेच्या हातून अंतरिक्ष निर्माण कसें होईल आणि प्रकाशाचा प्रादुर्भाव होऊन अंधकाराचा नाश कसा होईल हें सोमरसाच्या गुणांवरून समजावयाचें नाहीं.

श्लोकीकरणः—

तुअम् इमा ओषधीः सोम विश्वा
तुअम् अपो अजनयस्तुअं गाः ।
त्वमा ततन्थ उरु अन्तरिक्षं
तुअं ज्योतिषा वि तमो ववर्थ ॥

देवेन नो मनसा देव सोम रायो भागं सहसावन्नभि युध्य ।
मा त्वा तनदीशिषे वीर्यस्योभयेभ्यः प्र चिकित्सा गविष्टौ॥२३॥२३

देवेन । नः । मनसा । देव । सोम । रायः । भागम् । सहसाऽवन् ।
अभि । युध्य ।
मा । त्वा । आ । तनत् । ईशिषे । वीर्यस्य । उभयेभ्यः । प्र । चिकित्स । गोऽइष्टौ ॥ २३ ॥ २३ ॥

---

## भाषायाम्.

२३. हे देव सोम, हे सहसावन् (=बलवन्), देवेन मनसा (=दिव्येन चातुर्येण) नः (=अस्मदर्थं) रायो भागम् अभि युध्य (=धनस्यांशमभिलक्ष्य नः शत्रुभिः सह युध्यस्व=वयं शत्रोर्धनं यथा लभेमहि तथा नः शत्रुभिः सह युध्यस्व)। त्वा (=त्वां) [कश्चिदपि] मा आ तनत् (=मा भूमौ प्रस्तृतं करोतु=मा त्वा कश्चिदपि पातयतु=जयतु)। [त्वं हि] वीर्यस्य ईशिषे (=बलस्य प्रभुरसि)। [अतः कारणाद्] गविष्टौ (=युद्धे) उभयेभ्यः प्र चिकित्स (=यजमानेभ्यस्तथा स्तोतृभ्यः उपद्रवं परिहर=ते यथा निरुपद्रवा भवेयुस्तथा कुरु)॥

२३. हे देवा सोमा, हे बलाढ्या, [ तूं ] दिव्य मनानें युद्ध करून आम्हांला संपत्तीचा भाग मिळवून दे. तुझा कोणीहि पाडाव न करो. तूं शौर्याचा प्रभु होस. [ तूं ] युद्धांत उभयतांला उपाय सांगत जा.

23. With [ thy ] divine mind, O Divine Soma, do thou O mighty [Soma], fight our battles for spoils. May no one fell thee flat. Thou art the master of prowess. Do thou care for both ( the worshipper and the singer) in battle.

---

२३. हा या एकाण्णवदाव्या सूक्ताचा उपसंहार त्याहे. आणि सूक्ताच्या शेवटीं जो वर ऋषीच्या मनांत मागावयाचा तो यांत मागितला आहे. ऋषि म्हणतो, ' हे प्रबळ सोमदेवा, आम्हांस युद्धांत जय येऊन शत्रूची लूट आम्हांस जेणेंकरून मिळे अशा रीतीनें तूं आम्हांला अनुकूळ होऊन आमच्या पक्षानें युद्ध कर. तुझा पराभव कोणीहि करूं शकणार नाहीं, कारण कीं तूं सर्व शौर्याचा धनी आहेस. यास्तव तूं यजमानांचें आणि स्तोत्रें रचणाऱ्या लोकांचें कल्याण जेणेंकरून होई तसा मार्ग त्यांला युद्धांत दाखवीत जा.'

' संपत्तीचा भाग '=' रायो भागम्.' या शब्दांचा अर्थ दुसऱ्या रीतीनें करितां येईल असें दिसत नाहीं. आणि तात्पर्य असें दिसतें कीं आम्ही दरिद्री आहोंत, आणि या जगांत अमित संपत्ति आहे हिचा लवलेशहि आम्हांजवळ नाहीं, तर शत्रूचें द्रव्य आम्हांस मिळे आणि तेणेंकरून जगांतील संपत्तीचा कांहींतरी अंश आमचे हातीं येई असें कर.

' उभयतांला उपाय सांगत जा '= 'उभयेभ्यः प्र चिकित्स.' म्हणजे यजमान लोक आणि स्तोत्रें रचणारे कवि लोक या दोघांचेंहि कल्याण जेणेंकरून होई अशी युक्ति प्रसंगीं त्यांस सुचे असें कर.

या मंत्रांत जी प्रार्थना केली आहे तिचें तात्पर्य ' युद्धांत आमचें साहाय्य कर ' इतकें आहे. प्राचीन आर्य युद्धपरायण असत त्यामुळें त्यांची प्रार्थना युद्धांत आपणास जय येओ अशी बहुतकरून नेहमीं असे.

हा मंत्र वृत्ताला नीट बसत नाहीं. च्यारहि चरण खडबडीतच आहेत; शिवाय दुसरे चरणांत अकरा अक्षरांच्या ऐवजीं तेरा अक्षरें आहेत. त्याचा निर्वाह कसा करावा याविषयीं संशय आहे. सर्वानुक्रमणिकेंत तर ह्या ऋचेचें वृत्त त्रिष्टुभ् होय असें सांगितलें आहे. त्यावरून दुसऱ्या चरणांत अकराच अक्षरें असावीं, तेरा असूं नयेत. तेव्हां दोन अक्षरांचा एकादा शब्द यांत अधिक पडला असें समजावयाचें कीं काय? तसी कल्पना केली आणि ' रायः'

## सूक्तम् ९२.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । उषा देवता । अन्त्यस्तृचोऽश्विदेवताकः । आदितस्तिस्रो जगत्यः । त्रयोदश्याद्याः षड्च उष्णिहः । शिष्टा अष्टौ त्रिष्टुभः ।

**एता उ त्या उषसः केतुमक्रत पूर्वे अर्धे रजसो भानुमञ्जते ।**
**निष्कृण्वाना आयुधानीव धृष्णवः प्रति गावोऽरुषीर्यन्ति मातरः १**

एताः । ऊम् इति । त्याः । उषसः । केतुम् । अक्रत । पूर्वे । अर्धे । रजसः । भानुम् । अञ्जते ।
निःऽकृण्वानाः । आयुधानिऽइव । धृष्णवः । प्रति । गावः । अरुषीः । यन्ति । मातरः ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. एता उ (=एताः खलु ) त्याः ( =ताः प्रसिद्धा ) उषसः केतुम् अक्रत (=प्रातःकालाभिमानिन्यो देवताः प्रकाशमकुर्वत ) [ पश्य पश्य ] । [ पश्य पश्य ] [ ता ] रजसः पूर्वे अर्द्धे ( =अन्तरिक्षस्य प्राचीने प्रदेशे ) भानुम् अञ्जते ( =प्रकाशमाविर्भावयन्ति ) । धृष्णवः आयुधानीव ( =योद्धारः स्वशस्त्राणि यथा ) [ निष्कुर्वन्ति= संस्कुर्वन्ति ] [ तथा ] निष्कृण्वानाः ( =सर्वं जगत् संस्कुर्वाणाः=सप्रकाशं कुर्वाणा ) [ एता ] अरुषीर्गावः ( =आरक्तवर्णा उषोरूपा गावः ) [ एता ] मातरः ( =एता उषोरूपा मातरः ) प्रति यन्ति ( =प्रत्यहमागच्छन्ति ) ॥

शब्दाचें विशेष प्रयोजन या पादांत नाहीं असें ध्यानांत ठेविलें तर सगळा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणतां येईलः—

देवेन नो मनसा देव सोम
भागं सहसावन्नभि युध्य ।
मा त्वा तनत् ईशिषे वीर्यस्य
उभयेभ्यः प्र चिकित्सा गविष्टौ ॥

' शांतिसूक्त ' म्हणून जो पाठ आपल्या लोकांत म्हणत असतात त्यांत या सगळ्या सूक्ताचा उच्चार येत असतो. त्याप्रमाणेंच तुळाभार करितात आणि ब्राह्मणाला यजमानाच्या वजनाएवढा कांहींतरी धान्यादि इष्ट पदार्थ तराजूंत जोखून देतात त्या वेळींहि हें सगळें सूक्त म्हणतात. शिवाय ' दुष्टजननशांति ' म्हणून जें कर्म वाईट नक्षत्रावर जन्म झाला असतां अनिष्टनिवारणार्थं करितात त्यांत 'त्वं नः सोम ' हा आठवा मंत्र, आणि ' आ प्यायस्व समेतु ते ' हा सोळावा मंत्र, हे म्हणत असतात. आणि 'अन्त्येष्टि' कर्मांतील प्रथम दिवसीं जे पिंड देतात त्यांत ' सोमो धेनुं सोमो अर्वन्तम् ' या विसाव्या मंत्राचा उच्चार करण्याची चाल आहे. परंतु हे जे वेगळे

## सूक्त ९२.

ऋषि—गोतम. देवता—उषा; मात्र शेवटच्या तीन ऋचा अश्वी देवांविषयीं आहेत. वृत्त—पहिल्या च्यार ऋचांचें जगती; १३-१८ उष्णिक्; आणि राहिलेल्या आठ ऋचांचें त्रिष्टुभ्.

१. ह्या त्या उषा [ पहा ] उजेड पाडीत आहेत, अंतरिक्षाच्या पूर्वेकडील भागीं प्रकाश प्रगट करीत आहेत. योद्धे जशीं [ आपलीं ] शस्त्रें [ लकलकीत करितात ] तशा [ सर्व जगताला ] लकलकीत करणाऱ्या [ ह्या उषा ], [ ह्या ] तांबड्या गाई, ह्या माता प्रतिदिनीं येत असतात.

## Hymn 92.

To *Ushas* ( the Goddess of the Dawn ) verses 1–15, and to *As'vins* verses 16–18. By *Gotama* (author of the previous hymn). Metre–verses 1-4 are *Jagatîs*, verses 5–12 *Trishṭubhs*, and 13–18 are in the *Ushṇik*.

1. Lo! these are the Ushases, have made the light, are manifesting the ray in the orient half of the sky. Brightening [all], as warriors [brighten their] weapons, the tawny cows, the mothers, come daily.

---

वेगळे विनियोग सांगितले त्यांचा संबंध त्या त्या कर्माशीं किती आहे त्याचा विचार केला तर, मंत्राच्या अर्थाकडेस पाहावयाचें नाहीं; त्याच्या उच्चाराचेंच फळ मुख्य आहे इतकेंच समाधान करून घेणें अवश्य पडेल.

---

१. हें सूक्त उषा या प्रातःकालरूपी देवतेविषयीं आहे. उषा ही कोण आहे आणि तिजविषयींचीं सूक्तें कशीं आहेत याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. सू. ६, मं. ३; सू. ४६, मं. १; सू. ४८, मं. १ आणि टीपा पहा. ऋग्वेदांत जीं कितीएक फारच सुंदर सूक्तें आहेत त्यांत उषेचीं सूक्तें गणिलीं जातात.

हा मंत्र समजण्यास अशी कल्पना केली पाहिजे कीं, गोतमऋषि पाहाटेस उठून पूर्वेकडेस पाहात उभा राहिला आहे, आणि उषा नुक्तीच उगवत आहे, आणि जिकडे तिकडे आपली प्रभा पाडीत आहे असें पाहून म्हणतो, ‘ ही पाहा नित्यशः येणारी उषा देवी आपला झेंडा पुढें करीत आहे, आणि पूर्वेकडील प्रदेशांत प्रकाशाचा आविर्भाव करीत आहे. ती सर्व जगताला योद्धयांच्या शस्त्रांप्रमाणें एकाएकीं पाजळून जणूं लकलकीत करीत आहे. ही तांबड्या गाईसारिखी

उदंपप्तन्नरुणा भानवो वृथा स्वायुजो अरुषीर्गा अयुक्षत ।
अक्रन्नुषासो वयुनानि पूर्वथा रुशन्तं भानुमरुषीरशिश्रयुः ॥२॥

उत् । अपप्तन् । अरुणाः । भानवः । वृथा । सुऽआयुजः । अरुषीः । गाः । अयुक्षत ।
अक्रन् । उषसः । वयुनानि । पूर्वऽथा । रुशन्तम् । भानुम् । अरुषीः । अशिश्रयुः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. अरुणा भानवः ( =आरोचमाना उषसां दीप्तयो ) वृथा (=आयासरहितं यथा तथा ) उदपप्तन् ( =उदगमन्=उद्गतवत्यः ) [ पश्य पश्य ] । [ उषसः] स्वायुजः ( =शोभनं यथा तथा युज्यमाना=रथेष्वायुज्यमानाः=सुखं युज्यमाना ) अरुषीः (=आरक्तवर्णाः ) [ स्वकीया ] गा अयुक्षत ( =स्वरथेष्वयोजयन् ) । उषसः पूर्वथा (=पूर्वदिवसेषु यथा तथा ) वयुनानि अक्रन् ( =सर्वेषां प्राणिनां ज्ञानान्यकार्षुः=सर्वेषां दर्शनं यथा भवति दर्शनाच्च तेषां ज्ञानं यथा भवति तथा प्रकाशं प्रादुरभावयन् ) । अरुषीः ( =अरुष्यः=आरक्तवर्णा उषसो ) रुशन्तं भानुम् ( =आरक्तवर्णां दीप्तिम् ) अशिश्रयुः ( =असेवन्त=प्रकटयन्ति पश्य पश्य ) ॥

माता उषा प्रतिदिवशीं अशीच येत असते.'

' ह्या त्या उषा.' उषा जरी एकलीच आहे तरी ती प्रतिदिनीं येत असते आणि सर्वकाळ ती एकसारिखीच नसते म्हणून तिला अनेकवचन लाविलें आहे. तरी, ' ही पहा उषा येत आहे ' असा एकवचनीच निर्देश इष्ट आहे. याच सूक्तांत चवथ्या मंत्रापासून पुढें सूक्ताच्या शेवटापर्यंत उषेविषयीं एकवचनीच निर्देश आहे. दुसरें अनेकवचनाचें कारण असें आहे कीं, अरुणोदयीं ज्या तांबड्या कांति उदयाचलावर दृष्टीस पडतात त्या सर्व एकच रंगाच्या असतात असें नाहीं. त्या एकमेकापासून थोडथोड्या भिन्न दिसतात, एकमेकापासून निरनिराळ्या ठिकाणीं आणि विलगविलग दिसतात व अनेक कांति आहेत असें भासत असतें असें प्रातःकाळीं पूर्वेकडेस लक्ष्य लावून पाहणाऱ्याची खात्री होईल. त्यामुळेंच त्या अनेक कांतींस ' तांबड्या गाई ' असें म्हटलें आहे.

' तांबड्या गाई.' उषा देवतेला ( अथवा नित्य येणाऱ्या ज्या उषा देवता त्यांजला ) ' तांबड्या गाई ' असें नांव वेदांत दिलेलें आहे. केव्हां केव्हां तांबडी ( अरुषी ) इतकेंच नांव आढळतें. ऋ. ३. ५५. ११ पहा. उषेला गाय आणि माता असें म्हटलें आहे तें ममतेनें म्हटलें आहे.

श्लोकीकरणः—

एता उँ त्या उषसः केतुमक्रत

२. आरक्त प्रभा सहज वर फांकल्या आहेत. [ रथाला ] सहज जोडतां येणाऱ्या तांबड्या गाई [ उषांनीं ] [ आपल्या रथांस ] जोडिल्या आहेत. उषांनीं पूर्वींप्रमाणें सकळ पदार्थ प्रगट केले आहेत. तांबड्या [ उषा ] लकलकीत प्रकाशातें धारण करित्या झाल्या आहेत.

2. The ruddy lights have flown up with ease. The Ushases have yoked [their] red cows which are easily yoked, [and] have manifested all things as heretofore. The red [Ushases] have put on [their] ruddy brightness.

---

पूर्वे अर्द्धे रजसो भानुमञ्जते।
निष्कृण्वाना आयुधानीव धृष्णवः
प्रति गावो अरुषीर्यन्ति मातरः ॥

प्राचीन काळीं अशीं पद्यें म्हणतांनां ऱ्हस्वदीर्घांचा वृत्ताला पाहिजे तसा व्यत्यय करून म्हणत असत असा आमचा नित्य अभिप्राय नाहीं, तर आधुनिक काळीं श्लोक वृत्तें मात्रासंबंधानें, अक्षरसंख्येच्या संबंधानें आणि ऱ्हस्वदीर्घांच्या संबंधानें जशीं अनतिक्रम्य निर्बंधांनीं बांधिलीं गेलीं आहेत तशीं तींच वृत्तें वैदिककाळीं तितकीं निर्बंधबद्ध नसत, म्हणजे जें अक्षर आतां ऱ्हस्व तर ऱ्हस्वच पाहिजे, दीर्घ तर दीर्घच पाहिजे, स्वरांचा संधि झालाच पाहिजे, संयोगाच्या पूर्वींचीं ऱ्हस्व अक्षरें दीर्घ झालींच पाहिजेत, दीर्घाचा उच्चार दीर्घच आणि ऱ्हस्वाचा उच्चार ऱ्हस्वच झाला पाहिजे, असे आतां नियम आहेत ते तितके कडक नियम ऋग्वेदाचीं सूक्तें रचिलीं गेलीं तेव्हां नसत. त्यामुळेंच एकच वृत्त ऋग्वेदाच्या काळीं आणि आधुनिक काळीं ऱ्हस्वदीर्घांच्या संबंधानें तरी निरनिराळें असल्याप्रमाणें दिसतें. पुरातन काळापासून घांसून घांसून कानाच्या कसोटीला लाविलेलीं आणि उत्तम प्रकारचा संस्कार पावलेलीं जीं आधुनिक वृत्तें तीं वैदिक काळीं आतांच्याप्रमाणें मधुर, सुबोध आणि निर्मळ असतील अशी आशा करणेंच योग्य नव्हे. परंतु अभंगासारिखीं जीं सर्वसाधारण वृत्तें त्यांसारखींच श्लोक वृत्तें वैदिक काळीं असावीं असें अनुमान होतें.

---

२. उषा नुक्तीच उगवत आहे असें पाहून ऋषि म्हणतो, 'ह्या पहा उषेच्या आरक्त कांति पूर्वाचलावर पक्ष्यांप्रमाणें वर उडून आल्या आहेत; ह्या पहा उषेनें आपल्या लाल आणि मस्ती न करितां रथाला जुंपूं देणाऱ्या गाई आपल्या रथास जोडिल्या आहेत, आणि अशा प्रकारेंकरून रथारूढ होऊन

अर्चन्ति नारीरपसो न विष्टिभिः समानेन योजनेना परावतः ।
इषं वहन्तीः सुकृते सुदानवे विश्वेदह यजमानाय सुन्वते ॥ ३ ॥
अर्चन्ति । नारीः । अपसः । न । विष्टिऽभिः । समानेन । योजनेन । आ । पराऽवतः ।
इषम् । वहन्तीः । सुऽकृते । सुऽदानवे । विश्वा । इत् । अह । यजमानाय । सुन्वते ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. [ उषसः ] अपसो नारीर्न ( =अलंकरणादिकर्मकुशलाः स्त्रिय इव ) समानेन योजनेन ( =एकेनैव संबन्धेन=संगता भूत्वा ) विष्टिभिः ( =स्वतेजोभिः ) आ परावतः ( =दूरदेशात् ) अर्चन्ति ( =दीप्यन्ते=दीप्तिमत्यः सत्य आगच्छन्ति ), सुकृते ( =यज्ञादीनि सत्कर्माणि कुर्वते ) सुदानवे ( =शोभनदानोपेताय ) सुन्वते ( =सोमम् अभिषुण्वते=देवानामर्थे सोममर्पयते ) यजमानाय ( =उपासकाय ) विश्वा इत् अह (=विश्वानि इत् अहानि=विश्वान्येव दिनानि=दिनेदिने ) इषं वहन्तीः ( =अन्नमानयन्त्यः=अन्नादिसंपदं प्रयच्छन्त्यः ) ॥

अस्याः पूर्वार्धो दुर्बोधः सायणेनैवं व्याख्यातः । नारीर्नेत्य उषसो विष्टिभिर्निवेशकैः स्वकीयैस्तेजोभिः समानेन योजनेनैकेनैव योजनेनोद्योगेन आ परावत आ दूरदेशात् आ पश्चिमदिग्भागादर्चन्ति । नभःप्रदेशं पूजयन्ति । कृत्स्नं जगद्युगपदेव व्याप्नुवन्तीत्यर्थः । तत्र दृष्टान्तः । अपसो न । युद्धकर्मणोपेताः पुरुषा यथा स्वकीयैरायुधैर्धाटीमुखेन सर्वं देशं व्याप्नुवन्ति तद्वत् । इति ॥

विष्टिभिःपदस्य दुर्बोधोर्थः कतिपयैर्व्याख्यातृभिर्भिन्नैः प्रकारैर्ज्ञायते । विष्टिभिः कर्मभिरिति ग्रास्मानः । विष्टिभिः क्रमेणेति रोधः ॥

येणारी जो उषा ती ही पहा कशी सर्व वस्तूंना अंधकारापासून मुक्त करून प्रगट करीत आहे, आणि येतां येतां ही पहा कशी अधिक अधिक तांबडी होत आहे.' असें हें नुक्तीच उगवणाऱ्या उषेचें वर्णन आहे.

'सहज '=' वृथा.' म्हणजे श्रमाशिवाय; पाखराप्रमाणें जणुं एकदम वर उडून. ही लुप्तोपमा ' उदपप्तन् ' ह्या क्रियापदावरून गम्यमान आहे.

' तांबड्या गाई '=' अरुषीः गाः. ' उषा ही आपल्या रथाला तांबडे घोडे अथवा तांबड्या गाई अथवा बैल जोडीत असते असें वेदांत सांगितलेलें आढळतें. ऋ. १. १२४. ११ यांत 'युङ्क्ते गवामरुणानामनीकम्' (=तांबड्या गाईंचा कळप

## पाँच ता. १ पासून ता. ३१ डिसेंबरपर्यंत.

| | रु. आ. |
|---|---|
| श्री. रा. रा. तात्यासाहेब सांगलीकर. ... ... ... | १२–१२ |
| धि. आडमिनिस्ट्रेटर सं० मोरवी. ... ... ... | २०२– ८ |
| रा. बा. रामचंद्रराव अर्काटकर डे० क० ... ... ... | १२–१२ |
| रा. सा. गोपाळराव विनायक भानप स० ज० ... ... ... | १२–१२ |
| ,, ,, काशीनाथ बळवंत पेंडसे मामलेदार. ... ... ... | १२–१२ |
| रा. रा. रणछोडदास नरोत्तमदास ओ० ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, सोमनाथ भुहिभार. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, माणकलाल णथा म्हेता नि० लाटि दरबार. ... ... | ६– ६ |
| ,, ,, वामनराव तात्या बर्वे सुभे. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, रामचंद्र धोंडदेव वेलणकर मुनसफ. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, त्रिंबकराव नारायण राजमाचीकर. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, व्यंकटराव गोरे जुनियर क्लार्क. ... ... ... | ६–१४ |
| ,, ,, श्रीकृष्ण नरहर एक्स्ट्रा अ. कमिशनर. ... ... ... | १२–१२ |
| ,, ,, केशव शिवराम भुनलकर एक्स्ट्रा अ. कमिशनर. ... | १०–१० |
| ,, ,, सदाशिव विश्वनाथ धुरंधर ब्यारिस्टर मुंबई. ... ... | ६– ० |
| ,, ,, द्वारकादास उद्धवजी मुंबई. ... ... ... | १२– ० |
| ,, ,, व्यास नानाभाई देसाई टेलिग्राफ मा. ... ... ... | १०– ० |
| ,, ,, जगजीवन भवानीशंकर कापडया अ. मा. ... ... | ६– ६ |
| ,, ,, निळकंठ जनार्दन कीर्तने. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, गणेश मोरेश्वर वाडेकर. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, मुकुंद बाळकृष्ण ऊर्फ आपा सा. बुटि. ... ... ... | १२–१२ |
| ,, ,, डा. बापु सावंत अ. हा. ब्याट. ... ... ... | १०– ० |
| ,, ,, गंगाधर यशवंत मराठे. ... ... ... | ६– ६ |
| गुजराथ व्हर्नाक्युलर सोसायटी अमदाबाद. ... ... ... | १३– ४ |
| नेटिव लायब्ररी पेण. ... ... ... | ६– ० |
| नेटिव लायब्ररी उमरावती. ... ... ... | ६– ६ |
| दि. ब. नरसिंमि अयंगार इनाम कमिशनर. ... ... ... | ६– ६ |

Registered No. 98 of 1877.



---

## सूचना.

| | रु. | आ. |
|---|---|---|
| वर्षाची वर्गणी, आगाऊ | ६ | ० |
| मुंबईबाहेर राहणारांस टपाल हंशिलाबद्दल दरवर्षाचे | ० | ६ |

---

All communications to be addressed to the Manager Mr. Mahâdev Nârâyan Pandit, No. 29 *Moroba Popatji's Oart, Kalka Devi Road, Bombay.*

---

ग्रंथकर्त्यांच्या नांवचा वगैरे सर्व प्रकारचा पत्रव्यवहार मुंबई मोरोबा पोपटजीची वाडी घर नंबर २९, या पत्त्यावर रा. रा. महादेव नारायण पंडित "म्यानेजर वेदार्थयत्न" यांच्याशीं ठेवावा.

---

**विशेष सूचना.**—आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षाची बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी.

तिकीटें पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा बर्बाळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

THE

# VEDÂRTHAYATNA

OR

AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

# वेदार्थयत्न.

## ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक ८. जानेवारी सन १८७८. मासिक भाग २२.
Vol 2 Jany 1878 No 22

मुंबई:

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

(हें सन १८६७ च्या २५ व्या आक्टाप्रमाणें नोंदलें आहे.)

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

३. [ ह्या उषा ] कुशल स्त्रियांप्रमाणें दूरून एकाच काळीं [ आपल्या ] कांतींनीं प्रकाशतात, आणि पुण्यवान्, दानशील [ आणि ] सोम काढून उपासना करणारा [ जो ] उपासक [ त्या ] साठीं प्रतिदिवसीं अन्न घेऊन येतात.

3. Like skilful damsels [the Ushases] shine from afar at one time with [their] brightness, daily carrying food for the righteous, the liberal [and] the soma-offering worshipper.

रथाला जोडिते ) असें सांगितलें आहे. ऋ. ५. ८०. ३ यांत 'तांबडे बैल रथाला जोडून येणारी उषा' (=' एषा गोभिररुणेभिर्युजाना') असें म्हटलें आहे. इतर देवहि ( इन्द्र, सविता, अग्नि हे ) तांबड्या गाई किंवा तांबडे बैल रथाला जोडून येतात असें सांगितलें आहे, त्याप्रमाणेंच उषा तांबडे बैल आणि तांबड्या गाई रथाला जोडिते अशी कल्पना आहे अशी युक्ति जरी उघड आहे, तथापि उषा देवीच्या ज्या लाल कांति अथवा लाल किरण त्याच तांबड्या गाई आणि तेच तांबडे बैल हा संबंध चांगला जुळतो.

'पूर्वीप्रमाणें'=' पूर्वथा.' म्हणजे आजपर्यंत जसे प्रगट करीत आली आहे तसे इतकें तात्पर्य.

आधुनिक श्लोकांत आणि या मंत्रांत किती अंतर आहे पहा:—

उदॅपप्तन्नॅरुणॉ भानवॉ वृथा
सुआयुजो अॅरुषीर्गा अयुक्षत ।
अक्रन्नुषासो वयुनानि पूर्वथा
रुशन्तं भानुम् अरुषीरशिश्रयुः ॥

इतर मंत्रांप्रमाणें यांतहि पादांच्या अंतीं अंतीं छांदस वृत्तांत आणि श्लोक वृत्तांत कांहींच अंतर नाहींसें होत गेलें आहे त्याजकडेस लक्ष्य द्यावें.

३. उषा पूर्वेकडून येतात त्या कशा दिसतात तें यांत सांगितलें आहे. 'उषा ह्या सगळ्या एकदम निघून दूर अंतरावरून शोभतात त्या सुंदर स्त्रियांप्रमाणें दिसतात, आणि त्या येतांना भाविक उपासकांकरितां अन्नादि संपत्ति घेऊन येत असतात; म्हणजे त्या येतात म्हणून उपासकांला अन्नादि संपत्ति मिळत असते.'

'एकाच काळीं'=' समानेन योजनेन.' हे शब्द कठिण आहेत. एकाच संबंधानें असा अक्षरशः अर्थ आहे. म्हणजे एकाच वेळीं निघून, एकदाच जणुं बांधिल्या जाऊन. या ऋचेचा प्रथमार्ध दुर्बोध आहे, भाषा पहा.

सोम काढून देवांची उपासना करणारा जो उपासक त्याचें माहात्म्य उत्तरा-

**अधि पेशांसि वपते नृतूरिवापोर्णुते वक्ष उस्रेव बर्जहम् ।**
**ज्योतिर्विश्वस्मै भुवनाय कृण्वती गावो न व्रजं व्युषा आवर्तमः ॥४**

अधि । पेशांसि । वपते । नृतूःऽइव । अप । ऊर्णुते । वक्षः । उस्राऽइव । बर्जहम् ।
ज्योतिः । विश्वस्मै । भुवनाय । कृण्वती । गावः । न । व्रजम् । वि । उषाः । आवरित्यावः । तमः ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. [ उषाः ] नृतूरिव ( =नृत्यन्ती योषिदिव ) पेशांसि अधि वपते ( =रूपाणि आधत्ते=यथा नटी इदानीमेकं रूपं ततोन्यद्रूपं पुनश्च भिन्नमेव रूपमिति रूपाणि गृह्णाति तद्वद् अनेकानि रूपाणि दर्शयति ) । [ सा ] उस्रेव बर्जहम् ( =उस्रा गौः स्वकीयं पयस उत्पत्तिस्थानं पयःपूर्ण यथाविष्करोति तथा ) वक्षः अप ऊर्णुते ( =वक्षःस्थलमनाच्छादितं करोति=दर्शयति ) विश्वस्मै भुवनाय ( =सकलाय जगते ) ज्योतिः कृण्वती ( =प्रकाशं कुर्वती ) उषाः, गावो व्रजं न ( =गावो गोष्ठमिव= गावो यथा गोष्ठं विवृण्वन्ति तथा ), तमः वि आवः ( =अन्धकारं विभिद्य बहिरागात् ) ॥

र्धात जाणविलें आहे. सर्व संपत्ति ज्या मिळतात त्या उषेच्या आगमनामुळें मिळतात आणि त्या उपासकांसच मिळतात, धर्मरहित जनांला मिळत नाहींत असा अभिप्राय आहे.

श्लोकीकरणः—

अर्चन्ति नारीरपसो न विष्टिभिः
समानेन योजनेना परावतः ।
इषं वहन्तीः सुकृते सुदानवे
विश्वेदह यजमानाय सुन्वते ॥

४. [ उषा ही ] नटीप्रमाणें वेगवेगळीं रूपें धारण करिते आणि गाईंच्या कासेप्रमाणें [आपलें] वक्षस्थळ उघडें करिते. सकळ भुवनासाठीं प्रकाश पाडणारी उषा गोठ्यांतून गाई [बाहेर पडतात] तशी अन्धकारांतून बाहेर पडली आहे.

4. [Ushas] puts on many forms like a dancing girl, [she] uncovers [her] bosom like as the cow [her] udder. Making light for the whole world Ushas has come out of darkness as cows [ do ] out of the cow-fold

४. उषा उगवते अथवा येते ती कशी दिसते त्याविषयीं यांत कल्पना केलेली आहे. ' ती एखाद्या नटीप्रमाणें वेगवेगळीं रूपें धारण करिते आणि दुभत्या गाईची कास जशी भरलेली आणि पुष्ट दृष्टीस पडते तशी ती आपलीं स्तनें उघडीं जणुं करून दाखविते. सकळ जगताला उजेड मिळे असें करणारी उषा गोठ्यांत कोंडून ठेविलेल्या गाई जशा बाहेर पडतात तशी अंधकारांतून बाहेर पडली आहे पहा.'

श्लोकीकरणः—

अधि पेशांसि वपते नृतूरिव
अपोर्णुते वक्ष उस्रेव बर्जहम् ।
ज्योतिर्विश्वस्मै भुवनाय कृण्वती
गावो न व्रजं वि उषा आवर्तमः॥

**प्रत्य॒र्ची रुश॑दस्या अदर्शि॒ वि ति॑ष्ठते॒ बाध॑ते कृ॒ष्णमभ्व॑म् ।**
**स्वरुं॒ न पेशो॑ वि॒दथे॑ष्व॒ञ्जञ्चि॒त्रं दि॒वो दु॑हि॒ता भा॒नुम॑श्रेत् ॥५॥२४**

प्रति॑ । अ॒र्चिः । रुश॑त् । अ॒स्याः । अद॒र्शि॒ । वि । ति॒ष्ठ॒ते॒ । बाध॑ते ।
कृ॒ष्णम् । अभ्व॑म् ।
स्वरु॑म् । न । पेश॑: । वि॒दथे॑षु । अ॒ञ्जन् । चि॒त्रम् । दि॒वः । दु॒हि॒ता ।
भा॒नुम् । अ॒श्रे॒त् ॥ ५ ॥ २४ ॥

**अता॑रिष्म॒ तम॑सस्पा॒रम॒स्योषा उ॒च्छन्ती॑ व॒युना॑ कृणोति ।**
**श्रि॒ये छन्दो॒ न स्म॑यते विभा॒ती सु॒प्रती॑का सौ॑मन॒साया॑जीगः ॥६॥**

अता॑रिष्म । तम॑सः । पा॒रम् । अ॒स्य । उ॒षाः । उ॒च्छन्ती॑ । व॒युना॑ ।
कृ॒णो॒ति॒ ।
श्रि॒ये । छन्द॑: । न । स्म॒य॒ते॒ । वि॒ऽभा॒ती । सु॒ऽप्रती॑का । सौ॒म॒न॒साय॑ ।
अ॒जी॒ग॒रिति॑ ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. अस्याः (=उषसो) रुशद् अर्चिः (=दीप्यमानं तेजः) प्रति अदर्शि (=पुनर्दृश्यते=यथा ह्यो, यथा पूर्वेद्युस्तथा अस्मिन्नपि दिने दृश्यते)। [तदर्चिः] वि तिष्ठते (=विविधं तिष्ठति=सर्वास्वपि दिक्षु प्रसृतं भवति) अभ्वं कृष्णं (=महान्तमन्धकारं) बाधते (=विनाशयति) [च]। दिवो दुहिता (=द्युलोकरूपस्य पितुः कन्या=उषा) विदथेषु स्वरुम् अञ्जन् न (=यथा यज्ञेषु यूपमलंकारादिभिर्व्यक्तं सुशोभितं कुर्वन्ति तथा) पेशः (=स्वकीयं रूपम्) [अनक्ति=अलंकरणैर्युक्तं करोति] [अपि च] चित्रं भानुम् अश्रेत् (=चायनीयं रमणीयं तेजः असेवत धारयति)॥

'स्वरुं न पेशो विदथेष्वञ्जन्' इत्यत्र विदथेषु यज्ञेषु स्वरुं न स्वरुनाम्ना शकलेन युक्तं यूपं यथाज्येनाध्वर्यवोऽञ्जन्। अञ्जन्ति। तद्वन्नभसि स्वकीयं पेशो रूपमुषा अनक्ति। संश्लिष्टं करोति। इति सायणपादाः॥

६. [अधुना वयम्] अस्य तमसः पारम् (=अस्य नैशस्यान्धकारस्यान्तम्) अतारिष्म (=उत्तीर्णा अभूम=उत्तीर्णाः स्मः)। उच्छन्ती (=तमो निरस्यन्ती) उषा वयुना कृणोति (=वयुनानि करोति=सर्ववस्तूनां ज्ञानानि करोति=यथा सर्वेषां

५. हिची तेजोयुक्त प्रभा [ही पहा ] पुनः दिसत आहे, [ ती ] पसरत आहे, [ती] घोर अंधकाराला पळवून लावीत आहे. यज्ञांत यूप शोभवितात तशी द्यूची कन्यका [ आपलें ] रूप [ शोभवीत आहे]; [ती] सुंदर प्रकाश धारण करीत आहे.

६. [ आम्ही ] या अंधकाराच्या पार पडलों. उषा उगवून सकळ पदार्थ दृष्टिगोचर करिते. प्रकाशणारी [ उषा ], वश करूं इच्छिणाऱ्याप्रमाणें, मधुर हांसते. सुंदर [ उषे]नें [ आमचीं ] मनें प्रसन्न व्हावीं म्हणून [ आम्हांस ] जागृत केलें आहे.

5 Her brilliant light is visible again, [it] spreads, [it] chases away the vast darkness. [She] [exhibits her] beauty as [ they exhibit ] the sacrificial post in sacrifices; the daughter of heaven has assumed a beautiful brightness.

6. We have come across this darkness [of the night ], Ushas dawning illuminates the universe. Brilliant [Ushas] smiles like one solicitous to please, fair [ Ushas ] has waked us for delight.

---

५. यांत सुद्धा नुक्तीच उगवत असलेल्या उषेविषयीं तर्क आहेत. ' कालपर्यंत पहांटेस जशी उषेची प्रभा दिसली तशी आजहि ती पुनः दिसत आहे पहा. आणि जिकडे तिकडे पसरत आहे आणि पसरतां पसरतां सर्व स्थळांतून भयंकर अंधकाराला हाकलून देत आहे पहा. उषा आपलें रूप कसें सुशोभित करीत आहे पहा—द्युची कन्यका उषा सुंदर कांतीला धारण करीत आहे.'

' यज्ञांत यूप शोभवितात तशी '= ' स्वरुं विदथेषु न अञ्जन्.' ही उपमा किंचित् दुर्बोध दिसते, आम्हीं सायणानुसारें अर्थ केला आहे.

' द्यूची कन्यका '=' दिवो दुहिता.' हें जें उषेचें सुंदर नांव त्याजविषयीं सू. ४८, मंत्र १; आणि सू. ७१, मंत्र ५ हे आणि टीप पहा.

श्लोकीकरणः—

प्रति अर्चिः रुशदॅस्या अदर्शि
वि तिष्ठते बाधते कृष्णमभ्वम् ।
स्वरुं न पेशो विदथेषु अञ्जन्
चित्रं दिवो दुहिता भानुमश्रेत् ॥

६. उषा उगवत आहे आणि अंधकार जिकडे तिकडे पळत आहे आणि सर्व पदार्थ रात्रीच्या वेळीं अंधकारानें

भास्वती नेत्री सूनृतानां दिवः स्तवे दुहिता गोतमेभिः ।
प्रजावतो नृवतो अश्वबुध्यानुषो गोअग्राँ उप मासि वाजान् ॥७॥
भास्वती । नेत्री । सूनृतानाम् । दिवः । स्तवे । दुहिता । गोतमेभिः ।
प्रजाऽवतः । नृऽवतः । अश्वऽबुध्यान् । उषः । गोऽअग्रान् । उप ।
मासि । वाजान् ॥ ७ ॥

वस्तूनां ज्ञानं भवेत्तथा तानि दृष्टानि करोति ) । विभाती ( =विशेषेण प्रकाशवती ) [ सा ] छन्दो न ( =“ वशीकरणे समर्थः पुरुष” इव) श्रिये स्मयते ( =शोभायै हसति=सशोभं यथा स्यात्तथा हसति ) । सुप्रतीका ( =शोभनाङ्गी ) [ उषाः ] सौमनसाय अजीगः ( =सौमनस्याय अस्मान् जागृतान् कृतवती=वयं प्रबुध्य सुमनसो यथा भवेम तथा कृतवती ) ॥

## भाषायाम्.

७. भास्वती ( =तेजस्विनी ) सूनृतानां नेत्री ( =सूक्तरूपाणां वाचां प्रेरयित्री ) दिवो दुहिता ( =उषा ) [ एवं ] गोतमेभिः स्तवे ( =अस्माभिर्गोतमकुलोत्पन्नैः स्तोतृभिः स्तूयते ) । [ एवं स्तुता सती ] हे उषः, [ त्वं ] प्रजावतः ( =पुत्रपौत्रादियुक्तान् ) नृवतः ( =नृभिः पुरुषैरनुचरादिभिः संयुतान् ) अश्वबुध्यान् (=अश्वैर्बुध्यान् बोद्धव्यान्=अश्वसमृद्धय‍ङ्कितान् ) गोअग्रान् ( =गवादिपशुमुख्यान् ) वाजान् ( =अन्नसंभारान्=अन्नसंपदः ) उप मासि ( =प्रयच्छसि=प्रयच्छ ) ॥

जणुं गिळून टाकिले होते ते हळुहळु पुनः दिसूं लागले आहेत असें पाहून गोतम ऋषि म्हणतो, ‘ आतां आम्ही या रात्रिमय अंधकारांतून मुक्त झालों, कारण उषा उजळून सकळ पदार्थ पुनः दिसूं लागत असें करीत आहे. सुंदर उषा एकाद्या वशीकरणपरायण पुरुषाप्रमाणें मनोहारी अशा रीतीनें हास्यमुख दिसत आहे. आम्हीं सर्वांनीं उठून मनांत आनंद मानावा म्हणून सुरूपवती उषा आम्हांस जागृत करीत आहे.’

आपल्या आर्य पूर्वजांस रात्रीच्या अंधारांतून मुक्त होण्याविषयीं केवढी उत्कंठा असे आणि ज्या तेजाच्या योगानें तो त्यांचा मनोरथ पूर्ण होई अशा सूर्यरूप अथवा उषोरूप तेजावर ते कशी प्रीति करीत असत तें या मंत्रावरून दिसून येतें. आणि प्रभातकाळीं उठून ते आनंदित होत असें अनुमान यावरून निघतें.

श्लोकीकरणः—

अतारिष्म तमसस्पारमस्य
उषा उच्छन्ती वयुना कृणोति ।
श्रिये छन्दो न स्मयते विभाती
सुप्रतीका सौमनसायाजीगः ॥

७. तेजस्विनी [ आणि ] वाचांतें प्रेरणारी [ अशी ] द्यूची कन्यका गोतमांनीं [ या प्रकारेंकरून ] स्तविली आहे. हे उषे, संततीनें भरलेली, मनुष्यांनीं भरलेली, अश्वांनीं भरलेली [ आणि ] गाईनीं परिपूर्ण [ अशी ] संपत्ति [ तूं आम्हांला ] दे.

7. Brilliant, [and] inspirer of prophetic voices, the daughter of Heaven is [thus] praised by the Gotamas. Mayest thou, O Ushas, grant a prosperity full of children, full of men, distinguished by horses, [ and ] conspicuous with cows.

७. 'वर सांगितल्याप्रमाणें आम्हीं गोतमांनीं हें उषेचें स्वरूप वर्णून तिची स्तुति केली आहे. उषा ही स्तुतिरूप ज्या वाचा ऋषींच्या मुखांतून निघतात त्यांतें प्रेरणारी होय.— तर हे उषे, तूं आम्हांला पुत्रपौत्रादिसंपन्नियुक्त, अनुचरादि पुरुषयुक्त घोडे जींत विपुळ आहेत आणि जींत गाई तर प्रथमच दृष्टीस पडतात, 'अशी समृद्धि दे.' हा आणि पुढचे दोन मंत्र उषेला संबोधून आहेत.

'वाचांतें प्रेरणारी'=' नेत्री सूनृतानाम्.' उषःकाळीं कविता करण्याचें स्फुरण कवींस होतें हें प्रसिद्धच आहे आणि पक्षिरूप गायकांला आणि दुसऱ्या गवयांला त्या वेळीं गायनाची स्फूर्ति होते हें सर्वांस ठाऊक आहेच. सू. ४८, मं. २ आणि टीप पहा.

'मनुष्यांनीं भरलेली '=' नृवतः.' म्हणजे चाकर भृत्य जींत विपुळ आहेत ती असें सायणाचार्य म्हणतात.

'दे'='उप मासि.' अक्षरशः, 'देतोस,' म्हणजे 'देशीलच.'

श्लोकीकरणः—

भासुअती नेत्तरीॅ सूनृतानां
दिवः स्तवे दुहितॉ गोतमेभिः ।
प्रजावतो नृवतॉ अश्वबुध्यान्
उषो गॉअग्रान् उप मासि वाजान् ॥

उषस्तमश्यां यशसं सुवीरं दासप्रवर्गं रयिमश्वबुध्यम् ।
सुदंससा श्रवसा या विभासि वाजप्रसूता सुभगे बृहन्तम् ॥८॥

उषः । तम् । अश्याम् । यशसम् । सुऽवीरम् । दासऽप्रवर्गम् । रयिम् । अश्वऽबुध्यम् ।
सुऽदंससा । श्रवसा । या । विऽभासि । वाजऽप्रसूता । सुऽभगे । बृहन्तम् ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. हे उषः, [ अहं ] तं यशसं ( =महायशोयुक्तं ) सुवीरं ( =शौर्योपेतपुत्रपौत्रादिसंयुतं ) दासप्रवर्गं ( =बहुभिः कर्मकरैर्भृत्यैर्युतम् ) अश्वबुध्यम् ( =अश्वैर्बोद्धव्यं=शोभनाश्वैरङ्कितं) बृहन्तं ( =भूयांसं ) रयिं ( =धनम् ) अश्याम् ( =प्राप्नुयाम् ) या ( =यं त्वं ) वाजप्रसूता ( =उपासकेभ्यो दत्तान्ना ) हे सुभगे, सुदंससा श्रवसा ( =शोभनकर्मयुक्तेन स्तोत्रेण द्वारा=सुकृत्ययुक्तेन स्तोत्रेण स्तुता सती ) विभासि (=विभया ददासि=यथा तादृशं धनं लभ्येत तथा व्युच्छसि ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । सुचरितेभ्यः स्तोतृभ्यो यद् धनं, यद् यशः, यान् सुवीरान्, यं दासानां महान्तं वर्गं, यांश्च शोभनान् अश्वान् व्युच्छन्ती त्वं प्रयच्छसि तान् सर्वान् मे प्रयच्छेति ॥

८. हे उषे, यशानें भरलेली, सुवीरांनीं युक्त, अनेक दासांनीं परिपूर्ण [ आणि ] घोड्यांच्या योगानें प्रख्यात [ अशी ] संपत्ति मला लाभो; कीं जी मोठी संपत्ति सुचरितपर स्तोत्राच्या योगानें [प्रसन्न होऊन तूं ], हे अन्नदायिके सुंदरी, आपल्या प्रकाशाच्या प्रभावानें [ उपासकजनांला ] देत असतेस.

8. O Ushas, may I obtain that great wealth, full of glory, full of brave heroes, full of numerous servants, distinguished for [ its excellent ] horses, which O fortunate [ Ushas ], thou the bestower of food givest by thy shining [ when praised] with praises accompanied by good deeds.

८. भावार्थः—' हे सौभाग्यवती उषे, सत्कर्में आचरून तुझें स्तवन करणाऱ्या उपासकांला जें वैभव, जे पुत्रपौत्रादि शूर वंशज, जे अनेक दासजन, जें धन, जे घोडे तूं आपल्या प्रकाशानें देत असतेस ते सर्व मला प्राप्त होओत.'

' अनेक दासांनीं परिपूर्ण'=' दासप्रवर्गम्.' 'दास' या शब्दाचा मूळ अर्थ जो आर्य नव्हे तो, म्हणजे कोळी, खोंड, इत्यादिक जे या देशांतील मूळचे रानटी लोक त्यांतील मनुष्य. आणि ह्या लोकांस आर्यलोकांनीं जिंकून आपल्या घरीं राबवूं लागले म्हणून घरीं राबणारे अथवा भृत्यलोक त्यांसहि 'दास' हें नांव पडलें. सू. ३३, मं. ४ आणि त्याजवरील आमची टीप पहा.

' घोड्यांच्या योगानें प्रख्यात '=' अश्वबुध्यम्.' वरच्या मंत्रांत ' अश्वबुध्यान् ' हें पद आलें आहे तें पहा. म्हणजे जींतील घोडे इतके उत्तम असतात कीं त्यांच्यामुळें ती पहाण्याविषयीं लोकांना इच्छा उत्पन्न होते. ' अश्वबुध्य ' हा शब्द जेथें जेथें ऋग्वेदांत आला आहे तेथें तेथें तो संपत्तिवाचक शब्दाच्या विशेषणरूपानें योजिलेला असतो.

' आपल्या प्रकाशाच्या प्रभावानें देत असतेस '=' विभासि.' अक्षरशः अर्थ ' प्रकाशतेस,' म्हणजे अशा रीतीनें तूं प्रकाशतेस कीं तेणेंकरून सहजच संपत्ति मिळत असते. अशा प्रकारचे प्रयोग वेदांत पुष्कळ ठिकाणीं येत असतात. सू. ७९, मं. ५ आणि त्याजवरील 'प्रकाशाच्या योगानें धन दे'='रेवत् दीदिहि,' याविषयीं टीप पाहा. शिवाय ऋ. ५. २५. ३ यांत 'अग्ने रायो दीदिहि नः'(=हे अग्नी, तूं आम्हांकरितां धन प्रकाश=असा प्रकाश कीं जेणेंकरून आम्हांस धन मिळेल ) असें म्हटलें आहे. या प्रकारचीं

**विश्वा॑नि दे॒वी भुव॑नाभि॒चक्ष्या॑ प्रती॒ची चक्षु॑रु॒र्वि॒या वि भा॑ति।**
**विश्वं॑ जी॒वं च॒रसे॑ बो॒धय॑न्ती॒ विश्व॑स्य॒ वाच॑मविदन्मना॒योः ॥ ९ ॥**

विश्वा॑नि । दे॒वी । भुव॑ना । अ॒भि॒ऽचक्ष्य॑ । प्र॒ती॒ची । चक्षुः॑ । उ॒र्वि॒या । वि । भा॒ति॒ ।
विश्व॑म् । जी॒वम् । च॒रसे॑ । बो॒धय॑न्ती । विश्व॑स्य । वाच॑म् । अ॒वि॒द॒त् । म॒ना॒योः ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. देवी ( =द्योतमाना ) [ उषा ] विश्वानि भुवना ( =सर्वाणि भूतजातानि=सर्वमपि जगत् ) अभिचक्ष्य ( =प्रकाश्य ) प्रतीची ( =प्रत्यङ्मुखी सत्यागच्छन्ती ) चक्षुः ( =चक्षुष्मती=तेजस्विनी ) [ सती ] उर्विया (=विस्तीर्ण यथा तथा ) वि भाति ( =विशेषेण भ्राजते ) । विश्वं जीवं ( =सकलमपि प्राणिजातं ) चरसे ( =चरणाय=स्वस्वव्यापारेषु यथा सर्वे प्राणिनो व्यापृता भवेयुस्तथा तान् ) बोधयन्ती ( =उद्बोधयन्ती ) [ सा ] विश्वस्य मनायोः ( =सकलस्य वाक्चातुर्यसमर्थस्य कवेः ) वाचं ( =कवनरूपां वाणीम् ) अविदत् ( =अलभत=प्रयच्छति=सर्वेपि मत्सदृशाः कवयः स्तुतिरूपं काव्यं कर्तुं समर्था यथा भवेयुस्तथा तेषु वाचं प्रेरयति ) ॥

दुसरीं उदाहरणें पुष्कळ आहेत. ऋ. ८. ४४. १५ पहा.

या मंत्राचे पहिला, दुसरा आणि चवथा हे चरण शुद्ध श्लोकाप्रमाणेंच म्हणतां येतात—

उषस्तमश्यां यशसं सुवीरं
दासप्रवर्गं रयिमश्वबुध्यम् ।
सुदंससा श्रवसा॑ या वि भासि
वाजप्रसूता सुभगे बृहन्तम् ॥

९. [ ही ] देवी सकळ भुवनें पाहून परत येते आणि प्रकाशवती [उषा] सर्वत्र प्रकाशते. [ती] सकळ जीवांला जागे करून [आपआपल्या] कामीं लाविते, [ आणि ] सकळ कविजनांला वाचा फुटविते.

9. The goddess having seen all the world returns, and full of brightness shines far and wide. Waking all life to action she finds the voice for each poet.

९. 'ही उषा सकळ भुवनें पाहून पाहून आतां आम्हांजवळ परत येत आहे आणि विशेष प्रकाशमान होत्साती जिकडे तिकडे प्रकाशत आहे. ती जिकडे जिकडे जाते तिकडे तिकडे सकळ प्राण्यांस उठवून आपआपल्या कामीं लाविते आणि मजसारिखे जे कविजन त्यांला वाचा फुटे आणि ते स्तोत्रें जीं तद्रूप कविता रचीत असें करिते.' याप्रमाणें उषेविषयीं यांत स्वभावोक्ति आहे. उषा ही सकळ भुवनें पाहत पाहत फिरून आम्हांकडेस येते असें म्हणणें, ती सर्व प्राण्यांस जागे करिते आणि कविजनांच्या आंगीं स्फूर्ति आणिते असें म्हणणें यांत सहजोक्तीचें सौंदर्य आहे. या कवितेंत जरी प्रासादि अथवा यमकादि चमत्कार नाहींत तरी प्रसाद आणि आह्लादकत्व हीं विशेष आहेत.

'प्रकाशवती '=' चक्षुः.' म्हणजे जगाचा डोळाच जणुं अशी जी ती. 'चक्षु' शब्दाचा 'चक्षुष्मान् '= तेजस्वी असा अर्थहि वेदांत होत असतो.

'सर्वत्र '=' उर्विया.' अक्षरशः 'विस्तीर्णपणें.' 'उर्विया' हें येथें क्रियाविशेषण समजावयाचें आहे. यास प्रमाण ऋ. ५. २८. १ यांतील 'प्रत्यङ्ङुषसम् उर्विया विभाति' या पादावरील सायणभाष्य होय. इतर ठिकाणीं तरी 'उर्विया' हें क्रियाविशेषणच चांगलें जुळतें.

'आपापल्या कामीं लाविते.' प्रभातकाळीं पक्षी उठून गाऊं लागतात, हरणें चरूं लागतात, मनुष्यें बाहेर फिरूं लागतात, विद्यार्थी वोकूं लागतात इत्यादि व्यापार ज्याचा तो करूं लागतो हें प्रसिद्धच आहे. सू. ४८, मं. ५, ६ आणि त्याजवरील टीपा पहा. उषेविषयीं या गोष्टीवर पुढेंहि पुष्कळ ठिकाणीं वर्णन येत जाईल.

श्लोकीकरणः—

विश्वानि देवी भुवनाभिचक्ष्य<br>
प्रतीची चक्षुः उर्विया वि भाति ।<br>
विश्वं जीवं चरसे बोधयन्ति<br>
विश्वस्य वाचम् अविदन्मनायोः ॥

'वाचम्' यांतील 'च' दीर्घ म्हणावा लागतो. आणि बहुतकरून असा नियम आढळतो कीं ऱ्हस्व अक्षराच्या पुढ

पुनः॑पुनर्जा॒यमा॑ना पु॒रा॒णी स॑मा॒नं वर्ण॑म॒भि शु॒म्भमा॑ना ।
श्व॒घ्नीव॑ कृ॒त्नुर्वि॒ज॑ आमिना॒ना मर्त॑स्य दे॒वी ज॒रय॒न्त्यायुः॑ ॥१०॥ २९

पुनः॑ऽपुनः । जा॒यमा॑ना । पु॒रा॒णी । स॒मा॒नम् । वर्ण॑म् । अ॒भि । शु॒म्भमा॑ना ।
श्व॒घ्नीऽइ॑व । कृ॒त्नुः । वि॒जः॑ । आ॒ऽमि॒ना॒ना । मर्त॑स्य । दे॒वी । ज॒रय॑न्ती । आयुः॑ ॥ १० ॥ २९ ॥

## भाषायाम्.

१०. पुनःपुनर्जायमाना ( =प्रतिदिनं प्रातःकाले प्रादुर्भवन्ती ) पुराणी ( =चिरंतना ) [ सत्यपि ] समानं वर्णम् अभि शुम्भमाना ( =एकमेव वर्णं रूपमभिगृह्य शोभमाना=नित्यमेकेनैव रूपेण युक्ता दृश्यमाना ) [ उषा ] देवी, विजः कृत्नुः श्वघ्नीव (=उद्वेजकः सर्वस्वहरणेनोद्वेगं कारयन् द्यूतकर्मकुशलतरः कितव इव=एतादृशः कितवो यथान्यस्य धनं क्रमेण हरति तथा ), आमिनाना ( =आयुर्नाशयन्ती सती ), मर्तस्य आयुः ( =मरणधर्मणो मनुष्यस्य आयुः प्राणं ) जरयन्ती ( =जीर्णं कुर्वती= ऊनयन्ती ) [ वर्तते ] ॥

श्वघ्नीव कृत्नुर्विज आमिनानेति वाक्यं सायण एवं व्याचष्टे। उषाश्च पुनःपुनर्जायमानेत्युक्तम्। अतः सैवायुर्जरयति। तत्र दृष्टान्तः। कृत्नुः कर्तनशीला श्वघ्नीव व्याधस्त्रीव। सा यथा विजश्चलतः पक्षिण आमिनाना पक्षादिच्छेदनेन हिंसन्ती तेषामायुर्जरयति तद्वदिति। विजःशब्दो दुर्बोधः, सः 'अर्यः पुष्टीर्विज इवामिनाति' ( ऋ. २. १२. ५) इत्यत्र उद्वेजकशब्देन विवृतः सायणेन। तदेव विवरणमनुसृतमत्रापि मया, उपायान्तराभावात् ॥

'म्' आला आणि 'म्'च्या पुढें स्वर आला तर तें ऱ्हस्व अक्षर संयोगाच्या पूर्वी दीर्घ म्हणतां आलें असतें तसें दीर्घ म्हणावें. या मंत्राच्या पुढच्या मंत्रांतच 'वर्णम् अभि शुम्भमाना' यांतील 'र्ण' दीर्घ म्हणावा लागतो. आणि 'म्'च्या योगानें म्हणतां येतो. २३ व्या सूक्तांतील ५ व्या मंत्रांत 'युवम् एतानि' हेंहि तसलेंच उदाहरण होय. दुसरा नियम असा दिसतो कीं विसर्गाच्या पूर्वी ह्रस्व अक्षर असलें आणि त्या विसर्गाच्या पुढें स्वर येऊन विसर्गाचा रेफ झाला तरी ह्रस्व अक्षर, विसर्ग वेगळाच म्हणून दीर्घ करतां येतें. उदाहरण ' चक्षुः उर्विया.'

१०. पुनः पुनः जन्मास येणारी [ आणि ] पुरातन [ असूनहि ] एकच रूपानें शोभणारी [ ही उषा ] देवी, धूर्त [आणि] नागविणाऱ्या द्यूतकाराप्रमाणें, मर्त्यांचें आयुष्य हळुहळु हरण करणारी [ होय ].

10. [ She who is ] born again, and again, [ who is ] ancient [ and yet ] appears of the same colour—the goddess [ Ushas ] wears out the life of the mortal, a depriver like a cunning [ and ] deceitful gamester.

---

१०. 'उषा पुनः पुनः जन्मते, म्हणजे प्रतिदिनीं जन्मते आणि फार दिवसांपासून ती या जगांत आहे, आणि त्यामुळें ती म्हातारी असावी आणि म्हातारपणाची छाया तिला मारावी, आणि जेव्हां जेव्हां जन्मते तेव्हां बाळपणाची कांति तिला असावी; पण वस्तुतः तसें कांहीं नाहीं. तिचें स्वरूप नित्य एकच असतें, त्यांत न्यूनाधिक कांहीं होत नाहीं, आणि तिचा रंगहि बदलत नाहीं. पण ती स्वतः जरी आहे तशीच नित्य राहते, तथापि ती मर्त्यांचें आयुष्य हळुहळु हरण करून त्यांच्या स्वरूपाला बाळपणापासून तरुणपण, तरुणपणापासून वृद्धपण अशा वेगवेगळ्या दशा प्राप्त करून देऊन त्यांचा रंग बदलविते. आणि एकादा धूर्त आणि बुचाडून घेणारा जुगाऱ्या जसा हळुहळु द्रव्य जिंकून घेऊन न समजतां एकाएकीं शेवटीं फसवितो, तशी उषा सर्व मर्त्यांचें आयुष्य हरण करून त्यांस फसविते.'

'पुनः पुनः जन्मास येणारी.' म्हणजे दरदिवस सकाळीं उगवणारी.

'द्यूतकाराप्रमाणें'='श्वघ्नी इव.' 'श्वघ्नी' शब्दाचा द्यूतकार हा अर्थ सायणांनींच ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं केला आहे. पारधी असाहि एक दोन स्थळीं अर्थ केला आहे.

लग्नांत वरानें वधूचें 'पाणिग्रहण' केल्यावर ब्राह्मणांनीं आयुष्य वर्धमान म्हणजे वृद्धिंगत व्हावें या हेतूनें आयुर्वर्धक मंत्र म्हणून आशीर्वाद देण्याची चाल आहे. ज्या मंत्राच्या शेवटीं 'आयुः' हा शब्द येतो असे सहा मंत्र म्हणत असतात. त्यांत प्रस्तुत मंत्राचाहि पाठ कोण कोण म्हणतात. कारण त्याच्या शेवटीं 'आयुः' असा शब्द आला आहे, परंतु ज्याणें हा मंत्र अशा कामीं प्रथम लावून दिला (नारायणभट्टी प्रयोगरत्नादिक ग्रंथांत हे मंत्र म्हणावे म्हणून सांगितलें आहे) त्याला याचा अर्थ समजला नाहीं, कारण जर समजता, तर ज्यांत आयुष्याची वृद्धि नसतां हानि सांगितली आहे असा मंत्र अशा मंगळकार्यांत आणि ब्राह्मणांच्या आशीर्वादांत तो घातलाच नसता. पण

हे जे विनियोग करितात त्यांची बहुतकरून सर्वत्र हीच अवस्था आहे. दक्षिणेंत बहुतकरून विवाहाच्या वेळीं जे आयुर्मंत्र म्हणतात ते ऋ. १. ८९. ८; १. ९६. ८; १०. ३६. १४; १०. ८५. १९; १०. १०७. २ हे होत. हे मंत्र आयुःसूक्तापैकीं आहेत. 'आयुःसूक्त' सगळें 'मंत्रपुष्प' म्हणून ज्या मंत्रांनीं पुष्पाञ्जलि देवावर घालितात त्यांस म्हणतात. हें 'आयुःसूक्त' ऋग्वेदांत ज्या ज्या मंत्रांच्या शेवटीं "आयुः" शब्द येतो ते सगळे एकत्र घालून केलें आहे. ते मंत्र सोळा आणि ऋग्वेदपरिशिष्टांतून घेतलेले दोन मिळून अठरा आहेत. तें सूक्त येणेंप्रमाणें:—

भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा
भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्
व्यशेम देवहितं यदायुः ॥ १. ८९. ८
पुनः पुनर्जायमाना पुराणी
समानं वर्णमभि शुम्भमाना ।
श्वघ्नीव कृत्नुर्विज आमिनाना
मर्तस्य देवी जरयन्त्यायुः ॥ १. ९२. १०
द्रविणोदा द्रविणसस्तुरस्य
द्रविणोदाः सनरस्य प्र यंसत् ।
द्रविणोदा वीरवतीमिषं नो
द्रविणोदा रासते दीर्घमायुः ॥ १.९६.८
उदीर्ध्वं जीवो असुर्न आगाद्
अप प्रागात्तम आ ज्योतिरेति ।
आरैक्पन्थां यातवे सूर्याय
अगन्म यत्र प्रतिरन्त आयुः॥१.११३.१६
दक्षिणावतामिदिमानि चित्रा
दक्षिणावतां दिवि सूर्यासः ।
दक्षिणावन्तो अमृतं भजन्ते
दक्षिणावन्तः प्रतिरन्त आयुः॥१.१२५.६
इमे भोजा अङ्गिरसो विरूपा
दिवस्पुत्रासो असुरस्य वीराः ।
विश्वामित्राय ददतो मघानि
सहस्रसावे प्रतिरन्त आयुः ॥ ३.५३.७
यथा ह त्यद्वसवो गौर्यं चित्
पदि षिताममुञ्चता यजत्राः ।
एवो ष्वस्मन्मुञ्चता व्यंहः
प्र तार्यग्ने प्रतरं न आयुः ॥ ४. १२. ६
[यशस्करं बलवन्तं प्रभुत्वं
तमेव राजाधिपतिर्बभूव ।
संकीर्णनागाश्वपतिर्नराणां
सुमङ्गल्यं सततं दीर्घमायुः] परिशिष्टे ॥
गोमायुरदादजमायुरदात्
पृश्निरदाद्धरितो नो वसूनि ।
गवां मण्डूका ददतः शतानि
सहस्रसावे प्रतिरन्त आयुः।७.१०३.१०
ऋदूदरेण सख्या सचेय
यो मा न रिष्येद्धर्यश्व पीतः ।
अयं यः सोमो न्यधाय्यस्मे
तस्मा इन्द्रं प्रतिरमेम्यायुः ॥ ८.४८.१०
अप त्या अस्थुरनिरा अमीवा
निरत्रसन्तमिषीचीरभैषु ।
आ सोमो अस्माँ अरुहद्वि हाया
अगन्म यत्र प्रतिरन्त आयुः ॥८.४८.११
इन्द्रावरुणा सौमनसमदृप्तं
रायस्पोषं यजमानेषु धत्तम् ।
प्रजां पुष्टिं भूतिमस्मासु धत्तं

दीर्घायुत्वाय प्र तिरतं न आयुः॥८.५९.७
वृष्टिं दिवः शतधारः पवस्व
सहस्रसा वाजयुर्देववीतौ ।
सं सिन्धुभिः कलशे वावशानः
समुस्रियाभिः प्रतिरन्न आयुः॥९.९६.१४
सविता पश्चातात्सविता पुरस्तात्
सवितोत्तरात्तात्सविता धरात्तात् ।
सविता नः सुवतु सर्वतातिं
सविता नो रासतां दीर्घमायुः॥१०.३६.१४
नवो नवो भवति जायमानः
अह्नां केतुरुषसामेत्यग्रम् ।
भागं देवेभ्यो वि दधात्यायन्
प्र चन्द्रमास्तिरते दीर्घमायुः॥१०.८५.१९
विद्युन्न या पतन्ती दविद्योद्
भरन्ती मे अप्या काम्यानि ।
जनिष्टो अपो नर्यः सुजातः
प्रोर्वशी तिरत दीर्घमायुः ॥ १०.९५.१०
उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थुर्
ये अश्वदाः सह ते सूर्येण ।
हिरण्यदा अमृतत्वं भजन्ते
वासोदाःसोम प्र तिरन्तआयुः१०.१०७.२
[न तद्रक्षांसि न पिशाचाश्चरन्ति
देवानामोजः प्रथमजं ह्येतद् ।
यो बिभर्ति दाक्षायणा हिरण्यं
स देवेषु कृणुते दीर्घमायुः ॥
स मनुष्येषु कृणुते दीर्घमायुः] परिशिष्टे ॥

श्लोकीकरणः–

पुनः पुनर्जायमाना पुराणी
समानं वर्णम् अभि शुम्भमाना ।
श्वघ्नीव कृत्नुर्विज आमिनाना
मर्तस्य देवी जरयन्ती आयुः ॥

व्यूर्ण्वती दिवो अन्ताँ अबोध्यप स्वसारं सनुतर्युयोति ।
प्रमिनती मनुष्या युगानि योषा जारस्य चक्षसा वि भाति ॥११॥

विऽऊर्ण्वती । दिवः । अन्तान् । अबोधि । अप । स्वसारम् । सनुतः । युयोति ।
प्रऽमिनती । मनुष्या । युगानि । योषा । जारस्य । चक्षसा । वि । भाति ॥ ११ ॥

---

### भाषायाम्.

११. दिवः अन्तान् (=द्युलोकस्य प्रान्तान्) व्यूर्ण्वती (=तमसो मुक्तान् कुर्वती) [उषा] अबोधि (=प्रत्यबुध्यत=जागृता जातास्ति) [पश्य]। [सा] स्वसारं (=रात्रिरूपां स्वकीयां स्वसारं) सनुतः अप युयोति (=अपगतां कृत्वान्तर्हितां करोति=विनाशयति)। मनुष्या युगानि (=मनुष्याणि युगानि=मनुष्यसंबन्धीनि युगानि=मनुष्याणां कालान्) प्रमिनती (=हिंसन्ती) जारस्य योषा (=सूर्यरूपस्य जारस्य कान्ता) [सा] चक्षसा वि भाति (=स्वकीयेन तेजसा विशेषेण भ्राजते)॥

११. आकाशाच्या प्रांतांला [ अंधकारापासून ] मुक्त करणारी [उषा ही पहा] जागृत होत आहे, [ आणि ] [ आपल्या ] वहिणीला दूर पिटून देत आहे. मानवांचे दिवस नाहींसे करणारी [ अशी जी ] [ सूर्यरूप ] जाराची प्रिया [ ती आपल्या ] प्रकाशानें प्रकाशत आहे.

11. The uncoverer of heaven's frontiers, [ Ushas ] has awoke. She chases away [ her ] sister. The destroyer of human ages, [and] the beloved of the [ solar ] lover shines with her brightness.

---

११. पुनः उगवणाऱ्या उषेकडेस पाहून अथवा पाहिल्याप्रमाणें करून ऋषि म्हणतोः—' आकाशप्रदेशांला अंधकारांतून मुक्त करणारी उषा ही पहा येऊन आपल्या काळ्या वहिणीला (म्हणजे रात्रीला) हाकून देत आहे. मनुष्यांचे दिवस प्रत्यहीं कमी कमी करीत जाणारी जी सूर्यरूपी जाराची प्रिया उषा ती पहा कशी आपल्या प्रकाशानें प्रकाशत आहे.'

' बहिणीला '=' स्वसारम्.' वेदांत उषा आणि रात्र यांस परस्पर बहिणी असें म्हणण्याचा प्रचार आहे. नित्य एकत्र असतात, एकमेकाला सोडीत नाहींत म्हणून बहिणी असें ऋषींनीं म्हटलेलें आहे. ऋ. १. ११२.२, ३; १०. १२७. ३; १. १२४. ८ पहा.

' मानवांचे दिवस '=' मानुषा युगानि.' म्हणजे मनुष्यांचे जे घटिका, प्रहर, दिवस, महिना, वर्ष इत्यादिक काळ ते. ' युग ' शब्दाचा ऋग्वेदांत हाच अर्थ होतो. दिवस असा अर्थ सायणांनींच पुष्कळ स्थळीं ( योग्यरीतीनें ) केलेला आहे. सहस्रावधि आणि लक्षावधि वर्षांचीं जीं युगें आपण पुराणादिकांत ऐकतों तीं वेदांत ऐकून ठाऊक नाहींत. कृत, त्रेता, द्वापर, कलि यांचीं नांवेंहि ( युगार्थीं ) ठाऊक नाहींत. ' द्वापर ' तर शब्द सुद्धा ऋग्वेदांत आलेला नाहीं. मग युगायुगाप्रमाणें फिरणारे धर्म पुराणें सांगतात ते कोठून येतील? हा युगांविषयींचा जो विभू आपल्या धर्मांत रचिला गेला तो आलीकडचा आहे.

'[ सूर्यरूप ] जाराची प्रिया '=' जारस्य योषा.' सूर्याला उषेचा जार आणि उषा त्याची कांता असें ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं म्हटलेलें आहे. ऋ. १. ११५. २; ७. १०. १; ७. ७५. ५ इत्यादि अनेक मंत्रांत सूर्य उषेचा जार असें सांगितलें आहे.

पशून्न चित्रा सुभगा प्रथाना सिन्धुर्न क्षोद उर्विया व्यश्वैत्।
अमिनती दैव्यानि व्रतानि सूर्यस्य चेति रश्मिभिर्दृशाना ॥ १२ ॥

पशून्। न। चित्रा। सुऽभगा। प्रथाना। सिन्धुः। न। क्षोदः। उर्विया। वि। अश्वैत्।
अमिनती। दैव्यानि। व्रतानि। सूर्यस्य। चेति। रश्मिऽभिः। दृशाना ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१२. पशून् न (=यथा कश्चित् गवादीन् पशून् प्रथति) [अथवा] सिन्धुर्न क्षोदः (=महानदो यथा स्वकीयमुदकं रोधसी निर्भिद्य प्रथति तद्वत्) चित्रा (=चायनीया=सुन्दरी) सुभगा (=सुधनोपेता) [उषाः] प्रथाना (=प्रथिता सती=प्रसारिततेजस्का सती) उर्विया वि अश्वैत् (=विस्तीर्णं यथा तथा विविधं द्योतते=सर्वासु दिक्षु भ्राजते) [पश्य]। दैव्यानि व्रतानि (=देवसंबन्धीनि कर्माणि यज्ञादीनि) अमिनती (=अहिंसन्ती=स्वोदयाभावेन यथा न विनाशं गच्छेयुस्तथा कुर्वती) [सा] सूर्यस्य रश्मिभिर्दृशाना (=सूर्यस्य किरणैः सहोद्गच्छन्ती) चेति (=ज्ञायते=भवति) [पश्य]॥

---

श्लोकीकरणः—

वि ऊर्ण्वतो दिवो अन्तान् अबोधि
अप स्वसारं सनुतर्युयोति।
प्रमिनती मनुषिआ युगानि
योषा जारस्य चक्षसा विभाति ॥

१२. सुंदर [ आणि ] सौभाग्यवती [ उषा ] पशूंला [ पसरल्या]प्रमाणें [ अथवा ] महानद [ आपलें ] उदक [पसरतो त्या]-प्रमाणें जिकडे तिकडे आपलें तेज पसरून प्रकाशत आहे. देवप्रीत्यर्थ कर्मांचा भंग न होऊं देणारी [उषा] सूर्याच्या किरणांबरोबर दृष्टिगोचर होत आहे.

12. The fair [ and ] fortunate [ Ushas ] is spreading her brightness far and wide like [ a herd of ] cows, [ or ] as [ does ] the river [its] billowing waters. She who does not break the ordinances of the Gods has become visible along with the rays of the sun.

---

१२. उषा नुकतीच उगवत आहे अशा वेळाचें हें दुसरें एक वर्णन. 'जसा सकाळींच तांबड्या गाईंचा मोठाचमोठा एक कळप सोडून द्यावा आणि तो जिकडे तिकडे पसरावा तशी, अथवा एखादा मोठा नद पुरानें भरून जाऊन आपलें पाणीं जिकडे तिकडे पसरून देतो तशी, ही उषा जिकडे तिकडे आपल्या प्रभेनें पसरली आहे. प्रातःकालीं लोकांनीं उठून देवांची सेवा करावी इत्यादि जे नियम ते मोडून जाऊं नयेत आणि मनुष्यांनीं जेव्हांचीं तेव्हां कामें करावीं म्हणून उषा प्रत्यहीं सूर्याच्या किरणांबरोबर उगवत असते तशी आजहि उगवली आहे पहा.'

'तेज पसरून '=' प्रथाना.' अक्षरशः अर्थ ' आपण पसरली जाऊन,' ' आपणास पसरून.' ' जिकडे तिकडे '=' उर्विया.' याच सूक्ताचे नवव्या मंत्रावरील टीप पहा.

' पशूंला पसरिल्याप्रमाणें.' उषेच्या ज्या कांति प्रातःकाळीं पूर्वेकडेस दृष्टीस पडतात त्यांस गाईंची उपमा दिलेली पूर्वीं आलीच आहे. मं १, २ आणि त्यांजवरील टीपा पहा.

' प्रकाशत आहे '=' वि अश्वैत्.' ऋ. १. ११३. १५ इत्यादि मंत्रांवरील सायणभाष्यांत ' श्वित् ' धातूचा 'तेजानं वाढणें,' ' तेजस्वी होणें,' ' फांकणें,' हा खरा अर्थ आला आहे.

श्लोकीकरणः—

पशून्न चित्रा सुभगा प्रथाना
सिन्धुर्न क्षोदः उॅर्विया वि अश्वैत् ।
अमिनती दैविॲानि व्रतानि
सूर्यस्य चेति रॅश्मिभिर्दृशाना ॥

उषस्तच्चित्रमा भरास्मभ्यं वाजिनीवति ।
येन तोकं च तनयं च धामहे ॥ १३ ॥

उषः । तत् । चित्रम् । आ । भर । अस्मभ्यम् । वाजिनीऽवति ।
येन । तोकम् । च । तनयम् । च । धामहे ॥ १३ ॥

उषो अद्येह गोमत्यश्वावति विभावरि ।
रेवदस्मे व्युच्छ सूनृतावति ॥ १४ ॥

उषः । अद्य । इह । गोऽमति । अश्वऽवति । विभाऽवरि ।
रेवत् । अस्मे इति । वि । उच्छ । सूनृताऽवति ॥ १४ ॥

## भाषायाम्.

१३. हे उषः, हे वाजिनीवति (=दत्तान्ने), तत् चित्रं (=तादृशं सुन्दरं धनम्) अस्मभ्यम् आ भर (=अस्मदर्थमानय) येन [वयं] तोकं च तनयं च (=पुत्रांश्च पौत्रांश्च) धामहे (=दधीमहि)॥

पुत्रपौत्रादियुक्तं धनमस्मभ्यं देहीत्यर्थः॥

१४. हे उषः, हे गोमति (=गोभिर्युक्ते), हे अश्वावति (=अश्वसंपन्ने), हे विभावरि (=विशिष्टतेजस्विनि), हे सूनृतावति (=स्तोत्राद्यात्मकवाचां प्रेरयित्रि), [त्वम्] अद्येह (=अस्मिन् दिनेऽत्र) अस्मे रेवद् वि उच्छ (=अस्मभ्यं धनं प्रकाशस्व=वयं यथा धनं लभेमहि तथा तमो निवारय)॥

१३. हे उषे, हे अन्नदायिके, [ तूं ] आम्हांला असें सुंदर वैभव आणून दे कीं जेणेंकरून आम्हांस पुत्र आणि पौत्र हे प्राप्त होतील.

१४. हे उषे, हे गोसंपन्ने, हे अश्वसंपन्ने, हे प्रकाशवती, हे वाक्प्रेरके, तूं आज येथें आम्हांप्रत प्रकाशून धन दे.

13. Bring unto us, O Ushas, O granter of food, that prosperity whereby we may possess sons and grandsons.

14. O Ushas, rich in cows, rich in horses, O bright one, O inspirer of voices, shine thou here today into wealth for us.

---

१३.' आम्हांस पुत्रपौत्रादियुक्त संपत्ति दे' इतकेंच या ऋचेचें तात्पर्य आहे. उषेनें पुत्रपौत्रादिसंयुक्त संपत्ति आणावी म्हणजे काय ? तात्पर्य इतकेंच कीं, 'हे उषे, तूं आज जी उगवत आहेस तो हा दिवस आम्हांला लाभाचा होओ; आमची हानि न होई आणि आम्हांला संतति आणि संपत्ति उत्तम मिळे असें कर.' उषा अथवा सूर्य अथवा कोणताहि झाला तरी देव आपणाकरितां धन प्रत्यक्ष घेऊन येईल असें हे प्राचीन ऋषि मानीत नसत, तर नित्य उगवणारे अथवा यज्ञांप्रत येणारे जे देव त्यांची उगवते वेळेस अथवा यज्ञांस यावयाच्या वेळेस प्रार्थना केली तर ते त्या दिवसीं आपली हानि होऊं देणार नाहींत आणि संपत्तीविषयीं अथवा संततीविषयीं ज्या आपल्या मनकामना त्या पूर्ण करितील इतकेंच मनांत ठेवून ते प्रार्थना करीत असत.

ह्या मंत्राचें वृत्त उष्णिक्. या वृत्ताविषयीं सू. ७९, मं. ४ याजवरील टीप पहा. श्लोकाप्रमाणें वाचला तर हा मंत्र असा म्हटला पाहिजेः—

उषस्तच्चित्रमा भर
अस्मभ्यं वाजिनीवति।
येन तोकं च तनयं च धामहे ॥

यांतील तिसरा चरण जगती वृत्ताचा समजावा.

१४. यांत ऋषि म्हणतो, 'हे उषे, तूं आतां येथें प्रकाश आणि आम्हांला जेणेंकरून संपत्ति मिळे असें कर.' 'रेवत् वि उच्छ' याचा जो 'प्रकाशून धन दे' असा अर्थ येथें केला आहे त्याजविषयीं याच सूक्ताचा आठवा मंत्र आणि त्याजवरील टीका पहा.

'गोसंपन्ने' इ०. उषा उगवून गाई देते, घोडे देते, प्रभा जिकडे तिकडे फांकविते आणि गायकांच्या आणि स्तोत्यांच्या वगैरे वाचांला प्रेरणा करिते म्हणून तिजला या मंत्रांतील विशेषणें लाविलेलीं आहेत.

युक्ष्वा हि वाजिनीवत्यश्वाँ अद्यारुणाँ उषः ।
अथा नो विश्वा सौभगान्या वह ॥ १५ ॥ २६ ॥
युक्ष्व । हि । वाजिनीऽवति । अश्वान् । अद्य । अरुणान् । उषः ।
अथ । नः । विश्वा । सौभगानि । आ । वह ॥ १५ ॥ २६ ॥
अश्विना वर्तिरस्मदा गोमद्दस्रा हिरण्यवत् ।
अर्वाग्रथं समनसा नि यच्छतम् ॥ १६ ॥
अश्विना । वर्तिः । अस्मत् । आ । गोऽमत् । दस्रा । हिरण्यऽवत् ।
अर्वाक् । रथम् । सऽमनसा । नि । यच्छतम् ॥ १६ ॥

---

## भाषायाम्.

१५. हे उषः, हे वाजिनीवति ( =दत्तान्ने ), अद्य ( =अस्मिन् दिने ) अरुणान् अश्वान् ( =त्वदीयान् आरक्तवर्णान् वाजिनो ) युक्ष्व हि ( =रथे योजय खलु ) । अथ ( =अनन्तरं च ) विश्वा सौभगानि ( =सकलान्यपि सौभाग्यानि ) नः ( =अस्मभ्यम् ) आ वह ( =आनय ) ॥

१६. हे दस्रा ( =दस्रौ=शत्रूणामुपक्षपयितारौ=शत्रुविजयिनौ ) अश्विना ( =अश्विनौ ), [ युवां ] समनसा ( =समनसौ=समानमनस्कौ भूत्वा ) अस्मद् वर्तिः अर्वाक् ( =अस्माकं गृहं प्रति=अस्माकं गृहमुद्दिश्य ) [ युवयो ] रथं गोमत् ( =अस्माकं गोनां लाभो यथा भवति तथा ) हिरण्यवत् ( =हिरण्यलाभश्च यथा भवति तथा ) आ नि यच्छतम् ( =आभिमुख्येन आवर्तयतम्=प्रेरयतम् ) ॥

गा हिरण्यं च गृहीत्वा रथारूढौ युवामस्माकं गृहमागच्छतमिति भावः ॥

वर्तिःशब्दस्य गृहसमानार्थकत्वं सायणेन सम्यक् प्रतिपादितम् । सत्यपि हि तस्य मार्गार्थकत्वे 'आ नो अश्वावदश्विना वर्तिर्यासिष्टं मधुपातमा नरा गोमद्दस्रा हिरण्यवत्' ( ऋ. ८. २२. १७ ) इत्येतदादिभिर्भिन्नान्तरैर्गृहसमानार्थकत्वं ज्ञायते ॥ वर्तिरस्मदिति अस्मद्वर्तिरित्यर्थे न स्यादिति न ॥

---

श्लोकीकरणः—
उषो अद्येह गोमति ।
अश्वावति विभावरि ।
रेवदस्मे वि उच्छ सूनृतावति ॥

यांत सुद्धा तिसरा चरण बारा अक्षरांचा आणि जगतीप्रमाणें म्हणतां येतो असा आहे.

१५. हे उषे, हे अन्नदायिके, [ तूं आपले ] आरक्त अश्व आज [ रथाला ] जोड, आणि आम्हांकरितां सकल सौभाग्यें घेऊन ये.

१६. हे अश्वींनो, हे पराक्रमकारी [ अश्वी ] हो, [ तुम्ही ] उभयतां एकमनस्क [ होऊन ] [ आपला ] रथ आमच्या घराकडेस वळवा, कीं जेणेंकरून [ आम्ही ] गाईंनीं [ आणि ] सुवर्णानें संपन्न होऊं.

15. Harness then, O Ushas, O giver of food, [ thy ] tawny horses this day [ to thy chariot ]. And then bring unto us all happiness.

16. Drive you, victorious As'vins, your chariot with one mind towards our abode, so that we may obtain cows [ and ] gold.

---

१५. हा मंत्र समजण्यास अशी कल्पना करावी कीं ऋषि मोठ्या पहांटेस उठून पूर्वेकडे उषेची वाट पहात उभा राहिला आहे आणि म्हणतो, 'हे उषे, हे अन्नपूर्णे देवी, तूं आतां येण्याला विलंब लावूं नकोस, तर तुझे जे आरक्त वर्णाचे घोडे ते तूं आपल्या रथाला एकदम जूप आणि ये, आणि येतांना आम्हांकरितां सर्व उत्तम भाग्यें घेऊन ये.' उषेचे जे घोडे ते आरक्त वर्णाचे असतात असें सांगितलें आहे. याच सूक्ताचा दुसरा मंत्र आणि त्याजवरील आमची टीप पहा.

श्लोकीकरणः—

युक्ष्वा हि वाजिनीवति ।
अश्वानद्यारुणानुषः ।
अथा नो विश्वा सौभगानि आ वह ॥

१६. ही ऋचा उषेच्या जवळ जवळ उगवणारे अथवा आकाशांत प्रादुर्भूत होणारे जे अश्वी देव त्यांजविषयीं आहे. 'हे अश्वी हो, तुम्ही दोघेहि प्रसन्न होऊन आपला रथ हाकून आमच्या घराजवळ या आणि येतांना आम्हांला गाई आणि सुवर्ण हीं घेऊन या.' सू. ३, मं. १ याजवर दिलेली टीप पहा. अश्वी देवांविषयीं चवतिसावें इत्यादि सूक्तें पूर्वी आलींच आहेत.

'एकमनस्क होऊन' = 'समनसा.' म्हणजे दोघेहि आम्हांला प्रसन्न आणि अनुकूळ होऊन. 'आमच्या घराकडेस' = 'अस्मद् वर्तिः.' 'वर्तिः' शब्दाचा घर हा अर्थ सायणांनीं पुष्कळ ठिकाणीं केला आहे आणि तो बहुतेक ठिकाणीं चांगला जुळतो. ऋ. ८. २२. ७ याजवरून तो अर्थ सिद्ध होतो असें आम्हांस वाटतें. ( भाषा पहा. )

अश्वी हे कोणी दोन पहांटेस उगव-

**यावित्था श्लोकमा दिवो ज्योतिर्जनाय चक्रथुः ।**
**आ न ऊर्जं वहतमश्विना युवम् ॥ १७ ॥**

यौ । इत्था । श्लोकम् । आ । दिवः । ज्योतिः । जनाय । चक्रथुः ।
आ । नः । ऊर्जम् । वहतम् । अश्विना । युवम् ॥ १७ ॥

**एह देवा मयोभुवा दस्रा हिरण्यवर्तनी ।**
**उषर्बुधो वहन्तु सोमपीतये ॥ १८ ॥ २७ ॥**

आ । इह । देवा । मयःऽभुवा । दस्रा । हिरण्यवर्तनी इति हिरण्यऽवर्तनी ।
उषःऽबुधः । वहन्तु । सोमऽपीतये ॥ १८ ॥ २७ ॥

---

## भाषायाम्.

१७. हे अश्विना (=अश्विनौ), यौ [युवाम्] इत्था (=अनेन पुरोदृश्यमानेन प्रकारेण) श्लोकं (=युवयो रथस्य नादम्) आ दिवः (=आ द्युलोकात्) चक्रथुः (=कारितवन्तौ), [अपि च] जनाय (=लोकहितार्थं) दिव आ (=आ द्युलोकात्) ज्योतिः (=प्रकाशं) चक्रथुः (=कृतवन्तौ=स्वतेजसा सह उदितवन्तौ स्थः), [तौ] युवं (=युवां) नः (=अस्मभ्यम्) ऊर्जम् (=अन्नम्) आ वहतम् (=आनयतम्)॥

यस्माद्युवाम् आ दिवं नादं कुर्वन्तं रथमधिष्ठाय स्वतेजसा प्रोदितवन्तौ स्थस्तस्माद् अस्मभ्यमन्नादिसंपदगानयतमिति प्रार्थ्यते ॥

१८. उषर्बुधः (=उषःकाले प्रतिबुध्यमाना अश्विनोरश्वाः) मयोभुवा (=मयोभुवौ=सुखकारिणौ) दस्रा (=दस्रौ=शत्रूणामुपक्षपयितारौ=पराक्रमवन्तौ) हिरण्यवर्तनी (=हिरण्यमयरथौ) देवा (=देवौ) [अश्विनौ] सोमपीतये (=सोमं पातुम्) इह आ वहन्तु (=अत्रास्माकं यजनस्थान आनयन्तु) ॥

उषर्बुधः उषःकाले प्रतिबुध्यमाना उषःसवित्रादयो देवविशेषा अश्विनावावहन्तु आनयन्त्विति वा योज्यम् ॥

---

णारे तारे असावे (अथवा सूर्य आणि चंद्र हे तेजाचे निधि होत. पुढच्या मंत्रावरची टीप पहा). त्यांचा समावेश 'उषर्बुधः' (पहांटेस जागे होणारे) या नांवानें प्रसिद्ध असलेल्या सूर्य, सविता, मित्र, उषा इत्यादि देवांत होतो. म्हणून त्यांचा उच्चार उषेबरोबर पुष्कळ येत असतो. तसाच या मंत्रांत आला आहे. पुढचे दोन मंत्रहि अश्वींविषयींच आहेत.

श्लोकीकरणः—

अश्विना वर्तिरस्मदा ।
गोमद्दस्रा हिरण्यवत् ।
अर्वाग्रथं समनसा नि यच्छतम् ॥

१७. हे [ अश्वी हो ], ज्या तुम्हीं उभयतांनीं द्युलोकापर्यंत [ आपल्या रथाचा ] एवढा नाद केला आहे [ आणि ] जनासाठीं प्रकाश पाडिला आहे, [ ते ] तुम्ही आम्हांकरितां शक्तिदायक अन्न घेऊन या.

17. May you, O As'vins, who have thus caused heaven to resound with your chariot and made a light for the people, may you both bring invigorating food unto us.

१८. कल्याणकारक, पराक्रमी [ आणि ] सोन्याच्या रथांत बसून जाणारे [ जे अश्वी ] देव, त्यांजला प्रातःकाळीं जागृत होणारे [ त्यांचे अश्व ] सोम पिण्यासाठीं येथें घेऊन येओत.

18. May [their horses] awake at morn, bring hither, for to drink the Soma, the two gods, the givers of happiness, the performers of great deeds [ and ] drivers of golden chariots.

---

१७. भावार्थः— ' हे अश्वी देव हो, तुम्हीं आज आपल्या रथांत बसून सर्व द्युलोकपर्यंत त्या रथाच्या चक्रांचा नाद गाजवीत येत आहां आणि लोकांला प्रकाश मिळावा म्हणून प्रकाशत आहां; तर तुम्ही येतांना आम्हाला अन्न घेऊन या.'

' द्युलोकापर्यंत नाद केला आहे '= ' आ दिवः श्लोकं चक्रथुः'. अशी कल्पना केली पाहिजे कीं, अश्वी आपल्या मोठ्या रथांत बसून आपल्या तेजःपुंज प्रभेसहित पूर्वेकडे उगवत आहेत आणि त्यांच्या रथाचा मोठा ध्वनि होत आहे आणि तो द्युलोकापर्यंत जाऊन आदळत आहे. आणि अशा अश्वींला गोतम ऋषि बोलत आहे. ' प्रकाश पाडिला आहे ' = ' ज्योतिश्चक्रथुः.' सायणाचार्य म्हणतात कीं अश्वी देव म्हणजे सूर्य आणि चन्द्रमा हेच होत. त्यापेक्षां ते उगवले म्हणजे जनांला प्रकाश मिळतो असें म्हणणें हें योग्यच आहे. अश्वी यांचें वास्तविक स्वरूप काय आहे म्हणजे ते कशाचे देव होत, हें जरी निश्चयानें सांगवत नाहीं तरी वेदांमध्यें जीं त्यांजविषयीं सूक्तें आलीं आहेत, त्यांजवरून पहातां ते सूर्यादिकांप्रमाणें रथांत बसून येणारे, पूर्वेकडेस उगवणारे, आणि प्रकाशणारे देव होत, असें अनुमान निघतें; मग ते सूर्यचंद्रात्मक असोत अथवा कोणी दोन लखलखणारे तारे असोत अथवा सूर्य आणि दिवस एतद्रूप दोघे देव असोत.

## सूक्तम् ९३.

रहूगणपुत्रो गोतम ऋषिः । अग्नीषोमौ देवता । आद्यस्तृच आनुष्टुभः । चतुर्थ्याद्याः सप्तम्यन्ताश्चतस्रस्त्रिष्टुभः । अष्टमी जगती त्रिष्टुभ् वा । नवम्याद्यास्तिस्रो गायत्र्यः । द्वादशी त्रिष्टुभ् ॥

**अग्नीषोमाविमं सु मे शृणुतं वृषणा हवम् ।**
**प्रति सूक्तानि हर्यतं भवतं दाशुषे मयः ॥ १ ॥**

अग्नीषोमौ । इमम् । सु । मे । शृणुतम् । वृषणा । हवम् ।
प्रति । सुऽउक्तानि । हर्यतम् । भवतम् । दाशुषे । मयः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे वृषणा ( =वृषणौ=सेचनसमर्थौ=सामर्थ्योपेतौ=प्रबलौ ) अग्नीषोमौ, [ युवाम् ] इमं मे ( =मम ) हवम् ( =आह्वानं ) सु ( =सुष्टु=सावधानं ) शृणुतम् । सूक्तानि ( =इमानि मयोच्यमानानि स्तोत्राणि ) प्रति हर्यतं ( =आभिमुख्येन कामयेथाम् ) । [ अनन्तरं ] दाशुषे ( =हविर्दत्तवत उपासकाय मद्रूपाय मम नियोक्त्रे यजमानाय वा ) मयो भवतं ( =सुखस्य दातारौ ) भवतम् ॥

श्लोकीकरणः—

यावित्था श्लोकमा दिवो ।
ज्योतिर्जनाय चक्रथुः ।
आ नः ऊर्जं वहतमश्विना युवम् ॥

१८. हा येथें उपसंहार आहे. ऋषि अशी प्रार्थना करितो कीं, अश्वींचे जे मोठ्या पहांटेस जागे होणारे घोडे ते त्यांला या माझ्या यज्ञाकडेस सोम पिण्यासाठीं घेऊन येओत.

'सोन्याच्या रथांत वसून जाणारे'= 'हिरण्यवर्तनी.' हा अर्थ आम्हीं सायणानुसारें केला आहे. आणि हा शब्द जेथें जेथें आला आहे ते ते मंत्र पाहतां तो योग्य आहे असें वाटतें. कितीएक पाश्चात्य विद्वान् सुवर्णमय मार्गानें जाणारे असा अर्थ करितात, पण सायणाचार्यांचाच अर्थ घेण्यासारिखा दिसतो.

'प्रातःकाळीं जागृत होणारे अश्व '= 'उषर्बुधः.' हा अर्थ सायणाचार्यांस अनुसरून आम्हीं केला आहे. परंतु प्रातःकाळीं जागृत होणारे जे उषा, सविता इत्यादिक देव ते घेऊन येओत असाहि अर्थ चांगला संभवतो.

श्लोकीकरणः—

एह देवा मयोभुवा ।
दस्रा हिरण्यवर्तनी ।
उषर्बुधो वहन्तु सोमपीतये ॥

## सूक्त ९३.

ऋषि–**गोतम** (मागच्या सूक्ताचा जो तोच). देवता–**अग्नीषोम** (म्हणजे **अग्नि** आणि **सोम** या दोघांचें जोडपें). वृत्त–१-३ **अनुष्टुभ्**, ४-७ **त्रिष्टुभ्**, ८ **जगती** किंवा **त्रिष्टुभ्**, ९-११ **गायत्री**, १२ **त्रिष्टुभ्**.

१. हे प्रबळ अग्नीषोम हो, [तुम्ही] ही माझी हाक लक्ष लावून ऐका. [तुम्ही] [हीं] स्तोत्रें मान्य करून घ्या. [आणि] हविर्दात्या उपासकाला कल्याणकारी व्हा.

## HYMN 93.

To *Agnîshomau* (i. e. *Agni* and *Soma* taken collectively). By *Gotama* (author of the previous hymn). Metre—Verses 1 to 3 *Anushṭubh*; 4-7 *Trishṭubh*; 8 *Jagatî* or *Trishṭubh*; 9–11, *Gâyatrî*; 12 *Trishṭubh*.

1. O mighty Agni and Soma, hear ye well this my invocation; accept ye kindly [these] prayers, and be the givers of happiness to the sacrificer.

---

१. हें सूक्त अग्नीषोमाविषयीं, म्हणजे अग्नि आणि सोम हे जे दोघे देव त्यांविषयीं आहे. ह्या दोघांस मिळून एकत्र हें सूक्त अर्पण केलेलें आहे. अग्नीचा आणि सोमाचा असा काय संबंध आहे कीं त्यांजला अग्नीषोम असें समासबद्ध नांव देऊन त्यांची स्तुति एकत्र केलेली आहे? याचें उत्तर इतकें दिसतें कीं 'ज्ञानोबा तुकाराम' यांचें भजन एकत्र कां करितात? हे जसे संतमाळिकेंतील आणि लोकांच्या तोंडीं नेहमीं येत असणारे साधु असल्यामुळें एकत्र गाइले जातात तसेच अग्नि आणि सोम हे एकत्र देवमाळिकेंत असून उपासकांच्या मुखीं नित्य असतात म्हणून त्यांची स्तुति एकत्र येत असते.

'आणि हविर्दात्या उपासकाला कल्याणकारी व्हा'='भवतं दाशुषे मयः.' यावरून कोण समजावयाचा तें स्पष्ट समजत नाहीं, म्हणजे स्तोत्र करणारा कवि त्याला किंवा ज्याकरितां तो स्तोत्र रचीत आहे त्याला हें समजत नाहीं. सायणाच्या भाष्यावरून स्पष्टीकरण होत नाहीं. मी जो स्तोत्र करणारा त्याचें कल्याण करा असा एक अर्थ किंवा ज्याकरितां मी हें स्तोत्र रचीत आहें त्याचें कल्याण करा असा दुसरा अर्थ.

हा मंत्र साधारण अनुष्टुप् श्लोकाप्रमाणें चांगला म्हणतां येतो.

अग्नीषोमा यो अद्य वामिदं वचः सपर्यति ।
तस्मै धत्तं सुवीर्यं गवां पोषं स्वश्व्यम् ॥ २ ॥

अग्नीषोमा । यः । अद्य । वाम् । इदम् । वचः । सपर्यति ।
तस्मै । धत्तम् । सुऽवीर्यम् । गवाम् । पोषम् । सुऽअश्व्यम् ॥ २ ॥

अग्नीषोमा य आहुतिं यो वां दाशाद्धविष्कृतिम् ।
स प्रजया सुवीर्यं विश्वमायुर्व्यश्नवत् ॥ ३ ॥

अग्नीषोमा । यः । आऽहुतिम् । यः । वाम् । दाशात् । हविःऽकृतिम् ।
सः । प्रऽजया । सुऽवीर्यम् । विश्वम् । आयुः । वि । अश्नवत् ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. हे अग्नीषोमौ, यो [ यजमानः ] अद्य ( =अस्मिन् दिने ) इदं वचः ( =इदं स्तोत्ररूपं वचनं ) वां सपर्यति ( =युवाभ्यां समर्पयति ) तस्मै सुवीर्य ( =शोभनवीरोपेतं ) स्वश्व्यं ( =शोभनाश्वयुक्तं ) गवां पोषं ( =गवामभिवृद्धि=संपदं ) धत्तं ( =प्रयच्छतम् ) ॥

हविर्दत्तवते यजमानाय सुवीरान् शोभना गाश्च पुष्टिं च शोभनान् अश्वांश्च दत्तमित्यर्थः ॥

३. हे अग्नीषोमौ, यो [ यजमानो ] वां ( =युवाभ्याम् ) आहुतिम् ( =" आज्याहुतिं " ) दाशात् ( =दद्यात् ) यो [ वा ] वां ( =युवाभ्यां ) हविष्कृतिं ( =" चरुपुरोडाशादिना कृतामाहुतिं " ) दाशात् ( =दद्यात् ) स प्रजया ( =पुत्रपौत्रादिना सह ) सुवीर्यं ( =शोभनवीरैरुपेतं ) विश्वं ( =सकलम् ) आयुः (=आयुषः कालं=जीवनकालं ) वि अश्नवत् ( =विशेषेण प्राप्नुयात्=लभेत ) ॥

२. हे अग्नीषोम हो, जो आज तुम्हांला हें स्तोत्र अर्पण करीत आहे त्याला [ तुम्ही ] उत्तम वीरांनीं युक्त, [ आणि ] उत्तम अश्वांनीं युक्त [अशी] गोसंपत्ति द्या.

३. हे अग्नीषोम हो, जो [तुम्हांला ] आहुति [ देईल ] [आणि] जो तुम्हांस हवि सिद्ध करून देईल, तो सुवीरांनीं युक्त [ असें] पुत्रपौत्रांसहित सगळें आयुष्य लाभो.

2. O Agni and Soma, bestow upon him who offers this prayer unto you today, a wealth accompanied by excellent heroes and excellent horses.

3. O Agni and Soma, he who shall offer oblation or who shall offer other sacrificial food unto you, may he attain to his full life-time accompanied by brave sons and posterity.

---

२. या मंत्रावरून असें दिसतें कीं, मंत्र रचणारा हें सूक्त दुसऱ्या एका उपासकाकरितां रचीत आहे, स्वताहाकरितां नसावा. म्हणून म्हणतो, ' हें सूक्त जो मनुष्य आज तुम्हांला अर्पण करितो त्याला तुम्ही उत्तम वीर्यवंत पुत्रपौत्र, उत्तम गाई, उत्तम अश्व यांनीं परिपूर्ण जी उत्तम अभिवृद्धि ती द्या.'

श्लोकीकरणः—

अग्नीषोमा यो अद्य वाम्
इदं वचः सपर्यति ।
तस्मै धत्तं सुवीरिअं
गवां पोषं सुअश्विअम् ॥

३. ' हे अग्नीषोम हो, जो यजमान तुम्हांला घृताची आहुति अथवा चरुपुरोडाशादिक अन्न देतो त्याला तुम्ही पुत्रपौत्रादिक शूर संतति देऊन तो आपलें सर्व शतवर्षांचें आयुष्य भरेपर्यंत जगेल असें करा.' म्हणजे तो भर शंभर वर्षें जगो, आणि त्याला पुत्रपौत्रादि लाभोत.

या मंत्रांत ' आहुति '=' आहुतिम्' आणि 'हवि'='हविष्कृतिम्' हे दोन शब्द आहेत त्याचा अर्थ सायणाचार्य आहुति म्हणजे तुपाची आहुति आणि हविष्कृति म्हणजे चरुपुरोडाशादिक जें अन्न तें असा करितात.

तिसरा आणि चवथा चरण खालीं दाखविल्याप्रमाणें वाचले पाहिजेतः—

स प्रजया सुवीरिअं
विश्वमायुर्वि अश्नवत् ।

**अग्नीषोमा चेति तद्वीर्यं वां यदमुष्णीतमवसं पणिं गाः ।**
**अवातिरतं बृसयस्य शेषोऽविन्दतं ज्योतिरेकं बहुभ्यः ॥ ४ ॥**

अग्नीषोमा । चेति । तत् । वीर्यम् । वाम् । यत् । अमुष्णीतम् । अवसम् । पणिम् । गाः ।
अव । अतिरतम् । बृसयस्य । शेषः । अविन्दतम् । ज्योतिः । एकम् । बहुऽभ्यः ॥ ४ ॥

**युवमेतानि दिवि रोचनान्यग्निश्च सोम सक्रतू अधत्तम् ।**
**युवं सिन्धूँरभिशस्तेरवद्यादग्नीषोमावमुञ्चतं गृभीतान् ॥ ५ ॥**

युवम् । एतानि । दिवि । रोचनानि । अग्निः । च । सोम । सक्रतू इति सऽक्रतू । अधत्तम् ।
युवम् । सिन्धून् । अभिऽशस्तेः । अवद्यात् । अग्नीषोमौ । अमुञ्चतम् । गृभीतान् ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

४. हे अग्नीषोमा (=अग्नीषोमौ), तद् वां वीर्यं (=तद् वक्ष्यमाणं युवयोर्वीर्यसंपादितं महत् कर्म) चेति (=ज्ञातमभूत्=प्रख्यातं वर्तते) यत् (=येन) [युवां] पणिं (=पणेः=एतन्नामकादसुरात्) गा अवसं (=गोरूपमन्नम्) अमुष्णीतम् (=अपाहार्ष्टम्=हृतवन्तौ) [यद्] बृसयस्य शेषः (=बृसयनाम्नोसुरस्यापत्यं किंचित् रक्षः=वृत्रम् ?) अवातिरतम् (=अवाधिष्टम्=हतवन्तौ) [यच्च] [युवां] बहुभ्यः (=बहुजनहितार्थम्) एकं ज्योतिः (=एकमेव सूर्यरूपं प्रकाशम्) अविन्दतम् (=अलप्साथाम्=नभसि तमोमुक्तः सविता यथा पुनरपि तिष्ठति तथाकुरुतम्) ॥

पण्यादिरूपान् असुरान् सूर्यप्रकाशनिरोधकान् जित्वा सकलजनदर्शनार्थं सूर्यं पुनरपि नभसि प्रारोहयतमिति यद्युवयोर्भूयान् पराक्रमः स प्रख्यात एवेति भावः ॥

५. हे सोम, [त्वम्] अग्निश्च [इत्येतौ] युवं (=युवामेव) सक्रतू (=समानकर्माणौ समानमनसौ वा) [सन्तौ] एतानि (=पुरोदृश्यमानानि) रोचनानि (=ग्रहतारकादीनि नक्षत्राणि) दिवि (=द्युलोके) अधत्तम् (=अस्थापयतम्) । हे अग्नीषोमौ, युवं (=युवामेव) गृभीतान् (=गृहीतान्=वृत्रेण निरुद्धान्) सिन्धून् (=मेघो-

४. हे अग्नीषोम हो, तो तुमचा पराक्रम प्रसिद्ध आहे कीं [तुम्ही] पणीपासून गो[रूप] अन्न हरण करिते झालां, बृसयाच्या पोराला जिंकिते झालां, [आणि] बहुतांच्या हितासाठीं एकच प्रकाश संपादिते झालां.

४. O Agni and Soma, that exploit of yours is well known that [ye] took away the nourishment–the cows–from Paṇi, [that] [ye] subjugated the offspring of Brisaya [and that] [ye] discovered the one light for many.

५. हे अग्नी, आणि हे सोमा, तुम्हीच दोघेहि एकत्र मिळून हीं नक्षत्रें द्युलोकीं स्थापिते झालां आहां; तुम्हीच हे अग्नीषोम हो, [वृत्र]निरुद्ध नद्यांला पाण्याच्या निंद्य संसर्गापासून मुक्त करिते झालां.

5. You it is Agni and O Soma, that with a common mind have placed these brilliant stars in heaven; you it is that have freed, O Agni and Soma, the captive rivers from the curse of the enemy.

४. 'हे अग्नीषोम हो, मनुष्यांचें केवळ सर्व जीवनच अशा ज्या प्रकाशरूपी गाई, त्या पणि या नांवाच्या असुरानें हरण केल्या त्यामुळें जगांत सर्व अंधार होऊन गेला, आणि बृसय नांवाच्या असुराचा पोर जो [वृत्र] असुर त्याणेंहि सूर्याचें सर्व तेज हरण केलें; तेव्हां जिकडे तिकडे अंधार पडूं लागला त्या वेळीं पणीपासून तूं प्रकाशरूपी गाई सोडवून आणून बृसयाच्या पोरालाहि तुम्हीं जिंकून टाकिलें आणि इतकें सर्व करून सकळ मनुष्यांला ज्याच्या योगानें दिसतें अशी जी सूर्यरूपी ज्योति ती तुम्हीं पुनः आकाशांत स्थापन केली हा जो तुमचा पराक्रम तो सर्व जगांत प्रख्यात आहे.'

'गोरूप अन्न'='अवसं गाः.' 'गाई [हें जें] अन्न [तें]' असा अक्षराजवळ जवळ अर्थ केला तर होतो. प्रकाशाला गाई म्हणण्याचा आणि आकाशांतून पडणाऱ्या मेघोदकांच्या धारा त्यांसहि गाई म्हणण्याचा प्रचार वेदांत आहे. याचीं उदाहरणें आजपर्यंत पुष्कळ आलींच आहेत, आणि या गाई पणिनामक असुरानें हरण करून नेल्या होत्या असेंहि पूर्वीं आलें आहे. सू. ३३, मं. १० याजवरील टीप पहा.

'बृसयाच्या पोराला'='बृसयस्य शेषः.' सायणाचार्य म्हणतात, बृसयाचा पोर म्हणजे वृत्र समजावयाचा आहे. आणि ते म्हणतात, बृसय म्हणजे त्वष्टा म्हणून जो असुर तो. ऋग्वेदांत 'बृसय'

**आन्यं दिवो मातरिश्वा जभारामथ्नादन्यं परि श्येनो अद्रेः ।**
**अग्नीषोमा ब्रह्मणा वावृधानोरुं यज्ञाय चक्रथुरु लोकम् ॥६॥२८**

आ । अन्यम् । दिवः । मातरिश्वा । जभार । अमथ्नात् । अन्यम् । परि । श्येनः । अद्रेः ।
अग्नीषोमा । ब्रह्मणा । ववृधाना । उरुम् । यज्ञाय । चक्रथुः । ऊम् इति । लोकम् ॥ ६ ॥ २८ ॥

---

दकानि ) अभिशस्तेः अवद्यात् ( =अभिशस्तुः शपुर्वृत्ररूपस्य दोषात् ) अमुञ्चतम् ( =मुक्तान् अकुरुतम् ) ॥

पणिहृता मेघोदकात्मका गा युवामेव प्रत्याहरतम् अपि च द्युलोके यान्येतानि नक्षत्राणि दृश्यन्ते तानि युवाभ्यामेव तत्र स्थापितानीति भावः ॥

---

## भाषायाम्.

६. हे अग्नीषोमा ( =अग्नीषोमौ ), [ युवयोर्मध्ये ] अन्यम् ( =एकतरम्=अग्निं ) मातरिश्वा ( =एतन्नामको ) दिवः ( =द्युलोकसकाशात् ) [ पृथिव्याम् ] आ जभार ( =आ जहार=आनीतवान् ) । अन्यम् ( =अन्यतरं=सोमं ) श्येनः ( =एतन्नामकः पक्षी ) अद्रेः परि ( =अद्रेः सकाशात्=अद्रेर्मध्यात् ) अमथ्नात् ( =निर्मथ्य आनीतवान् ) । [ ईदृशौ ] ब्रह्मणा वावृधाना ( =ब्रह्मणा वावृधानौ=स्तोत्रेण वर्धमानौ=स्तोत्रेण द्वारा पुष्टौ ) [ युवाम् ] [ इमम् ] उरुं लोकं ( =विस्तीर्णं जगत् ) यज्ञाय चक्रथुः उ ( =यज्ञकरणाय निर्मितवन्तौ खलु=यथा बहवो जना यज्ञं कुर्युस्तथा लोकमिमं विस्तीर्णं निर्मितवन्तौ ) ॥

---

शब्द आणखी एकच मंत्रांत आला आहे ( ऋ. ६. ६१. ३ ) त्यांतहि बृसय म्हणजे त्वष्टा हा असुर आणि त्याचा पोर म्हणजे वृत्र असें सायणांनीं सांगितलें आहे.

श्लोकीकरणः—

अग्नीषोमा चेति तद्वीरिअं वां
यदमुष्णीतम् अवसं पणिं गाः ।
अवातिरतं बृसयस्य शेषः

अविन्दतं ज्योतिरेकं बहुभ्यः ॥

५. भावार्थः—'हे अग्नीषोम हो, आकाशांत जीं हीं सूर्यचन्द्रादिक महातेजें आणि ग्रहतारकादिक असंख्य नक्षत्रें दृष्टीस पडतात, हीं तुम्हींच तेथें स्थापिलीं आहेत, आणि हीं जीं पूर्वीं दुष्ट वृत्रानें अवरोधून ठेविलेलीं मेघोदकें आतां निर्बंध मोठमोठ्या नद्यांप्रमाणें वहात आहेत तीं तुमच्याच पराक्रमानें वहात आहेत.'

६. [ हे अग्नीषोम हो ], [तुम्हांतून] एकाला मातरिश्वा द्युलोकाहून आणिता झाला [ आणि ] दुसऱ्याला श्येन [ पक्षी ] अद्रींतून मंथन करून काढून आणिता झाला. हे अग्नीषोम हो, स्तोत्राच्या योगानें वर्धमान होणारे [ तुम्ही ] यज्ञासाठीं [ हा ] विस्तीर्ण लोक निर्माण करिते झालां आहां.

6. One of you Mâtaris'vâ brought down from heaven, the falcon churned the other from the mountain. Glorified by prayer you, O Agni and Soma, created this wide world for sacrifice.

---

'एकत्र मिळून'=' सक्रतू.' म्ह० दोघांनीं मिळून एकत्र आपली बुद्धि खर्चून. 'नद्यांला'=' सिन्धून्.' म्हणजे ज्यांपासून नद्या उत्पन्न होतात अशीं जीं मेघोदकें तीं. मेघोदकांला 'सिन्धु' असें कसें नांव पडलें याविषयीं सू. ३५, मं.८ याजवरील 'अंतरिक्ष' या शब्दाविषयींची टीप पहा.

'पाण्याच्या निंद्य संसर्गापासून'='अभिशस्तेरवद्यात्.' म्हणजे दुष्ट जो वृत्र त्याच्या दोषी जुलमापासून.

श्लोकीकरणः—

युवम् एतानि दिवि रोचनानि
अग्निश्च सोम सक्रतू अधत्तम् ।
युवं सिन्धूनभिशस्तेरवद्यात्
अग्नीषोमावमुञ्चतं गृभीतान् ॥

---

६. 'हे अग्नीषोम हो, तुम्हांतून एकाला म्हणजे अग्नीला मातरिश्वा याणें द्युलोकाहून पृथिवीवर आणिलेलें आहे; आणि दुसऱ्याला, म्हणजे सोमाला, श्येन पक्ष्यानें पर्वतांतून मंथन करून आणिलें आहे. आणि लोक तुमची स्तुति करूं लागले तेव्हां प्रसन्न होऊन ह्या सर्व जगभर लोकांनीं जिकडे तिकडे यज्ञ करावे म्हणून हें विस्तीर्ण जग तुम्ही निर्माण करिते झालां.'

'मातरिश्वा द्युलोकाहून आणिता झाला'='आ दिवो मातरिश्वा जभार.' 'मातरिश्वा' कोण आणि त्याणें अग्नि कसा आणिला त्याविषयीं सू. ३१, मं. ३; सू. ६०, मं. १ आणि सू. ७१, मं. ४ हे आणि त्यांजवरील टीपा पहा.

'श्येन पक्षी अद्रींतून मंथन करून काढून आणिता झाला'='अमथ्नात् श्येनः अद्रेः परि.' सोमाला प्रथम पृथिवीवर श्येनानें आणिलें अशी कथा आहे. म्हणूनच सोमाला 'श्येनाभृत' (श्येनानें आणिलेला) असें नांव पडलें आहे. सू. ८०, मं. २ आणि टीप पहा.

'मन्थन करून काढून आणिलें'='अ-

**अग्नीषोमा हविषः प्रस्थितस्य वीतं हर्यतं वृषणा जुषेथाम् ।**
**सुशर्माणा स्ववसा हि भूतमथा धत्तं यजमानाय शं योः ॥ ७ ॥**

अग्नीषोमा । हविषः । प्रऽस्थितस्य । वीतम् । हर्यतम् । वृषणा । जुषेथाम् ।
सुऽशर्माणा । सुऽअवसा । हि । भूतम् । अथ । धत्तम् । यजमानाय । शम् । योः ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे अग्नीषोमा ( =अग्नीषोमौ ), [युवां] प्रस्थितस्य हविषः (=पुरोभागे स्थापित स्यास्य हविरन्नस्य ) [भागं ] वीतं (=भक्षयतं ), हर्यतम् (=अस्मान् कामयेथाम् ), हे वृषणा ( =वृषणौ=प्रवलौ ) [ अग्नीषोमौ ], जुषेथाम ( =" अस्मदीयं परिचरणं सेवेथाम् " ) । [ युवां ] सुशर्माणा ( =सुशर्माणौ=शोभनसुखकारिणौ ) स्ववसा ( =स्ववसौ=शोभनरक्षणौ ) [ च ] भूतं हि ( =अस्माकं भवतं खलु ) । अथ ( =अनन्तरं ) यजमानाय ( =यज्ञं कुर्वंत उपासकाय ) शं योः धत्तं (=शांति सुखं च विधत्तं=प्रयच्छतम् ) ॥

मथ्नात्.' " हिसकावून आणिला" म्हणून " मंथन करून आणिला " असें सायणाचार्य म्हणतात. आणि 'अद्रींतून' म्हणजे " मेरूच्या शिरावर असलेला जो स्वर्गलोक त्यांतून " असें तेच म्हणतात.

'वर्धमान होणारे'='वावृधाना.' म्हणजे 'अत्यानंद पावून त्यापासून प्रबळ झालेले.' स्तोत्राच्या योगानें देवतांस विशेष बळ येतें असें वेदांत येतें तें प्रसिद्धच आहे.

' यज्ञासाठीं '=' यज्ञाय.' म्हणजे लोकांनीं भाविक आणि नम्र बुद्धानें देवांस भजून नित्य यज्ञ करीत राहावें म्हणून. सृष्टि निर्माण करण्याचा हा जो येथें उद्देश सांगितला तो लक्षांत ठेवण्यासारिखा आहे.

श्लोकीकरणः—

आन्यं दिवो मातरिश्वा जभार
अमथ्नॉदन्यं परि श्येनो अद्रेः ।
अग्नीषॉमा ब्रह्मणॉ वावृधाना
उरुं यॅज्ञाये चेक्रथुः उ लोकम् ॥

७. हे अग्नीषोम हो, [ हें तुम्हांपुढें ] अर्पण केलेलें हवि तुम्ही भक्षण करा, तुम्ही प्रसन्न व्हा. हे प्रबळ [ अग्नीषोम ] हो, [तुम्ही ] आमची सेवा ग्रहण करा. [तुम्ही] उत्तम सुख देणारे [ आणि ] उत्तम संरक्षण करणारे व्हा. आणि यज्ञ करणाऱ्या उपासकाला शांति [ आणि ] कल्याण हीं प्राप्त करून द्या.

7. O Agni and Soma, partake [you ] of this proffered oblation, love [ us ] [and ] O mighty ones, be pleased [ with us ]. Be ye the givers of excellent happiness [ and ] granters of excellent protection. And bestow you peace [ and ] happiness upon the sacrificer.

७. या मंत्राचा भावार्थ उघडच आहे. अग्नीषोमाप्रीत्यर्थ अग्नीमध्यें अर्पण करण्यासाठीं आणिलेल्या हविरन्नाला उद्देशून ऋषि म्हणतो आहे, 'हे अग्नीषोम हो, तुम्ही हें आमचें हवि ग्रहण करून भक्षण करा आणि सुप्रसन्न व्हा, आणि तुम्हांप्रीत्यर्थ यज्ञ करणारे जे आम्हो त्यांस तुम्ही सुख आणि रक्षण हीं प्राप्त करून देऊन शांति आणि सौमनस्य होईल असें करा.'

'यज्ञ करणाऱ्या उपासकाला '=' यजमानाय.' येथें सूक्तकर्ता आत्मव्यतिरिक्त मनुष्याची विवक्षा करून म्हणत आहे असें नाहीं, आपणांसच उद्देशून बोलत आहे. परंतु यजमान वेगळा आणि हें सूक्त रचणारा वेगळा आहे असें समजलें तर 'यजमानाय' म्हणजे ज्याच्याकरितां मी हें सूक्त म्हणत आहें आणि जो हा यज्ञ करीत आहे त्या पुरुषाकरितां, असाहि अर्थ होणार नाहीं असें नाहीं.

श्लोकीकरणः—

अग्नीषोमा हविषः प्रस्थितस्य
वीतं हर्यतं वृषणा जुषेथाम् ।
सुशर्माणा सुअवसा हि भूतम्
अथा धत्तं यजमानाय शं योः ॥

यो अग्नीषोमा हविषा सपर्याद्देवद्रीचा मनसा यो घृतेन ।
तस्य व्रतं रक्षतं पातमंहसो विशे जनाय महि शर्म यच्छतम् ॥८॥

यः । अग्नीषोमा । हविषा । सपर्यात् । देवद्रीचा । मनसा । यः । घृतेन । तस्य । व्रतम् । रक्षतम् । पातम् । अंहसः । विशे । जनाय । महि । शर्म । यच्छतम् ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. यो [ यजमानः ] अग्नीषोमा ( =अग्नीषोमौ=हे अग्नीषोमौ, युवां ) हविषा ( =हविरन्नेन ) देवद्रीचा मनसा ( =देवतापरायणेनान्तःकरणेन ) [ वा ] सपर्यात् ( =परिचरेत् ) यो [ वा ] घृतेन ( =आज्याहुतिभिः ) [ सपर्यात् ] तस्य व्रतं [ हे अग्नीषोमौ ], [ युवां ] रक्षतं ( =तस्य कर्म=उद्योगं समाप्तिं प्रापयतम्) [ तम् ] अंहसः पातम् ( =पापात्पालयतम् ), [ तस्य ] विशे जनाय ( =पुत्रपौत्राद्यपत्येभ्यः अनुचरादिभृत्येभ्यश्च ) महि शर्म यच्छतम् ( =महत् सुखं दत्तम् ) ॥

८. हे अग्नीषोम हो, जो [कोण] हवीच्या योगानें [तुम्हांला] भजेल, [जो कोण] [तुम्हांला] देवतापरायण अंतःकरणानें [आणि] जो [कोण] घृताच्या योगानें [तुम्हांस] भजेल, त्याच्या उद्योगावर [तुम्ही] अनुग्रह करा. [त्याला] पापापासून [तुम्ही] रक्षा. त्याच्या मुलांबाळांला [आणि] लोकांला [तुम्ही] मोठें सुख द्या.

8. He who should serve you Agni and Soma with sacrificial food, with a god-craving mind, [or] who [should serve you] with clarified butter, his work may you prosper, him may you save from sin, to [his] progeny [and] to [his] men may you give great happiness.

---

८. 'हे अग्नीषोम हो, जो कोण उपासक तुम्हांला चरुपुरोडाशादि हविरन्न देऊन अथवा केवळ भाविक मनानें अथवा घृताच्या आहुति देऊन भजेल त्याणें आरंभिलेलें कोणतेंहि काम तुम्ही शेवटास न्या, त्याला संकटापासून तारा, आणि त्याच्या मुलांबाळांला आणि अनुचरादि परिवाराला तुम्ही मोठें सुख प्राप्त करून द्या.'

'हवीच्या योगानें'=' हविषा.' 'हवि' म्हणजे चरु, पुरोडाश इत्यादि अन्न असें सायणाचार्य म्हणतात. या मंत्रांत हवि देऊन भजणें, केवळ भाविक मनानें भजणें, आणि तुपाच्या धारा ओतून भजणें या तीन प्रकारच्या उपासनेंत भेद प्रदर्शित केला आहे.

'त्याच्या उद्योगावर तुम्हीं अनुग्रह करा '=' तस्य व्रतं रक्षतम्.' म्हणजे त्याणें कोणतेंहि आरंभिलेलें काम शेवटास न्या, त्याचा नाश होऊं देऊं नका, त्याला यश देत जा.

'मुलांबाळांला आणि लोकांला '= 'विशे जनाय.' 'घरादाराला,' 'कच्चाबच्चांला.'

ह्या मंत्राचें वृत्त जगती किंवा त्रिष्टुभ् आहे असें तर सांगितलें आहे पण त्याचा अर्थ सगळा मंत्र त्रिष्टुभ् किंवा सगळा जगती होय असा नसावा, तर अर्धा त्रिष्टुभ् आहे आणि अर्धा जगती आहे, त्यापेक्षां सगळ्यालाच त्रिष्टुभ् अथवा जगती म्हणावें, असा असावा. कारण या मंत्राचे पहिले दोन चरण त्रिष्टुभाचे आणि तिसरा व चवथा हे जगतीचे आहेत; ते याप्रमाणेंः—

यो अ॒ग्नीषोमा॑ ह॒विषा॑ स॒पर्या॑द्
दे॒व॒द्रीचा॒ मन॑सा॒ यो घृ॒तेन॑ ।
तस्य॑ व्र॒तं र॑क्षतं पा॒तमंह॑सः
वि॒शे जना॑य॒ महि॒ शर्म॑ यच्छतम् ॥

पण त्यारहि चरण त्रिष्टुभाप्रमाणें म्हणतां

अग्नीषोमा सवेदसा सहूती वनतं गिरः ।
सं देवत्रा बभूवथुः ॥ ९ ॥

अग्नीषोमा । सऽवेदसा । सहूती इति सऽहूती । वनतम् । गिरः ।
सम् । देवऽत्रा । बभूवथुः ॥ ९ ॥

अग्नीषोमावनेन वां यो वां घृतेन दाशति ।
तस्मै दीदयतं बृहत् ॥ १० ॥

अग्नीषोमौ । अनेन । वाम् । यः । वाम् । घृतेन । दाशति ।
तस्मै । दीदयतम् । बृहत् । १० ॥

---

## भाषायाम्.

९. हे अग्नीषोमा ( =अग्नीषोमौ ), सवेदसा ( =सवेदसौ=समानहविष्कौ ) सहूती ( =समानाह्वानौ ) [ युवां ] नो गिरः ( =अस्माभिरुच्यमाना इमाः स्तुतीः ) [एकत्रैव] वनतम् (=उभावपि समानमेव स्तोत्रमिदं सेवेथाम्) । [युवां] देवत्रा (=देवेषु मध्ये ) [ हि ] सं बभूवथुः ( =समानमेव जन्म प्रापथुः=संजातौ स्थः न तु पृथक् पृथक् ) ॥

१०. हे अग्नीषोमौ, अनेन [ घृतेन ] वाम् ( =ईदृशेन घृतेन युवां ) [ यो दाशति ] वां ( =युवाम् ) [ अनेन ] घृतेन यो दाशति ( =भजते=उपास्ते ) तस्मै [ युवां ] बृहद् दीदयतम् ( =महद् धनं प्रकाशयतं=महद् धनं यथा तं प्राप्नुयात् तथा प्रकाशेथाम् ) ॥

---

येणार नाहींत, कारण तिसरा आणि चवथा हे चरण एक एक अक्षर कमी केल्याशिवाय त्रिष्टुभाला बसणार नाहींत. आणि जरी पहिला पाद ‘ सपर्याद्’ यांतून ‘ सपरिआद् ’ अशीं च्यार अक्षरें काढिलीं आणि द्वादशाक्षरी केला तरी दुसऱ्या पादांत अक्षर वाढविण्याला मार्ग नाहीं, कारण ‘ देवद्रीचा ’ अशीं च्यार अक्षरें निघालीं तरी पाद जगतीप्रमाणें म्हणतां येणार नाहीं.

९. हे अग्नीषोम हो, समानहविष्क [ आणि ] समानाह्वान [ जे तुम्ही ते ] [आमचीं स्तोत्रें] [ एकत्रच ] ग्रहण करून घ्या. [ कारण ] [ तुम्ही ] देवांमध्यें दोघेहि मिळून एकत्र जन्मलेले आहां.

9. O Agni and Soma, may you who have a common oblation [ and ] a common invocation accept our prayers together. [ For ] together were you born among the Gods.

१०. हे अग्नीषोम हो, या [ घृतानें ] तुम्हांला, तुम्हांला [ या ] घृतानें जो [ कोण ] भजतो, त्याजप्रत [ तुम्ही ] प्रकाशून मोटें वैभव द्या.

10. O Agni and Soma, with this [ clarified butter ] [ whoever ] [ sacrifices ] to you, whoever sacrifices to you with [ this ] clarified butter, to him may you shine upon great wealth.

---

९. ' हे अग्नीषोम हो, तुम्हां दोघांला मिळून ही स्तुति आम्ही अर्पण करीत आहों, ही प्रत्येकाची वेगळी वेगळी नाहीं तरीहि तुम्हांला मान्य होओ. कारण तुमची जी उत्पत्ति देवांमध्यें झाली ती दोघांची मिळून एकत्रच झालेली आहे, निरनिराळी नाहीं, आणि तुमचें आह्वानहि लोक दोघांचें मिळून करितात आणि तुम्हांला हवि तरी दोघांला मिळूनच देत असतात.'

' एकत्र जन्मलेले आहां '=' सं बभूवथुः.' म्हणजे देवांत तुम्हां दोघांला मिळून हाक मारण्याची चाल आहे, तुम्हां दोघांचें जोडपें देवांमध्यें प्रसिद्ध आहे.

१०. ह्या मंत्राचा अर्थ समजण्यास अशी कल्पना केली पाहिजे कीं मंत्रकर्ता फार उत्तम तूप घेऊन त्याच्या आहुति अग्नीषोमाला अर्पीत आहे आणि म्हणतो कीं, ' या आमच्या उत्तम तुपासारिख्या तुपानें जो कोण तुम्हांला भजेल त्याला तुम्ही मोटें वैभव प्राप्त करून द्या, कारण वैभव देण्याविषयीं तुम्हांला कांहींच कठिण नाहीं, तुमच्या मनांत आलें आणि तुम्ही केवळ प्रकाशलां म्हणजे आपोआप तें प्राप्त होईल.'

' प्रकाशून मोटें वैभव द्या '=' बृहत् दीदयतम्.' अक्षरशः अर्थ 'मोटें [वैभव] प्रकाशा.' म्हणजे असे प्रकाशा कीं जेणेंकरून मोटें वैभव प्राप्त होईल. सू. ९२, मं. ८, १४, १६ हे तीन मंत्र आणि त्यांजवरील टीपा पहा.

जशी पूर्वींच्या तशीच या मंत्राचीहि रचना वृत्तसंबंधानें सरळ आहे. आधुनिक श्लोकाप्रमाणें म्हणावयाला अडचण कांहींच नाहीं. पुढच्या मंत्राविषयीं सुद्धा असेंच आहे.

**अग्नीषोमाविमानि नो युवं हव्या जुजोषतम् ।**
**आ यातमुप नः सचा ॥ ११ ॥**

अग्नीषोमौ । इमानि । नः । युवम् । हव्या । जुजोषतम् ।
आ । यातम् । उप । नः । सचा ॥ ११ ॥

**अग्नीषोमा पिपृतमर्वतो न आ प्यायन्तामुस्रिया हव्यसूदः ।**
**अस्मे बलानि मघवत्सु धत्तं कृणुतं नो अध्वरं श्रुष्टिमन्तम् ॥**
**॥ १२ ॥ २९ ॥ १४ ॥**

अग्नीषोमा । पिपृतम् । अर्वतः । नः । आ । प्यायन्ताम् । उस्रियाः । हव्यऽसूदः ।
अस्मे इति । बलानि । मघवत्ऽसु । धत्तम् । कृणुतम् । नः । अध्वरम् । श्रुष्टिऽमन्तम् ॥ १२ ॥ २९ ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

११. हे अग्नीषोमौ, युवं (=युवाम्) इमानि (=पुरोदृश्यमानानि) नो हव्या (=अस्माकं हवींषि) जुजोषतम् (=अतिशयेन सेवेथाम्)। [युवां] सचा (=सहैव) नः (=अस्मान्) उप आ यातम् (=आगच्छतम्)॥

१२. हे अग्नीषोमा (=अग्नीषोमौ), [युवां] नः अर्वतः पिपृतम् (=अस्माकमश्वान् पालयतम्), [अस्माकं] हव्यसूदः (=हवींषि क्षारयन्त्यः=क्षीरादिहविष उत्पादयित्र्य) उस्राः (=गाव) आ प्यायन्तां (=प्रवृद्धा भवन्तु=पुष्टाः सन्तु)। मघवत्सु (=हविरन्नयुक्तेषु=हविषो दातृषु) अस्मे (=अस्मासु) बलानि धत्तं (=स्थापयतम्)। नो अध्वरम् (=अस्माकं यज्ञं) श्रुष्टिमन्तं कृणुतं (=श्रवणयुक्तं कुरुतं=युवाभ्यां श्रुतं कुरुतं=सफलं कुरुतम्)॥

---

११. हे अग्नीषोम हो, तुम्ही हीं आमचीं हव्यें सेवन करा. तुम्ही दोघे मिळून आम्हांप्रत या.

१२. हे अग्नीषोम हो, [तुम्ही] आमच्या घोड्यांचें संरक्षण करा, [आमच्या] हव्यदायक गाई पुष्ट होओत. [तुम्हांला] हवि देणारे जे आम्ही त्यांला [तुम्ही] सर्व प्रकारचें सामर्थ्य द्या [आणि] आमचा यज्ञ सफळ करा.

11. O Agni and Soma, may you accept with great pleasure these our oblations. Come ye together unto us.

12. O Agni and Soma, preserve our horses, may [our] cows that yield the oblation become fattened. Bestow all strength upon us the givers of oblation. Crown our sacrifice with a hearing.

---

११. हविरन्नें पुढें करून गोतम म्हणतो, 'हे अग्नीषोम, तुम्ही दोवेहि मिळून या, आणि हीं हविरन्नें ग्रहण करा.'

१२. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. ऋषि शेवटीं इतकी प्रार्थना करितो कीं, 'हे अग्नीषोम हो, तुम्ही आमचे घोडे सुरक्षित राहतील असें करा, आमच्या गाई पुष्कळ दूध देतील असें करा, आमच्या स्वताहाच्या आंगीं सामर्थ्य द्या आणि जेव्हां जेव्हां आम्ही यज्ञ करून तुमची प्रार्थना करूं आणि तुम्हांला हाक मारूं तेव्हां तेव्हां तुम्ही ती ऐकून येत जा—म्हणजे आमची मनकामना पूर्ण करीत जा.' हा जो वर मागितला यावरून आपले आर्य पूर्वज किती भाविक, किती साधे भोळे, आणि कपटरहित होते तें दृष्टीस पडतें. या प्रार्थनेंत अहंपणाचा, ब्रह्मवर्चस्वाचा, ज्ञानभाराचा अथवा विद्येच्या गर्वाचा लेशहि नाहीं. गोतमासारिख्या महाऋषीनें घोडे बाळगावे आणि ते चांगले पुष्ट करण्याविषयीं प्रार्थना करून झटावें यावरून आपले प्राचीन ऋषि जसे होते म्हणून पुराणादिक आधुनिक ग्रंथ म्हणतात तसले ते नव्हते असें सिद्ध होतें. ऋग्वेदांतील अनेक सूक्तांवरून आर्य लोकांच्या घरीं घोड्यांची संपत्ति मोठी मानीत असें दिसून येतें.

'हव्यदायक'='हव्यसूदः.' म्हणजे ज्या दूध देणाऱ्या होत. प्राचीन काळापासून हविरन्न देण्याच्या कामीं दूध, तूप इत्यादिकांची किती अवश्यकता असे आणि त्यामुळें गाईवर लोकांचें केवढें प्रेम असे तें यावरून दिसून येतें.

या अष्टकांत गोतमाचीं सूक्तें येथें संपलीं, पुढच्या सूक्तापासून कुत्स ऋषीचीं लागणार. आतां येथपर्यंत जीं गोतमाचीं सूक्तें आपण पाहिलीं त्यावरून गोतमा-

## सूक्तम् ९४.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । अग्निर्देवता । अष्टम्याः पुनराद्यास्त्रयः पादा देवदेवताकाः । षोडश्या अन्त्यौ पादौ तत्रोक्तदेवदेवताकौ ॥ पञ्चदशीषोडश्यौ त्रिष्टुप्छन्दस्के । शिष्टाः सर्वा जगत्यः ॥

**इमं स्तोममर्हते जातवेदसे रथमिव सं महेमा मनीषया।**
**भद्रा हि नः प्रमतिरस्य संसद्यग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥ १**

इमम् । स्तोमम् । अर्हते । जातऽवेदसे । रथम्ऽइव । सम् । महेम । मनीषया । भद्रा । हि । नः । प्रऽमतिः । अस्य । सम्ऽसदि । अग्ने । सख्ये । मा । रिषाम । वयम् । तव ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. अर्हते ( =पूज्याय ) जातवेदसे ( =जातानां सर्वेषां प्राणिनां वेदित्रे ) [ अग्नये ] इमं स्तोमम् ( =इदं सूक्तं ) मनीषया ( =देवतापरायणया बुद्ध्या ) रथमिव सं महेम (=रथमिव संस्कुर्याम=यथा कश्चित् मित्रादिप्रियजनानयनाय रथं संस्कृत्य प्रेषयति तद्वद् इदं सूक्तमग्नेरानयनाय संस्कुर्याम )। हि (=यस्मात्) अस्य संसदि ( =अग्नेरुपासकजनसंहतौ ) [ वर्तमानानां ] नः ( =अस्माकम्=अस्मदर्थं ) प्रमतिः ( =अग्नेः प्रकृष्टा बुद्धिः=अनुग्रहबुद्धिः) भद्रा ( =कल्याणी ) [ भविष्यति ]। [ तर्हि ] हे अग्ने, तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ] वयं मा रिषाम ( =मा हिंसिता भवेम ) ॥

दिक प्राचीन महर्षि कसे होते, त्या वेळच्या लोकांची स्थिति कशी होती, याविषयीं बऱ्याच निश्चयानें आपल्याच्यानें अनुमान काढवतें. तें हें कीं, प्राचीन ऋषि आम्हांसारिखेच मर्त्य आणि अल्पायुषी होते आणि शंभर वर्षें जीवंत राहणें म्हणजे आयुष्याची शिकस्त झाली असें आम्हांप्रमाणें तेहि मानीत; ते संसार सोडून गिरिकंदरीं कंदमुळें खाऊन राहत नसत, तर आम्हांप्रमाणेंच गांवीं नगरीं राहत असत; ते आपणांस दिव्य सामर्थ्य आहे, आपण इतर लोकांपेक्षां उंच जातीचे आहों असें मानीत नसत; ते आपण 'पृथ्वीवरील देव' आहों, इतरांनीं आपली सेवा करावी असें मानीत नसत; त्यांला घोडे बाळगण्याविषयीं छंद असे, आणि आपणांस पुत्रपौत्रादिक संतति होईल ती शौर्यादिक जे क्षत्रियांचे गुण तेणेंकरून पूर्ण असावी असें ते इच्छीत आणि देवांकडेस प्रार्थीत; ते बहुतकरून नेहमीं युद्धें करीत असत, कोणानाकोणाबरोबर तरी युद्ध करावयाचा प्रसंग त्यांजला वारंवार येत असे, आणि त्या युद्धांत आपणास जय येओ आणि शत्रूचें सगळें धन आपणांस मिळो अशी ते प्रार्थना करीत. धर्माच्या संबंधानें पाहि-

## सूक्त ९४.

ऋषि—आङ्गिरस कुत्स, म्हणजे अङ्गिरसकुळांत जन्मलेला कुत्स या नांवाचा पुरुष. देवता—अग्नि. परंतु आठव्या ऋचेचे पहिले तीन चरण देवांविषयीं आहेत आणि सोळाव्या ऋचेचा उत्तरार्ध मित्र, वरुण, अदिति, सिन्धु, पृथिवी आणि द्युलोक ह्यांविषयीं आहे असें मानितात. वृत्त—जगती, मात्र पंधरावी आणि सोळावी या ऋचांचें त्रिष्टुभ्.

१. रथ [ सिद्ध केल्या]प्रमाणें हें स्तोत्र [ आपण ] पूजनीय सर्वज्ञ अग्नीसाठीं मन:पूर्वक सिद्ध करूं. कारण कीं याच्या [ भक्त]-मंडळींत [ राहिलों तर ] आमचा चांगला संभाळ [ होईल ]. तर हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

## HYMN 94.

To *Agni*, but the first three lines of verse 8 belong to the Devas (i.e. Gods) and the second half of verse 16 to the Gods mentioned therein. By *Kutsa* of the family of the Angirases. Metre— *Jagatî*, except verses 15, 16 which are *Trishtubh*.

1. Let us prepare as a chariot this hymn for adorable Agni, the knower of all creatures. For [ if we be ] among his followers we shall have his blissful grace. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

---

ल्या असतां ते देवांच्या प्रतिमा करून पूजीत असत असें दिसून येत नाहीं, पण यज्ञ करणें हें सकळ मनुष्यांचें काम आहे असें ते समजत आणि त्याप्रमाणें आचरण ठेवीत असत. हें गोतमादिक महर्षींचें खरें वृत्त आहे, तें भलतीकडे ठेवून पुराणादिकांत त्यांजविषयीं काय काय चमत्कारिक कथा रचिल्या आहेत त्या पहा; आणि त्या कथाकारांचा मूळ उद्देश कसाहि असला तरी आम्ही त्यांचा अर्थ कसा समजतों पहा!

श्लोकीकरण:—

अग्नीषोमा पिपृतमर्वतो नः
आ प्यायन्तामुस्रियो हव्यसूदः ।
अस्मे बलानि मघवत्सु धत्तं
कृणुतं नो अध्वरं श्रुष्टिमन्तम् ॥

**यस्मै त्वमायजसे स साधत्यनर्वा क्षेति दधते सुवीर्यम् ।**
**स तूताव नैनमश्नोत्यंहतिरग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥ २ ॥**

यस्मै । त्वम् । आऽयजसे । सः । साधति । अनर्वा । क्षेति । दधते । सुऽवीर्यम् ।
सः । तूताव । न । एनम् । अश्नोति । अंहतिः । अग्ने । सख्ये । मा । रिषाम । वयम् । तव ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. [ हे अग्ने ], यस्मै [ यजमानाय ] त्वम् आयजसे (=त्वं यज्ञं कृत्वा देवाना-वहसि=यस्य यज्ञे त्वं होता भवसि ) स साधति ( =इष्टं लभते ) [ स] अनर्वा क्षेति ( =अप्रतिहतः सन् निवसति ) [ स ] सुवीर्यं दधते ( =सुवीर्योपेतपुत्रपौत्रादिसंपदं धारयति ) [ स ] तूताव ( =प्रवृद्धो भवति ), एनम् अंहतिः न अश्नोति ( =न तं दारिद्र्यं प्राप्नोति ) । [ तर्हि ] हे अग्ने, तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ] वयं मा रिषाम ( =मा हिंसिता भवेम ) ॥

१. 'कोणी एकादा मनुष्य मित्राला आणण्याकरितां रथ सिद्ध करून पाठवून देतो तसें हें सूक्त आपण सिद्ध करून अग्नीप्रत म्हणूं, म्हणजे तो येईल. त्याचें स्तोत्र करणें योग्य आहे. कारण आम्ही त्याच्या भक्तमंडळींत असलों तर तो आमची चांगली काळजी घेईल आणि आम्ही त्याच्या मैत्रींत राहूं तोंपर्यंत आमचें कांहींच वाईट होणार नाहीं.'

'रथ [ सिद्ध केल्या]प्रमाणें '= ' रथं न.' स्तोत्र रचून तें इष्ट देवतेला उद्देशून म्हटलें म्हणजे तें त्या देवतेला रथांत बसवून शीघ्र घेऊन येत असतें अशी कल्पना ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं येत असते. आणि म्हणूनच अमुक देवाचा रथ मी आपल्या स्तोत्रानें जोडितों इत्यादि वाक्यें वेदांत येतात. सू. ८२, मं. ६ आणि त्याजवरील टीप पहा.

हें सर्व सूक्त 'वर्धापनविधि' ( म्हणजे वाढदिवस ) करितात त्यांत होम करून भाताच्या आहुति देतात तेव्हां म्हणत असतात. ८९ वें सूक्त जसें म्हणतात तसेंच आणि त्याजबरोबर हेंहि म्हणत असतात. ( त्या सूक्तावरील प्रयोगाविषयींची आमची टीप पहा ).

ही ऋचा वृत्तानें वरीच लडबडीत आहेः–

इमं स्तोमम् अर्हते जातवेदसे
रथम् इव सं महेमा मनीषया ।
भद्रा हि नः प्रमतिरस्य संसदि
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

२. [ हे अग्नी ], तूं ज्याचा यज्ञ संपादितोस त्याची मनकामना पूर्ण होते. [ तो ] निष्कंटक होऊन सुखी राहतो, [ तो ] उत्तम शौर्यवंत पुत्रपौत्रांप्रत पावतो. तो समृद्ध होतो. त्याला दरिद्रावस्था गांठीत नाहीं. [ तर ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

2. He for whom **thou** dost sacrifice—he attains his desire, [ he ] lives unopposed, [he] possesses progeny full of bravery. He prospers. Poverty reacheth him not. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

---

२. 'हे अग्नी, ज्याच्या यज्ञांत तूं होता होऊन यज्ञ संपादितोस त्याची मनकामना पूर्ण होते, तो निःशत्रु होऊन सुखी होतो, त्याला शूर पुत्रपौत्रादिक प्राप्त होतात, त्याचा सर्व प्रकारांनीं उत्कर्ष होतो, आणि त्याला दरिद्रावस्था प्राप्त होत नाहीं. अशी तुझ्या कृपेची कीर्ति आहे, तर आम्ही तुझ्या सेवेंत आहों त्यापेक्षां आमचें वाईट न होओ असें कर.'

'तूं ज्याचा यज्ञ संपादितोस'='यस्मै त्वम् आयजसे.' अग्नि हा उत्तम होता होय आणि तो ज्या यज्ञांत पौरोहित्य करितो तो यज्ञ देवांस प्रिय होतो असें प्रसिद्धच आहे. पहिल्या सूक्ताचा पांचवा इत्यादिक मंत्र पहा.

श्लोकीकरणः—

यस्मै त्वम् आयजसे स साधति  
अनर्वा क्षेति दधते सुवीरिअम् ।  
स तूताव नैनमश्नोति अंहतिः  
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

शकेम त्वा समिधं साधया धियस्त्वे देवा हविरदन्त्याहुतम्।
त्वमादित्याँ आ वह तान्ह्यु१श्मस्यग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥ ३ ॥

शकेम। त्वा। सम्ऽइधम्। साधय। धियः। त्वे इति। देवाः। हविः। अदन्ति। आऽहुतम्।
त्वम्। आदित्यान्। आ। वह। तान्। हि। उश्मसि। अग्ने। सख्ये। मा। रिषाम। वयम्। तव ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. [हे अग्ने], [वयं] त्वा समिधं (=त्वां समिद्धं कर्तुं) शकेम (=समर्था भवेम)। [त्वं] [नो] धियः साधय (=यज्ञादिकर्माणि निष्पादय)। त्वे (=त्वयि) आहुतं हविः (=समर्पितं हविरन्नं) देवा अदन्ति (=भक्षयन्ति)। [तस्मात्] त्वम् आदित्यान् आ वह (=अदितेः पुत्रान् मित्रावरुणार्यमादीन् देवान् आनय) [वयं] हि तान् उश्मसि (=उश्मः=कामयामहे)। [तर्हि] हे अग्ने, तव सख्ये (=तव मित्रत्वे) [वर्तमाना] वयं मा रिषाम (=मा हिंसिता भवेम)॥

३. [ हे अग्नी ], तुला प्रज्वलित करण्याचें सामर्थ्य आम्हांस राहे असें कर. [ तूं आमचीं ] कर्मं संपाद. तुझ्या ठायीं अर्पण केलेलें हवि देव भक्षण करितात. तूं आदित्यांला घेऊन ये. कारण त्यांची आम्ही इच्छा करीत आहों. [तर] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

3. May we be able to kindle thee. Lead thou our rites. Food offered in thee the Gods do eat. Bring thou the Âdityas, for we love them. May we never O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

३. 'हे अग्नी, तुला समिद्ध करून देवांप्रीत्यर्थ हवि तुझ्याठायीं देण्याचें सामर्थ्य आमचे आंगीं तूं ठेव, आणि आम्हीं तुला प्रदीप्त केल्यावर तूं आमचा होता होऊन आम्हीं आरंभिलेलीं यज्ञादि कर्मं चालीव. कारण तुझ्या ठायीं समर्पिलेलें हविरन्न देव खातात असें प्रसिद्ध आहे. तर ज्यांविषयीं आम्ही वांछा करीत आहों असे जे आदित्य त्यांला इकडे घेऊन ये.'

' आदित्यांला '=' आदित्यान्.' आदित्य म्हणजे मित्र, वरुण, अर्यमा, पूषा, भग, इंद्र आणि सविता. सू. ४१,मं. ४ आणि त्याजवरील टीप पहा.

श्लोकीकरणः–

शकेॅम त्वा समिधं साधया धियस्
तुए देवा हविरदन्ति आहुतम् ।
त्वमादित्यानावह तान्हि उश्मसि
अग्ने सख्ये मा रिषॅामा वयं तव ॥

भरा॑मे॒ध्मं कृ॒णवा॑मा ह॒वींषि॑ ते चि॒तय॑न्तः॒ पर्व॑णापर्वणा व॒यम् ।
जी॒वात॑वे प्रत॒रं सा॑धया॒ धियोऽग्ने॑ स॒ख्ये मा रि॑षामा व॒यं तव॑ ॥ ४

भरा॑म । इ॒ध्मम् । कृ॒णवा॑म । ह॒वींषि॑ । ते॒ । चि॒तय॑न्तः । पर्व॑णाऽपर्वणा । व॒यम् ।
जी॒वात॑वे । प्र॒ऽत॒रम् । सा॒ध॒य॒ । धियः॑ । अग्ने॑ । स॒ख्ये । मा । रि॒षा॒म॒ । व॒यम् । तव॑ ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. [हे अग्ने], [वयम्] इध्मं भराम (=त्वदर्थं समिधः संपादयाम=यथा संपादयेम तथा कुरु) वयं [त्वां] पर्वणापर्वणा (=पर्वणि पर्वणि=" प्रतिपक्षमावृत्ताभ्यां दर्शपूर्णमासाभ्यां ") चितयन्तः (=प्रज्ञापयन्तः=प्रदीप्तं कुर्वन्तः सन्तः) ते हवींषि कृणवाम (=तुभ्यं हविरन्नानि करवाम=यथा कुर्मस्तथा कुरु) । जीवातवे (=जीवनाय=चिरजीवनाय=वयं यथा चिरं जीवेम तथा) धियः प्रतरं साधय (=अस्माकं कर्माणि " अग्निहोत्रादीनि " निष्पादय=होता भूत्वा उत्कृष्टं यथा तथा समाप्तिं प्रापय), [तर्हि] हे अग्ने, तव सख्ये (=तव मित्रत्वे) [वर्तमाना] वयं मा रिषाम (=मा हिंसिता भवेम) ॥

४. [ हे अग्नी ], आम्हीं तुजकरितां काष्ठें आणावीं अशी इच्छा आम्हांला दे. आम्ही तुला प्रतिपर्वणीला प्रदीप्त करून तुझ्या ठायीं हवि अर्पण करावें अशी आम्हांला इच्छा दे. [ आम्हीं ] [ फार वर्षे ] जगावें म्हणून [ आमचीं ] कर्मे उत्कृष्ट रीतीनें संपाद. [ तर ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

4. May we bring thee fuel, may we offer thee oblations, kindling thee every season. That we may live long, lead thou our rites successfully. May we never O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

४. 'हे अग्नी, तुला प्रत्येक पर्वणीच्या वेळीं, म्हणजे यज्ञ करण्याचे जे प्रातःकाळ, संध्याकाळ, पौर्णिमा, अमावास्या इत्यादि प्रसंग त्या प्रत्येक प्रसंगीं तुला प्रदीप्त करण्यासाठीं समिधा आणाव्या, तुला समिद्ध करावा, आणि तुझ्याठायीं हवि अर्पावें अशी आम्हांला इच्छा दे. आणि आमचीं जीं कर्मे तीं तूं सांग संपादून आमचें आयुष्य संपेपर्यंत आम्ही जगूं असें कर. कारण हे अग्नी, तुझ्या मैत्रींत आम्ही असलों तर आमचा नाश होणार नाहीं.'

'आमचीं कर्मे संपाद' = 'साधय धियः.' म्हणजे आम्ही जे यज्ञादिक करितों त्यांत तूं मुख्य पुरोहित होऊन आमचीं कर्मे तडीला ने, कीं जेणेंकरून आम्ही फार दिवसपर्यंत जगूं. ही जी फार दिवस जगण्याची प्रार्थना आणि वांछा येथें आणिली आहे तिजमुळें आणि "अग्ने सख्ये मा रिषाम वयं तव" हें पालवपद प्रत्येक मंत्रांत आलें आहे त्यामुळेंच हें सूक्त 'वर्धापन' कर्मांत म्हणत असतील असें वाटतें.

श्लोकीकरणः—

भरामेध्मं कृणवामा हवींषि ते
चितयन्तः पर्वणापर्वणा वयम् ।
जीवातवे प्रतरं साधया धियः
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

h 4

विशां गोपा अस्य चरन्ति जन्तवो द्विपच्च यदुत चतुष्पदक्तुभिः ।
चित्रः प्रकेत उषसो महाँ अस्यग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥
॥ ५ ॥ ३० ॥

विशाम् । गोपाः । अस्य । चरन्ति । जन्तवः । द्विऽपत् । च । यत् ।
उत । चतुःऽपत् । अक्तुऽभिः ।
चित्रः । प्रऽकेतः । उषसः । महान् । असि । अग्ने । सख्ये । मा ।
रिषाम । वयम् । तव ॥ ५ ॥ ३० ॥

---

## भाषायाम्.

५. [अयमग्निः] विशां गोपाः (=जनानां पालयिता) [भवति] । अस्य अक्तुभिः (=अस्यैव=अग्नेरेव रश्मिभिः=प्रकाशद्वारा) जन्तवः (=सकलाः प्राणिनः) द्विपद् च यद् उत चतुष्पद् (=यद् द्विपदं यच्च चतुष्पदं तानि सर्वप्राणिजातानि) चरन्ति (=संचरन्ति) । [हे अग्ने], [त्वम्] उषसः (=उषोदेवतासंबन्धी) चित्रः (=चायनीयः=पूज्यः=उत्तमो) महान् प्रकेतः (=प्रकाशः) असि । [तर्हि] हे अग्ने, तव सख्ये (=तव मित्रत्वे) [वर्तमाना] वयं मा रिषाम (=मा हिंसिता भवेम) ॥

५. [ अग्नि हा ] लोकांचा पालन करणारा [ होय ]. जे द्विपाद आणि जे चतुष्पाद प्राणी [ते] ह्याच्याच प्रकाशामुळें चालतात. [ हे अग्नी ], [ तूं ] उषेचा सुंदर मोठा प्रकाश होस. [ तर ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

5. [ He is ] the protector of the people. Through his rays all creatures, both [that which is] biped and [that] which [is] quadruped, move.—[ Thou ] art [ O Agni ], the fair [and] great light of Ushas. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

५. 'हे अग्नी, तूं सकळ प्राण्यांचा संरक्षक आहेस. तूं प्रकाशतोस म्हणून द्विपाद आणि चतुष्पाद प्राणी संचार करूं शकतात. उषेचा जो प्रकाश तद्रूपच तूं आहेस. आणि उषा उगवते आणि सूर्य उगवतो तद्रूपच तूं तेज आहेस आणि तें तेज जिकडे तिकडे पसरतें म्हणूनच सर्व प्राणी जगले आहेत. तर तुझ्या मैत्रींत आम्ही आहों त्यापेक्षां आमचें वाईट कधींहि न होई असें कर.'

'ह्याच्याच प्रकाशामुळें '=' अस्य अक्तुभिः.' म्हणजे हा जेव्हां सूर्यरूपानें प्रकाशतो तेव्हां. सूर्याचें तेज आणि उषेचें तेज दिसतें आणि लोकांस आपआपल्या कामीं प्रवृत्त करितें तें अग्नीचेंच तेज- होय असें समजून ऋषि बोलत आहे.

श्लोकीकरणः—

विशां गोपा अस्य चरन्ति जन्तवो
द्विपच्च यदुत चतुष्पदक्तुभिः ।
चित्रः प्रकेतः उषसो महानसि
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

त्वम॑ध्व॒र्युरु॒त होता॑सि पू॒र्व्यः प्र॒शास्ता॒ पोता॑ ज॒नुषा॑ पु॒रोहि॑तः ।
विश्वा॑ वि॒द्वाँ आर्त्वि॑ज्या धीर पुष्य॒स्यग्ने॑ स॒ख्ये मा रि॑षामा व॒यं
तव॑ ॥ ६ ॥

त्वम् । अ॒ध्व॒र्युः । उ॒त । होता॑ । अ॒सि॒ । पू॒र्व्यः । प्र॒ऽशा॒स्ता । पोता॑ । ज॒नुषा॑ । पु॒रःऽहि॑तः ।
विश्वा॑ । वि॒द्वान् । आर्त्वि॑ज्या । धी॒र॒ । पु॒ष्य॒सि॒ । अग्ने॑ । स॒ख्ये । मा । रि॒षा॒म॒ । व॒यम् । तव॑ ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. [ हे **अग्ने** ], त्वम् अध्वर्युः ( =एतन्नामक ऋत्विग् ) [ असि ] उत पूर्व्यो होता असि ( =अपि च पुरातनो देवानामाह्वाता भवसि ) । [ त्वं ] प्रशास्ता (=एतन्नामक ऋत्विक् ) पोता ( =एतन्नामक ऋत्विग् ) जनुषा [ च ] ( =जन्मतश्च ) पुरोहितः ( =एतन्नामक ऋत्विग् ) [ भवसि ] । विश्वा आर्त्विज्या ( =विश्वानि आर्त्विज्यानि=सर्वाणि ऋत्विक्कर्माणि ) विद्वान् ( =जानन् ) हे धीर (=धीमन् ), पुष्यसि ( =सफलानि करोषि ) । [ ताहं ] हे अग्ने, तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ) वयं मा रिषाम ( =मा हिंसिता भवाम ) ॥

इमां सायण एवं व्याचष्टे । हे अग्ने, त्वमध्वर्युरध्वरस्य यागस्य नेता देवान्प्रति प्रेरयिता यद्वा याग आध्वर्यवस्य कर्ता भवसि । अध्वर्यौ मनुष्ये जाठररूपेण वागिन्द्रियाधिष्ठातृत्वेन वावस्थाय यागनिष्पादकोऽसि । उत अपि च पूर्व्यो मुख्यो होता देवानामाह्वाता पूर्ववद्धोतर्यवस्थाय हौत्रस्य कर्मणः कर्ता वासि । भवसि । मानुषो होता मुख्यः । तदपेक्षयास्य मुख्यत्वम् । तथा प्रशास्ता प्रकर्षेण शास्ता सर्वेषां शिक्षकोऽसि । यद्वा होतर्यज पोतर्यजेत्यादिना प्रैषेण शास्तीति मैत्रावरुणः प्रशास्ता । पूर्ववत्तस्मिन्नवस्थाय यागनिष्पादकोऽसि । पोता यज्ञस्य पावयिता शोधयितासि । यद्वा पोतृनामकस्यार्त्विजः पूर्ववदधिष्ठाय यागनिष्पादकोऽसि । तथा जनुषा जन्मना स्वाभाव्येन पुरोहितः पुरस्तादागामिनि स्वर्गादौ हितोऽनुकूलाचरणोऽसि । यद्वा सर्वेषु कर्मसु पूर्वस्यां दिश्याहवनीये स्थापितोऽसि । अथवा पुरोहितो ब्रह्मा देवपुरोहितस्य बृहस्पतेः प्रतिनिधित्वात् । तथा च मन्त्रान्तरम् । बृहस्पतिर्देवानां ब्रह्माहं मनुष्याणामिति । अतस्तस्मिन्ब्रह्मणि पूर्ववदवस्थाय तद्रूपः सन्विश्वा सर्वाण्यार्त्विज्या ऋत्विजः कर्माण्याध्वर्यवादीनि विद्वान् जानंस्त्वं हे धीर प्राज्ञाग्ने पुष्यसि । न्यूनाधिकभावराहित्येन संपूर्णानि करोषि ॥

६. [ हे अग्नी ], तूं अध्वर्यु [ होस ] आणि [ तूं ] पुरातन होता होस. [ तूं ] प्रशास्ता [ होस ]. [ तूं ] जन्मत: पुरोहित [ होस ]. हे प्राज्ञा, [ तूं ] ऋत्विजांचीं सकळ कर्में जाणतोस आणि फलद्रूप करितोस. [ तर ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

6. Thou [art] an Adhvaryu [priest], and art an ancient invoker. [Thou art] a Pras'âstâ, a Potâ [and] by birth a Purohita [priest]. Thou knowest and makest to prosper all offices of the priests, O wise one. May we never, O Agni, be hurt [while we are] under thy auspices.

६. 'हे अग्नो, यज्ञांत जे अध्वर्यु, होता, प्रशास्ता, पोता आणि पुरोहित या नांवांचे ऋत्विज् म्हणजे उपाध्ये असतात तद्रूपच तूं आहेस, आणि सकळ ऋत्विजांचीं सकळ कामें तुला येतात, आणि तीं तूं चालवून सफळ करीत असतास. तर असा जो विद्वान् तूं त्या तुझ्या आश्रयाखालीं आम्ही आहों, त्यापेक्षां आमचें अकल्याण होऊं देऊं नको.'

श्लोकीकरण:—

त्वमध्वर्युः उत होतासि पूर्विअः
प्रशास्ता पोता जनुषा पुरोहितः ।
विश्वा विद्वानार्त्विज्या धीर पुष्यसि
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

ही जी वृत्तरचना आम्ही विग्रह करून दाखवितों यावरून जगती वृत्त आधुनिक श्लोक वृत्ताला लाविलें तर साधारण रीत्या बसतें तर खरें, पण त्रिष्टुभाप्रमाणें सरळ बसत नाहीं.

**यो विश्वतः सुप्रतीकः सदृङ्ङसि दूरे चित्सन्तळिदिवाति रोचसे।**
**रात्र्याश्चिदन्धो अति देव पश्यस्यग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥७**

यः । विश्वतः । सुऽप्रतीकः । सऽदृङ् । असि । दूरे । चित् । सन् । तळित्ऽइव । अति । रोचसे ।
रात्र्याः । चित् । अन्धः । अति । देव । पश्यसि । अग्ने । सख्ये । मा । रिषाम । वयम् । तव ॥ ७ ॥

**पूर्वो देवा भवतु सुन्वतो रथोऽस्माकं शंसो अभ्यस्तु दूढ्यः ।**
**तदा जानीतोत पुष्यता वचोऽग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥ ८**

पूर्वः । देवाः । भवतु । सुन्वतः । रथः । अस्माकम् । शंसः । अभि । अस्तु । दुःऽध्यः ।
तत् । आ । जानीत । उत । पुष्यत । वचः । अग्ने । सख्ये । मा । रिषाम । वयम् । तव ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. यस् [ त्वम् अग्निः ] सुप्रतीकः ( =शोभनाङ्गो ) विश्वतः सदृङ् ( =सर्वास्वपि दिक्षु सदृशः समानरूपः ) असि [ स त्वं ] दूरे चित् सन् ( =दूरदेशे वर्तमानोपि ) तळिदिव अति रोचसे ( =समीपम् इव=समीपं वर्तमान इव प्रकाशसे ) । [ स त्वं ] हे देव ( =द्योतमान ), रात्र्याश्चित् अन्धः ( =बहुलमन्धकारम् ) अति पश्यसि ( =अतीत्य ईक्षसे=अतीत्य प्रकाशयसि । [ तर्हि ] हे अग्ने, तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ] वयं मा रिषाम ( =मा हिंसिता भवाम ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । दिवा यत् सूर्यरूपं तेजो दूरवर्त्यपि समीपवर्तिवत् प्रकाशते रात्रौ च यन्नभसि तारकादीनां तेजो बहून् अन्धकारव्याप्तान् आकाशप्रदेशान् अतीत्य भूमौ पतति तत्सर्वमग्नेः संबन्ध्येवेति ॥

८. हे देवाः, सुन्वतो रथः ( =सोमं युष्मदर्थम् अभिषुण्वत उपासकस्य रथो ) [ युद्धादिषु ] पूर्वो भवतु ( =प्रथमो भवतु=सोमम् अनभिषुण्वतां रथेभ्योपि जये प्रथमो भवतु ) । अस्माकं शंसः ( =अस्माकम् अभिशापः=अस्माभिः कृतः शापो ) दूढ्यः अभि अस्तु ( =दुर्धियः पापबुद्धीन् अस्माकं शत्रून् अभिभवतु=बाधताम् ) ।

७. जो [ तूं अग्नि ] सुंदर [ आणि ] चहूंकडून एकसारिखा होस, [ तो ] [ तूं ] दूर असतांहि जवळ [ असल्या]प्रमाणें प्रकाशतोस, [ तो तूं ] देदीप्यमान [ अग्नि ] रात्रीच्या सुद्धा अंधकारामधून प्रकाशतोस. [ तर ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

८. हे देव हो, सोमयाग करणाऱ्या उपासकाचा रथ [ सर्वां]-पुढें असो. आमचा शाप दुष्ट जनांला बाधो. तर [ हे देव हो ], ही आमची प्रार्थना तुम्ही मान्य करून घ्या आणि सफळ करा. हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

7. Thou, O Agni, who art beautiful [ and ] of the same form on all sides, shinest as though [ thou wert ] near, though being far; thou seest beyond the blindness of even the night. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

8. May the chariot of the Soma-sacrificer be in front, O Gods. May our imprecation harm the wicked. Know ye then this prayer and make [ it ] prosper. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

---

७. भावार्थः—‘ हे अग्नी, दिवसा जें सूर्यरूप तेज अति दूर असतांहि अति समीप असल्याप्रमाणें पूर्णपणें प्रकाशतें, आणि रात्रीच्या वेळीं सर्व अंधकारमय आकाशप्रदेशांमधून जें तारांचें आणि नक्षत्रांचें तेज भूमीवर पडतें, तें सर्व तुझेंच आहे. तूं सुंदर आणि पाहिजे त्या दिशेनें पाहिला तरी एकच रूपाचा आहेस. तर असा जो महानुभावी तूं, त्या तुझ्या आश्रयाखालीं आम्ही आहों त्यापेक्षां तूं आमचें अकल्याण होऊं देऊं नको.’

‘ चहूंकडून एकसारिखा ’=‘ विश्वतः सदृङ्.’ म्हणजे सूर्यरूप अथवा नक्षत्ररूप जो अग्नि त्याजकडे कोणत्याहि ठिकाणाहून पाहिलें तरी त्याचें रूप एकच असतें.

श्लोकीकरणः—

यो विश्वतः सुप्रतीकः सदृङ्ङसि<br>
दूरे चित्सन्तळिदिवाति रोचसे ।<br>
रात्र्याश्चिदन्धो अति देव पश्यसि<br>
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

८. देवांला संबोधून म्हणतो, ‘ हे देव हो, जो उपासक सोम काढून तुम्हां-

वधैर्दुःशंसाँ अप दूढ्यो जहि दूरे वा ये अन्ति वा के चिदत्रिणः ।
अथा यज्ञाय गृणते सुगं कृध्यग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥ ९

वधैः । दुःऽशंसान् । अप । दुःऽध्यः । जहि । दूरे । वा । ये । अन्ति । वा । के । चित् । अत्रिणः ।
अथ । यज्ञाय । गृणते । सुऽगम् । कृधि । अग्ने । सख्ये । मा । रिषाम । वयम् । तव ॥ ९ ॥

तद् [ एतद् ] वचः ( =अस्माकमिदं वचनम् ) आ जानीत ( =आभिमुख्येन जानीत=अवगच्छत ) उत पुष्यत ( =सफलं कुरुत च ) । [ तर्हि ] हे अग्ने, तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ] वयं मा रिषाम (=मा हिंसिता भवाम ) ॥

## भाषायाम्.

९. [ हे अग्ने ], दुःशंसान् ( =दुष्टैः कीर्तनैर्युक्तान्=दुर्वचनवाचिनः=दुष्टाभिशंसिनः पारुष्यवादिनः=नास्तिकान् ) वधैः ( =आयुधैः ) अप जहि ( =हत्वा अपगमय ) । ये अत्रिणः ( =भक्षयितारः=राक्षसादयो ) दूरे वा ( =दूरदेशे वा ) [ ये ] के चित् [ अत्रिणः ] अन्ति वा ( =ये केचिच्च समीपदेशे ) [ वर्तमाना ] अत्रिणः ( =राक्षसादयस् ) [ तान् ] [ अप जहि ] । अथ ( =अनन्तरं=तथा कृत्वा च ) यज्ञाय ( =यज्ञकारिणे यजमानाय ) गृणते ( =स्तुवते मत्सदृशाय ) [ च ] सुगं कृधि ( =सुगं कुरु=सुगमं कुरु=मार्गं सुखेन गन्तव्यं कुरु=सुखं देहि ) । [ तर्हि ] हे अग्ने, तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ] वयं मा रिषाम ( =मा हिंसिता भवाम ) ॥

ला अर्पण करील आणि तुम्हांला भजेल त्याचा रथ नित्य सर्वांच्या रथांपुढें राही असें तुम्ही करा. म्हणजे युद्धांत सर्वांपुढें त्याचा रथ जाऊन प्रथम विजयी होओ. आमचें वाईट इच्छिणाऱ्याचें वाईट होओ असें आम्ही इच्छिलें आणि म्हटलें तर त्याचें त्याप्रमाणें वाईट होत जाओ. ही जी आमची प्रार्थना ती तुम्ही ऐकून घ्या आणि सफळ करा; आणि हे अग्नी, आम्ही तुझ्या आश्रयाखालीं आहों त्यापेक्षां आमचें अकल्याण होऊं देऊं नको.'

'आमचा शाप दुष्ट जनांला बाधो'= 'अस्माकं शंसः दूढ्यः अभि अस्तु.' म्हणजे हे आपले आर्य पूर्वज सदैव लोकांला थोडेंसें निमित्त झालें म्हणजे शाप देत होते असें नाहीं, तर कुत्साच्या म्हणण्याचा भावार्थ इतकाच आहे कीं, ज्यांचें वाईट व्हावें असें आम्ही इच्छूं

९. हे अग्नी, तूं दुर्वचनी [ आणि ] दुर्बुद्धि [ लोकां]स शस्त्रांनीं मारून टाक; जे [ जे ] कोण राक्षस दूर [ असतील ] अथवा समीप [ असतील ] [ त्यांस तूं शस्त्रांनीं मारून टाक ]. आणि तेणेंकरून [ तूं ] यज्ञ करणाऱ्याचें [ आणि ] स्तोत्र करणाऱ्याचें कल्याण कर. हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

9. With weapons do thou cut down the infidels [and] the wicked, [ cut down ] whatever devils may be far or near. And then grant thou good luck to the sacrificer [and] to the poet. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

त्या शत्रूचें कल्याण होऊं देऊं नकोस.
श्लोकीकरणः—

पूर्वो देवा भवतु सुन्वतो रथः
अस्माकं शंसो अभि अस्तु दूढिअः ।
तदा जानीत उत पुष्यता वचः
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

९. ' देवनिंदक आणि मनुष्यनिंदक असे जे नास्तिक आणि दुर्बुद्धीचे लोक त्यांचा तूं शस्त्रांनीं वध कर. आणि जे जे म्हणून राक्षसादिक नाश करणारे प्राणी असतील त्यांलाहि शस्त्रांनीं मारून नाहींसे करून टाक, मग ते दूर असोत किंवा जवळ असोत. आणि तसें करून मग यज्ञ करणाऱ्या उपासकाचें आणि मजसारिख्या स्तोत्याचें कल्याण होई असें कर. आणि आम्ही तुझ्या आश्रयाखालीं आहों त्यापेक्षां आमचा नाश होऊं देऊं नको.'

' दुर्वचनी '=' दुःशंसान्.' म्हणजे ज्यांच्या तोंडीं नित्य अपशब्द, निंदा, वल्गना हीं असतात असे लोक, ' नास्तिक.' देवांची सेवा यज्ञादिकेंकरून न करणारे असा भावार्थ आहे.

' यज्ञ करणाऱ्या '=' यज्ञाय.' हा अर्थ आम्हीं सायणानुसारें केला आहे, आणि तसा केल्याशिवाय निर्वाह दिसत नाहीं. कितीएक विद्वान् ' यज्ञाय सुगं कृधि,' यज्ञ करावयाला मार्ग सोपा म्हणजे निर्विघ्न कर असा अर्थ करूं इच्छितात. पण ' यज्ञ करणारा ' आणि ' स्तोता ' यांच्यामध्यें विरोध विवक्षित आहे तो मग नाहींसा होईल. मात्र शब्दशः अर्थ तसा होणार नाहीं असें नाहीं. या मंत्रांत जो प्रार्थना आहे तिचें तात्पर्य असें आहे कीं, यज्ञरूप जो सत्यधर्म त्याची निंदा करणारे जे नास्तिक आणि विघ्न करणारे

यदयुक्था अरुषा रोहिता रथे वातजूता वृषभस्येव ते रवः ।
आदिन्वसि वनिनो धूमकेतुनाग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥
॥ १० ॥ ३१ ॥

यत् । अयुक्थाः । अरुषा । रोहिता । रथे । वातऽजूता । वृषभस्यऽइव । ते । रवः ।
आत् । इन्वसि । वनिनः । धूमऽकेतुना । अग्ने । सख्ये । मा । रिषाम । वयम् । तव ॥ १० ॥ ३१ ॥

अध स्वनादुत बिभ्युः पतत्रिणो द्रप्सा यत्ते यवसादो व्यस्थिरन् ।
सुगं तत्ते तावकेभ्यो रथेभ्योऽग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥११

अध । स्वनात् । उत । बिभ्युः । पतत्रिणः । द्रप्साः । यत् । ते । यवसऽअदः । वि । अस्थिरन् ।
सुऽगम् । तत् । ते । तावकेभ्यः । रथेभ्यः । अग्ने । सख्ये । मा । रिषाम । वयम् । तव ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

१०. [ हे अग्ने ], यद् ( =यदा ) [ त्वम् ] अरुषा ( =अरुषौ=आरोचमानौ ) वातजूता ( =वातजूतौ=वायुवेगवन्तौ ) रोहिता ( =रोहितौ=तव लोहितवर्णावश्वौ ) रथे अयुक्थाः ( =रथे अयोजयः ) ते रवः ( =रथस्य गर्जना ) [ च ] वृषभस्येव ( =महोक्षस्य रव इव ) [ भवति ] आत् ( =तदा ) [ त्वं ] वनिनः ( =वनवृक्षान् ) धूमकेतुना ( =धूमपताकिना तव ज्वालासंघेन ) इन्वसि ( =व्याप्नोषि ) । [ तर्हि ] हे अग्ने, तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ] वयं मा रिषाम ( =मा हिंसिता भवाम ) ॥

११. अध ( =अपि च ) [ हे अग्ने ], यद् ( =यदा ) ते ( =तव ) यवसादः ( =तृणानां भक्षयितारः ) द्रप्साः ( =ज्वालांशाः ) वि अस्थिरन् ( =विविधम् अवतिष्ठन्ते=इतस्ततः प्रसृता भवन्ति ) [ तदा ] स्वनात् ( =तव गम्भीरशब्दात् ) उत पतत्रिणः ( =पक्षिणोऽपि ) बिभ्युः ( =बिभ्यति ) तत् ( =अपि च तदानीं ) ते ( =तुभ्यं ) तावकेभ्यो रथेभ्यश्च सुगं [ भवति ] ( =मार्गः सुगम्यो भवति ) । [ तर्हि ] हे अग्ने, तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ] वयं मा रिषाम ( =मा हिंसिता भवाम ) ॥

१०. [ हे अग्नी ], तूं जेव्हां आपल्या रथाला लकलकीत [ आणि ] वायूप्रमाणें चपळ [ अशी ] तांबड्या घोड्यांची जोडी जोडितोस [ आणि जाऊं लागतोस ] [ आणि ] जेव्हां तुझ्या [ रथाची ] गर्जना पोळाच्या डरकण्याप्रमाणें [ होते ], तेव्हां [ तूं ] [ आपल्या ] धूमकेतु [ ज्वाळे ]नें अरण्यांतील महावृक्षांला व्यापून टाकीत असतोस. [ तर ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

10. When thou hast yoked to [ thy ] chariot [thy] pair of brilliant tawny horses, swift as the wind, [ and ] when thy roaring is like [ the bellowing of ] a bull, then dost thou overrun the forest trees with [thy] smoke-bannered flame. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

११. आणि [ हे अग्नी ], जेव्हां तुझ्या तृणभक्षक ठिणग्या इकडे तिकडे पसरतात [ तेव्हां ] पक्षी सुद्धा [तुझ्या ] ध्वनीला ऐकून भीत असतात; [ आणि ] तेव्हां तुला [ आणि ] तुझ्या रथाला मार्ग सुगम [ होत असतो ]. [ तर ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

11. Then even the birds tremble at thy noise when thy grass-eating sparks extend; then all becomes easy for thee [and] thy chariots. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

---

जे राक्षसादिक त्यांला तूं मारून टाक आणि आम्हांला निष्कंटक कर म्हणजे आम्ही तुझ्या सेवेंत राहून सुखी होऊं.

श्लोकीकरणः—

वधैर्दुःशंसानप दूढ्यो जहि
दूरे वा ये अन्ति वा के चिदत्रिणः ।
अथा यज्ञाय गृणते सुगं कृधि
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

---

१०. 'हे अग्नी, तूं जेव्हां आपल्या रथाला तुझे तेजस्वी लाल घोडे जुंपतोस आणि जातां जातां तुझ्या रथाचा आवाज एकाद्या मोठ्यानें डरकणाऱ्या पोळा-

अयं मित्रस्य वरुणस्य धायसेऽवयातां मरुतां हेळो अद्भुतः ।
मृळा सु नो भूत्वेषां मनः पुनरग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥
॥ १२ ॥

अयम् । मित्रस्य । वरुणस्य । धायसे । अवऽयाताम् । मरुताम् । हेळः ।
अद्भुतः ।
मृळ । सु । नः । भूतु । एषाम् । मनः । पुनः । अग्ने । सख्ये । मा ।
रिषाम । वयम् । तव ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१२. अयं (=मद्रूप उपासको) मित्रस्य वरुणस्य [च] धायसे (=धारणाय=मित्रावरुणाभ्यां पालितो भवितुं) [योग्यो भवति] अवयातां मरुताम् (=अन्यदेवमन्युम् अपगमयतां मरुतां) [स्वकीय एव] हेळः (=क्रोधः) अद्भुतः (=महान्) [भवति]। [हे अग्ने], [त्वं] सु मृळ (=सुष्ठु मृडय=अस्मान् सुखय) एषां मनः (=मरुताम् अन्तःकरणं) पुनर्नो भूतु (=पुनरपि अस्माकं भवतु=क्रोधं त्यक्त्वा अस्मदनुकूलं भवतु)। [तर्हि] हे अग्ने, तव सख्ये (=तव मित्रत्वे) [वर्तमाना] वयं मा रिषाम (=मा हिंसिता भवाम)॥

मित्रावरुणावानय मरुतश्चानयेति प्रार्थ्यते ॥

---

ऱ्या आवाजाप्रमाणें होत असतो तेव्हां तूं जिकडे तिकडे पसरतोस, आणि आपल्या तेजानें अरण्यांतील झाडांला पुरे पुरे करून टाकितोस.' अग्नीचे लाल घोडे म्हणजे लाल रंगाच्या ज्वाळा. आणि तो 'रथांत बसून जाऊं लागला म्हणजे' तो अरण्यांत पसरूं लागला म्हणजे असा अर्थ.

श्लोकीकरणः—

यदयुक्था अरुषा रोहिता रथे
वातजूता वृषभस्येव ते रवः।
आदिन्वसि वनिनो धूमकेतुना
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

११. 'आणि हे अग्नी, जेथें जेथें पडतील तेथें तेथें गवताला खाऊन टाकणाऱ्या ठिणग्या त्या इकडे तिकडे पसरूं लागल्या आणि तुझा आवाज होऊं लागला म्हणजे पशुपक्ष्यादिक सर्व प्राणी थरथर कांपून पळून जातात आणि वृक्षादिक सर्व वनस्पति जळून जातात, आणि मग तूं आणि तुझे रथ जिकडे जाल तिकडे मार्ग मोकळा असतो. तर आम्ही तुझ्या आश्रयाखालीं आहों त्यापेक्षां आमचें अकल्याण होऊं देऊं नको.'

१२. हा [ अग्नीचा स्तोता ] मित्र [ आणि ] वरुण यांच्या रक्षणास [ पात्र ] [ होय ] [ आणि ] क्रोधाची शांति करविणाऱ्या मरुतांचा क्रोध अद्भुत [ होय ]. [ हे अग्नी], [ तूं आम्हांवर] कृपा कर [ आणि ] त्या [ मरुतां]चें मनहि पुनः आम्हांला अनुकूळ होओ. [ तर ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

12. This [ worshipper ] is [ fit ] for support by Mitra [ and ] by Varuna. Wonderful is the anger of the Maruts [though they are themselves] the appeasers [ of anger]. Be thou fevourable, O Agni, [ and ] may the heart of these [Maruts] become ours once more. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

श्लोकीकरण:—

अध स्वनादुत बिभ्युः पतत्रिणो
द्रप्सा यत्ते यवसादो वि अस्थिरन् ।
सुगं तत्ते तावकेभ्यो रथेभिओ
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

१२. भावार्थः—'हा जो मी उपासक तो मित्र आणि वरुण या देवांच्या प्रसादास योग्य आहें. तर त्यांलाहि तूं घेऊन ये, आणि मरुत् हे देव जरी दुसऱ्या देवांचा क्रोध शांत करण्याविषयीं तत्पर असतात तरी ते स्वताहाच क्रोध करीत नाहींत असें नाहीं, आणि त्यांचा तो क्रोध चमत्कारिक, म्हणजे बाहेर उघड न समजणारा असा आहे. तर त्यांलाहि तूं घेऊन ये. आणि तूं प्रसन्न होऊन त्यांलाहि प्रसन्न करीव. कारण आम्ही तुझ्या आश्रयाखालीं आहों त्यापेक्षां आमचा नाश होऊं देऊं नको.'

'क्रोधाची शांति करविणाऱ्या'='अवयाताम्.' सायणाचार्य येथें द्युलोकाखालून, म्हणजे अंतरिक्षांतून चालणारे त्यांचा असा अर्थ करितात. पण 'अव + या' या धातूचा अर्थ क्रोध शांत करणें असा वेदांत कितीएक ठिकाणीं होत असतो. ऋ. १. १२९. ११ यांत इंद्राला 'अवयाता दुर्मतीनाम्' म्हणजे दुष्टबुद्धींच्या लोकांला शांत करणारा, आणि ऋ. ८. ४८. २ यांत सोम देवाला 'देव्यस्य हरसः अवयाता' म्हणजे देवांचा क्रोध शांत करणारा असें म्हटलें आहे. ऋ. ४. १. ४ 'वरुणस्य हेळः अवयासिसीष्ठाः'=हे अग्नी, तूं वरुणाचा क्रोध शांत कर असें म्हटलें आहे. ऋ. ६. ६६. ५ यांत 'उग्रान् अव यासत्' रागावलेल्यांस शांत करावें असा प्रयोग आहे. त्या-

देवो देवानामसि मित्रो अद्भुतो वसुर्वसूनामसि चारुरध्वरे ।
शर्मन्त्स्याम तव सप्रथस्तमेऽग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥१३

देवः । देवानाम् । असि । मित्रः । अद्भुतः । वसुः । वसूनाम् । असि । चारुः । अध्वरे ।
शर्मन् । स्याम । तव । सप्रथःऽतमे । अग्ने । सख्ये । मा । रिषाम । वयम् । तव ॥ १३ ॥

तत्ते भद्रं यत्समिद्धः स्वे दमे सोमाहुतो जरसे मृळयत्तमः ।
दधासि रत्नं द्रविणं च दाशुषेऽग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥ १४ ॥

तत् । ते । भद्रम् । यत् । सम्ऽइद्धः । स्वे । दमे । सोमऽआहुतः । जरसे । मृळयत्ऽतमः ।
दधासि । रत्नम् । द्रविणम् । च । दाशुषे । अग्ने । सख्ये । मा । रिषाम । वयम् । तव ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१३. [ हे अग्ने ], [ त्वं ] देवानां देवः ( =देवतमो ) [ भवसि ], [ त्वम् ] अद्भुतो मित्रोसि ( =महान् मित्रो भवसि ) । [ त्वं ] वसूनां वसुः ( =साधूनां मध्ये साधुः ) [ भवसि ] [ त्वम् ] अध्वरे ( =यज्ञे ) चारुः ( =कमनीयः ) [ अतिथिः ] [ असि ] । [ वयं ] तव सप्रथस्तमे ( =विस्तृततमे ) शर्मन् ( =शर्मणि=आश्रये ) स्याम ( =भवाम ) । [ तर्हि ] हे अग्ने, तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ] वयं मा रिषाम ( =मा हिंसिता भवाम ) ॥

१४. [ हे अग्ने ], तत् ते भद्रं ( =तद् वक्ष्यमाणं तव सुखकरं ) [ भवति ] यत् मृळयत्तमः ( =अतिशयेन सुखयिता ) [ त्वं ] स्वे दमे ( =स्वकीये गृहे=" उत्तरवेदिलक्षणे निवासस्थाने " ) समिद्धः ( =सम्यक् प्रदीप्तः सन् ) सोमाहुतः ( =सोमस्याहुत्या संतर्पितः सन् ) जरसे ( =स्तूयसे ) । [ त्वं ] दाशुषे ( =हविर्दत्तवत उपासकाय ) रत्नं द्रविणं च ( =संपदं धनं च ) दधासि ( =ददासि ) । [ तर्हि ] तव सख्ये ( =तव मित्रत्वे ) [ वर्तमाना ] वयं मा रिषाम ( =मा हिंसिता भवाम ) ॥

१३. [ हे अग्नी ], तूं देवांमध्यें देव [ आहेस ], [ तूं ] उत्तम मित्र आहेस, [ तूं ] साधूंमध्यें साधु [ आहेस ]. [ तूं ] यज्ञांत प्रिय [ अतिथि ] होस. तुझ्या अतिविस्तीर्ण आश्रयाखालीं आम्ही राहूं असें कर. [ आणि ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

13. [Thou art] a God among the Gods, art a wonderful friend, good among the good, [thou] art an amiable [guest] in a sacrifice. May we be under thy most extensive support. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

१४. [ हे अग्नी ], परम सुखकारी असा जो तूं त्या तुला जेव्हां तुझ्या घरीं प्रदीप्त करून सोमाची आहुति देऊन तुला स्तवितात तेव्हां तुला आनंद होतो. [ आणि ] तूं हविर्दात्या उपासकाला संपत्ति आणि द्रव्य देत असतोस. [ तर ] हे अग्नी, तुझ्या मैत्रींत [ राहून ] आमचा नाश न होई असें कर.

14. That [is] thy happiness, [ O Agni ], that well-kindled in thy own home, [ and ] gratified with Soma, thou the source of the greatest happiness, art praised. Thou givest excellent wealth and riches to the sacrificer. May we never, O Agni, be hurt [ while we are ] under thy auspices.

---

जवरील सायणाचें भाष्य पहा.

श्लोकीकरणः—

अयं मित्रस्य॑ वरुणस्य धायसे<br>
अवयॉतां मरुतां हेळॊ अद्भुतः ।<br>
मृळा सु नो भूतु ऍषां मनः पुनः<br>
अग्ने सॅख्ये मा रिषॉमा वयं तव ॥

---

१३. 'हे अग्नी, तूं देवांमध्यें उत्तम देव आणि साधूंमध्यें उत्तम साधु आणि उत्तम मित्र आहेस. तूं यज्ञांत अतिप्रियकर पाहुणा होस. यास्तव तुझा आश्रय आम्हांस सतत मिळो. आणि एकदा आम्ही तुझ्या आश्रयांत आलों म्हणजे आमचें कधींहि अकल्याण होऊं देऊं नको.'

'साधूंमध्यें साधु '=' वसुर्वसूनाम्.' म्हणजे उपासकांला द्रव्यादिकांचा लाभ करून देऊन त्यांचें चांगलें करणारा. बरें करणारा.

यस्मै॒ त्वं सु॑द्रविणो॒ दद॑ाशोऽनागा॒स्त्वम॑दिते स॒र्वता॑ता ।
यं भ॒द्रेण॒ शव॑सा चो॒दया॑सि प्र॒जाव॑ता॒ राध॑सा ते स्याम ॥ १५ ॥
यस्मै॑ । त्वम् । सु॒ऽद्र॒वि॒णः॒ । दद॑ाशः । अ॒ना॒गाः॒ऽत्वम् । अ॒दि॒ते॒ । स॒र्व॒ऽता॑ता ।
यम् । भ॒द्रेण॑ । शव॑सा । चो॒दया॑सि । प्र॒जाऽव॑ता । राध॑सा । ते । स्या॒म॒ ॥ १५ ॥

## भाषायाम्.

१५. हे सुद्रविणः ( =द्रविणोदः=धनद ) अदिते ( =अखण्डनीय ) [ अग्ने ], यस्मै ( =यादृशाय यजमानाय ) त्वं सर्वताता ( =सर्वतातौ=सर्ववस्तुषु ) अनागास्त्वम् ( =अपापत्वं ) ददाशः ( =दद्याः=दातुमिच्छेः ), यं भद्रेण शवसा चोदयासि (=यस्मै यजमानाय=यादृशायोपासकाय कल्याणकारिणा बलेन संयोजयेः=संयोजयितुमर्हः ) ते ( =तादृशाः=त्वद्देयानागास्त्वयोग्याः, त्वद्देयबलयोग्याश्च सन्तो ) [ वयं ] प्रजावता राधसा स्याम ( =पुत्रपौत्रादिसंतत्युपेतेन धनेन युक्ता भवाम=पुत्रपौत्रादीन्यपत्यानि धनं च प्राप्नुयाम ) ॥

'प्रिय '=' चारुः.' ऋ. ३. ४९. ३ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

श्लोकीकरणः—

देवो देवानामसि मित्रो अद्भुतः
वसुर्वसूनामसि चारुरध्वरे ।
शर्मन्त्स्याम तव सप्रथस्तमे
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

१४. 'हे अग्नी, तुला तुझ्या घरीं म्हणजे वेदीवर स्थापन करून प्रदीप्त करून आणि सोमाच्या आहुति देऊन तुझें स्तोत्र उपासक लोक म्हणत असतात तेव्हां तुला आनंद होतो आणि तूं त्यांला धनसंपत्ति देत असतोस तशी आम्हांलाहि दे, आणि आम्हीं तुझ्या आश्रयाखालीं आहों त्यापेक्षां आमचें सदैव कल्याणच होईल, अकल्याण होणार नाहीं असें कर.'

श्लोकीकरणः—

तत्ते भद्रं यत्समिद्धः सुए दमे
सोमाहुतो जरसे मृळयत्तमः ।
दधासि रत्नं द्रविणं च दाशुषे
अग्ने सख्ये मा रिषामा वयं तव ॥

## पोंच ता. १ पासून ता. ३१ जानेवारीपर्यंत.

| | रु. आ. |
|---|---|
| श्री. विनायकराव गणेश किबे. ... ... ... | ६- ६ |
| ,, उमेदसिंगजी. ... ... ... ... ... | १२-१२ |
| ,, ठाकूरसाहेब आफ् लिंबडी. ... ... ... | ६३-१२ |
| ,, रणजितसिंगजी महाराज सं० रतलाम ... ... ... | ६- ६ |
| हिज् हायनेस निजाम सरकार हैदराबाद डेक्कन... ... ... | १६- ६ |
| रा. बा. अण्णाजी व्यंकटराव सब अ० कॉ० वेटर आफ् फारेस्ट. | ६- ६ |
| रा. सा. आबाजी विष्णु काथवटे. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, श्रीकृष्ण शास्त्री तळेकर. ... ... ... | ५- ४ |
| ,, ,, मोतिलाल लालभाई मुनसफ. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, कृष्णराव सदाशिव जोगळेकर स० ज०. ... ... | ६- ६ |
| रा. रा. माधवराव शिरिस्तेदार. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, गणेश जनार्दन आगासे फर्स्ट अ० मा०. ... ... | १२-१२ |
| ,, ,, गोपाळ मोरेश्वर साठे फ० अ० मा० ... ... ... | १२-१२ |
| ,, ,, विनायकराव विठ्ठल सबनीस हेड क्लार्क. ... ... | १२-१२ |
| ,, ,, व्यास नानाभाई देसाई टेलिग्राफ मा०. ... ... | ५- ० |
| ,, ,, राजाराम तुकाराम पाटील. ... ... ... | ९- ९ |
| ,, ,, भास्करराव अण्णा. ... ... ... | ६- ० |
| ,, ,, अण्णाजी विठोबा क्लार्क जी० रे० ... ... ... | १२-१२ |
| ,, ,, नारो गोविंद दातार ह० स्कू० ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, वासुदेव नारायण आजगांवकर ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, गोपिनाथ दादाजी शारंगधर मुंबई. ... ... ... | १२- ० |
| ,, ,, तिरमलराव शेषगिरराव दातार वकील. ... ... | ६- ६ |
| ,, ,, रामचंद्र दाजी भागवत. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, पुंडलिकराव पुरुषोत्तम ककर. ... ... ... | १२-१२ |
| ,, ,, रामचंद्र काशिनाथ वकील. ... ... ... | ६- ६ |
| ,, ,, वासुदेवराव बल्लाळ खेर एवस्ट्रा अ०क०. ... ... | ६- ६ |
| ,, ,, गु. सुबराव प्लीडर. ... ... ... | १०- ० |

Registered No. 110 of 1878.

| | रु. आ. |
|---|---|
| रा. रा. व्यंकटराव गोपाळ दुयम शिरिस्तेदार ... ... ... ... | १२–१२ |
| ,, ,, अंबालाल साखरलाल देसाई ज०. ... ... ... | ६– ६ |
| रोबेन साम्युअलजी. ... ... ... | ६– ६ |
| प्रिन्सिपाल प्रेसिडेन्सि कालेज मद्रास. ... ... ... | ६– ६ |
| नेटिव लायब्ररी वेंगुर्ले. ... ... ... | ६– ६ |
| राजाराम हायस्कूल लायब्ररी कोलापूर. ... ... ... | ६– ६ |
| रसल लायब्ररी जेतपूर. ... ... ... | ६– ६ |
| नेटिव लायब्ररी कल्याण. ... ... ... | ६– ६ |
| नेटिव लायब्ररी मुधोळ. ... ... ... | ६– ६ |

## सूचना.

| | रु. आ. |
|---|---|
| वर्षाची वर्गणी, आगाऊ | ६ ० |
| मुंबईबाहेर राहणारांस टपाल हंशिलाबद्दल दरवर्षाचे | ० ६ |

All communications to be addressed to the Manager Mr. Mahadev Nârâyan Pandit, No. 29 *Moroba Popatji's Oar, Kalka Devi Road, Bombay.*

ग्रंथकर्त्याच्या नांवचा वगैरे सर्व प्रकारचा पत्रव्यवहार मुंबई मोरोबा पोपटजीची वाडी घर नंबर २९, या पत्त्यावर रा. रा. महादेव नारायण पंडित "म्यानेजर वेदार्थयत्न" यांच्याशीं ठेवावा.

**विशेष सूचना.**—आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षाची बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी.

तिकीटें पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्ताळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

THE

# VEDÂRTHAYATNA

OR

AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

# वेदार्थयत्न.

## ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक ९. फेब्रुवारी सन १८७८. मासिक भाग २३.
Vol 2 Feby 1878 No 23

मुंबईः
"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

१९. हे धनदात्या, अनंता [ अग्नी ], ज्या प्रकारचें निष्पापत्व तूं सर्व गोष्टींविषयीं [ उपासकांला ] देत असतोस, [ आणि ] [ तूं ] ज्या प्रकारच्या कल्याणकारक बळाची प्रेरणा [ उपासकांच्या आंगीं ] करितोस, तसें आम्हांला करून आम्हांस संतति आणि संपत्ति मिळे असें कर.

15. O Agni, giver of good wealth, O infinite one, may we be such as thou mayest make sinless in all matters [and] such as thou mayest inspire with happy strength. [Being such] may we have progeny and wealth.

१५. हा मंत्र सूक्ताच्या उपसंहाराजवळ आहे, त्यामुळें सूक्तकर्त्याच्या मनांत मागावयाचा असलेला वर यांत मागितला आहे. तो हाः–' हे अग्नी, ज्याला सर्व गोष्टींत अपेश कधीं येऊंच नये आणि ज्याला उत्तम सामर्थ्य असावें असें तुला वाटेल तसे आम्हीं असावे असें कर, आणि आम्हांला संतति आणि संपत्ति हीं दोनींहि दे. म्हणजे यश संपादण्याची योग्यता आणि तुझें पाठबळ मिळविण्याची योग्यता आमचे आंगीं घाल आणि आम्हांला संतति आणि संपत्ति दे.'

या मंत्राची शब्दरचना–' यस्मै,' 'यम्' आणि 'ते' या शब्दांमुळें किंचित् दुर्बोध झाली आहे. पण मंत्राचा भावार्थ आम्हीं दिला आहे तसा आहे यांत आम्हांला संशय नाहीं. दुर्बोधान्वय आहे, अर्थ स्पष्टच आहे. पण 'यत्' आणि 'तत्' यांच्या संबंधानें व्युत्क्रम ज्यांत आहे असे मंत्र वेदांत बरेच आढळतात. सायणाचार्य ' ते राधसा ' म्हणजे ' तुझें धन ' ("त्वया दत्तेन धनेन") असा अर्थ करितात, पण 'ते' हें पद येथें अनुदात्त नाहीं, उदात्त आहे; त्यामुळें त्याचा अर्थ ' तुझा ' असा होण्याला अडचण आहे, आणि ' यस्मै ' आणि ' यम् ' याचा संबंधी शब्द 'ते' याशिवाय नाहीं, यास्तव आम्हीं केल्याप्रमाणें अर्थ करणें अवश्य आहे:–

ह्या मंत्राचें वृत्त त्रिष्टुभ् आहे.

यस्मै त्वं सुद्रविणो ददाशः
अनागास्त्वम् अदिते सर्वताता ।
यं भद्रेण शवसा चोदयासि
प्रजावता राधसा ते सिआम ॥

स त्वमग्ने सौभगत्वस्य विद्वानस्माकमायुः प्र तिरेह देव ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ १६ ॥ ३२ ॥ ६ ॥

सः । त्वम् । अग्ने । सौभगऽत्वस्य । विद्वान् । अस्माकम् । आयुः । प्र । तिर । इह । देव ।

तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ १६ ॥ ३२ ॥ ६ ॥

## भाषायाम्.

१६. स त्वम् (=अतः कारणात् त्वं ) हे देव (=द्योतमान ) अग्ने, सौभगस्य विद्वान् (=शोभनधनस्य=सुवैभवस्य=सुवैभवं जानन् ) त्वम् अस्माकम् आयुः ( =अस्माकमायुःकालम् ) इह ( =अत्र लोके ) प्र तिर (=प्रवर्धय) । तत् (=एतद् आयुःप्रवर्धनं च ) मित्रः, वरुणः, अदितिः (=एतन्नाम्नी देवानां माता ), सिन्धुः ( =समुद्राभिमानिनी देवता ) पृथिवी उत द्यौः (=पृथिवी द्युलोकश्च ) [ इत्येते ] नः मामहन्ताम् ( =अस्मभ्यम्=अस्मदर्थं पूजयन्तु=रक्षन्तु ) ॥

१६. तर हे देवा अग्नी, कल्याण [ सर्व कांहीं ] जाणणारा तूं आमचें आयुष्य या लोकीं वाढीव. आणि तें [ आयुष्य ] मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू आम्हांला दान देओत.

16. Do thou therefore, O brilliant Agni, that knowest [all] good fortune, prolong our life here. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth, and Heaven confirm this unto us.

---

१६. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. ऋषि अग्नीला म्हणतो, ‘ हे अग्नी, याप्रमाणें आम्हीं तुझी स्तुति केली आहे, तर कल्याण कसें करावें हें तुला ठाऊक आहे त्यापेक्षां तूं आमचें कल्याण करून आम्ही फार दिवस जगूं असें कर, आणि या प्रकारेंकरून तूं जें आयुष्य वाढविशील त्याला मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्युलोक ह्या देवता वळकटी आणोत.’ आमचें आयुष्य वाढीव याशिवाय यांत दुसरा वर मागितलेला नाहीं.

‘ अदिति.’ अदिति म्हणून जी आदित्यांची माता सांगितली आहे तिजविषयीं सू. ७२, मं. ९ आणि त्याजवरील आमची टीप पहा.

या मंत्रांतील द्वितीयार्ध पुढील बऱ्याच सूक्तांच्या शेवटीं पालवपदाप्रमाणें येत जाईल.

श्लोकीकरणः–

स त्वम् अग्ने सौभगत्वस्य विद्वान्
अस्माकमायुः प्र तिरेह देव ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्ताम्
अदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥

## सूक्तम् ९५.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । अग्निर्देवता । औषस्योग्निर्वा । त्रिष्टुप् छन्दः ॥

**द्वे विरूपे चरतः स्वर्थे अन्यान्या वत्समुप धापयेते ।**
**हरिरन्यस्यां भवति स्वधावाञ्छुक्रो अन्यस्यां ददृशे सुवर्चाः ॥१॥**

द्वे इति । विरूपे इति विऽरूपे । चरतः । स्वर्थे इति सुऽअर्थे ।
अन्याऽअन्या । वत्सम् । उप । धापयेते इति ।
हरिः । अन्यस्याम् । भवति । स्वधाऽवान् । शुक्रः । अन्यस्याम् । ददृशे ।
सुऽवर्चाः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. विरूपे (=विभिन्नरूपे=परस्परासदृशरूपे) द्वे (=अहोरात्ररूपे) स्वर्थे (=शोभनप्रयोजने=शोभनगम्यस्थलोपेते) [मातरौ] चरतः (=आसाते=भवतः)। अन्यान्या वत्सम् उप धापयेते (=अन्यस्या वत्सम् अन्येति परस्परव्यतिहारेण स्वकीयरसं पाययतः)। अन्यस्याम् (=एकस्याम् अहोरूपायां) हरिः (=हरिद्वर्णः) [सूर्यरूपो वत्सः] स्वधावान् (=तेजस्वी) भवति। अन्यस्यां (=रात्रौ) शुक्रो [वत्सः] (=निर्मलकान्तिः अग्निरूपो वत्सः) सुवर्चा ददृशे (=शोभनकान्तिः प्रकाशते) ॥

इमं मन्त्रं सायणाचार्या एवं व्याचक्षते। "स्वर्थे स्वरणे शोभनगमनागमने। यद्वा अर्थः प्रयोजनम्। शोभनप्रयोजनोपेते विरूपे विषमरूपे शुक्लकृष्णतया नानारूपे द्वे अहोरात्रे चरतः। पुनःपुनः पर्यावर्तेते। ते चाहोरात्रे अग्नेः सूर्यस्य च जनन्यौ। तत्र रात्रेः पुत्रः सूर्यः। स हि गर्भवद्रात्रावन्तर्हितः सन् तस्याश्चरमभागादुत्पद्यते। अह्नः पुत्रोऽग्निः। स हि तत्र विद्यमानोऽपि प्रकाशराहित्येनासत्कल्पः सन् तस्मादह्नः सकाशान्निर्मुक्तः प्रकाशमानं स्वात्मानं लभते। अनयोरेतयोः पुत्रत्वं च तैत्तिरीयैराम्नायते। तयोरेतौ वत्सावग्निश्चादित्यश्च। रात्रेर्वत्सः श्वेत आदित्यः। अह्नोऽग्निस्ताम्रोऽरूण इति। ते चाहोरात्रे वत्सं स्वं स्वं पुत्रमन्यान्या परस्परव्यतिहारेणोपधापयेते। स्वकीयं रसं पाययतः। यद्रात्र्या कर्तव्यं स्वपुत्रस्यादित्यस्य पायनं तदहः करोति। यदह्ना कर्तव्यं स्वपुत्रस्याग्ने रसस्य पायनं तद्रात्रिः करोति। एतच्च सायंप्रातःकालीनाहुत्यभिप्रायम्। श्रूयते च। तस्मा अग्नये सायं हूयते सूर्याय प्रातरिति। यस्मादेवं तस्मादन्यस्यां स्वजनन्या अन्यस्यामहरात्मिकायामग्नेर्जनन्यां हरी रसहरणशील

## सूक्त ९५.

ऋषि–अङ्गिरस्कुळांतील **कुत्स** या नांवाचा पुरुष. देवता–**अग्नि**, अथवा **औषस्य अग्नि**, म्हणजे उषेसंबंधी जो **अग्नि** तो. वृत्त–**त्रिष्टुभ्.**

१. भिन्नरूपांच्या दोघी [ रात्री आणि उषा ] आपआपल्या कामाविषयीं तत्पर होत्सात्या भ्रमण करीत असतात. [ त्या ] एकमेकी एकमेकीच्या बाळांला स्तनपान करवितात. एकीच्या जवळ पीतवर्णाचा [ बाळक ] तेजस्वी होतो, दुसरीच्या जवळ निर्मळ कांतीचा [ बाळक ] महातेजस्वी दिसूं लागतो.

## Hymn 95.

To *Agni*, or *Agni Aushasya* (i.e. *Agni* who appears in the form of *Ushas* the Dawn). By *Kutsa* of the family of *Angiras*. Metre—*Trishṭubh*.

1. The two [ sisters ] dissimilar in appearance, are each intent on a defined goal. They suckle their calves each that of the other. With one the ruddy calf acquires strength, with the other the fair calf appears brilliant.

---

१. येथून पहिल्या अष्टकाच्या सातव्या अध्यायास आरंभ झाला. हें सूक्त ' औषस अग्नि ' म्हणजे उषा देवी जी तद्रूप अग्नीविषयीं, म्हणजे अग्नीविषयींच आहे, आणि उषेच्या संबंधानें त्याचें वर्णन केलेलें आहे. या पहिल्या मंत्रांत ऋषि म्हणतो, ' रात्र आणि उषा ( किंवा दिवस) ह्या दोघी वहिणी होत. पण त्यांचें रूप एकसारिखें नाहीं; एक अगदी काळी आणि दुसरी अगदी लखलखीत आणि तेजस्वी होय. त्या नेहमी आपआपल्या कामीं तत्पर होत्सात्या चालत असतात, एकीची वाट दुसरी पाहत नाहीं. कांहीं तरी महत्त्वाचें काम ज्यांला करावयाचें असतें अशा दोघी बायकांसारिख्या मोठ्या दक्षतेनें आणि वेगानें चालत असतात. त्यांला प्रत्येकीं एकेक बाळक असतो. पण प्रत्येकजण आपला बाळक जिची ती न पाजतां एकीचें मुल दुसरी आणि तिचें मुल ही अशाप्रमाणें पाजतात. रात्रीचा मुलगा पीतवर्ण सूर्य, आणि दिवसरूपी अथवा उषोरूप बाईचा मुलगा शुद्धतेजस्क अग्नि होय; पण रात्रीचा जो पीतवर्ण वत्स सूर्य तो उषेच्या जवळ वाढतो आणि शुद्ध अग्नि रात्ररूपी बाईजवळ शक्तिमान आणि तेजस्वी होत असतो.' हा सगळा अर्थ आम्हीं सायणानुसारें केला आहे, आणि

दशेमं त्वष्टुर्जनयन्त गर्भमतन्द्रासो युवतयो विभृत्रम् ॥
तिग्मानीकं स्वयशसं जनेषु विरोचमानं परि षीं नयन्ति ॥ २ ॥

दश । इमम् । त्वष्टुः । जनयन्त । गर्भम् । अतन्द्रासः । युवतयः । वि-
ऽभृत्रम् ।
तिग्मऽअनीकम् । स्वऽयशसम् । जनेषु । विऽरोचमानम् । परि । सीम् ।
नयन्ति ॥ २ ॥

---

आदित्यः स्वधावान् हविर्लक्षणान्नवान्भवति । शुक्रो निर्मलदीप्तिरग्निः स्वजनन्या अन्यस्यां रात्र्यामादित्यस्य जननयां सुवर्चाः शोभनदीप्तियुक्तः सन् ददृशे । दृश्यते ” इति ॥

---

## भाषायाम्.

२. इमं ( =पूर्वोक्तं ) विभृत्रं ( =विहरणशीलं ) गर्भं ( =वत्सम् अग्निरूपं ) त्वष्टुः ( =त्वष्टृनामकस्य जगत्कर्तुर्देवविशेषस्य ) अतन्द्रासः ( =निरालस्याः=कर्मचतुरा ) युवतयः ( =अङ्गुलीरूपा योषितो ) जनयन्त ( =उदपादयन् ) । तिग्मानीकं (=तीक्ष्णतेजसं ) स्वयशसं ( =महायशसं ) विरोचमानं ( =विविधेषु स्थलेषु प्रकाशमानं= सर्वासु दिक्षु भास्वरं ) सीम् ( =एनम् अग्निरूपं वत्सं ) जनेषु परि नयन्ति (=लोकानां गृहेषु इतस्ततो वत्सवद्विहारयन्ति ) ॥

---

थान कोणती आई कोणत्या वत्साला पाजिते याविषयीं जरी कोठकोठें वाद असेल तरी सायणाचेंच म्हणणें सयुक्तिक दिसतें. या मंत्रावरून अग्नीचें जन्म सूर्यासारिखें मोठें आहे असें दर्शविलें आहे.

श्लोकीकरणः–

दुए विरूपे चरतः सुअर्थे
अन्यान्यॉ वत्सम् उप धापयेते ।
हरिः ॲन्यस्यां भवति स्वधावान्
शुक्रो ॲन्यस्या ददृशे सुवर्चाः ॥

२. त्वष्ट्याच्या दहा [ अंगुली-रूप ] चतुर तरुणी [ ह्या ] चंचळ बाळकाला जन्म देत्या झाल्या. प्रखरमुख, महायश, [ आणि ] सर्वत्र प्रकाशणाऱ्या ह्या [ बाळका]-ला लोकांचे घरीं जिकडे तिकडे नेत असतात.

2. The sprightly ten youthful [ fingers ] of Tvashtâ gave birth to this active child. Him of the resplendent face, of independent glory, [ and ] of universal brightness they carry about in people's houses.

---

२. अग्नीचें जन्म उषेचे पोटीं होतें अशी कल्पना वरच्या मंत्रांत केली. या मंत्रांत अग्नीच्या जन्माविषयीं अशी कल्पना करितो कीं 'सर्व जगताला निर्माण करणारा जो देव त्वष्टा त्याणेंच आपल्या हातानें त्याला उत्पन्न केलें आणि तेणेंकरून त्वष्ट्याच्या ज्या तरुण स्त्रियांप्रमाणें दोन हातांच्या दहा आंगळ्या त्यांजकडून ह्या वर सांगितलेल्या अग्नी बाळाचें जन्म झालें आहे. त्यांच्यापासून याचें जन्म झाल्यावर ह्या अग्नी बाळाला सर्व आप-आपल्या घरीं खेळावयास नेल्यासारिखा नेऊं लागले. पण तो साधारण बाळक नव्हे, तर याचें तोंड तेजःपुंज होय, याचें यश जिकडे तिकडे पसरलेलें आहे आणि याचा प्रकाश सर्वत्र पडणारा होय.'

'तरुणी'='युवतयः.' अंगुलींस तरुणी अथवा बहिणी असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं म्हटलेलें आहे. ऋ. ३. २९. १३ आणि सायणभाष्य पहा.

त्वष्टा हा देव जसा मनुष्यांस आणि दुसऱ्या भूतांस उत्पन्न करितो त्याप्रमाणें-च तो देवांसहि उत्पन्न करितो असें केव्हां केव्हां सांगितलें आहे. उदाहरणार्थ ऋ. २. २३. १७ यांत ब्रह्मणस्पतीला त्वष्टा यानें उत्पन्न केलें असें सांगितलें आहे. ऋ. १०. २. ७ यांत 'यं त्वा...त्वष्टा जजान'='हे अग्नी, ज्या तुला त्वष्टा निर्माण करिता झाला' असें म्हटलें आहे. (ऋ. १०. ४६. ९ 'आपस्त्वष्टा यं ततक्षुः'='ज्याला उदक आणि ज्याला त्वष्टा हे निर्माण करिते झाले,' असें सांगितलें आहे तेंहि पहा ).

'लोकांच्या घरीं'='जनेषु.' म्हणजे, 'लोक आपल्या घरीं.' ह्या अर्थाची सप्तमी वेदांत पुष्कळ येते. सू. ३७, मं. १४ यांत 'कण्वेषु' ही सप्तमी याचसारिखी आहे.

श्लोकीकरणः—

दशेमं त्वष्टुर्जनयन्त गर्भम्
अतन्द्रासो युवतयो विभृत्रम् ।
तिग्मानीकं स्वयशसं जनेषु
विरोचमानं परि षीं नयन्ति ॥

**त्रीणि जाना परि भूषन्त्यस्य समुद्र एकं दिव्येकमप्सु ।**
**पूर्वामनु प्र दिशं पार्थिवानामृतून्प्रशासद्वि दधावनुष्ठु ॥ ३ ॥**

त्रीणि । जाना । परि । भूषन्ति । अस्य । समुद्रे । एकम् । दिवि । एकम् । अप्ऽसु ।

पूर्वाम् । अनु । प्र । दिशम् । पार्थिवानाम् । ऋतून् । प्रऽशासत् । वि । दधौ । अनुष्ठु ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. अस्य (=अग्नेः) समुद्रे (=सागरे) एकं, दिवि एकं (=द्युलोक एकम्), अप्सु [एकम्] (=अन्तरिक्ष एकम्) [इति] त्रीणि जाना (=जननानि) परि भूषन्ति (=अलंकुर्वन्ति=स्तुवन्ति)। [दिविस्थसूर्यरूपोऽग्निः] ऋतून् प्रशासत् (=दिवसमासात्मकान् वसन्तादिकात्मकांश्च कालान् प्रकर्षेण ज्ञापयन्=कुर्वन्) पार्थिवानां पूर्वां दिशं (=पार्थिवानां प्रदेशानां पृथिव्याः पूर्वदिशम्) अनु प्र अनुष्ठु वि दधौ (=तां पूर्वां दिशं निर्मितां कृत्वा तदनु दिशान्तराण्यपि क्रमेण वि दधाति करोति)॥

३. ह्याचीं तीन जन्में वर्णीत असतात,–एक समुद्रांत, एक द्युलोकांत, [ आणि ] [ एक ] अंतरिक्षांत. [ तो ] ऋतूंची व्यवस्था करून नंतर पृथिवीची पूर्व दिशा आणि इतर दिशा ह्या एकामागून एक निर्माण करितो.

3. They glorify his three births, one in the sea, one in heaven [ and the third ] in the watery sky. Having established the seasons he made the east of the earthly regions and the other quarters in order.

३. अग्नीच्या जन्माविषयीं जो कल्पनातरंग तो डोळ्यापुढें ठेवून ऋषि म्हणतो कीं, 'विद्वान् लोक अग्नीचें तीन ठिकाणीं जन्म होतें असें म्हणत असतात; त्यांतून एक जन्म समुद्रांत, दुसरें द्युलोकांत आणि तिसरें अंतरिक्षांत, याप्रमाणें तीन जन्में होत. द्युलोकांतील जन्म म्हणजे सूर्यरूप अग्नि जो द्युलोकांत फिरतो तें; अंतरिक्षांत जन्म म्हणजे मेघमालांबरोबर अंतरिक्षप्रदेशांत वीजा चमकतात आणि खालींहि पडतात तें अंतरिक्षांतील जन्म. यांतून द्युलोकांत सूर्यरूपानें जें जन्म अग्नि घेतो त्या रूपानें तो पृथिवीवरील ज्या पूर्व, पश्चिम इत्यादि दिशा त्या एकामागून एक निर्माण करितो.' यांत अग्नीचें स्वरूप वर्णिलेलें आहे तें सकळ विश्वांत जें जें म्हणून सर्व तेज आहे तद्रूप होय. अग्नीचें जें द्युलोकींचें आणि अंतरिक्षींचें जन्म सांगितलें तीं दोनीं समजण्यासारिखीं आहेत. पण समुद्रांतील अग्निजन्म तें कोणतें? सायण म्हणतात, समुद्रांत जो वडवानलरूपानें अग्नि उद्भवतो तें त्याचें समुद्रांतील जन्म होय. अग्नीच्या जन्मत्रयाविषयीं दुसऱ्याहि पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे; पण त्या बहुतकरून सर्व ठिकाणीं द्युलोकांतील सूर्य, अंतरिक्षांतील वीज आणि पृथिवीवर मनुष्यांचे घरीं पेटवितात तो अशीं तीन जन्में सांगितलेलीं आढळतात. आणि वडवानळ अग्नीविषयीं ऋग्वेदांत प्रसिद्धि नाहीं.

'पृथिवीच्या पूर्व दिशा'=' पार्थिवानां पूर्वा दिशम्.' यांत 'पार्थिवानां' म्हणजे 'पृथिव्याः' असा अर्थ घेतला पाहिजे. ह्या मंत्राचा जो वर आम्हीं अर्थ केला तो सायणांस अनुसरूनच आहे आणि आम्हांस वाटतें निर्विवाद आहे. तर यावरून इतकें सिद्ध होतें कीं, पुष्कळ हजारो वर्षेपर्यंत आपल्या आर्य पूर्वजांला दिशांचें आणि ऋतूंचें खरें मूळ ठाऊक होतें. हें ज्ञान पश्चिमेकडील लोकांस होण्याला मागाहून पुष्कळ वर्षें लागलीं.

'अंतरिक्षांत'=' अप्सु.' अक्षरशः अर्थ 'उदकांत' इतकाच आहे. पण याचा अर्थ अंतरिक्ष असा कसा होतो याविषयीं सू. ३५, मं. ८ याजवरील

क इमं वो निण्यमा चिकेत वत्सो मातृर्जनयत स्वधाभिः ।
बह्वीनां गर्भो अपसामुपस्थान्महान्कविर्निश्चरति स्वधावान् ॥४॥

कः । इमम् । वः । निण्यम् । आ । चिकेत । वत्सः । मातृः । जनयत । स्वधाभिः ।
बह्वीनाम् । गर्भः । अपसाम् । उपऽस्थात् । महान् । कविः । निः । चरति । स्वधाऽवान् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे ऋत्विग्यजमानाः ], इमम् ( =एतं पूर्वोक्तं जन्मत्रयविशिष्टं ) निण्यम् ( =अन्तर्हितं=गूढस्वरूपम् ) [ अग्निं ] वः कः ( =युष्माकं मध्ये कतम ) आचिकेत ( =कतमो जानाति ) ? वत्सः ( =अग्निरूपो वत्सः ) स्वधाभिः ( =स्वतेजोभिः=स्वप्रभावेण ) मातृर्जनयत ( =स्वस्योत्पादयित्रीरुत्पादयति ) । बह्वीनां गर्भः ( =अनेकानाम् अपां गर्भः अग्निरूपो वत्सः ) अपसाम् उपस्थाद् ( =अपाम् उदरात् ) महान् ( =प्रौढः ) कविः ( =विद्वान्=ज्ञानसंपन्नः ) स्वधावान् ( =बलवान्=प्रबलः ) [ एतादृशः सन् ] निश्चरति ( =निर्गच्छति=जायते ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । सत्यपि भौतिकेऽग्नौ परिज्ञाते, द्युलोकादिषु तथा अन्तरिक्षप्रदेशेषु वर्तमानं गूढस्वरूपमग्निं कोपि न जानाति । अग्निरूपो वत्सो हि स्वयमेव स्वकीया मातृर्जनयति । अल्पाकृतिरज्ञो बलहीनो बालकः कथं मातृजनने समर्थः स्यादिति न शङ्कनीयम् । अग्निर्हि न स्वमातृणामुदरात् साधारणबालका यथा अल्पाकृतिरज्ञो निर्बलश्च जज्ञे तर्हि ' महान् कविः स्वधावान् ' सन्नेव उदपद्यतेति ॥

एतां सायण एवं व्याख्यातवान् । हे ऋत्विग्यजमाना । निण्यं । निर्णीतान्तर्हितनामैतत् । अबादिषु गर्भरूपेणान्तर्हितम् । तथा च मन्त्रान्तरम् । गर्भो यो अपां गर्भो वनानां गर्भश्च स्थातां गर्भश्चरथामिति । एवंभूतमिममग्निं वो युष्माकं मध्ये क आचिकेत । को जानाति । न कोऽपीत्यर्थः । सोऽयमग्निर्वत्सो मेघस्थानामपां वैद्युताग्निरूपेण पुत्रस्थानीयः सन् मातृस्तस्य मातृस्थानीयानि वृष्ट्युदकानि स्वधाभिर्हविर्लक्षणैरन्नैर्जनयत । उत्पादयति । तथा च स्मर्यते । अग्नौ प्रास्ताहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठते । आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजा इति । अपि च बह्वीनां मेघस्थानामपां गर्भो वैद्युतरूपेण गर्भस्थानीयः सोऽग्निरपसामुपस्थात् समुद्रान्निश्चरति । औषसाग्निरूपेणादित्यः स-

४. [ हे मित्र हो ], ह्या गूढ [ अग्नी ]ला तुम्हांतून कोणी पाहिलें आहे? तो वत्स आपल्या सामर्थ्यानें आपल्या आयांस आपण जन्म देतो. अनेक आयांचा बाळक असा जो [ अग्नि ] तो महाविद्वान् [ आणि ] मोठा [आणि] प्रबळ असाच त्या उदकरूप आयांच्या उदरांतून बाहेर पडला.

4. Which of you has perceived this hidden [Agni]? [That] calf gives birth to [his own] mothers through [his] strength. The offspring of many, [Agni] issues forth from the womb of the Waters [already] great [and] wise [and] endowed with power.

---

'अंतरिक्ष' शब्दाविषयींची टीप पहा.

श्लोकीकरणः—

त्रीणि जॉना परि भूषन्ति अस्य
समुद्र एकं दिवि एकमप्सु ।
पूर्वामनु प्र दिशं पार्थिवानाम्
ऋतून्प्रशासद्वि दधावनुष्ठु ॥

---

४. 'या मंत्रांत ऋषि आपल्याजवळ असलेल्या लोकांस संबोधून म्हणतो कीं, 'हे मित्र हो, वर सांगितल्याप्रमाणें त्रैलोक्याला व्यापून टाकणारा आणि निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या रूपानें उद्भवणारा जो अग्नि त्याचें स्वरूप तुम्हांपैकीं कोणास ठाऊक आहे? कोणासहि ठाऊक नाहीं. तो आपल्या पराक्रमानें आपल्या आयांस आपणच जन्मवितो आणि तो आपल्या अनेक आयांच्या पोटांतून जन्मला तेव्हां एकदम मोठा आणि विद्वान् आणि सामर्थ्यपूर्ण असाच होत्साता आपल्या आयांच्या म्हणजे उदकरूप ज्या अनेक आया त्यांच्या उदरांतून एकाच काळीं बाहेर पडला.' म्हणजे जो अग्नि तुम्हांला प्रत्यक्ष दिसतो तो तुम्ही जाणतच असाल, पण त्रैलोक्याला व्यापून राहणारा किंवा त्रैलोक्यांत जन्म पावणारा जो अग्नि त्याचें स्वरूप कोणास कळत नाहीं. आणि तो अग्नि चमत्कारिक आहे. त्याचें जन्म आणि वृत्त हीं साधारण बाळकांच्या जन्माप्रमाणें आणि वृत्ताप्रमाणें नसतात.

'तो वत्स...आपल्या आयांस जन्म देतो'='वत्सो मातॄर्जनयत.' म्हणजे अग्नि बाळ साधारण नव्हे; तो आपल्या आयांस आपणच उत्पन्न करितो. आया कोण आणि त्यांस तो कशा उत्पन्न करितो? सायणाचार्य "मेघोदकांला उत्पन्न करितो" म्हणून भाष्य करितात. आम्हांसहि तसेंच वाटतें. आकाशांत बाष्परूपानें मेघोदकें आलीं म्हणजे विजांच्या रूपानें अग्नि त्यांजपासून उत्पन्न होतो म्हणून अग्नीला उदकांचा पुत्र असें

आविष्ट्यो॑ वर्धते॒ चारु॑रासु जि॒ह्मानां॑मू॒र्ध्वः स्वय॑शा उ॒पस्थे॑ ।
उ॒भे त्वष्टु॑र्बिभ्यतु॒र्जाय॑मानात्प्र॒ती॒ची सिं॒हं प्रति॑ जोषयेते ॥५ ॥१॥

आविः॑ऽत्यः । व॒र्ध॒ते॒ । चारुः॑ । आ॒सु॒ । जि॒ह्माना॑म् । ऊ॒र्ध्वः । स्वऽय॑शाः । उ॒पऽस्थे॑ ।

उ॒भे इति॑ । त्वष्टुः॑ । बि॒भ्य॒तुः॒ । जाय॑मानात् । प्र॒ती॒ची इति॑ । सिं॒हम् । प्रति॑ । जो॒षये॑ते॒ इति॑ ॥ ५ ॥ १ ॥

न्निर्गच्छति । कीदृशः । महान् । तेजसा प्रौढः । कविः । क्रान्तदर्शी । स्वधावान् । हविर्लक्षणान्नवान् । एक एवाग्निर्होमनिष्पादकलक्षणेन पार्थिवरूपेण वैद्युतात्मनौषसरूपेणादित्यात्मना च विभज्य वर्तत इत्यर्थः ॥

## भाषायाम्.

५. चारुः ( =सुन्दरः ) [ अग्निरूपो वत्सः ] आसु आविष्ट्यो वर्धते ( =अन्नूपासु मातृषु आविर्भूतः प्रकाशमानः सन् वर्धते ) जिह्मानां ( =तिर्यगवस्थितानां तासाम् ) उपस्थे ( =उदरे ) स्वयशाः ( =स्वायत्तदीप्तिः=निजतेजोविशिष्टः ) ऊर्ध्वः ( =उच्छ्रितः सन् ) [ वर्धते ] । त्वष्टुः ( =एतनाम्नो देवात् ) जायमानात् (=उत्पद्यमानाद् ) [ एतस्मात् सिंहात् ] उभे ( =द्यावापृथिव्यौ ) बिभ्यतुः ( =भीत्वा अपजग्मतुः) [ तदपि ] प्रतीची (=प्रतीच्यौ=पुनरप्यागच्छन्त्यौ) [ ते ] सिंहं (=सिंहोपमम् ) [ अग्निं ] प्रति जोषयेते ( =सेवेते ) ॥

न साधारणवत्सवदयमग्निर्वत्सोदृश्यमानो मातुरुदरे वर्धते तर्हि दृश्यमान एव वर्धते । पशुवत्तिरश्चीनानाम् अन्नूपमातृणामुदरे च तिरश्चीनो न वर्धते तर्हि ऊर्ध्वः सन् वर्धते । ता इव चायं न दीप्तिहीनस्तर्हि स्वयशाः स्वायत्तदीप्तिर्भवति । त्वष्टुस्तु यदायमग्निर्जातस्तदा द्यावापृथिव्यावपि तस्माद् भीत्वा परागते । पश्चात्पुनरागत्य तं सिंहसदृशमग्निं बालकवत्सेवेते स्मेति भावः ॥

म्हणतात· आणि जेथें जेथें वीज पडते तेथें तेथें वृष्टि झाल्याशिवाय राहत नाहीं म्हणून अग्नि उदकांस उत्पन्न करितो अशी कल्पना केलेली आहे असें दिसतें. अग्नि वत्स असून आपल्या आयांस उत्पन्न करितो असें म्हटलें, तर एवढा लहान बाळ मोठ्या प्रौढ आयांला उत्पन्न कसा करील अशी आशंका घेऊन म्हणतो, हा जरी बाळ आहे तरी तो लहान नाहीं; तो आपल्या आयांच्या उदरांतून निघाला तेव्हां एकदम मोठा विद्वान् आणि प्रबळ असाच निघाला, इतर बाळकांप्रमाणें

५. [ हा ] सुंदर [ अग्नि ] त्या [ आयां]च्या ठायीं उघड दिसून वाढत असतो, स्वतेजस्वी [ बाळ ] आडव्या [ आयां]च्या पोटीं उभा [ वाढत असतो ]. [ अग्नि ] त्वष्ट्यापासून जन्मतांच द्यावापृथिवी भिऊन पळाल्या. [ पण ] त्या परत येऊन [ या ] सिंहा[च्या बाळा]ची लाड करूं लागल्या.

5. The fair child [Agni] grows in these [the mothers] visibly, the self-resplendent [child grows] upright in the womb of [his] oblique [mothers]. Both Earth and Heaven trembled with fear when he was born from Tvashṭâ; returning again they fondled the lion.

लहान, निर्बळ आणि ज्ञानहीन उपजलेला नाहीं (महान् कविः स्वधावान् निश्चरति ).

श्लोकीकरणः–

कः इमँ वो निण्णिअमा चिकेत
वत्सो मॉतृर्जनयत स्वधाभिः ।
वह्वीनाँ गर्भो अपसामुपस्थान्
महान्कविर्निश्चरति स्वधावान् ॥

५. अग्नीचें जें उदकरूप मातांच्या पोटीं जन्म सांगितलें त्या गोष्टीलाच अनुलक्षून पुनः म्हणतो, ' हा बाळक इतर बाळकांप्रमाणें आईच्या उदरांत असतां दृष्टीस न पडणारा नव्हे, तर तो तेथें वाढत असतांच दिसत असतो· आणि जशी आई तसें मुल, पण अग्नीची गोष्ट वेगळी; त्याच्या आया जरी गुरांसारिख्या तोंड खालीं करून चालणाऱ्या आणि मनुष्याप्रमाणें उभ्या न चालणाऱ्या होत तरी अग्नि त्यांच्या पोटांत उभा राहून वाढतो; आणि आयांसारिखा निस्तेज नव्हे, तर तेजःपुंज होय आणि तें तेज केवळ त्याचेंच आहे, दुसऱ्याकडून त्याला येत नाहीं. आणि त्वष्ट्याच्या हातून जेव्हां अग्नीचें जन्म झालें तेव्हां तर स्वताहा भूलोक आणि द्युलोक हे भिऊन पळाले, पण परत येऊन मग ह्या सिंहासारिख्या अग्नि बाळाचें लालन करूं लागले.'

' आडव्या आयांच्या पोटीं '=' जिह्मानामुपस्थे.' म्हणजे ज्या उदकमय मेघमाला आकाशांत पशूंप्रमाणें चालत असतात त्यांच्या पोटीं. त्यांची आकृति बहुतकरून आडवी असते, मनुष्याप्रमाणें उभी नसते.

' त्वष्ट्यापासून जन्मतांच'= 'त्वष्टुर्जायमानात्.' हा उल्लेख अग्नीच्या दुसऱ्याजन्माविषयीं आहे, उदकांपासून झालेल्या जन्माविषयीं नाहीं, असें समजावयाचें

उभे भद्रे जोषयेते न मेने गावो न वाश्रा उप तस्थुरेवैः ।
स दक्षाणां दक्षपतिर्बभूवाञ्जन्ति यं दक्षिणतो हविर्भिः ॥ ६ ॥
उभे इति । भद्रे इति । जोषयेते इति । न । मेने इति । गावः । न ।
वाश्राः । उप । तस्थुः । एवैः ।
सः । दक्षाणाम् । दक्षऽपतिः । बभूव । अञ्जन्ति । यम् । दक्षिणतः ।
हविःऽभिः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. उभे (=द्यावापृथिव्यौ) भद्रे मेने न (=वत्सले स्त्रियाविव) [तं वत्सं] जोषयेते (=सेवेते) [ते] वाश्रा गावो न (=वत्सार्थं हम्बारवं कुर्वत्यो गाव इव), एवैः (=स्वचरितैः=आदरातिशयचेष्टाभिः=संभ्रमेण) उप तस्थुः (=उप तस्थतुः =उपस्थिते बभूवतुः)। सः (=सोयमग्निः) दक्षाणां दक्षपतिः (=सकलानां बलानामधिपतिः) बभूव। यं (=तमेवेममग्निं) [यजमाना] हविर्भिः (="चरुपुरोडाशादिभिः") दक्षिणतः (="आहवनीयस्य दक्षिणभागेवस्थिता ऋत्विजः") अञ्जन्ति (=आर्द्रीकुर्वन्ति=संतर्पयन्ति)॥

एतादृशो महिमा ह्यस्यास्माभिरुपास्यमानस्याग्नेरिति भावः ॥

---

आहे. वर दुसरी ऋचा पाहा.

'सिंहाच्या वाळाची'=' सिंहम्.' किंवा केवळ सिंहाचा, इतका अर्थ केला तरी चालेल. अग्नीला ऋ. ३. २. ११ यांत सिंहाची उपमा दिली आहे. इंद्राला (ऋ. ४. १६. १४), बृहस्पतीला (ऋ. १०. ६७. ९), अश्वींला (ऋ. ५. ७४. ४), सोमाला (९. ९७. २८) इत्यादि दुसऱ्या देवांलाहि सिंहाची उपमा वेदांत दिलेली आढळते.

श्लोकीकरणः—

आविष्टिओ वर्धते चारुरासु
जिह्मानॉमूर्ध्वः स्वयशा उपस्थे ।
उभे त्वॅष्टुर्बिभ्यते जायमानात्
प्रतीची सिंहं प्रति जोषयेते ॥

६. [ त्या ] उभयतां मिळून ममताळू स्त्रियांप्रमाणें [ त्याची ] लाड करूं लागल्या; हंबरणाऱ्या गाईप्रमाणें मोठ्या संभ्रमानें येऊन [ त्याला ] खेळवूं लागल्या. तर तो अग्नि सकळबळांचा बळपति झाला. आणि त्याच अग्नीला हवींनीं दक्षिणभागीं तृप्त करीत असतात.

6. They both fondle [ him ] like two affectionate women. In haste they hugged [ him ] like lowing cows. That [ Agni ] became the lord of [ all ] powers;– [ he ] whom they annoint with oblations to the south.

---

६. द्यावापृथिवी ह्या प्रथम भिऊन पळाल्या पण मागाहून येऊन अग्नी बाळाचें लालन करूं लागल्या म्हणून वर सांगितलें. त्यालाच अनुलक्षून कुत्स म्हणतो, ‘ जशा मोठ्या ममताळू दोघी बायका एकाद्या बाळाचें लालन करितात तशा द्यावापृथिवी अग्नी बाळाचें लालन करूं लागल्या. जशा कास भरलेल्या गाई आपल्या वत्सांकडेस मोठ्या वेगानें धांवत येतात तशा या अग्नीजवळ जाऊन त्याला खेळवूं लागल्या. तो अग्नि पुढें सकळ शक्तींचा धनी झाला. आणि तोच अग्नि आपण आपआपल्या घरीं स्थापून त्याला हवि देऊन भजत असतों.’ असा ह्या आमच्या अग्नीचा महिमा आहे, असा भावार्थ.

‘ मोठ्या संभ्रमानें येऊन ’=‘ एवैः.’ अक्षरशः अर्थ ‘जाण्यायेण्यांनीं,’ ‘ येराझारींनीं,’ ‘ इकडे तिकडे फिरून.’ कोणा पाहुण्याचें आदरातिथ्य करण्याकरितां घरच्या स्त्रियेस इकडे तिकडे घरांत फिरावें लागतें तसें फिरून, ‘ गडबडीनें,’ ‘प्रेमानें.’ ‘एवैः’ या पुष्कळ ठिकाणीं येणाऱ्या अव्ययाचा हा अर्थ बऱ्याच ठिकाणीं जुळतो असें दिसतें.

‘ दक्षिणभागीं’=‘ दक्षिणतः.’ हा अक्षरशः अर्थ आम्हीं सायणाचार्यांच्या भाष्याप्रमाणें केला आहे. ते म्हणतात, अग्नीला दक्षिणेला स्थापीत नाहींत, ‘आहवनीय ’ या अग्नीच्या ‘ दक्षिणेला ’ ऋत्विज उभे राहून आहुति देतात. कांहीं असलें तरी हें क्रियाविशेषण येथें मोठ्या महत्त्वाचें आहे असें नाहीं. इतर सर्व अर्थ उघडच आहे.

श्लोकीकरणः–

उभे भॅद्रे जोषयेते न मेने
गावो न वाश्रा उप तस्थुरेवैः ।
स दक्षॅाणां दक्षपतिर्बभूव
अञ्जन्ति यं दक्षिणतो हविर्भिः ॥

**उद्यंयमीति सवितेव बाहू उभे सिचौ यतते भीम ऋञ्जन् ।**
**उच्छुक्रमत्कमजते सिमस्मान्नवा मातृभ्यो वसना जहाति ॥ ७ ॥**

उत् । यंयमीति । सविताऽइव । बाहू इति । उभे इति । सिचौ । यतते । भीमः । ऋञ्जन् ।
उत् । शुक्रम् । अत्कम् । अजते । सिमस्मात् । नवा । मातृऽभ्यः । वसना । जहाति ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. [ सोऽग्निः ] सवितेव ( =सविता यथा किरणरूपान्बाहूनुद्यच्छति तथा ) बाहू उद्यंयमीति (=स्वतेजांस्यूर्ध्वाभिमुखानि करोति ), उभे सिचौ (=उभे द्यावापृथिव्यौ) ऋञ्जन् यतते ( =प्रसाधयन् प्रयतते=प्रयत्नं कृत्वा प्रसाधयति=वस्त्रैरलंकरोति )। [ स ] सिमस्मात् ( =विश्वस्मात् वस्तुनः सकाशात् ) शुक्रम् अत्कं ( =शुक्रं निर्मलं तेजः=निर्मलं वासः ) उदजते ( =उद्गमयति=उद्धृत्य हरति ) [ अपि च ] मातृभ्यः ( =स्वमातृभ्यः=मातृणामर्थे ) नवा वसना ( =नवानि वसनानि वस्त्राणि ) जहाति ( =ददाति ) ॥

७. [ तो ] सवित्याप्रमाणें [ आपले ] बाहु वर पसरतो. भयानक [ अग्नि ] पृथिवी आणि द्युलोक यांस वस्त्रालंकृत करण्याचा पराक्रम करितो. [ तो ] सकळ वस्तूंवरून पांढरें वस्त्र काढून घेतो [ आणि ] [ आपल्या ] आयांला नवीं वस्त्रें देतो.

7. He throws up [ his ] arms like Savitâ. He, dreadful, energetically clothes both Earth and Heaven. He takes off the fair raiment from all. He gives new clothes to his mothers.

७. यांत अग्नीचें चरित्र वर्णिलें आहे. परंतु अग्नीच्या कोणत्या विशेष कृत्यांला उद्देशून ऋषि बोलत आहे तें स्पष्ट समजत नाहीं. शब्दार्थ उघड आहे तो ह्याः—' अग्नि सवित्याप्रमाणें आपले हात वर करितो. आणि तो अतिविस्तीर्ण द्यावापृथिवींला आपल्या सुंदर तेजोरूप वस्त्रानें शोभवितो. तो सर्व वस्तूंपासून त्यांचें लकलकीत वस्त्र हरण करून घेतो आणि आपल्या आयांला नवीन वस्त्रें नेसावयास देतो.' परंतु अग्नीचे बाहु म्हणजे त्याच्या कांति असा अर्थ घेतला तरी ' कांति वर करितो ' याचा अर्थ काय? उषोरूपानें उगवून जिकडे तिकडे पसरवितो असा अर्थ सायणांनीं केला आहे तोच घेतला तर अग्नि उषेच्या रूपानें उगवून द्यावापृथिवींस तेजोरूप वस्त्र नेसवितो असा दुसऱ्या पादाचा भावार्थ झाला. परंतु सकल वस्तूंपासून त्यांचें निर्मल वस्त्र हरण करितो म्हणजे काय? सायणाचार्य सकळ पदार्थमात्रापासून सूर्यरूपानें रस हरण करितो असा अर्थ करितात. आयांला नवीं वस्त्रें नेसवितो म्हणजे तात्पर्य काय? सायणाचार्य मेघोदकरूप आयांपासून सकळ जगताला आच्छादणारीं अशीं वस्त्रें म्हणजे तेजें संपादन करितो असें म्हणतात. पण या मंत्राचा उत्तरार्ध समजावयाला शब्दशः सोपा असला तरी कोणत्या गोष्टीला अनुलक्षून ऋषीचें बोलणें आहे तें नीट समजत नसल्यामुळें तात्पर्यार्थ स्पष्ट नाहीं.

श्लोकीकरणः—

उद्यंयमीति सवितेव बाहू<br>
उभे सिचौ यतते भीम ऋञ्जन् ।<br>
उच्छुक्रमत्कम् अजते सिमस्मात्<br>
नवा मातृभ्यो वसना जहाति ॥

**त्वेषं रूपं कृणुत उत्तरं यत्संपृञ्चानः सदने गोभिरद्भिः ।**
**कविर्बुध्नं परि मर्मृज्यते धीः सा देवताता समितिर्बभूव ॥ ८ ॥**

त्वेषम् । रूपम् । कृणुते । उत्ऽतरम् । यत् । सम्ऽपृञ्चानः । सदने । गोभिः । अत्ऽभिः ।
कविः । बुध्नम् । परि । मर्मृज्यते । धीः । सा । देवऽताता । सम्ऽइतिः । बभूव ॥ ८ ॥

**उरु ते ज्रयः पर्येति बुध्नं विरोचमानं महिषस्य धाम ।**
**विश्वेभिरग्ने स्वयशोभिरिद्धोऽदब्धेभिः पायुभिः पाह्यस्मान् ॥९॥**

उरु । ते । ज्रयः । परि । एति । बुध्नम् । विऽरोचमानम् । महिषस्य । धाम ।
विश्वेभिः । अग्ने । स्वयशःऽभिः । इद्धः । अदब्धेभिः । पायुऽभिः । पाहि । अस्मान् ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. [ अग्निः ] सदने ( =स्वकीये गृहे ) गोभिः अद्भिः संपृञ्चानः ( =वृष्ट्युदकरूपाभिर्गोभिः संयुक्तः सन् ) [ स्वकीयम् ] उत्तरं ( =श्रेष्ठं ) त्वेषं ( =दीप्तम् अन्यैर्द्रष्टुमशक्यं=तेजःपुञ्जं ) रूपं कृणुते ( =आविष्करोति ) [ इति ] यत् ( =यदा ) [ भवति ] [ तदा ] कविः ( =क्रान्तदर्शी=विद्वान् ) धीः ( =धीरः=प्राज्ञः ) [ अग्निः ] बुध्नं परि मर्मृज्यते ( =अन्तरिक्षं तेजसाच्छादयति ) । सा ( =सैव ) [ तस्याग्नेः ] देवताता समितिः ( =देवैः सह संगमनं=देवैः सह प्रादुर्भावो ) बभूव ॥

अत्रेदमुक्तं भवति । यदा मेघोदकरूपाभिर्गोभिर्युक्तः सन्नग्निर्वैद्युतः स्वकीयमुत्कृष्टतरं तेजस्तेजःपुञ्जपूर्णेन्तरिक्षे प्रादुर्भावयति तदा तत्सर्वमन्तरिक्षं तेन तेजसा प्रमृष्टं भवति यच्च तत्स्वरूपप्रादुर्भवनं तदेव देवान्तरैः सहाग्नेर्गमनं भवतीति ॥

९. [ हे अग्ने], ते उरु ज्रयः ( =तव विस्तीर्णं तेजो ) विरोचमानं (=प्रकाशमानं सत् ) महिषस्य धाम ( =महतस्तव स्थानं निवासस्थानभूतम् एतादृशं ) बुध्नम् ( =अन्तरिक्षं ) परि एति ( =सर्वतो व्याप्नोति ) । [ तर्हि ) हे अग्ने, विश्वेभिः स्वयशोभिः इद्धः ( =अस्माभिः प्रज्वलितस्त्वं सकलैरपि तव तेजोभिः सह प्रादुर्भूत्वा )

८. अग्नि [ आपल्या ] घरीं मेघोदकरूप गाईंला मिळून [ आपलें ] अतिजाज्वल्य [ आणि ] अति उच्च तेज प्रगट करितो तेव्हां प्रज्ञावान् [ आणि ] बुद्धिमान् [ अग्नि ] सर्व आकाशप्रदेशाला तेजानें निर्मळ करितो. तीच [ त्याची ] देवांशीं भेट होय.

8. When [ Agni ], combined in [ his ] home with the [ heavenly ] cows—the Waters—, manifests [ his ] resplendent [ and ] highest form, wise [and] intelligent [ Agni ] illuminates the firmament [with his light]. That was [ his ] meeting with the gods.

९. [ हे अग्नी ], तुझें विस्तीर्ण तेज, तुज मोठ्याचें स्थान [असें जें ] अंतरिक्ष त्याला चहूंकडून दीप्त करून व्यापून टाकितें. [तर] हे अग्नी, [ तूं ] आपल्या सकळ तेजांसहित प्रदीप्त होऊन [तुझ्या] अप्रतिहत रक्षणांनीं आम्हांला रक्ष.

9. Thy extended effulgence, shining brilliantly, pervades the firmament, [ which is ] thy abode, O great [ Agni ]. Kindled, therefore, O Agni, into all thy own splendors, save us thou with [ all ] [ thy ] almighty aids.

---

८. ' अग्नि जेव्हां आकाशांत विजेच्या रूपानें आपलें अतितेजस्वी स्वरूप प्रगट करितो, तेव्हां सर्व अंतरिक्ष प्रकाशानें व्याप्त होऊन जातें. तीच अग्नीची इतर देवांशीं गांठ; म्हणजे तें जें तेज दृष्टीस पडतें तें अग्नीची भेट दुसऱ्या देवांशीं होत असते त्यामुळें पडत असतें,' असा या मंत्राचा भावार्थ दिसतो. पण मंत्र कांहींसा कठिण आहे खरा.

' आपल्या घरीं '=' सदने.' म्हणजे ' अन्तरिक्षांत ' असा अर्थ.

' उदकरूप गाईंला '=' गोभिरद्भिः.' म्हणजे मेघमालिकांत जीं बाष्परूपानें राहणारीं उदकें तीं, कीं ज्यांस ' गाई ' असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं म्हणत असतात.

' बुद्धिमान् '=' धीः.' असा ( सायणांस अनुसरून ) अर्थ केल्याशिवाय निर्वाह नाहीं.

' देवांशीं '=' देवताता.' ही ' देवताति ' शब्दाची सप्तमी घ्यावी किंवा ' देवतात् ' असा तकारान्त शब्द कल्पून त्याची तृतीया समजावी. रूप कोणतेंहि समजलें तरी अर्थ ' देव,' देवसमूह असा आहे. ऋ. ३. १९. २ यांतील ' देवताति ' शब्दाविषयींचें सायणभाष्य पहा.

धन्वन्स्रोतः कृणुते गातुमूर्मिं शुक्रैरूर्मिभिरभि नक्षति क्षाम् ।
विश्वा सनानि जठरेषु धत्तेऽन्तर्नवासु चरति प्रसूषु ॥ १० ॥

धन्वन् । स्रोतः । कृणुते । गातुम् । ऊर्मिम् । शुक्रैः । ऊर्मिऽभिः । अभि । नक्षति । क्षाम् ।
विश्वा । सनानि । जठरेषु । धत्ते । अन्तः । नवासु । चरति । प्रऽसूषु ॥ १० ॥

---

अदब्धेभिः पायुभिः (=शत्रुभिरहिंसितैः=अप्रतिहतैः रक्षणैः ) अस्मान् पाहि ( =अस्मान् रक्ष ) ॥

महतस्तव यत्तेजः सर्वमन्तरिक्षं व्याप्नोति तेन सकलेन सह त्वमद्य नो यज्ञे प्रादुर्भूतः सन् अस्मान् रक्षेति भावः ॥

---

## भाषायाम्.

१०. [ स ] धन्वन् ( =धन्वनि=उदकरहिते मरुप्रदेशे ) स्रोतः कृणुते ( =उदकप्रवाहं निर्मिमीते ) ऊर्मिं गातुं [ कृणोति ] ( =ऊर्मये=उदकसंघाय मार्गं करोति=उदकसंघा यथा प्रवहेयुस्तथा करोति ) । [ स ] शुक्रैरूर्मिभिः ( =निर्मलैरुदकसंघैः ) [ सह ] क्षाम् अभि नक्षति ( =पृथिवीम् अभिव्याप्नोति ) । [ स ] विश्वा सनानि ( =विश्वानि सनातनानि=सर्वाणि पुरातनानि भूतानि=अग्रयावग्रानि काष्ठादीनि तेन दग्धानि तानि ) जठरेषु धत्ते ( =स्वोदरे धारयति ) [ स्वयं पुनः ] नवासु प्रसूषु ( =अग्न्युत्पादकास्वोषधीरूपासु मातृषु ) अन्तश्चरति (=तत्र वर्तमानस्तिष्ठति ) ॥

---

श्लोकीकरणः—

त्वेषं रूपं कृणुत उत्तरं यत्
संपृञ्चानः सदने गोभिरद्भिः ।
कविर्बुध्नं परि मर्मृज्यते धीः
सा देवताता समितिर्बभूव ॥

९. 'हे अग्नी, तुझें तेज इतकें विस्तीर्ण आहे कीं, तें सर्व अंतरिक्षाला, म्हणजे तूं ज्यांत वास करितोस त्या अखंड प्रदेशाला व्यापून टाकितें. तर त्या सकल तेजासहित तूं आज प्रगट होऊन आमचें संरक्षण कर' असा भावार्थ आहे.

'विस्तीर्ण तेज '=' उरु ज्रयः.' ऋ. ७. ५२. ५ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'तुज मोठ्याचें स्थान '='[ते] महिषस्य धाम.' म्हणजे, अग्नि विद्युद्रूपानें अंतरिक्षांत राहतो यास्तव अंतरिक्ष त्याचें स्थान होय.

'सकळ तेजांसहित प्रदीप्त होऊन '=

१०. उदकहीन शुष्क प्रदेशांत [ तो ] जल निर्माण करितो [ आणि ] उदकाचे लोट वाहवितो. [ तो ] स्वच्छ उदकप्रवाहांस घेऊन भूमीवर येतो. [ तो ] सर्व जुन्या वस्तु [ आपल्या ] उदरांत धारण करितो [ आणि ] नव्या आयांच्या पोटांत [ पुनः ] संचार करितो.

10. He creates water in waterless regions [and] a passage for a flood of water. He comes upon earth with pure streams of water. He holds all old things in [his] bowels. He [again] lives in the womb of new mothers.

---

' विश्वेभिः स्वयशोभिः इद्धः.' म्हणजे तुला आम्ही पेटवीत आहों तो शुल्करूपानें प्रगट न होतां आपल्या सर्व प्रभावांसहित प्रगट हो, म्ह० प्रकाश.

' अप्रतिहत'= 'अदब्धेभिः.' म्हणजे ज्याचें रक्षण करण्याचा पतकर अग्नीनें घेतला त्याची हानि दुसरा कोणीहि करूं शकत नाहीं, इतका तो सर्वश्रेष्ठ होय.

श्लोकीकरण:—

उरु ते ज्रयः परि एति बुध्नं
विरोचमानं महिषस्य धाम ।
विश्वेभिरग्ने स्वयशोभिरिद्धो
अदब्धेभिः पायुभिः पाहि अस्मान्॥

दुसरा आणि तिसरा हे चरण आधुनिक श्लोकाप्रमाणें म्हणतां येतात.

---

१०. यांतहि अग्नीचें स्वरूप वर्णिलें आहे. तो ज्या प्रदेशांत पाणी नसतें अशा मारवाडासारिख्या प्रदेशांत पाणी उत्पन्न करवितो, आणि पाण्याचे मोठमोठे पूर येत असें करितो. आणि त्याच्या मनांत येईल तर तो आकाशांतून मोठमोठ्या धारांसहित पृथ्वीवर येईल; म्हणजे मोठमोठ्या वृष्टींसहित वीजांच्या रूपानें पृथ्वीवर पडेल. आजपर्यंत काष्ठादिक जे पदार्थ झाले, ते सर्व याच्या पोटांत आहेत, म्हणजे यानें ते खाऊन टाकिले आहेत; आणि आपण अजून दुसऱ्यांच्या पोटांत जन्म घेतच आहे; म्हणजे जीं नवीन लांकडें उत्पन्न होतात त्यांत अग्नि आहेच, तो त्यांत बाळकाप्रमाणें वाढत असतो.—जुने सगळे पदार्थ याचे पोटीं; आणि हा दुसऱ्यांचे पोटीं, असा ह्याचा महिमा आहे.'

' उदकाचे लोट वाहवितो '=' गातुम् ऊर्मिं कृणुते.' अक्षरशः अर्थ ' जलप्रवाहाला मार्ग करितो.' ' ऊर्मये ' असें रूप असावें अशी इच्छा होते.

' जुन्या वस्तु आपल्या उदरांत धारण करितो '=' विश्वा सनानि जठरेषु

एवा नो अग्ने समिधा वृधानो रेवत्पावक श्रवसे वि भाहि ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ ११ ॥ २ ॥

एव । नः । अग्ने । सम्ऽइधा । वृधानः । रेवत् । पावक । श्रवसे ।
वि । भाहि ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ११ ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

११. एव ( =एवम्=अनेन प्रकारेण ) हे अग्ने, समिधा वृधानः ( =समिद्भिः प्रवृद्धः=अस्माभिर्दत्ताभिः समिद्भिः प्रदीप्तः सन् ), हे पावक ( =शोधक ), [ त्वं ] नः रेवत् श्रवसे वि भाहि ( =अस्मदर्थं धनयुक्तं यथा स्यात्तथा अन्नलाभाय च=अस्माकं धनलाभो यथा स्यादन्नलभश्च यथा स्यात्तथा प्रकाशस्व ) । तत् ( =एतच्च ) मित्रः, वरुणः, अदितिः ( =एतन्नाम्नी देवानां माता ), सिन्धुः ( =समुद्राभिमानिनी देवता ) पृथिवी उत द्यौः ( =पृथिवी द्युलोकश्च ) [ इत्येते ] नः मामहन्तु ( =अस्मभ्यम्=अस्मदर्थं पूजयन्तु=ददतु ) ॥

---

धत्ते.' म्हणूनच अग्नीला सर्वभक्षी म्हणत असतात. होऊन गेलेलीं जितकीं लांकडें जाळलीं गेलीं तीं सर्व त्याच्या पोटांत आहेत असें म्हणणें यांत स्वभावोक्तिच आहे.

'आयांच्या '=' प्रसूषु.' म्हणजे वनस्पति वृक्ष इत्यादिकांच्या. वृक्षांला आणि वनस्पतींला अग्नीच्या आया म्हणतात हें तर वेदांत प्रसिद्धच आहे.

श्लोकीकरणः—

धन्वन्स्रोतः कृणुते गातुमूर्मिं
शुक्रैरूर्मिभिः अभि नक्षति क्षाम् ।
विश्वा सनानि जठरेषु धत्ते
अन्तर्नवासु चरति प्रसूषु ॥

११. या प्रकारेंकरून हे अग्नी, हे पावका, [ आमच्या ] समिधांनीं प्रदीप्त झालेला [ तूं ] प्रकाश, आणि आम्हांला वैभव आणि संपत्ति प्राप्त करून दे. आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू आम्हांला देओत.

11. Thus fed with fuel, mayest thou O Agni, O Purifier, shine upon prosperity and wealth unto us. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

११. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. ऋषि शेवटची प्रार्थना करितो कीं, 'हे अग्नी, या प्रकारेंकरून तुला आम्हीं समिधा घालून प्रदीप्त केला आहे. तर तूं आज प्रसन्न होऊन प्रकाश, आणि आम्हांस वैभव आणि धन हीं प्राप्त होतील असें कर. आणि हें जें आतां आम्हीं तुजजवळ मागून घेतलें तें मित्र, वरुण इत्यादिक देवहि आम्हांला दान देओत.' या मंत्राचा उत्तरार्ध पालवपद होय यास्तव अर्थसंदर्भाला कसा लागेल तसा लावून घ्यावा लागतो.

ह्या सूक्तावरोबर कुत्स ऋषीचीं दोन सूक्तें संपलीं. यावरून कुत्स महर्षि कसा होता, म्हणजे देवांची उपासना करण्याचा त्याचा प्रकार कसा असे, तो आपणास कसा समजे, देवांला कसे समजे, देवांपाशीं काय मागे, त्याला कोणत्या वस्तूंची अवश्यकता असे आणि तो देवांची स्तुति कशी करी त्याविषयीं अनुमान काढतां येतें, आणि तें अनुमान पुराणादिक जे वेदोत्तर ग्रंथ त्यांमध्यें ह्या ऋषींविषयीं अद्भुतच कथा सांगितलेल्या आहेत त्यांच्या प्रामाण्याला बळकटी आणणारें आहे असें कोणीहि म्हणणार नाहीं.

श्लोकीकरण:—

एवा नो॑ अग्ने स॒मिधा॑ वृधा॒नो
रे॒वत् पा॑वक॒ श्रव॑से॒ वि भा॑हि ।
तन्नो॑ मि॒त्रो वरु॑णो मामहन्ताम्
अदि॑तिः॒ सिन्धुः॑ पृथि॒वी उ॒त द्यौः ॥

## सूक्तम् ९६.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । द्रविणोदा अग्निः शुद्धोग्निर्वा देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**स प्रत्नथा सहसा जायमानः सद्यः काव्यानि बळधत्त विश्वा ।**
**आपश्च मित्रं धिषणा च साधन्देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥ १ ॥**

सः । प्रत्नऽथा । सहसा । जायमानः । सद्यः । काव्यानि । बट् । अधत्त । विश्वा ।
आपः । च । मित्रम् । धिषणा । च । साधन् । देवाः । अग्निम् । धारयन् । द्रविणःऽदाम् ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. सहसा जायमानः (=बलेन निर्मथननियुक्तेन जात एव) सः [अग्निः] सद्यः (=तदानीमेव=उत्पत्त्यनन्तरमेव) प्रत्नथा (=पुरातन इव=पूर्वं विद्यमान इव) बट् (=सत्यं) विश्वा काव्यानि (=विश्वानि काव्यानि=सर्वाण्यपि कवेः कर्माणि होतृकर्माणि तथा हविर्वहनादीनि कर्माणि) अधत्त (=व्यधत्त=विदधौ=अकरोत्)। [तदनन्तरम्] आपश्च धिषणा च (=आपो देव्यश्च धिषणा देवी च) [तम्] [उपासकानां] मित्रं साधन् (=असाधन्=मित्रमकुर्वन्) । देवाः (=इन्द्रादयो देवा) अग्निं द्रविणोदां (=धनस्य दातारं) धारयन् (=अधारयन्=अकुर्वन्=द्रविणोदस्त्वकर्मणि न्ययोजयन्) ॥

## सूक्त ९६.

ऋषि—अङ्गिरस्कुळांत जन्मलेला कुत्स (पूर्वी सूक्ताचा जो तोच). देवता—द्रविणोदा अग्नि (म्हणजे द्रव्य देणें हा गुण जिचा आहे अशी अग्नीची विभूति, म्हणजे द्रव्य देणारा अग्नि) अथवा केवळ अग्निच देवता होय असेंहि समजतात. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. तो बळाच्या योगानें निर्माण होतांच प्रौढ [असल्या]-प्रमाणें एकदम सर्व कौशल्यकर्मं खरोखर करूं लागला. [मग त्याला] आपो देवी आणि त्याप्रमाणें [देवी] धिषणा [मानवांचा] मित्र करित्या झाल्या [आणि] देव अग्नीला द्रव्यदाता करिते झाले.

## Hymn 96.

To *Agni Draviṇodas* (i.e. *Agni the Giver of Wealth*) or to simple *Agni*. By *Kutsa* of the family of *Angiras*, (same as the author of the previous hymn). Metre—*Trishṭubh*.

1. Truly he [so soon as] born by strength at once performed as [if he were] grown all the feats of a sage. Both the Waters and the goddess Dhishaṇâ made him a friend [to mankind]. The Gods appointed Agni Giver of Wealth.

---

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीनेंच केलेलें आहे. ह्याची देवता 'अग्नि द्रविणोदा' म्हणजे द्रव्यदाता अग्नि. या पहिल्या मंत्रांत अग्नि जन्मतांच तो कसा होता आणि तो जन्मतांच दुसऱ्या देवांनीं काय केलें तें सांगितलेलें आहे. 'अग्नीला अरणींतून उत्पन्न करितांच तो एकदम प्रौढ असाच जन्मला आणि प्रौढ मनुष्यानें स्तोत्रें म्हणणें, यज्ञ करणें इत्यादि कामें करावयाचीं तीं करूं लागला. मग त्याला आपो देवींनीं आणि धिषणा या देवीनें मनुष्यांचा मित्र केला आणि इतर देवांनीं त्याला 'द्रविणोदा' केलें, म्हणजे मनुष्यांला द्रव्य देणारा केला. याप्रमाणें या अग्नीचा महिमा आहे.'

'तो बळाच्या योगानें निर्माण होतांच' =' सहसा जायमानः.' म्हणजे मथनाच्या योगानें अरणींतून बाहेर पडतांच. वस्तुतः ऋषीच्या मनांत अग्नीचें जन्म अंतरिक्षांत वीजेच्या रूपानें होतें त्याला अनुलक्षून बोलावयाचें आहे, पण अग्नीचें जें अरणींत भौतिक जन्म होतें

स पूर्वया निविदा कव्यतायोरिमाः प्रजा अजनयन्मनूनाम् ।
विवस्वता चक्षसा द्यामपश्च देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥ २॥

सः । पूर्वया । निऽविदा । कव्यता । आयोः । इमाः । प्रऽजाः । अजनयत् । मनूनाम् ।
विवस्वता । चक्षसा । द्याम् । अपः । च । देवाः । अग्निम् । धारयन् । द्रविणःऽदाम् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. सः [ अग्निः ] आयोः ( =उपासकस्य मनुष्यस्य ) पूर्वया निविदा कव्यता ( =पुरातनया उपासनया स्तुत्या च=पुरातनयजमानानामुपासनया स्तुत्या च ) [ उपस्थितः सन् ] मनूनां ( =मनुष्याणाम् ) इमाः प्रजाः ( =एता दृश्यमाना विशः ) अजनयत् ( =निर्मितवान् ), विवस्वता चक्षसा ( =दीप्तेन तेजसा स्वकीयेन ) द्याम् अपश्च ( =द्युलोकम् अन्तरिक्षं च ) [ अजनयत्=निर्मितवान् ) । देवाः ( =इन्द्रादयो देवा ) अग्निं द्रविणोदां ( =धनस्य दातारं ) धारयन् ( =अकुर्वन् ) ॥

त्याचा ऋषीनें यांत संकर केला आहे.

'प्रौढ असल्याप्रमाणें'= 'प्रत्नथा'. या अर्थाला प्रमाण ऋ. ३.२.१२ आणि ५. ८. २ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणाचें भाष्य यानें आहे.

'आपो देवींनीं'=' आपः.' म्हणजे उदकें जीं तद्रूपी देवींनीं. आपो देवींनीं त्याला मित्र केला म्हणजे त्याणें आपणांवर कृपा करावी म्हणून त्याला प्रसन्न करित्या झाल्या.

'धिषणेनें'=' धिषणा.' 'धिषणा' ही एक वेदांत क्षुद्रदेवतांपैकीं आहे. इजविषयीं सू. २२, मंत्र १० याजवरील मराठी टीपा पहा. 'धिषणा' म्हणून जी देवी ती स्तुतीची देवता होय. तिलाच सायणाचार्य केव्हां केव्हां 'माध्यमिका वाक्' असें आपल्या भाष्यांत म्हणत असतात. वाग्देवता अथवा स्तुतिरूप देवता इनें अग्नीला मनुष्यांचा मित्र केला म्हणजे तिनें त्याची स्तुति गाऊन मनुष्यांला अनुकूळ होई असें केलें.

श्लोकीकरणः—

स प्रत्नथा सहसा जायमानः
सद्यः काव्यानि बळधत्त विश्वा ।
आपश्च मित्रं धिषणा च साधन्
देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥

२. तो उपासकांच्या पुरातन स्तोत्रानें [ आणि ] उपासनेनें मनूच्या ह्या प्रजा उत्पन्न करिता झाला; [ तो ] [ आपल्या ] देदीप्यमान तेजानें द्युलोक आणि अंतरिक्ष [ यांस उत्पन्न करिता झाला]. .देव अग्नीला द्रव्यदाता करिते झाले.

2. He through the ancient offering [and] prayer of the worshipper created these sons of men, with [his] brilliant light he created Heaven and the firmament. The Gods appointed Agni GIVER OF WEALTH.

२. यांत अग्नीनें काय काय पराक्रम केले तें सांगितलें आहे. 'तो उत्पन्न होतांच पुरातन काळचे जे उपासक त्यांनीं त्याची उपासना केली, आणि स्तुति केली; त्यामुळें तो प्रसन्न झाला आणि जगत् निर्माण करण्याविषयीं समर्थ झाला; तेव्हां त्याणें ह्या ज्या प्रजा सर्व पृथ्वीवर पसरल्या आहेत त्या निर्माण केल्या, आणि आपलें जें स्वताहाचें तेज त्याच्या योगेंकरून त्याणें हा विस्तीर्ण द्युलोक आणि हें अंतरिक्ष हीं निर्माण केलीं. असा जो अग्नि त्याला देवांनीं द्रविणोदा म्हणजे द्रव्यदाता करून या जगांत स्थापिला आहे.'

'उपासकांच्या '=' आयोः.' आयुशब्दाचा हा अर्थ वेदांत प्रसिद्ध आहे.

'मनूच्या ह्या प्रजा '=' इमाः प्रजा मनूनाम्.' ही जी मनुष्याची संतति जिकडे तिकडे पसरलेली दिसत आहे ती. या मंत्रांत पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक हे अग्नीनें निर्माण केले असें ऋषि म्हणत आहे. ' इमाः प्रजा मनूनाम् ' म्हणजे जरी ' हीं मनुष्यें ' इतका अर्थ आहे तरी ' ही सगळी पृथिवी ' असा अर्थ त्याच्या मनांत आहे.

हा मंत्र श्लोकवृत्ताला सहज वसतोः—

स पूर्वया निविदा कव्यतायोः<br>
इमाः प्रजा अजनयन्मनूनाम् ।<br>
विवस्वता चक्षसा द्यामपश्च<br>
देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥

तमीळत प्रथमं यज्ञसाधं विश आरीराहुतमृञ्जसानम् ॥
ऊर्जः पुत्रं भरतं सृप्रदानुं देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥ ३ ॥
तम् । ईळत । प्रथमम् । यज्ञऽसाधम् । विशः । आरीः । आऽहुतम् ।
ऋञ्जसानम् ।
ऊर्जः । पुत्रम् । भरतम् । सृप्रऽदानुम् । देवाः । अग्निम् । धारयन् ।
द्रविणःऽदाम् ॥ ३ ॥
स मातरिश्वा पुरुवारपुष्टिर्विदद्गातुं तनयाय स्वर्वित् ।
विशां गोपा जनिता रोदस्योर्देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥ ४ ॥
सः । मातरिश्वा । पुरुवारऽपुष्टिः । विदत् । गातुम् । तनयाय । स्वः-
ऽवित् ।
विशाम् । गोपाः । जनिता । रोदस्योः । देवाः । अग्निम् । धारयन् ।
द्रविणःऽदाम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. तं (=पूर्वोक्तं ) यज्ञसाधं (=यज्ञस्य साधयितारम् ) ऊर्जः पुत्रं ( =बलस्य पुत्रं =बलादरण्योर्जातं ) भरतं ( =? सर्वेषां भर्तारं ) सृप्रदानुम् ( ="अविच्छेदेन धनानि प्रयच्छन्तम्") [ अग्निम् ] आरीर्विशः ( =आर्यो विशः=आर्याः प्रजाः=आर्यजना ) ऋञ्जसानम् ( =कृतालंकारम्=अलंकृतं कृत्वा ) आहुतं ( =प्रापिताहुतिम्=आहुतिभिः संतृप्तं कृत्वा ) प्रथमम् ईळत (=सर्वेभ्योपि पूर्वम् अस्तुवन्=अयजन्त ) [तम्] अग्निं देवाः ( =इन्द्रादयो ) द्रविणोदां ( =धनस्य दातारं ) धारयन् (=अकुर्वन् ) ॥
आर्यजना अग्निमेव प्रथममुपासत ततः पश्चादितरान्देवानित्यर्थः ॥

४. स ( =पूर्वोक्तः ) पुरुवारपुष्टिः ( =अनेकधनवृद्धिमान् ) स्वर्विद् ( =स्वर्गस्य लम्भयिता=स्वर्गस्य प्रापयिता ) मातरिश्वा ( =? अग्निः ) [ आर्यविशां ] तनयाय ( =अपत्येभ्योस्मदर्थं ) गातुं विदत् ( =मार्गम् अविदत्=उपासनामार्गं दर्शितवान् ) [ स ] विशां गोपाः ( =जनानां पालयिता ) रोदस्योर्जनिता (=द्यावापृथिव्योः पिता ) [ भवति ] । [ तम् ] अग्निं देवाः ( =इन्द्रादयो ) द्रविणोदां (=धनस्य दातारं ) धारयन् ( =अकुर्वन् ) ॥

३. ह्या [अग्नी]लाच, [ ह्या ] यज्ञसंपादक [ अग्नी]लाच आर्य लोक प्रथम अलंकृत करून हवींनीं तृप्त करून स्तविते झाले— [ या ] बळाच्या पुत्रालाच, या अति उदार प्रभूलाच [ प्रथम स्तविते झाले]. देव अग्नीला द्रव्यदाता करिते झाले.

3. Him, the promoter of the sacrifice, the Ârya people first decorated, sacrificed to, [ and ] praised,—him, the son of might, the generous lord. The Gods appointed Agni Giver of Wealth.

४. तो अनेकवैभववान् [आणि ] स्वर्गाची प्राप्ति करून देणारा मातरिश्वा [ अग्नि ] [ आर्य लोकांच्या ] संततीकारणें, [ उपासना]मार्ग घालून देता झाला. [ तो ] जनांचा पालक [होय ] [आणि] द्यू आणि पृथिवी यांचा पिता [होय]. देव अग्नीला द्रव्यदाता करिते झाले.

4. That Agni Mâtaris'vâ, endowed with multiform prosperity [ and ] the procurer of heaven, discovered the way of worship for the posterity [ of the Âryas]—Agni the protector of the people [ and ] the father of Earth and Heaven. The Gods appointed Agni Giver of Wealth.

---

३. यांत अग्नीची उपासना केव्हांपासून होऊं लागली त्याविषयीं सांगितलें आहे. अग्नीचीच उपासना आर्य लोकांनीं प्रथम केली, नंतर इतर देवांचीं करूं लागले.

' यज्ञसंपादक '=' यज्ञसाधम्.' म्हणजे यज्ञाला सिद्धीस नेणारा. यज्ञाचें फळ प्राप्त करून देणारा. ' आर्य लोक '=' आरीः विशः' म्हणजे आम्हां हिंदु लोकांचे वाडवडील आणि पारसी, इंग्रेज, रोम, ग्रीक, फ्रेंच, जर्मन, यांचे वाडवडील. ' आर्य' शब्दाविषयीं सू. ५१, मं. ८ आणि त्याजवरील टीप पहा.

' बळाच्या पुत्राला '=' ऊर्जः पुत्रम्.' सू.२६, मं. १० आणि टीप पहा.

' उदार प्रभूला'=' सूप्रदातुं भरतम्.' ' भरत ' शब्दाचे अर्थ सायणांनीं दोन दिलेले आहेत त्यांतून एक आम्हीं घेतला आहे. पण ' भरत ' हें अग्नीच्या एका नांवासारिखें येथें घातलें आहे असें दिसतें.

श्लोकीकरणः—

तमीळत प्रथमं यज्ञसाधं
विशः आरीराहुतमृञ्जसानम् ।

**नक्तोषासा वर्णमामेम्याने धापयेते शिशुमेकं समीची ।**
**द्यावाक्षामा रुक्मो अन्तर्वि भाति देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम्**
**॥ ५ ॥ ३ ॥**

नक्तोषसा । वर्णम् । आमेम्याने इत्याऽमेम्याने । धापयेते इति ।
शिशुम् । एकम् । समीची इति सम्ऽईची ।
द्यावाक्षामा । रुक्मः । अन्तः । वि । भाति । देवाः । अग्निम् । धार-
यन् । द्रविणःऽदाम् ॥ ५ ॥ ३ ॥

## भाषायाम्.

५. वर्णम् आमेम्याने (=स्वस्वरूपं हिसन्त्यौ) नक्तोषसा (=नक्तोषसौ) समी-ची (=संगते भूत्वा) एकं शिशुम् [अग्निं] धापयेते (=स्तन्यं पाययेते)। रुक्मः (=रोचमानः) [स शिशुर्जायमान एव] द्यावाक्षामा अन्तः (=द्यावापृथिव्योरन्तः =द्यावापृथिव्योर्मध्ये) वि भाति (=विविधं भाति=सर्वत्र भाति स्म)। [तम्] अग्निं देवाः (=इन्द्रादयो) द्रविणोदां (=धनस्य दातारं) धारयन् (=अकुर्वन्)॥

ऊर्जः पुत्रं भरतं सृप्रदानुं
देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥

४. वरच्या मंत्रांत आर्य लोकांनीं सर्व देवांच्या पूर्वी अग्नीची उपासना करण्याचा प्रचार घातला असें सांगितलें. आता म्हणतो, 'हा जो आर्य जनांनीं प्रचार घातला त्यावरून सर्व ऋद्धिसिद्धींचा पति आणि स्वर्गाची प्राप्ति करून देणारा अग्नि त्याणें आर्य जनांचे जे आम्हीं वंशज आहों त्यांचें कल्याण व्हावें म्हणून देवांचें भजन करणें हा जो सर्व कल्याणाचा उत्तम मार्ग तो दाखवून दिला आहे. अग्नि हा सामान्य नव्हे, तर या त्रिभुवनाला उत्पन्न करणारा आणि पोसणारा असा तो आहे. त्याला देवांनीं या पृथिवीवर द्रव्यदाता करून ठेविलें आहे.'

'मातरिश्वा.' येथें मातरिश्वा हें अग्नीचें विशेषण आहे. तें वेदांमध्यें पुष्कळ ठिकाणीं येत असल्यामुळें 'द्रविणोदा', 'वैश्वानर,' 'पावक,' 'जातवेदा', 'तनूनपात्,' 'नराशंस,' 'अपां नपात्' इत्यादि जीं अग्नीचीं नांवें त्यांपैकीच तें एक होऊन गेलें आहे. मातरिश्वा हें नांव अग्नीला कशामुळें पडलें याविषयीं फार मतभेद आहे. सायणाचार्य बहुतकरून "मातरि अन्तरिक्षे श्वसिति विद्युदादिरूपतया चेष्टते इति मातरिश्वा"=मातरि म्हणजे अंतरिक्षांत वीजेच्या इत्यादि रूपानें श्वसिति म्हणजे राहतो म्हणून 'मातरिश्वा,' असा (ऋ. ३. २६. २) अर्थ करीत असतात. केव्हां केव्हां त्यांणीं अर्णीरूप आईच्या पोटीं वास करितो

५. [ आपआपलीं ] रूपें बदलणाऱ्या रात्र आणि उषा [ ह्या दोघी ] एकत्र होऊन [ ह्या ] एकुलत्या बाळाला थान पाजितात. देदीप्यमान [ अग्नि बाळ ] द्युलोक आणि भूलोक यांजमध्यें सर्वत्र प्रकाशतो. [ त्या ] अग्नीला देव द्रव्यदाता करिते झाले.

5. Night and Dawn changing [ their ] colours [ and ] uniting together suckle [ this ] [ their ] only child. The brilliant [child Agni] shines far and wide throughout Earth and Heaven. The Gods appointed Agni GIVER OF WEALTH.

म्हणून ' मातरिश्वा ' असें सांगितलें आहे. पण व्युत्पत्ति काय असेल ती असो. ' मातरिश्वा ' शब्द अग्नीचें नांव आहे यांत संशय नाहीं. हा मातरिश्वा अग्नि निराळा आणि ' मातरिश्वा ' म्हणून जो एक देव सांगितला आहे, कीं ज्याणें अग्नीला प्रथम भूलोकावर द्युलोकाहून आणिलें ( सू. ६०, मं. १ याजवरील टीप पहा ) तो ' मातरिश्वा ' वेगळा होय. कदाचित् मातरिश्वा या देवानें अग्नीला आणिलें म्हणूनच त्याला ' मातरिश्वा ' असें नांव पडलें नसेल ना ?

हा श्लोक खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला पाहिजे:—

स मातरिश्वा पुरुवारपुष्टिर्
विदद्गॉतुं तनयॉय सुअर्वित् ।
विशां गॉपा जनितॉ रोदसीओर्
देवा अॅग्निं धारयॅन्द्रविणोदाम् ॥

५. ' अग्नि जन्मतांच अग्नीच्या ज्या दोघी माता रात्र आणि उषा—कीं ज्या नित्य प्रातःकाळीं आणि सायंकाळीं संधीच्या वेळीं आपआपलें रूप बदलीत असतात त्या—एकत्र होऊन दोघींचा जो एकच बाळ अग्नि त्याला त्यांनीं थान पाजविलें. आणि ह्या तेजःपुंज बाळानें जन्मतांच सकळ द्युलोक आणि भूलोक यांस आपल्या तेजानें भरून टाकिलें. असा जो अग्नि त्याला देवांनीं द्रव्यदाता करून या जगांत ठेविलें आहे.'

' रूपें बदलणाऱ्या.' म्हणजे सकाळीं उषा आणि रात्र ह्या एकमेकीस भेटतात, तेव्हां रात्र आपलें स्वरूप बदलून किंचित् गोरी होते आणि उषा आपलें स्वरूप आहे त्यापेक्षां थोडी काळी दिसत असते. त्याप्रमाणेंच उलट क्रमानें संध्याकाळाविषयीं समजावें.

वृत्ताला अनुरोधून पहिल्या चरणांत ' आमेमिआने' असें म्हणावें लागतें.

**रायो बुध्नः संगमनो वसूनां यज्ञस्य केतुर्मन्मसाधनो वेः ।**
**अमृतत्वं रक्षमाणास एनं देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥ ६ ॥**

रायः । बुध्नः । सम्ऽगमनः । वसूनाम् । यज्ञस्य । केतुः । मन्मऽसाधनः । वेरिति वेः ।

अमृतऽत्वम् । रक्षमाणासः । एनम् । देवाः । अग्निम् । धारयन् । द्रविणःऽदाम् ॥ ६ ॥

**नू च पुरा च सदनं रयीणां जातस्य च जायमानस्य च क्षाम् ।**
**सतश्च गोपां भवतश्च भूरेर्देवा अग्निं धारयन्द्रविणोदाम् ॥ ७ ॥**

नु । च । पुरा । च । सदनम् । रयीणाम् । जातस्य । च । जायमानस्य । च । क्षाम् ।

सतः । च । गोपाम् । भवतः । च । भूरेः । देवाः । अग्निम् । धारयन् । द्रविणःऽदाम् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. [ अग्निः ] रायो बुध्नः ( =धनस्य मूलं ) वसूनां संगमनः ( =द्रव्याणां संगमनस्थानं ) यज्ञस्य केतुः ( =प्रज्ञापको ध्वजस्थानीयः) [ अपि च ] वेर्मन्मसाधनः ( =उपासकजनस्येष्टसाधको ) [ भवति ] । अमृतत्वं रक्षमाणासः ( =अमरत्वं रक्षमाणाः=" स्वकीयामरणत्वं...पालयन्तो " ) देवाः ( =इन्द्रादय ) एनमग्निं द्रविणोदां ( =धनस्य दातारं ) धारयन् ( =अस्थापयन्=अकुर्वन् ) ॥

७. नू च पुरा च ( =इदानींतनकाले पुरातनकाले च ) रयीणां सदनं ( =धनानां गृहं=गृहभूतं ) जातस्य च जायमानस्य च क्षाम् (=पुराजातानां वस्तूनां तथैव इदानीमुत्पद्यमानानां वस्तूनां निवासस्थानं=निवासस्थानभूतं ) सतश्च भवतश्च भूरेः (=नित्यमेव वर्तमानस्य प्रभूतस्य वस्तुजातस्य तथा कालवशात्कदैव उत्पद्यमानस्य प्रभूतस्य पदार्थजातस्य ) गोपां ( =रक्षकम् ) अग्निं देवाः ( =इन्द्रादयो ) द्रविणोदां ( =धनस्य दातारं ) धारयन् ( =अकुर्वन् ) ॥

६. [ आणि हा ] धनाचें मूळ [ होय ], संपत्तींचें भांडार, यज्ञाचा ध्वज [ आणि ] भाविक उपासकाची मनकामना सिद्ध करणारा [ होय ]. अमरत्वाचें संरक्षण करण्याकरितां या अग्नीला देव द्रव्यदाता करिते झाले.

६. [He is] the source of wealth, the store of blessings, the banner of sacrifice, the accomplisher of the pious man's desires. Preservers of immortality, the Gods appointed this Agni GIVER OF WEALTH.

७. [ जो ] सकळ धनांचें सांप्रतकाळीं आणि पुरातनकाळींहि घर [ होय ], [ जो ] होऊन गेलेल्या [पदार्थां]चें आणि [जो] उत्पन्न होत आहेत अशा [पदार्थां]चें माहेर [होय], [जो] असंख्य नित्य [पदार्थां]चा आणि [वारंवार] उत्पन्न होत असलेल्या [पदार्थां]चा पाळण करणारा [होय] [त्या] अग्नीला देव द्रव्यदाता करिते झाले.

7. [ Agni ] the home of all riches now and before, the abode of that which has been and of that which is, the preserver of all that is eternal and all that is produced—[ that ] Agni the Gods appointed GIVER OF WEALTH.

---

६. यांत अग्नीचा आणखी महिमा वर्णिला आहे. ' तो सकळ संपत्तीचें आश्रयस्थान, सकळ धनांचें भांडार, यज्ञाची पताका आणि यज्ञ करणाऱ्या भाविक मनुष्याचें इच्छिलेलें देणारा असा होय. तर आपलें अमरत्व संरक्षण करण्यासाठीं देवांनीं त्या अग्नीला द्रव्यदाता करून ठेविलें.'

' यज्ञाचा ध्वज '=' यज्ञस्य केतुम्.' म्हणजे जेथें जेथें यज्ञ होणार असेल तेथें तेथें असणारा. आणि हें खरेंच आहे कीं अग्नीशिवाय यज्ञ होणार नाहीं, कारण कीं बहुतकरून यज्ञांत हवि अर्पण करणें तें अग्नीच्याच ठायीं करीत असतात.

' भाविक उपासकाची '=' वेः.' या सायणांनीं केलेल्या अर्थाला निर्विवाद प्रयोगान्तरांची बळकटी असल्याप्रमाणें दिसत नाहीं, पण दुसरा निर्वाह नाहीं, व अर्थहि संभवतो खरा.

' अमरत्वाचें संरक्षण करण्याकरितां '=' अमृतत्वं रक्षमाणासः.' अक्षरशः

द्र॒वि॒णो॒दा द्रवि॑णसस्तु॒रस्य॑ द्रविणो॒दाः सन॑रस्य॒ प्र यं॑सत् ।
द्र॒वि॒णो॒दा वी॒रव॑ती॒मिषं॑ नो द्रविणो॒दा रा॑सते दी॒र्घमायुः॑ ॥ ८ ॥

द्र॒वि॒णः॒ऽदाः । द्रवि॑णसः । तु॒रस्य॑ । द्र॒वि॒णः॒ऽदाः । सन॑रस्य । प्र । यं॒स॒त् ।
द्र॒वि॒णः॒ऽदाः । वी॒रऽव॑तीम् । इष॑म् । नः॒ । द्र॒वि॒णः॒ऽदाः । रा॒स॒ते॒ । दी॒र्घम् । आयुः॑ ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. द्रविणोदाः (=द्रव्यस्य दाता=एतन्नामाग्निः) तुरस्य द्रविणसः (=चलतो धनस्य) [एकदेशं] [नः=अस्मभ्यं] [प्र यंसत्=प्रयच्छतु]। द्रविणोदाः सनरस्य (="सननीयस्य संभजनीयस्य स्थावररूपस्य धनस्य") [भागं] [नः=अस्मभ्यं] प्र यंसत् (=प्रयच्छतु)। द्रविणोदाः वीरवतीम् इषं (=शूरपुत्रपौत्रादिभिर्युताम् अन्नादिसंपदं) नः (=अस्मभ्यं) [रासते=ददातु] द्रविणोदा दीर्घम् आयुर् [नः=अस्मभ्यं] रासते (=प्रयच्छतु)॥

अर्थ, 'अमरत्व राखणारे असे जे ते.' सायणाचार्य 'आपलें अमरत्व' (म्हणजे देवांचें) असा अर्थ समजतात. पण आपलें अमरत्व राखण्यासाठीं अग्नीला 'द्रविणोदा' केला म्हणजे काय? अग्नीनें द्रव्य दिलें म्हणजे लोक यज्ञ करितील, आणि लोक यज्ञ करितील तोंपर्यंत देवांचें अमरत्व राहतें, यास्तव देवांनीं अग्नीला 'द्रविणोदा' करून ठेविलें अशी ओढाताण करावयाची कीं काय? दुसरा भावार्थ तर कांहीं दिसत नाहीं.

७. आणखी दुसऱ्या रीतीनें अग्नीचें स्वरूप यांत वर्णिलें आहे. 'ज्या ज्या चांगल्या वस्तु या जगांत पूर्वीं होऊन गेल्या आणि ज्या आतां आहेत त्या सर्व अग्नीच्या हातीं आहेत. जे जे पदार्थ आजपर्यंत असंख्य युगेंपर्यंत होऊन गेले आणि जे आतां होत आहेत त्यांचें तो माहेर आहे. आणि काळ, अवकाश, प्रकाश इत्यादिक जे नित्य पदार्थ आणि वृक्ष, मनुष्यें, नद्या इत्यादिक पुनः पुनः उत्पन्न होणारे पदार्थ त्यांचें आश्रयस्थान आणि संरक्षणाचें साधन अग्नि होय. तर त्या ह्या अग्नीला देवांनीं द्रव्यदाता केलें.'

हें जें अग्नीचें स्वरूप येथें सांगितलें तें केवळ भौतिक अग्नीचें स्वरूप नव्हे. अग्निशब्दाचा मूळ अर्थ आग असा जरी होतो आणि त्याच्या दैविक वृत्तांत जरी

८. द्रव्यदाता [ अग्नि ] जंगम संपत्ति देओ, द्रव्यदाता [ अग्नि ] स्थावर संपत्ति देओ. द्रव्यदाता [ अग्नि ] आम्हांस शूर संततीनें भरलेली अशी संपत्ति देओ. द्रव्यदाता [ अग्नि ] आम्हांस दीर्घ आयुष्य देओ.

8. May Agni the Giver of Wealth give moveable wealth, may the Giver of Wealth give wealth immoveable; may the Giver of Wealth grant us affluence accompanied by brave progeny, may the Giver of Wealth grant us long life.

---

त्याच्या प्रसिद्ध भौतिक स्वरूपाचा समावेश आहे आणि अग्नीचें भौतिकत्व त्यांत जणुं जागरूक असतें, तथापि खऱ्या परमेश्वराचे गुण आर्य लोकांस अवगत होते आणि ते गुण आपल्या वेगवेगळ्या दैवतांच्या आंगीं अंशतः अथवा पूर्णपणें ( कसें जसें असेल त्याप्रमाणें ) आहेत असें ते समजत असत इतकें उघड आहे.

---

८. हा उपसंहाराजवळचा मंत्र आहे त्यामुळें ऋषीनें येथेंच अभीष्ट प्रार्थण्यास आरंभ केला आहे. तो म्हणतोः—'हा जो द्रव्यदाता अग्नि मी येथपर्यंत आपल्या सूक्तांत वर्णिला तो आम्हांला जंगम आणि स्थावर हीं धनें देओ. तो आम्हांला अन्न देओ आणि शौर्यगुणानें परिपूर्ण असे पुत्रपौत्रादिक वंशज देओ. आणि तो आम्हांला दीर्घायुष्य देओ.'

'स्थावर संपत्ति'=' सनरस्य.' हा अर्थ सायणानुसार आहे. 'सनर' शब्द आणखी दुसरे ठिकाणीं आलेला आढळत नाहीं त्यामुळें प्रत्यंतर पाहण्यास मार्ग नाहीं. सायणांनीं केलेला अर्थ संदर्भाला इष्ट आहे यांत मात्र संशय नाहीं.

या सूक्ताचा विवाहाच्या कामीं प्रयोग करितात असें पुढें ( नवव्या ऋचेवरील टीप पहा ) सांगितलें आहे. त्याशिवाय या आठव्या मंत्राचा उच्चार लग्नाच्या वेळीं आयुर्मंत्र म्हणून जे म्हणतात त्यांत करीत असतात, कारण यांत 'दीर्घमायुः' हे शब्द शेवटीं आले आहेत. सू.९२,मं.१०याजवरील आमची टीप पहा. या मंत्राविषयीं इतकें म्हटलें पाहिजे कीं आयुर्वर्धनासाठीं ९२व्या सूक्ताच्या १०व्या मंत्रापेक्षां याची अर्थसंबंधानें सार्थता अधिक आहे.

यांत जो कुत्सानें वर मागितला आहे त्यांत शूर पुत्रपौत्र मागितले आहेत. त्याजविषयीं असा विचार सुचतो कीं, पूर्वींचे मोठे मोठे ऋषि जर तप करण्यांत, दक्षिणा घेण्यांत, योगसाधन करण्यांत सर्व आयुष्य घालविणारे, आपलें राज्य संभाळण्याचा सर्व भार क्षत्रियांवर टाकून आपण स्वस्थ बसण्याचा आपला ब्राह्मणांचा धर्म आहे असें मानणारे असते, अथवा क्षत्रियांचा द्वेष करणारे असते तर "अग्नि आम्हांला शूर पुत्रपौत्रादिक संतति देओ" अशी त्यांनीं कां प्रार्थना केली असती ?

एवा नो अग्ने समिधा वृधानो रेवत्पावक श्रवसे वि भाहि ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः
॥ ९ ॥ ४ ॥

एव । नः । अग्ने । सम्ऽइधा । वृधानः । रेवत् । पावक । श्रवसे ।
वि । भाहि ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ९ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

९. एव (=एवम्=अनेन प्रकारेण) हे अग्ने, समिधा वृधानः (=समिद्भिः प्रवृद्धः=अस्माभिर्दत्ताभिः समिद्भिः प्रदीप्तः सन्), हे पावक (=शोधक), [त्वं] नः रेवत् श्रवसे वि भाहि (=अस्मदर्थं धनयुक्तं यथा स्यात्तथा अन्नलाभाय च=अस्माकं धनलाभो यथा स्यादन्नलाभश्च यथा स्यात्तथा प्रकाशस्व) । तत् (=एतच्च) मित्रः, वरुणः, अदितिः (=एतन्नाम्नी देवानां माता), सिन्धुः (समुद्राभिमानिनी देवता) पृथिवी उत द्यौः (=पृथिवी द्युलोकश्च) [इत्येते] नः मामहन्ताम् (=अस्मभ्यम्=अस्मदर्थं पूजयन्तु=ददतु) ॥

---

## सूक्तम् ९७.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । 'अग्निः शुचिः' शुद्धो वाग्निर्देवता । गायत्री च्छन्दः ।

अप नः शोशुचदघमग्ने शुशुग्ध्या रयिम् ।
अप नः शोशुचदघम् ॥ १ ॥

अप । नः । शोशुचत् । अघम् । अग्ने । शुशुग्धि । आ । रयिम् ।
अप । नः । शोशुचत् । अघम् ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

१. [अग्निः] नः (=अस्माकम्) अघं (=पापं=दरिद्रत्वम्) अप शोशुचत् (=अतिशयेन प्रकाश्य अपगमयतु) । —हे अग्ने,[शोचिषा दरिद्रत्वस्यापनयनानन्तरं] रयिम् आ शुशुग्धि (=संपदं तव शोचिषा द्वारा आनय) । [अग्निः] नः (=अस्माकम्) अघ (=पापं=दरिद्रत्वम्) अप शोशुचत् (=अतिशयेन प्रकाश्य अपगमयतु)॥

९. या प्रकारेंकरून हे अग्नी, हे पावका, [आमच्या] समिधांनीं प्रदीप्त झालेला [तूं] प्रकाश, आणि आम्हांला वैभव आणि संपत्ति प्राप्त करून दे. आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू आम्हांला देओत.

9. Thus fed with fuel mayest thou, O Agni, O Purifier, shine upon prosperity and wealth unto us. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

९. हा मंत्र पूर्वीं आलेलाच आहे. ९ व्या सूक्ताचा अकरावा जो मंत्र तोच हा येथें पुनः आलेला आहे. यास्तव टीपाकरितां गेल्या सूक्ताचा शेवटचा मंत्र पहा.

हें सर्व सूक्त लग्नांत म्हणत असतात, परंतु ह्यांत लग्नाच्या संबंधाचा अर्थ कांहीं नाहीं. पुढचें सूक्त गर्भाधानांत म्हणत असतात. परंतु हीं जीं सूक्तें निरनिराळ्या कर्मांच्या संबंधानें म्हणत असतात त्यांचा संबंध त्यांशीं नसतो, आणि केव्हां केव्हां तर करीत असलेल्या कर्माच्या अगदीं विरुद्ध असतो असेंहि होत असतें.

## सूक्त ९७.

ऋषि **अङ्गिरस्**कुळांतील **कुत्स** या नांवाचा (पूर्वसूक्ताचा जो तोच). देवता—**अग्नि शुचि** (म्हणजे, '**प्रकाशून शुद्ध करणारा अग्नि**') अथवा नुसता **अग्निच**. वृत्त—**गायत्री**.

## HYMN 97.

To *Agni S'uchi* (i.e. *Agni* that purifies, or enlightens with his light), or To *Agni* simply. By *Kutsa* of the family of *Angiras* (author of the previous hymn). Metre—*Gâyatrî.*

१. [अग्नि] प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें करो.—हे अग्नी, [तूं] प्रकाशून [आम्हांला] धन घेऊन ये.—[अग्नि] प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें करो.

1. May he shine our poverty away.—Bring O Agni, wealth unto us as thou shinest.—May he shine our poverty away.

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीचेंच आहे. आणि अग्नीच्या संबंधानें 'शुच्' धातूचीं पुष्कळ रूपें या सूक्तांत आलीं असल्यामुळें या सूक्ताची देवता 'शुचि' अग्नि

**सुक्षेत्रिया सुगातुया वसूया च यजामहे ।**
**अप नः शोशुचदघम् ॥ २ ॥**

सुऽक्षेत्रिया । सुगातुऽया । वसुऽया । च । यजामहे ।
अप । नः । शोशुचत् । अघम् ॥ २ ॥

**प्र यद्भन्दिष्ठ एषां प्रास्माकासश्च सूरयः ।**
**अप नः शोशुचदघम् ॥ ३ ॥**

प्र । यत् । भन्दिष्ठः । एषाम् । प्र । अस्माकासः । च । सूरयः ।
अप । नः । शोशुचत् । अघम् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. सुक्षेत्रिया (=सुक्षेत्राणामिच्छया) सुगातुया (=शोभनस्य मार्गस्य=कल्याणस्येच्छया) वसुया च (=शोभनधनस्येच्छया च) [वयम् अग्नि] यजामहे (=भजामहे)। [तस्मात्] [अग्निः] नः (=अस्माकम्) अघं (=पापं=दारिद्र्यम्) अप शोशुचत् (=अतिशयेन प्रकाश्य अपगमयतु)॥

३. यद् (=यस्मात् कारणात्) [अयं कुत्सः] एषां [जनानां मध्ये] भन्दिष्ठः (=स्तोतृतमः) अस्माकासश्च (=अस्माकाश्च=अस्मदीयाश्च) सूरयः (=स्तोतारः=स्तोतृतमा) [भवन्ति] [तस्माद्] [अग्निः] नः (=अस्माकम्) अघं (=पापं=दारिद्र्यम्) अप शोशुचत् (=अतिशयेन प्रकाश्य अपगमयतु)॥

म्हणजे 'तेजानें शुद्ध करणारा अग्नि' होय, असें समजतात. परंतु नुस्ता 'अग्निच' या सूक्ताची देवता म्हटल्यास चालेल असेंहि मत आहे.

या पहिल्या मंत्रांत ऋषि म्हणतो, 'अग्नि प्रकाशो आणि आपल्या प्रकाशानें आमचें दारिद्र्य नाहींसें करून टाको.' ही ऋचा अग्नीविषयीं वर्णन करणारी नसतां एकादा आशीर्वाद करावा अथवा शाप उच्चारावा आणि एक वाक्यांत वेगवेगळा संबंध असावा त्याप्रमाणें आहे.

'प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें करो'='अप नः शोशुचद् अघम्.' अक्षरशः अर्थ 'आमचें दारिद्र्य प्रकाशून टाको,' म्हणजे प्रकाशो, आणि अशा रीतीनें प्रकाशो कीं आमचें आयुष्य नाहींसें होईल, असा भावार्थ आहे. 'प्रकाशून धन घेऊन ये'='शुशुग्धि आ रयिम्.' याविषयीं तरी तसेंच आहे.

हें सूक्त गर्भाधानांत म्हणत असतात. शेवटच्या मंत्रावरील टीपा पहा.

२. उत्तम शेतें मिळण्याच्या इच्छेनें, चांगली गति व्हावी या इच्छेनें, आणि उत्तम धन मिळावें या इच्छेनें [ आम्ही ] [ अग्नीला ] भजत आहों. तर [ अग्नि ] प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें करो.

३. ज्यापेक्षां या [ लोकां]त [ हा जन ] अतिशय भाविक [आहे ] आणि आमचे [ हे ] उपासकहि [ अतिशय भाविक आहेत ], [ त्यापेक्षां ] [ अग्नि ] प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें करो.

2. With the desire for good fields, with the desire for good prosperity and with the desire for good wealth we worship [ Agni ]. May he shine our poverty away.

3. Since [ this worshipper ] [ is ] the best praiser and [since] our worshippers [are the best praisers], may he shine our poverty away.

---

२. या मंत्राविषयीं विशेष सांगण्यासारिखें कांहीं नाहीं. पुरातन ऋषि कसे होते, ते उपास्य देवतांजवळ काय काय मागत असत आणि संसारांत सुख देणाऱ्या ज्या शेतें भातें, द्रव्य, गुरें ढोरें इत्यादि वस्तु त्यांविषयीं ते कशी प्रार्थना करीत त्याचा मात्र विचार करण्यासारिखा आहे.

'चांगली गति व्हावी या इच्छेनें '= 'सुगातुया.' अक्षरशः अर्थ, चांगल्या मार्गाच्या इच्छेनें. परंतु 'गातु' शब्दाचा अर्थ कल्याण, परिणामीं होणारें सुख असाहि होत असतो.

'तर अग्नि प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें करो '='अप नः शोशुचदघम्.' हा तिसरा चरण पालवपदाप्रमाणें येईल. सूक्ताचे शेवटपर्यंत हेंच पालवपद आहे.

३. ऋषि म्हणतो, 'हे अग्नी, हे जे अनेक लोक तुला भजत आहेत त्यांत मी तुझें स्तोत्र अतिशय प्रेमानें करीत आहें आणि मजबरोबरचे दुसरे स्तोतेहि तुझी स्तुति उत्तम रीतीनें करीत आहेत. त्यापेक्षां तूं मोठा प्रकाश पाडून आमचें दारिद्र्य नष्ट कर.'

'या लोकांत [ हा जन ]'. हा अर्थ केवळ 'एषाम्' इतकें पद आहे तितक्यावरून सायणानुसारें केला आहे. 'हा जन' म्हणजे मी कुत्स असें ते म्हणतात तसेंच समजलें पाहिजे असें वाटतें. परंतु 'हे लोक' ते कोण? जवळ उभे असलेले तर नसतील? तर या जगांत जे अग्नीचे भक्त असतील ते. असा अर्थ इष्ट असावा.

'हे आमचे उपासकहि '=' अस्माकासः सूरयः.' जे कुत्साबरोबरचे दुसरे

प्र यत्ते॑ अग्ने सू॒रयो॒ जाये॑महि॒ प्र ते॑ व॒यम् ।
अप॑ नः॒ शोशु॑चद॒घम् ॥ ४ ॥

प्र । यत् । ते॒ । अ॒ग्ने॒ । सू॒रयः॑ । जाये॑महि । प्र । ते॒ । व॒यम् ।
अप॑ । नः॒ । शोशु॑चत् । अ॒घम् ॥ ४ ॥

प्र यद॒ग्नेः सह॑स्वतो वि॒श्वतो॒ यन्ति॑ भा॒नवः॑ ।
अप॑ नः॒ शोशु॑चद॒घम् ॥ ५ ॥

प्र । यत् । अ॒ग्नेः । सह॑स्वतः । वि॒श्वतः॑ । यन्ति॑ । भा॒नवः॑ ।
अप॑ । नः॒ । शोशु॑चत् । अ॒घम् ॥ ५ ॥

## भाषायाम्.

४. हे अग्ने, यद् [ वयं ] ते सूरयः प्र [ जायेमहि ] (=तव स्तोतृत्वेन जाताः स्मः ), ते [ सूरयो ] वयं प्र जायेमहि (=वयं तवोपासका जाताः स्मः ). [ तस्मात् ] [ भवान् ] नः ( =अस्माकम् ) अघं ( =पापं=दारिद्र्यम् ) अप शोशुचत् ( =अतिशयेन प्रकाश्य अपगमयतु ) ॥

५. यद् (=यस्मात् कारणात्) सहस्वतः (=शत्रूनभिभवतः=विजयिनः) अग्नेर्भानवः ( =तेजांसि ) विश्वतः ( =सर्वस्मादपि प्रदेशात् ) प्र यन्ति ( =प्रगच्छन्ति=प्रसार्यन्ते ) [ तस्मात् ] [ स ] नः ( =अस्माकम् ) अघं ( =पापं=दारिद्र्यम् ) अप शोशुचत् ( =अतिशयेन प्रकाश्य अपगमयतु ) ॥

लोक उभे असतील ते असें वाटतें. अथवा हें सूक्त कुत्स दुसऱ्या एकाद्या यजमानासाठीं रचून म्हणत असेल तर तो यजमान आणि त्याचे इष्टमित्र इत्यादि असा अर्थ होईल.

वृत्तसुखार्थ पहिला चरण 'प्र यद् भन्दिष्ठ एषआम्' असा म्हटला पाहिजे.

४. हे अग्नी, ज्यापेक्षां [आम्ही] तुझे उपासक [जन्मलों आहों], तुझे [उपासक] आम्ही जन्मलों आहों, [त्यापेक्षां] [तूं] प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें कर.

५. ज्यापेक्षां विजयी अग्नीच्या प्रभा सर्व दिशांहून फांकत आहेत, [त्यापेक्षां] [अग्नि] प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें करो.

4. Since we are born thy sacrificers–born, O Agni, thy sacrificers, mayest thou shine our poverty away.

5. Since the rays of victorious Agni expand from all sides, may he shine our poverty away.

---

४. अग्नीनें आपलें दारिद्र्य कां नष्ट करावें याला आणखी हेतु सांगतो. 'हे अग्नी, ज्यापेक्षां आम्ही आमच्या जन्मापासूनच तुझे भक्त निपजलों आहों, आमच्या जन्मापूर्वींच आमचे वाडवडीलहि तुझेच भक्त होते, दुसऱ्या देवाचे नव्हते, त्यापेक्षां तूं आज प्रगट आणि आमचें दारिद्र्य नष्ट कर.'

'प्रकाशून......नाहींसें कर'=' अप शोशुचत्.' यांत 'अप शोशुचत्' हें क्रियापद तृतीयपुरुषीं आहे, आणि इतर सगळा मंत्र अग्नीला संबोधून म्हटलेला आहे. पण 'अप नः शोशुचदघम्' हें केवळ पालवपद असून तें प्रत्येक मंत्रांत येतें, आणि प्रत्येक मंत्रांत त्याचा व्याकरणतः आणि अर्थतः संबंध सर्व अंशीं मिळेल असें नाहीं. त्यामुळें या पुरुषव्यत्ययांत नवल नाहीं. शिवाय पालवपद नसतांहि पुष्कळ ठिकाणीं असे पुरुषव्यत्यय वेदांत येत असतात.

५. यांत अग्नीला शपथ घातल्यासारिखी आहे. हें सगळें सूक्तच तसल्या शपथांचें आहे. प्रत्येक मंत्रांत अग्नीला आमचें दारिद्र्य नाहींसें करावें याविषयीं एक एक शपथ आहे. या मंत्रांतील शपथ अशी आहे कीं, 'महाप्रबळ अग्नि जर आपल्या प्रकाशानें सर्व ठिकाणाहून प्रकाशत असेल तर तो आमचें दारिद्र्य नाहींसें करो.' कांहीं तरी अनिष्ट प्राप्त झालें म्हणजे तें निवारण व्हावें म्हणून पांडवप्रतापादिक प्राकृत ग्रंथांत स्त्रियांचा आलाप असला म्हणजे अशा प्रकारचाच असतो. पांडवप्रतापांतील सावित्रीच्या आख्यानांत सावित्रीनें आपला नवरा पुनः जीवंत व्हावा या उद्देशानें केलेली प्रार्थना पहा.

त्वं हि विश्वतोमुख विश्वतः परिभूरसि ।
अप नः शोशुचदघम् ॥ ६ ॥

त्वम् । हि । विश्वतःऽमुख । विश्वतः । परिऽभूः । असि ।
अप । नः । शोशुचत् । अघम् ॥ ६ ॥

द्विषो नो विश्वतोमुखाति नावेव पारय ।
अप नः शोशुचदघम् ॥ ७ ॥

द्विषः । नः । विश्वतःऽमुख । अति । नावाऽइव । पारय ।
अप । नः । शोशुचत् । अघम् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. हि (=यस्मात् कारणात् ) हे विश्वतोमुख ( =सर्वतो ज्वालारूपमुख ), त्वं विश्वतः परिभूः असि ( =त्वं सर्वस्मादपि प्रदेशात् प्रग्रहीता=प्रगृह्य संरक्षिता भवसि ) ।—[ अग्निः ] नः ( =अस्माकम् ) अघं ( =पापं=दारिद्र्यम् ) अप शोशुचत् ( =अतिशयेन प्रकाश्य अपगमयतु ) ॥

७. हे विश्वतोमुख ( =सर्वतोमुख ) [ अग्ने ], [ त्वं ] नावेव ( =नावा नदीमिव ) नः ( =अस्मान् ) द्विषः अति पारय ( =शत्रून् अतिक्रम्य पारय=शत्रुरहितं प्रदेशं नय) ।—[ अग्निः ] नः ( =अस्माकम् ) अघं (=पापं=दारिद्र्यम् ) अप शोशुचत् ( =अतिशयेन प्रकाश्य अपगमयतु ) ॥

६. कारण कीं हे अग्नी, हे सर्वतोमुख [अग्नी], तूं चहूंकडून संरक्षण करणारा होस. [त्यापेक्षां] [तूं] प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें कर.

६. For thou, [O Agni], O God who hast a face on every side, dost preserve [thy servants] on all sides. Mayest thou shine our poverty away.

७. हे सर्वतोमुख [अग्नी], [तूं] आम्हांस नावेनें [पार पाडिल्या]प्रमाणें शत्रूंच्या पार पाड. [तूं] प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें कर.

7. Mayest thou, O God who hast a face on every side, take us across our enemies as in a boat. Mayest thou shine our poverty away.

---

६. यांत आणखी एक शपथ आहे. 'हे अग्नी, तुला सर्व बाजूंनीं तोंडें आहेत आणि तूं सर्व बाजूंला पहातोस आणि सर्व बाजूंकडून सेवकांचें रक्षण करितोस असें म्हणतात, हें जर खरें असेल तर तूं प्रकाशून आमचें दारिद्र्य नष्ट होई असें कर.'

'सर्वतोमुख'=' विश्वतोमुख.' म्हणजे अग्नीला चहूंकडून दिसतें, आमच्या सारखें एकीकडेसच दिसतें असें नाहीं. अग्नीला हें विशेषण उत्तम शोभतें यांत संशय नाहीं.

'नाहींसें कर'=' अप शोशुचत्.' वर ४ थ्या मंत्रावरची टीप पहा.

७. यांतहि एक आणखी शपथ आहे. ती हीः—'हे अग्नी, तूं सर्वतोमुख आहेस; म्हणजे तुला प्रत्येक बाजूला एक एक तोंड आहे. हें जर खरें असेल तर तूं आम्हांस आमच्या शत्रूंपासून तार आणि आमचें दारिद्र्य नाहींसें कर.'

' नावेनें [पार पाडिल्या]प्रमाणें शत्रूंच्या पार पाड '=' नावेव द्विषः अति पारय.' असा जरी अक्षरशः अर्थ आहे तरी नावेच्या योगानें जसे कोणी तरी नदीच्या पार पडतात, तसे आम्ही तुझ्या योगानें शत्रूंच्या पार पडूं असें कर असें विवक्षित आहे. याप्रमाणें पाहिलें म्हणजे ' नौरिव ' असा पाठ असावा. पण वृत्तसुखासाठीं आणि अग्नीच्या आंगीं नावेपेक्षां अधिक सचेतनत्व दर्शविण्याकरितां ' नावेव ' असा प्रयोग घातला आहे असें आम्हांस वाटतें.

स नः सिन्धुमिव नावयाति पर्षा स्वस्तये ।
अप नः शोशुचदघम् ॥ ८ ॥ ५ ॥

सः । नः । सिन्धुम्ऽइव । नावया । अति । पर्ष । स्वस्तये ।
अप । नः । शोशुचत् । अघम् ॥ ८ ॥ ९ ॥

## भाषायाम्.

८. स [ त्वं ] [ हे अग्ने ], नावया सिन्धुमिव (=नावा यथा कंचित् ) सिन्धुं ( =समुद्रम् ) [ अतिपारयन्ति ] [ तथा ] नः स्वस्तये अति पर्ष ( =अस्मान् अतिपारय=शत्र्वादिरहितं प्रदेशं कल्याणाय नय ) ।—[ अग्निः ] नः ( =अस्माकम् ) अघं ( =पापं=दारिद्र्यम् ) अप शोशुचत् ( =अतिशयेन प्रकाश्य अपगमयतु ) ॥

८. तर [ हे अग्नी ], नावेनें समुद्राच्या [ पार पाडिल्या]प्रमाणें [ तूं ] आम्हांला पार पाडून [आमचें ] कल्याण कर. [तूं] प्रकाशून आमचें दारिद्र्य नाहींसें कर.

8. Do thou therefore, [ Agni ], take us across for [ our ] good as in a boat across the sea. Mayest thou shine our poverty away.

८. हा या सूक्ताचा येथें उपसंहार आहे. यांत ऋषीनें शेवटची प्रार्थना केली आहे. ' हे अग्नी, या प्रकारें तुझी आम्हीं स्तुति केली आहे. तर तूं आम्हांला तारवांत बसून समुद्रापलिकडे गेल्याप्रमाणें तुझ्या साहाय्यानें शत्रु, रोग इत्यादि जे उपद्रव त्यांचे पार जाण्याचें सामर्थ्य दे आणि आमचें कल्याण कर, आणि आमचें दारिद्र्य नाहींसें कर.'

' सिन्धु ' शब्दाचा अर्थ ' समुद्र ' असाहि आहे आणि 'नदी' असाहि आहे. त्यापेक्षां नदीच्या पार असा जरी अर्थ केला, तरी नावेंत बसून जाणें निंद्य आहे असें कुत्स ऋषि मानीत नाहीं हें उघड होतें.

या सूक्ताचा प्रयोग गर्भाधानांत करितात म्हणून सूक्तारंभीं सांगितलें आहे. तो असाः—गर्भाधानांतील 'आज्यहोम ' म्हणजे तुपाचा होम झाल्यावर नवऱ्यानें पत्नीच्या डोकीला हात लावून ( "पत्न्या मूर्धाभिमर्शन" करून) या सूक्ताचे आठहि मंत्र म्हणावे. हें सूक्त म्हणण्याची जी ही चाल पडली आहे ती " अप नः शोशुचदघम् " हे आशीर्वादगर्भ शब्द त्यांत आहेत म्हणून पडली आहे यांत संशय नाहीं. आपण जे आतां संस्कार करीत असतों त्यांत योजण्यांत येतात त्या मंत्रांची त्या त्या प्रसंगांला अनुसरून इतकी जरी योग्यार्थता असती तरी पुरे असती. परंतु बहुतेक मंत्रांविषयीं तसें म्हणवत नाहीं.

आणि दुसरें या सूक्ताविषयीं असें सांगावयाचें कीं, शोकाचा, दुःखाचा आणि अपवित्रतेचा कांहीं तरी प्रसंग पडला तर या सूक्ताचा जप करण्याची चाल फार दिवसांपासून पडली असावी असें वाटतें. तें सायणांनीं या सूक्ताची उत्पत्ति कशी झाली याविषयीं जी कथा सांगितली आहे तिजवरून दिसून येतें. कथा हीः—

" दीर्घजिह्वी या नांवाची राक्षसी
" सकळ यज्ञांस उपद्रव करूं लागली.
" तिला मारण्याचें सामर्थ्य इंद्राला
" नसल्यावरून त्याणें कुत्स हा सकळांचा
" मित्र असल्यामुळें त्यास म्हटलें, तूं हिला
" मार. मग त्याणें तिला मारिलें. तेव्हां
" कुत्साला वाग्रूप देवता म्हणाली, त्वां
" केलें हें अनुचित होय, कां कीं तूं आ-
" पणास सकळांचा मित्र म्हणवितोस.
" त्यावरून त्या ऋषीला शोक प्राप्त झा-

## सूक्तम् ९८.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । वैश्वानरगुणकोऽग्निः शुद्धाग्निर्वा देवता । त्रिष्टुप् छन्दः ।

**वैश्वानरस्य सुमतौ स्याम राजा हि कं भुवनानामभिश्रीः ।**
**इतो जातो विश्वमिदं वि चष्टे वैश्वानरो यतते सूर्येण ॥ १ ॥**

वैश्वानरस्य । सुऽमतौ । स्याम । राजा । हि । कम् । भुवनानाम् । अभिऽश्रीः ।
इतः । जातः । विश्वम् । इदम् । वि । चष्टे । वैश्वानरः । यतते । सूर्येण ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [ वयं ] वैश्वानरस्य ( =वैश्वानरगुणोपेतस्य वैश्वानर इत्युक्तस्य ) [ अग्नेः ] सुमतौ स्याम ( =अनुग्रहात्मिकायां सुबुद्ध्यां भवेम=वयं तस्यानुग्रहाय पात्रभूता भवेम )। [ स ] हि कं ( =स खलु ) भुवनानां ( =सकलानां भूतानाम् ) अभिश्रीः ( =अभिश्रयणीयभूतः=आश्रयभूतो ) राजा [ भवति ]। [ स ] इतो जातः (=द्यावापृथिवीरूपयोररण्योः सकाशाद् उषोरूपेण जायमान एव ) विश्वमिदं वि चष्टे ( =सकलमिदं जगत् पश्यति=उषोरूपेण सूर्यरूपेण वा अवेक्षते)। वैश्वानरो [ हि ] सूर्येण यतते ( =सूर्येण साकं संयतते=संगच्छते=संगतो भवति तस्मात् कारणात् सर्वमपि जगत् जायमान एव पश्यति ) ॥

---

" ला. तो शोक घालविण्यासाठीं म्हणून " हें अग्नीचें स्तोत्र कुत्स ऋषीनें रचून " म्हटलें, आणि त्यामुळें त्याचा शोकहि " गेला."

शोक घालविण्याच्या प्रसंगीं हें सूक्त म्हणण्याचा संप्रदाय असल्यामुळें तो संप्रदाय कसा पडला हें दाखविण्याकरितां ही वरची कथा प्रवृत्त झाली असावी हें उघडच आहे.

## सूक्त ९८.

ऋषि—अङ्गिरसकुळांतील **कुत्स** नांवाचा (पूर्वीच्या सूक्ताचा जो तोच). देवता—**वैश्वानर अग्नि** (म्हणजे त्रिभुवनांतील जें सकळ तेज तद्रूप **अग्नि,** कीं ज्याविषयीं सू. ५९, मं. ६, ७ याजवरील टीपेंत सांगितलें आहे तो **अग्नि**), अथवा नुस्ताच **अग्नि**. वृत्त—**त्रिष्टुभ्.**

१. आपण वैश्वानर [अग्नी]च्या कृपेंत राहूं असें होओ. कां कीं [तो] सर्व भूतांचा आश्रयदाता राजा [होय]. [तो] या [अरणी]पासून उत्पन्न होतांच हें सकळ [जग] अवलोकन करितो. वैश्वानर [अग्नि] सूर्याला जाऊन मिळतो.

## HYMN 98.

To *Agni Vais'vânara* (i.e. *Agni* so called, *Agni* of the *Universe*), or to *Agni* simply. By *Kutsa* of the family of *Angiras*, (author of the previous hymn). Metre—*Trishtubh*.

On *Agni Vais'vânara* see our Marâthi commentary at Hymn 59, verses 6, 7.

1. May we be in the good graces of Vais'vânara. For he is the accessible king of all creatures. So soon as born he sees all this universe: Vais'vânara unites with the sun.

---

१. हें सूक्त वैश्वानर अग्नीविषयीं आहे. जसा जातवेदा अग्नि, द्रविणोदा अग्नि, पावक अग्नि इत्यादि अग्नीच्या विभूति आहेत त्याप्रमाणें अग्नि वैश्वानर हीहि एक विभूति आहे. अग्नि वैश्वानराविषयीं सू. ५९ याजवरील टीपेंत सांगितलें आहे, ते सगळे मंत्र पहा. पण विशेषेंकरून सहावा आणि सातवा हे मंत्र आणि त्यांजवरील टीपा पहाव्या. वैश्वानर अग्नि म्हणजे सकळ जगतांतील जें सकळ तेज तद्रूप अग्नि होय असें जें येथें सांगितलें तें योग्य आहे असें या सूक्तावरून दिसून येईल. या पहिल्या मंत्रांत ऋषि म्हणतो कीं, वैश्वानर अग्नि हा सकळ भुवनांचा प्रभु आणि त्यांला आपल्याजवळ आश्रय देणारा होय. तो सूर्यरूपानें प्रातःकाळीं उगवतो आणि हें सकळ जगत् आपल्या डोळ्यानें जन्मतांच जणुं पाहतो. तर असा जो वैश्वानर अग्नि त्याच्या कृपेंत आम्हीं नित्य राहूं असें होओ, त्याची अवकृपा आम्हांवर न होओ.'

'या [अरणी]पासून'='इतः.' ज्यांस एकमेकावर घांसून अग्नि उत्पन्न क-

पृष्टो दिवि पृष्टो अग्निः पृथिव्यां पृष्टो विश्वा ओषधीरा विवेश ।
वैश्वानरः सहसा पृष्टो अग्निः स नो दिवा स रिषः पातु नक्तम्॥२

पृष्टः । दिवि । पृष्टः । अग्निः । पृथिव्याम् । पृष्टः । विश्वाः । ओषधीः । आ । विवेश ।
वैश्वानरः । सहसा । पृष्टः । अग्निः । सः । नः । दिवा । सः । रिषः । पातु । नक्तम् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. [वैश्वानरः] अग्निः दिवि पृष्टः (=द्युलोके पृच्छाविषयः=प्रियकरो) [भवति] [स] पृथिव्यां पृष्टः (=प्रियकरो) [भवति] स पृष्टः (=प्रियकरः सन्) ओषधीः आ विवेश (=प्रविष्टवान्=प्रियः सन् वृक्षादिष्वपि वर्तते) । अग्निः पृष्टः (=प्रियकरो) वैश्वानरः सहसा [पातु] (=आत्मीयेन बलेन रक्षतु), स [वैश्वानरो] नो दिवा रिषः [पातु] (=शत्रोः सकाशाद् अस्मान् अह्नि रक्षतु) स [वैश्वानरो] [नो] रिषो नक्तं पातु (=अस्मान् शत्रुसकाशाद् रात्रौ च रक्षतु) ॥

पृष्टशब्दं सायण एवं व्याचष्टे । पृष्टः संस्पृष्टः । यद्वा निषिक्तो निहितो वर्तते...... स्पृश संस्पर्शने......यद्वा पृषु सेचने । इति ॥

रीत त्यांचें नांव 'अरणी.' त्यांचा खालचा एक तुकडा आणि वरचा एक तुकडा, अशा दोहोंस मिळून 'अरणी' हें द्विवचनान्त नांव आहे. ह्या 'अरणी' लांकडाच्या केलेल्या असत. त्या एकमेकावर ठेविल्याप्रमाणें पृथिवीवर जसा द्युलोक आहे तसा वरचा भाग वर आणि खालचा भाग खालीं पृथिवीप्रमाणें दिसतो अशी कल्पना प्राचीन कवि जन करीत, त्यामुळें अरणींसहि अग्नीचीं मातापितरें म्हणत आणि द्यावापृथिवींलाहि त्याचीं मातापितरें असें समजत. ह्याला आणखी विशेष कारण असें आहे कीं, द्यावापृथिवींच्या पोटीं अग्नि बीजांच्या रूपानें उत्पन्न होत असतोच. सांप्रतच्या मंत्रांत अशी कल्पना आहे कीं, सकाळींच जें तेज जिकडे तिकडेस फांकत असतें तें अग्नीचेंच होय, तें सूर्यांत जाऊन मिसळतें आणि त्यांत मिसळल्यावर त्या सूर्याच्या रूपानें अग्नि हें सकळ जग पाहतो.

'सूर्याला जाऊन मिळतो'= 'यतते सूर्येण.' सर्व जें कांहीं तेज होय तद्रूपच अग्नि आहे आणि सूर्याच्या किरणाशीं अग्नि जाऊन मिसळतो असें इतर मंत्रांतहि सांगितलें आहे. ऋ. ९.११९.३;५.४.४ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

२. [ वैश्वानर अग्नि ] द्युलोकांत प्रिय [ आहे ], [ वैश्वानर] अग्नि पृथिवीवर प्रिय [ आहे ]; [ तो ] सकळ वनस्पतींत प्रिय [ होऊन ] बसला आहे. प्रिय वैश्वानर अग्नि [ आपल्या ] शक्तीनें [ संरक्षो ]. तो आम्हांला दिवसाच्या वेळीं [ शत्रूपासून संरक्षो ], तो [ आम्हांला ] रात्रीच्या वेळीं शत्रूपासून संरक्षो.

2. Agni [ is ] dear in Heaven, dear on Earth, dear to [and] living in the [ bosom of all ] plants. May dear Agni Vais'vânara [ save us with his might ], [ may ] he [ save ] us [ from the enemy ] in the day, may he save [ us ] from the enemy at night.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें वृत्तानुरोधेंकरून वाचावा लागतोः–

वैश्वानरस्य सुमतौ सिआम
राजा हि कं भुवनॉनामभिश्रीः ।
इतो जॉतो विश्वमिदं वि चष्टे
वैश्वानरो यतते सूरिएण ॥

२. ऋषीनें या मंत्रांतहि अग्नि वैश्वानराचें सकळव्यापित्व वर्णून वर मागितला आहे. 'वैश्वानर अग्नि द्युलोकीं असून तेथें आवडता आहे. तो पृथिवीवरहि आहे आणि येथेंहि जनांस आवडताच आहे. तो सकळ वनस्पतींच्या पोटीं असून तेथेंहि प्रिय आहे. तर हा अग्नि वैश्वानर आम्हांला आपल्या शक्तीनें तारो, तो आम्हांला आमच्या शत्रूपासून दिवसाचा संरक्षो आणि रात्रीचाहि संरक्षो.'

'प्रिय'='पृष्टः.' हें 'प्रछ्' मागणें या धातूचें रूप आहे असें जे म्हणतात त्यांनें म्हणणें बरोबर दिसतें. अक्षरशः अर्थ 'मागितलेला,' 'प्रार्थिलेला,' 'ज्याच्याविषयीं लोक मागणें करितात तो.' सायणाचार्य 'स्पृश्' धातूचें किंवा 'पृष्' धातूचें रूप आहे म्हणतात आणि "लागलेला" अथवा "शिंपलेला–स्थापिलेला" असें भाष्य करितात. दुसऱ्या एका ठिकाणीं ( ऋ. ३. ४९. ४ यांत ) वैश्वानर अग्नीविषयींच द्युलोकाचे संबंधानें 'पृष्ट' शब्द आला आहे तेथें त्यांनीं 'सर्वत्र वर्तमानः' म्हणजे "द्युलोकीं सर्वत्र असणारा" असा अर्थ केला आहे, तो आमच्या अर्थाच्या जवळ जवळ आहे. आम्ही तरी 'आहे आणि असून प्रीतींतला आहे' असा अर्थ समजतों.

वैश्वानर तव तत्सत्यमस्त्वस्मान्रायो मघवानः सचन्ताम् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ ३ ॥ ६ ॥

वैश्वानर । तव । तत् । सत्यम् । अस्तु । अस्मान् । रायः । मघऽवानः । सचन्ताम् ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ३ ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

३. हे वैश्वानर [ अग्ने], तव तत् सत्यम् अस्तु (=त्वद्विषयं यदस्माभिरत्र सूक्तेन प्रोक्तं यच्चास्माभिस्त्वं सर्वं याचितस्तत् सत्यं सफलं भवतु ) । मघवानो रायः (=अन्नादिसंपद्युक्तानि धनानि ) अस्मान् सचन्ताम् ( =अस्मान् सेवन्ताम्=अस्माकं गृहे सदैव सन्तु ) । तत् (=एतच्च यदस्माभिः प्रार्थितं तत् ) मित्रः, वरुणः, अदितिः (=एतन्नाम्नी देवानां माता ) सिन्धुः ( =समुद्राभिमानिनी देवता ) पृथिवी उत द्यौः (=पृथिवी द्युलोकश्च ) [ इत्येते ] नो मामहन्ताम् ( =अस्मभ्यं ददतु ) ॥

३. हे वैश्वानर [ अग्नी ], हें तुझें [ सर्व ] खरें होओ. धनधान्य संपूर्ण संपत्ति आमच्या घरीं राहोत. आणि हें दान मित्र, वरूण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू आम्हांला देओत.

3. O Vais'vânara [Agni], may [all] that be true of thee. May plentiful prosperity attend on us. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

३. हें सूक्त येथें संपलें. ऋषि शेवटीं असें प्रार्थितो कीं, ' हे वैश्वानर अग्नी, या प्रकारें जें तुझें आम्हीं वर्णन केलें आणि जें तुजपाशीं मागून घेतलें तें सर्व खरें आणि सफळ होओ, आणि सर्व प्रकारची संपत्ति आणि विपुळता हीं आमच्या घरीं सदैव नांदोत. आणि हा जो आतां आम्हीं वर मागितला तो मित्र, वरूण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू हे देव मान्य करोत, कां कीं तूंहि मान्य केला आणि त्यांनींहि मान्य केला म्हणजे आम्हांला तो मिळेल यांत कांहींच संशय नाहीं.'

' हें '=' तत्.' म्हणजे वरच्या दोन मंत्रांत जें सांगितलें कीं वैश्वानर अग्नि सकळ भुवनांचा राजा होय, आम्हीं त्याच्या कृपेंत असावें, त्याणें आमचें सदैव पालन करावें इत्यादि तें.

## सूक्तम् ९९.

मरीचिपुत्रः कश्यप ऋषिः । जातवेदा अग्निः शुद्धो वाग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ।

**जातवेदसे सुनवाम सोममरातीयतो नि दहाति वेदः ।**
**स नः पर्षदति दुर्गाणि विश्वा नावेव सिन्धुं दुरितात्यग्निः ॥ १ ॥ ७**

जातऽवेदसे । सुनवाम । सोमम् । अरातिऽयतः । नि । दहाति । वेदः । सः । नः । पर्षत् । अति । दुःऽगानि । विश्वा । नावाऽइव । सिन्धुम् । दुःऽइता । अति । अग्निः ॥ १ ॥ ७ ॥

## भाषायाम्.

१. जातवेदसे (=जातानां सकलवस्तूनां वेदित्रे=एतन्नामकाय) [अग्नये] [वयं] सोमं सुनवाम (=सोमलतामभिषूय सोमरसं करवाम)। [सः] अरातियतः (=" शत्रुमिवास्मानाचरतः "=शत्रोः) वेदः (=धनं) नि दहाति (=नितरां दहतु)। स [जातवेदा] नः (=अस्मान्) विश्वा दुर्गाणि (=सकलानि दुःखानि) अति पर्षत् (=अतिनीय पारयतु=दुःखरहितं देशं नयतु) [स जातवेदा] अग्निः सिन्धुं नावेव (=समुद्रं यथा कश्चित् कमपि नावा पारयति तद्वद्) दुरिता (=दुरितानि=पापानि) [नः] अति [पर्षत्] (=अस्मान् पापरहितं प्रदेशं नयतु)॥

१. हें एकच ऋचेचें सूक्त 'जातवेदाः' या नांवाचा जो अग्नि त्याजविषयीं आहे. जसा 'वैश्वानर अग्नि,' 'पावक अग्नि,' 'शुचि अग्नि,' तसा एक 'जातवेद अग्नि' होय. जातवेद हें नांव पडण्याचें कारण निश्चित आहे असें नाहीं. (याच मंत्रावरील सायणभाष्य पहा.) सायण म्हणतात, 'सकळ वस्तूंचें ज्ञान त्यास आहे' म्हणून जातवेद होय, अथवा 'सकळ धन ज्याजवळ आहे तो जातवेद' होय. यास्कांनींहि निरुक्तांत पुष्कळ प्रकार सांगितले आहेत. मंत्रकर्त्या ऋषीच्या मनांत जातवेद हें नांव पडण्याचें कारण कोणतें वागत होतें तें " अरातियतो नि दहाति वेदः" या पादावरून समजून येतें. त्याच्या विवक्षेप्रमाणे ' जातवेद ' शब्दांतील ' वेद ' पदाचा अर्थ ' धन ' आहे असें उघड होतें.

हा मंत्र याज्ञिक कर्मांत, म्हणजे उपाध्यांकडून आपण जीं कर्में करवितों त्यांत प्रसिद्ध आहे. तो पुष्कळ कर्मांच्या वेळीं म्हणतात. त्यांतून कितीएक विनियोग येथें सांगतों. "कौतुकबंधन" म्हणून हातांत सुताचें कंकण करून बांधण्याचा जो लग्नाच्यावेळीं वगैरे विधि करितात त्यांत हा मंत्र म्हणून त्या सुताला गंध लावीत असतात. "वर्धापनविधि" म्हणजे वाढदिवसाच्या दिवशीं करावयाचें जें कर्म, त्यांत चरुहोम करितांना हें सूक्त म्हणून आहु-

## सूक्त ९९.

ऋषि–मरीचीचा पुत्र कश्यप. देवता–जातवेदा अग्नि (म्हणजे जातवेदा असें ज्याला म्हणतात ती सकल भुवनांतें जाणणारी अग्नींची विभूति), अथवा नुस्ताच अग्नि या सूक्ताची देवता होय असेंहि समजतात. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. [आपण] जातवेद [अग्नी]साठीं सोम काढूं. [तो] [आम्हांबरोबर] द्वेष करणाऱ्या [मनुष्या]चें धन जाळून टाको. तो आम्हांला सकळ दुःखांच्या पार पाडो, नावेच्या योगानें समुद्र [पार पाडिल्या]प्रमाणें अग्नि [आम्हांला] पापांच्या पैलतीरीं नेओ.

## HYMN 99.

To *Agni Jâtavedas* (i.e. *Agni* known as *Jâtavedas*, because that he *knows all creatures*, or *is the master of all wealth*), or to *Agni* simply. By *Kas'yapa* the son of *Marîchi*. Metre—*Trishtubh*.

1. Let us press out the Soma for [Agni] Jâtavedas. May he burn the wealth of him who treats [us] as enemies. May he take us across all sorrows, may he ferry [us] to the other side of sins like as ferrying in a boat across the sea.

---

ति टाकितात. तिसरा विनियोग हा कीं "ग्रहयज्ञ" म्हणून ग्रहादिक अनिष्ट देवतांचा क्रोध शांत व्हावा या हेतूनें जें कर्म करितात त्यांत हा मंत्र म्हटला म्हणजे "शक्ति, बाण, शूल, तलवार, चक्र, ढाल, चंद्रबिंब, रुंडमाळा, कुठार, परशु यांस धारण करणारी दहा हातांची दुर्गा देवी" सिंहावर बसून दैत्याचे प्राण हरण करणारी अशी येऊन प्रत्यक्ष ग्रहयज्ञ करणाऱ्या पापी उपासकाच्या घरीं बसते असें समजून तिला हा मंत्र म्हणून बोलावितात (जातवेदसमिति मंत्रमुक्त्वा शक्तिबाणशूलखड्गचक्रचन्द्रबिम्बखेटकमालापरशुटङ्कोपेतदशभुजां सिंहारूढां दुर्गाख्यां दैत्यासुहारिणीं दुर्गाम् आवाहयामि); आणि असा मंत्र म्हणून आणविलेली जी भयंकर आणि मनुष्यांच्या रुंडमाळा घालून फिरणारी देवी दुर्गा, अथवा कालिका, तिची या ग्रहयज्ञांत पूजा करून तिला आहुति दिली म्हणजे ती अनिष्टनिवारण करिते असें समजून आपले लोक कर्ज काढूनहि ग्रहयज्ञादिक कर्में करितात. पण रुंडमाळा धारण करणारी देवी दुर्गा येईल कशी ? आणि तिला प्रसन्न करावें कसें ? कारण हा मंत्र दुर्गा देवीविषयीं मुळींच नाहीं, मग तो म्हटला असतां ती येणार नाहीं आणि आमच्या

## सूक्तम् १००.

वृषागिरो महाराजस्य पुत्रभूता ऋज्राश्वाम्बरीषसहदेवभयमानसुराधस ऋषयः। इन्द्रो देवता। त्रिष्टुप् छन्दः।

**स यो वृषा वृष्ण्येभिः समोका महो दिवः पृथिव्याश्च सम्राट्।**
**सतीनसत्वा हव्यो भरेषु मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ १ ॥**

सः। यः। वृषा। वृष्ण्येभिः। सम्ऽओकाः। महः। दिवः। पृथिव्याः। च। सम्ऽराट्।
सतीनऽसत्वा। हव्यः। भरेषु। मरुत्वान्। नः। भवतु। इन्द्रः। ऊती ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. यो वृषा (=वीर्यवान्) [इन्द्रो] वृष्ण्येभिः (=वृष्ण्यैः=वीर्यैः) समोकाः (=युक्तो) [भवति], यो महो दिवः (=महतो द्युलोकस्य) पृथिव्याश्च सम्राट् (=सम्यगेको राजा) [भवति], [यः] सतीनसत्वा (=उदकविषये बलयुक्तः=मेघोदकवर्षणे समर्थो) भरेषु (=संग्रामेषु=युद्धेषु) [योद्धृभिर्] हव्यः (=आह्वातव्यो) [भवति] स मरुत्वान् इन्द्रः (=मरुद्भिर्युक्त इन्द्रो) नः ऊती भवतु (=अस्माकम् ऊतये रक्षणाय भवतु=मरुद्भिः सह आगम्य अस्मान् रक्षतु)॥

सतीनसत्वेति ईषद् दुर्बोधं पदम् अस्माभिः सायणमनुसरद्भिर्व्याख्यातम्। यत्र यत्र सतीनशब्दः प्रयुक्तस्तत्र तत्र सतीनमुदकनामेति सः। सतीनं सत्यमिति कतिपयाः पाश्चात्याः। सति पुनः सतीनशब्दस्य सत्यशब्दसमानार्थकत्वे तदसंशयं भारतवर्षीयप्राचीनवेदव्याख्यापरंपरापरायणेन सायणाचार्येण परिज्ञातम् अभविष्यत्। न च तत्र तत्र मन्त्रेषु सतीनशब्दस्य सत्यशब्दसमानार्थकत्वम् अपेक्षितमपि।

उपाध्यांनीं खटपटोनें केलेलीं ग्रहयज्ञादि कर्में निष्फळ होतात, खर्च मात्र होतो, इष्ट येत नाहीं आणि अनिष्टहि जात नाहीं यांत कांहीं नवल नाहीं. या मंत्रांत 'दुर्गाणि' हा शब्द आला आहे आणि त्यांत दुर्गा हीं दोन अक्षरें आलीं आहेत इतकाच काय तो देवी दुर्गेचा या मंत्राशीं संबंध. परंतु हा मंत्र ऐकून जर दुर्गा देवी येईल तर 'हेंचि दान देगा देवा, तुझा वीसर न व्हावा' हा मंत्र ऐकूनहि सापाचें वीष उतरेल, कारण कीं यांतहि 'वीसर' या शब्दांत 'वीस' (वीष) हा शब्द आला आहे. दुर्गा देवीचें आवाहन करण्याच्या कामीं या मंत्राचा विनियोग केला आहे यावरून दोन गोष्टी निर्विवाद सिद्ध होतात. पहिली ही कीं, पुरातनकाळीं दुर्गा

## सूक्त १००.

ऋषि—वृषागिर् या महाराजाचे पांच पुत्र **ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान, सुराधस्** हे सर्व मिळून. देवता—इन्द्र. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. जो वीर्यवान् इंद्र सकल वीर्यांनीं युक्त [ होय ], जो महान् द्युलोकाचा आणि पृथिवीचा एकलाच प्रभु [ होय ], जो उदकपराक्रमी इंद्र संग्रामांत योद्धयांनीं धांवा करून बोलाविण्यास योग्य होय, तो मरुतांसहित इन्द्र आमचा संरक्षिता होओ.

## HYMN 100.

To *Indra*. By *Ṛijrâs'va*, *Ambarîsha*, *Sahadeva*, *Bhayamâna*, and *Surâdhas*, sons of *King Vṛishâgir*. Metre—*Trishṭubh*.

1, That hero endowed with all heroisms, the sole ruler of vast Heaven and Earth, the hero of the [ heavenly ] Waters, fit to be invoked for aid by warriors in battles—may that Indra, accompanied by the Maruts, stand for our protection.

---

अथवा कालिका देवी ही ऐकून सुद्धा ठाऊक नव्हती ती मागाहून प्रसिद्धीला आल्यामुळें आमच्या धर्मांत आणि कर्मांत शिरली. नंतर तिला वेदासारिख्या अनादि ग्रंथाचा कांहीं तरी आधार लावून द्यावा म्हणून एकाद्या पुरातन भिंतीला नवी माती चिकटविल्याप्रमाणें या सूक्ताला दुर्गा हीं अक्षरें यांत आहेत या निमित्तानें दुर्गा देवी लाविली आहे. दुसरी ही कीं, आपले लोक धर्मासंबंधी स्वतः विचारशून्य असल्यामुळें आणि सगळा भरवसा उपाध्यावर टेवीत असल्यामुळें प्रयोग कसा करावा, कोणत्या देवाची कशी शांति करावी, आणि कोणाचा क्रोध शांत होण्याविषयीं ब्राह्मणास सुवर्णदान द्यावें आणि कोणाला प्रसन्न करण्यासाठीं ब्राह्मणाला तूप द्यावें, याविषयीं भाविक जनांला स्वस्त मुक्तीचा मार्ग घालून देणारे जे नारायणभट्टादि उपाध्ये, त्यांला याप्रमाणें वडाची साल पिंपळाला लावून 'दुर्गा देवी', 'राहु' 'केतु', इत्यादि नवीन क्षुद्र देवतांच्या उपासनेचा प्रचार, वेदांतील कोणतेहि मंत्र कसेहि लावून देऊन, वाटला तर आपणास याविषयीं कोणी विचारणार नाहीं, कारण कीं सर्व लोक उपाध्यांपेक्षांहि अधिक अज्ञानी आहेत असें त्यांला वाटत असेल.

'दुर्गासूक्त' म्हणून म्हणत असतात त्यांतहि हा मंत्र म्हणतात. परंतु दुर्गासूक्तांत सुद्धा दुर्गा देवीच्या संबंधानें पाहिलें तर या मंत्राचा जप अथवा उच्चार करणें योग्य आहे कीं नाहीं याविषयीं वरच्याप्रमाणेंच विचार आहे.

---

१. या सूक्ताविषयीं लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट अशी आहे कीं, ह्याचा कर्ता

यस्यानाप्तः सूर्यस्येव यामो भरेभरे वृत्रहा शुष्मो अस्ति ।
वृषन्तमः सखिभिः स्वेभिरेवैर्मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ २ ॥

यस्य । अनाप्तः । सूर्यस्यऽइव । यामः । भरेऽभरे । वृत्रऽहा । शुष्मः । अस्ति ।

वृषन्ऽतमः । सखिऽभिः । स्वेभिः । एवैः । मरुत्वान् । नः । भवतु । इन्द्रः । ऊती ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. यस्य [ इन्द्रस्य ] यामः ( =मार्गः ) सूर्यस्येव ( =सवितुर्मार्ग इव ) अनाप्तः ( =केनाप्यलब्धो ) [ भवति ] [ यो ] भरेभरे ( =युद्धे युद्धे=सर्वेष्वपि युद्धेषु ) शुष्मः ( =बलवान् ) वृत्रहा ( =शत्रूणां हन्ता ) [ च ] अस्ति, [ यश्च ] स्वेभिः ( =स्वकीयैर् ) एवैः सखिभिः ( =चपलैर्मित्रैर्मरुद्भैर् ) वृषन्तमः (=अतिशयेन वीर्योपेतः=प्रबलतमो ) [ भवति ] स मरुत्वान् इन्द्रः (=मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु ( =अस्माकम् ऊतये रक्षणाय भवतु=मरुद्भिः सह आगम्य अस्मान् रक्षतु ) ॥

'एवैः'पदं कैश्चित् पाश्चात्यपण्डितैः प्रत्यहमिवेति व्याख्यातम् । सोर्थस्तु सायणभाष्ये कुत्रापि न दृश्यते । 'एवैः'शब्दस्य च यथा प्रत्यहमित्यर्थे सति अज्ञास्यत् तं सायणो निःसंशयम् । एतस्यामृचि सायणानुसारेणास्माभिः कृतोर्थस्तु सम्यग्युज्यते ॥

ऋषि ब्राह्मण जातीचा नव्हे, तर वृषागिर् या नांवाच्या राजाचे ऋज्राश्व इत्यादि जे पांच पुत्र ते ह्याचे कर्ते होत. असें असतांहि या सूक्ताला ऋग्वेदांतील इतर सूक्तांपेक्षां क्षत्रियसूक्त असें समजून कमी पवित्र आहे असें कोणीही मानीत नाहींत. आणि विश्वामित्रासारिखे साठ हजार वर्षे तप करून हा वृषागिर् राजा आणि त्याचे पुत्र ब्राह्मणत्वाप्रत पावले म्हणून त्यांनीं केलेलें सूक्त पवित्र वेदाचा पवित्र भाग होय असेंहिं नाहीं. आणि या सूक्ताप्रमाणें क्षत्रियांनीं केलेलीं दुसरीं सूक्तें ऋग्वेदांत पुष्कळ आहेत. यावरून प्राचीन काळीं ब्राह्मणांनींच सूक्तें रचावीं. अथवा ब्रह्मकर्म करावें आणि क्षत्रियांनीं नेहमीं लढत मात्र असावें असा नेम नसे.

'उदकपराक्रमी '=' सतीनसत्वा.' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. 'सतीन'शब्द वेदांत फार येत नाहीं आणि जेथें जेथें येतो तेथें तेथें सायणाचार्य निघंटूला अनुसरून उदक असाच अर्थ करितात. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'सतीनसत्वा' म्हणजे 'सत्यसामर्थ्य' असा अर्थ करितात. पण त्याला पुरता आधार नाहीं. (भाषा पहा.) उदकपराक्रमी असा जो आम्हीं येथें अर्थ केला

२. ज्याचा मार्ग सूर्याच्या [मार्गा]प्रमाणें अलभ्य [ होय ], [जो] प्रतापी [आणि] [जो] प्रत्येक युद्धांत शत्रूंला मारून टाकणारा होय, [ आणि ] [ जो ] आपल्या वेगवान् मित्रांच्या योगेंकरून अति सामर्थ्यवान् [ होय ], तो मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

2. [He] whose path [is] unattainable like [ that ] of the sun, [ who ] is mighty [ and ] victorious in every battle, [ and who is ] most puissant with his own swift friends—may [ that ] Indra accompanied by the Maruts, stand for our protection.

आहे त्याचा अभिप्राय असा आहे कीं, आकाशांत उदकें वृत्रानें अवरोधून ठेविलेलीं असतात तीं इंद्र वृत्राला मारून खालीं सोडून देत असतो.

'मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ '=' मरुत्वान् नः भवतु इन्द्रः ऊती.' अक्षरशः अर्थ, 'मरुद्युक्त इंद्र आमच्या संरक्षणार्थ होओ'; म्हणजे, इंद्र मरुतांला घेऊन येओ आणि आम्हांला रक्षो. हा चरण पालवपदाप्रमाणें सर्व सूक्तभर प्रतिमंत्रांत येत जाईल. आतां पहिला अष्टक संपेपर्यंत बहुतकरून प्रत्येक सूक्ताच्या शेवटीं एका सगळ्या मंत्राचें पालवपद येत जाईल.

हा मंत्र श्लोकवृत्ताला खालीं दाखविल्याप्रमाणें बसतोः—

स यो वृषा वृष्णिएँभिः समोका
महो दिवः पृथिविआश्च सम्राट् ।
सतीनसत्वा हविओ भरेषु
मरुत्वाँन्नो भवतु इन्द्र ऊती ॥

२. भावार्थः—' जो इंद्र सवित्याप्रमाणें अत्यंत दूर आकाशांमधून जातो आणि ज्याचा मार्ग कोणासहि ठाऊक नाहीं आणि कोणींहि पाहिलेला नाहीं, जो प्रबळ इंद्र सर्व युद्धांत विजयी होतो, ज्याला महावेगी मरुतांचें उत्तम साहाय्य नित्य असतें असा जो इंद्र, तो आमचा संरक्षिता होओ.'

' ज्याचा मार्ग...अलभ्य होय '=' यस्य यामः अनाप्तः'. म्हणजे जो सकळ देवांपेक्षां अधिक व्यापी होय, जो जिकडे तिकडे भरला आहे.

' आपल्या वेगवान् मित्रांच्या योगेंकरून '=' सखिभिः स्वेभिरेवैः'. मरुतांचें पाठबळ इंद्राला मोठें असतें, आणि ते त्याला साहाय्य करितात म्हणून तो मोठा प्रबळ होतो, अशाविषयीं सर्व वेदांत वाक्यें भरलेलीं आहेत. इंद्र मुळींच प्रबळ ( वृषा ) आहे. पण तशांत मरुत् हे त्याचे साहाय्यकर्ते असल्यामुळें तो अति बलाढ्यच होतो असा ऋषीचा भावार्थ आहे. 'एव'शब्दाचा अर्थ आम्हीं वेगवान् असा सायणांस अनुसरून केला आहे तोच योग्य आहे असें आम्हांस

दिवो न यस्य रेतसो दुघाना: पन्थासो यन्ति शवसापरीता: ।
तरद्द्वेषाः सासहिः पौंस्येभिर्मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ ३ ॥

दिव: । न । यस्य । रेतस: । दुघाना: । पन्थास: । यन्ति । शवसा ।
अपरिऽइता: ।
तरत्ऽद्वेषा: । ससहि: । पौंस्येभि: । मरुत्वान् । न: । भवतु । इन्द्र: ।
ऊती ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. यस्य पन्थासः (=यस्येन्द्रस्य पन्थानो मार्गा) दिवः [पन्थासो] न (=सूर्यस्य मार्गा इव) शवसा अपरीतासः (=केनापि परबलेनानभिगताः=शत्रूणामुपद्रवान्मुक्ताः) [सन्तो] रेतसो दुघानाः (=वृष्ट्युदकस्य दुहन्तः प्रवर्षन्तो) [भवन्ति] [यश्च] सासहिः (=शत्रूणामभिभवितृतम) [इन्द्रः] पौंस्येभिः (=पौंस्यैः=वीर्यैस्) तरद्द्वेषाः (=द्विषस्तरन्=विजयी) [भवति] [स] मरुत्वान् इन्द्रः (=मरुद्भिर्युक्त इन्द्रो) नः ऊती भवतु (=अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु) ॥

केचित्तु विद्वांसो दिवो रेतसः द्युलोकस्य यद् रेतः रेतोरूपमुदकं तस्येति संयोजयन्ति द्युशब्दं पुनर्दीप्तिमान् सूर्य इति सायणाचार्या अन्यत्रापि विवृण्वन्ति (ऋ. १. ५३. ४)। न च संभाव्यते तेषामर्थ इति न ॥

वाटतें. कितीएक पाश्चिम विद्वान् ' एवैः ' इतकें (उच्चैः नीचैः शनैः यांसारिखें) क्रियाविशेषण समजून ' नित्याप्रमाणें,' ' प्रचाराप्रमाणें ' असा अर्थ कल्पितात, पण तो साधार आहे असें आमच्यानें म्हणवत नाहीं.

' मरुतांसहित इंद्र '=' मरुत्वान् इन्द्रः.' म्हणजे जो नित्य मरुतांला बरोबर घेऊन फिरत असतो तो इंद्र. जसा 'नराशंस अग्नि', 'जातवेद अग्नि', 'वैश्वानर अग्नि' इत्यादि वेगवेगळे अग्नि, तसाच 'मरुत्वान् इंद्र', 'इंद्र पर्जन्यात्मा', 'वैकुंठ इंद्र' (ऋ. १०. ४७ पहा) असा इंद्रहि भिन्न भिन्न स्वरूपांनीं कल्पिलेला आहे. आणि याचीं उदाहरणें आधुनिक कालींहि पुष्कळ आहेत. जसें, गणपति देव जरी एकच आहे तरी वेगवेगळ्या ठिकाणचा गणपति वेगवेगळ्या गोष्टींच्या संबंधानें प्रसिद्धीला येतो, त्यामुळेंच पुळ्यांचा गणपति, श्रीरंगमचा गणपति इत्यादि गणपतीच्या आणि 'कांचीचा विष्णु', 'श्रीरंगमचा विष्णु', 'वेंकटरमण गि-

३. ज्याचे मार्ग सूर्याच्या [मार्गा]प्रमाणें [कोणीहि] [आपल्या] बळानें आक्रमूं शकत नाहीं [असे असून] वृष्ट्युदकाचा वर्षाव करितात, [जो] [आपल्या] पराक्रमांच्या योगेंकरून शत्रूंला जिंकून विजयी होत असतो, [तो] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

3. [He] whose paths lie stretched unendangered by [all hostile] power, [and] are the showerers of rain, like [the paths] of the resplendent [sun]—[that Indra] the conqueror of his enemies, the victor with [his] powers—may [that] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

रीचा शेषशायी विष्णु' अशा वेगवेगळ्या विभूति आहेत. त्याप्रमाणेंच 'यशोदाबाळ कृष्ण' (बालाजी), 'गोपीरमण कृष्ण', 'पार्थसारथि कृष्ण' इत्यादि कृष्णाचींहि रूपें निरनिराळीं कल्पून निरनिराळीं देवळें बांधून त्यांत त्या त्या वेगवेगळ्या रूपांनीं त्यांची पूजा करण्याचा प्रचार पडला आहे. त्याप्रमाणेंच शिवाची मूर्ति वेगळी, त्याचें भजन पूजन इत्यादि वेगळें, आणि उमामहेश्वराची मूर्ति वेगळी, भजन पूजन वेगळें, आणि त्यांचे भक्तहि वेगळेच असतात. त्याप्रमाणेंच नुस्ता इंद्र वेगळा आणि मरुत्वान् इंद्र वेगळा होय. वस्तुतः भेद नाहीं.

श्लोकीकरणः—

यस्य अनाप्तः सूर्यस्येव यामः
भरेभरे वृत्रहा शुष्मो अस्ति ।
वृषन्तमः सखिभिः स्वेभिरेवैः
मरुत्वान्नो भवतु इन्द्र ऊती ॥

३. 'ज्याचे मार्ग सूर्याच्या मार्गाप्रमाणें निष्कंटक होत, आणि शत्रूंच्या उपद्रवापासून मुक्त असून सूर्यमार्गाप्रमाणें वृष्टि करून भूमीवर उदक पाडणारे होत, जो इतका बळवान् आहे कीं, तो आपल्या शत्रूंला सहज मारून टाकून युद्धांत विजयी होत असतो तो इंद्र मरुतांसहित येऊन आमचें संरक्षण करो' असा ऋषीचा अभिप्राय आहे.

'आक्रमूं शकत नाहीं'='अपरीताः.' म्हणजे साधारण कोणी जाऊं लागला तर त्याच्या मार्गीं कोणी तरी उभा राहून त्याला पुढें जाऊं देणार नाहीं असें कधीं तरी होईल, पण सूर्याला तूं थांब, पुढें जाऊं नको असें कोणीहि म्हणूं शकत नाहीं, त्याप्रमाणें इंद्रहि निष्कंटक आहे आणि सर्वव्यापी आहे.

'वृष्ट्युदकाचा वर्षाव करितात'='रेतसो दुहानाः.' अक्षरशः अर्थ 'गाय पान्हा सोडून दूध देते तसे पृथिवीवर

सो अङ्गिरोभिरङ्गिरस्तमो भूद्वृषा वृषभिः सखिभिः सखा सन् ।
ऋग्मिभिर्ऋग्मी गातुभिर्ज्येष्ठो मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ ४ ॥

सः । अङ्गिरःऽभिः । अङ्गिरःऽतमः । भूत् । वृषा । वृषऽभिः । स-
खिऽभिः । सखा । सन् ।
ऋग्मिऽभिः । ऋग्मी । गातुऽभिः । ज्येष्ठः । मरुत्वान् । नः । भवतु ।
इन्द्रः । ऊती ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. स [ इन्द्रः ] अङ्गिरोभिः अङ्गिरस्तमो भूत् ( =एतन्नामभिरतिपुरातनैरुपासकैः=तेषां पूज्यत्वादयो ये गुणास्तैर्विशिष्टतमोभवत् ) । वृषभिः ( =सामर्थ्योपेतैर्मरुद्भिर् ) वृषा ( =सामर्थ्योपेतः=सामर्थ्योपेततमो ) [ भवति ] । सखिभिः सखा सन् ( =सखिभूतैर्मरुद्भिर्द्वारा सखितमः=अतिशयेन सखिगुणविशिष्टश्च भवति ) । [ स ] ऋग्मिभिः ( =स्तुत्यैर्मरुद्भिर्द्वारा ) ऋग्मी ( =स्तुत्यः=अतिशयेन स्तुत्यो ) [ भवति ] [ अपि च ] गातुभिर्ज्येष्ठः ( =स्तोतृभिर्मरुद्भिः करणेन श्रेष्ठो ) [ भवति ] [ स ] मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु ( =अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु ) ॥

अङ्गिरसो नाम पुरातनतमा देवोपासकाः । तैर्मरुद्भिरिव नित्यं सेवितत्वादिन्द्रस्तेषां साधुत्वादयो ये गुणास्तैर्युक्तो भूत् । ते सर्वे गुणा इन्द्रे संगता इवेत्यर्थः । वीर्योपेतैर्मरुद्भिर्नित्यं सेवितत्वादिन्द्रो वीर्यवत्तमो भवति । सखिभूतैर्मरुद्भिः सेव्यमानत्वादिन्द्रोऽतिशयेन सखिगुणैर्विशिष्टो भवति । तथैव मनुष्यस्तवनीयैर्मरुद्भिः सेव्यमानत्वादतिशयेन स्तवनीयस्तैश्च स्तुतत्वात्सर्वेषु देवेषु श्रेष्ठो भवतीति भावः ॥

इयं सायणेनैवं व्याख्याता । स इन्द्रोऽङ्गिरोभिः अङ्गन्ति गच्छन्तीत्यङ्गिरसो गन्तारः । तेभ्योऽप्यङ्गिरस्तमो भूत् । अतिशयेन गन्ता भवति । वृषभिर्वृषा वर्षितृभ्योऽप्यतिशयेन वर्षिता । सखिभिः समानख्यानेभ्यो मित्रभूतेभ्योऽपि सखातिशयेन हितकारी । एवंभूतः सन् ऋग्मिभिरर्चनीयेभ्योऽपि ऋग्म्यर्चनीयो भवति । गातुभिर्गातव्येभ्यः स्तोतव्येभ्योऽपि ज्येष्ठोऽतिशयेन स्तोतव्यः । एवंगुणविशिष्टो मरुत्वानिन्द्रो रक्षणाय भवतु । इति ॥

४. तो अंगिरसांच्या योगेंकरून उत्तम अंगिरा झाला आहे, [ आणि ] वीर्यवंत [ सहायां]च्या योगेंकरून [ परम ] वीर्यवान् आणि मित्रांच्या योगेंकरून [ उत्तम ] मित्र झाला आहे. [ तो ] स्तवनीय [ देवां]च्या योगेंकरून [ अतिशय ] स्तवनीय [ आणि ] स्तवन करणाऱ्यांच्या योगानें अतिश्रेष्ठ [ झाला आहे ]. [ तो ] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

4. He is the best Angiras with the Angirases, [ most ] puissant with [his] puissant [ allies ], the [best] friend with [ his ] friends. [ He is ] [ the most ] praiseworthy with [ his ] praiseworthy [ allies ], the highest with [ his ] praisers. May [that] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

वर्षाव करितात. आकाशांतून अति इष्ट जो मेघवर्षाव होत असतो तो अमुक देव रथांत बसून गमन करीत आहे त्याच्या कृपेमुळें होत आहे असा भाव आपले आर्य पूर्वज धरीत असत; मग तो देव सविता असो, इन्द्र असो, मरुद्गण असो अथवा सोम असो.

वृत्तासाठीं ' पौंसिएभिः' असा उच्चार करावा लागतो.

४. 'ज्याची सेवा अति पुरातन अङ्गिरस या नांवाच्या ऋषींनीं म्हणजे उपासकांनीं केली त्यामुळें जो अंगिरसांचा अति प्रेमळ पुरस्कर्ता असून आम्हांला उत्तम अंगिरसांप्रमाणें दिसतो, ज्याच्या समीप त्याचे वीर्यवंत मित्र जे स्तवन करणारे स्तुत्य मरुत् हे सदैव असतात त्यामुळें तो अति सामर्थ्यवान् उत्तम मित्र आणि अतिशय स्तुत्य असा होय, आणि मरुतांच्या योगेंकरून श्रेष्ठ मानला जातो, तो इंद्र आमचें संरक्षण करो' असा भावार्थ.

' अंगिरसांच्या योगानें उत्तम अंगिरा झाला आहे '=' अङ्गिरोभिः अङ्गिरस्तमः.' म्हणजे अंगिरसांचा अति मित्र असल्यामुळें जो आम्हांला अंगिरसांप्रमाणेंच किंबहुना अधिकच पूज्य होय. अंगिरस हे अति पुरातन कोणी उपासक त्यांविषयीं ऋग्वेदांत पुष्कळ सांगितलें आहे. ते इंद्रादिक देवांचे मोठे भक्त होते असें सांगितलें आहे. ते इंद्राबरोबर जणुं नित्य मरुतांसारिखे फिरत असतात आणि त्याच्या सेवेंत असतात त्यांमध्यें इंद्र त्यांचा प्रभु जणुं शोभतो असा भावार्थ. येथें जसें इंद्राला ' अंगिरस्तम ' असें म्हटलें आहे, त्याप्रमाणें इतर पुष्कळ मन्त्रांत अ-

**स सूनुभिर्न रुद्रेभिर्ऋभ्वा नृषाह्ये सासह्वाँ अमित्रान् ।**
**सनीळेभिः श्रवस्यानि तूर्वन्मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ ५ ॥८॥**

सः । सूनुऽभिः । न । रुद्रेभिः । ऋभ्वा । नृऽसह्ये । ससह्वान् । अमित्रान् ।
सऽनीळेभिः । श्रवस्यानि । तूर्वन् । मरुत्वान् । नः । भवतु । इन्द्रः । ऊती ॥ ५ ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

५. स ऋभ्वा (=महान्) [इन्द्रः] सूनुभिर्न रुद्रेभिः (=पुत्रैरिव रुद्रपुत्रैः=स्वपुत्रानिव रुद्रपुत्रान् मरुतः सहायान् गृहीत्वा) नृषाह्ये अमित्रान् सासह्वान् (=युद्धे शत्रून् जितवान्=य इन्द्रो मरुतां साहाय्येन शत्रून् युद्धेभिभवति) सनीळेभिः श्रवस्यानि तूर्वन् (=मित्रैर्मरुद्भिः सह धनानि हरन् सन्=य इन्द्रो मरुद्भिः सह युद्धे शत्रूणां वृत्रादीनां धनानि वृष्टिजलादिरूपाणि हरति) [स] मरुत्वान् इन्द्रः (=मरुद्भिर्युक्त इन्द्रो) नः ऊती भवतु (=अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु) ॥

---

ग्नीला अंगिरस्तम असें म्हटलेलें आढळतें, आणि अश्वी देव आणि उषा देवी यांलाहि अंगिरस्तम असें विशेषण लाविलें आहे. अंगिरसांविषयीं सू. ५१, मं. ३ याजवरील टीप पहा.

या मंत्रांत जे 'वीर्यवंत सहाय' ('वृषणः'), 'मित्र' (सखायः), 'स्तवनीय' (ऋग्मिणः) आणि 'स्तवन करणारे' (गातवः) सांगितले ते मरुत् होत. त्यांच्या योगानें इंद्र अति सामर्थ्ययुक्त होतो असें याच सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत सांगितलें आहे, त्याप्रमाणें तो त्यांच्या योगानें उत्तम मित्र इत्यादि होतो असें या मंत्रांत ऋषि म्हणतो आहे.

'स्तवन करणाऱ्यांच्या योगानें'='गातुभिः.' मरुत् हे इंद्राचें स्तवन करीत असतात, आणि त्याची कीर्ति गात असतात असें ऋग्वेदांत सांगितलें आहे.

वृत्तानुरोधेंकरून 'ज्येष्ठो' याच्या स्थळीं 'जिएष्ठो' असें म्हटलें पाहिजे.

५. तो महान् [ इंद्र ] [ आपल्या ] पुत्रांस सहाय घेतल्याप्रमाणें रुद्राच्या पुत्रांला सहाय घेऊन संग्रामांत शत्रूंचा पराभव करून टाकीत असतो; आणि [ तो ] [ त्या ] मित्रांच्या साहाय्यानें धनें जिंकून घेतो, [ तो ] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

5. He, the great [ Indra, who ] with the aid of Rudra's sons as [though they were his] sons, subdues [his] enemies in battle, conquering spoils with [ his ] companions—may [that] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

५. मरुतांच्या योगानें इंद्राला विशेष सामर्थ्य, आणि मित्रत्व इत्यादि येतात म्हणून वर सांगितलें त्यालाच अनुलक्षून पुनः ऋषि म्हणतो कीं, 'जो इंद्र मरुतांला आपल्या पुत्रांप्रमाणें साहाय्याला घेऊन युद्धांत आपल्या वृत्रादिक शत्रूंला मारून त्यांजपासून सर्व धन म्हणजे मेघोदकादि संपत्ति हरण करून घेत असतो, तो इंद्र मरुतांसहित येऊन आमचें संरक्षण करो.'

'रुद्राच्या पुत्रांला'='रुद्रैः.' मरुत् हे रुद्राचे पुत्र होत याविषयीं सूक्त ३८, मं.७आणि सू.७२, मं.४ आणि टीप पहा.

'त्या मित्रांच्या साहाय्यानें'='सनीळेभिः' म्हणजे मरुतांच्या साहाय्यानें. 'सनीड' (अथवा 'सनीळ') याचा अक्षरशः अर्थ ज्यांचा निवास एकत्र होत असतो ते, असा आहे; म्हणजे नित्य एकत्र राहणारे, जीवलग मित्र, प्राणप्रिय.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला तर श्लोकवृत्ताला बसतोः—

स सूनुभिर्न रुद्रेभिर्ऋभ्वा
नृषाहिए सासहवान् अमित्रान् ।
सनीळेभिः श्रवसिआनि तूर्वन्
मरुत्वान्नो भवतु इन्द्र ऊती ॥

स मन्युमीः समदनस्य कर्तास्माकेभिर्नृभिः सूर्यं सनत् ।
अस्मिन्नहन्त्सत्पतिः पुरुहूतो मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ ६ ॥

सः । मन्युऽमीः । सऽमदनस्य । कर्ता । अस्माकेभिः । नृऽभिः । सूर्यम् । सनत् ।
अस्मिन् । अहन् । सत्ऽपतिः । पुरुऽहूतः । मरुत्वान् । नः । भवतु । इन्द्रः । ऊती ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. स मन्युमीः (=शत्रूणां क्रोधस्य हन्ता) समदनस्य (=संग्रामस्य) कर्ता [इन्द्रः] अस्माकेभिर्नृभिः (=अस्मदीयैः पुरुषैः पुत्रपौत्रादिभिर्भृत्यादिभिश्च) सूर्यं सनत् (=सूर्यप्रकाशं सानयतु=संभक्तं करोतु=अस्मदीयैः पुरुषैः संयुक्तं करोतु=तेभ्यो ददातु)। अस्मिन् अहन् (=अस्मिन् दिवसे) सत्पतिः (=सतां पालकः) पुरुहूतः (=बहुभिरुपासकैराहूतः सेवितः) [स] मरुत्वान् इन्द्रः (=मरुद्भिर्युक्त इन्द्रो) नः ऊती भवतु (=अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्य अस्मान् रक्षतु)॥

अस्माकेभिर्नृभिः सूर्यं सनत् इत्यत्र सायण एवमाह । “अस्माकेभिरस्माकैरस्मदीयैर्नृभिः पुरुषैः सूर्यं सूर्यप्रकाशं सनत् संभक्तं करोतु । शत्रुपुरुषैस्तु वृष्टिनिरोधकमन्धकारं संयोजयतु” इति । दुर्बोधः पुनरेष पादः ॥

सत्पतिशब्दस्य सायणकृतमेव व्याख्यानं साधीय इति वयम् ॥

## पोंच ता. १ पासून ता. २८ फेब्रुवारीपर्यंत.

| | रु. आ. |
|---|---|
| श्री. महाराज होळकर सरकार सं० इंदुर. ... ... ... | ३१–१४ |
| ,, नारायणराव दादासाहेब पवार ... ... ... | ६– ६ |
| रा. बा. बापुजी रामचंद्र पटवर्धन एक्स्ट्रा अ० क० ... ... | १२–१२ |
| रा. सा. हरिदास वेहारिदास कारभारी सं० वडवान ... ... | १५९– ६ |
| ,, ,, द्वारकादास चतुर्भुज मामलेदार ... ... ... | ६– ६ |
| सर मंगळदास नथुभाई मुंबई. ... ... ... | १२– ० |
| रा. रा. नारो बाबजी गोळे वकील. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, वासुदेव श्रीधर भावे हेडमास्तर. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, गोविंद गंगाधर फडके मुंबई. ... ... ... | १२– ० |
| ,, ,, गोविंद रामचंद्र खांडेकर मुंबई. ... ... ... | १२– ० |
| डा. गोपाळ शिवराम मुंबई. ... ... ... | १२– ० |
| ,, पांडुरंग गोपाळ मुंबई. ... ... ... | ६– ० |
| रा. रा. सुंदरराव रघुनाथ सुरतकर मुंबई. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, गणेश शास्त्री बोडस मुंबई. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, मोरेश्वर बळवंत फणसे. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, शंकर वामन चितळे फर्स्ट अ० मा० ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, रामचंद्र मुकुंदजी मुंबई. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, शंकरराव रामाजी पत्की वकील. ... ... ... | १२–१२ |
| ,, ,, वामनराव नारायण ओक फर्स्ट ग्रेट ओव्हरसियर. ... | ६– ६ |
| ,, ,, नारायण बळवंत वहिवाटदार. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, विनायकराव रंगराव पुरंदरे. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, बाळकृष्ण नारायण मुंबई. ... ... ... | ६– ० |
| ,, ,, वासुदेव बाळकृष्ण लोटलीकर. ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, भिमाजी रघुनाथ भागवत कासर. ... ... ... | १५– ० |
| ,, ,, नारायणराव स्वामिराव म्या० ... ... ... | ६– ६ |
| ,, ,, वामनराव आबाजी मोडक हेडमास्तर.... ... ... | १२–१२ |
| शेट सोराबजी शापुरजी बंगाली मुंबई. ... ... ... | १२– ० |
| नेटिव लायब्ररी इंदुर. ... ... ... | १२–१२ |

Registered No. 110 of 1878.

# सूचना.

| | रु. | आ. |
|---|---|---|
| वर्षाची वर्गणी, आगाऊ | ६ | ० |
| मुंबईबाहेर राहणारांस टपाल हंशिलाबद्दल दरवर्षाचे | ० | ६ |

All communications to be addressed to the Manager Mr. Mahâdev Nârâyan Pandit, No. 29 *Moroba Popatji's Oart, Kalka Devi Road, Bombay.*

ग्रंथकर्त्याच्या नांवचा वगैरे सर्व प्रकारचा पत्रव्यवहार मुंबई मोरोबा पोपटजीची वाडी घर नंबर २९, या पत्त्यावर रा. रा. महादेव नारायण पंडित "म्यानेजर वेदार्थयत्न" यांच्याशीं ठेवावा.

**विशेष सूचना.**–आमच्या कितीएक वर्गणीदारांकडे गेल्या वर्षाची बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी.

तिकीटें पाठविणें झाल्यास अर्धा आणा दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्तावळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

THE

# VEDARTHAYATNA

OR

## AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

## वेदार्थयत्न.

## ऋग्वेदसंहिता

पदांसहित व

तिचें मराठी आणि इंग्रजी भाषांतर.

पुस्तक २. अंक १०. मार्च सन १८७८. मासिक भाग २४.
Volume 2 March 1878 No. 24

मुंबई:
निर्णयसागर छापखान्यांत छापिलें.

माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता

६. तो [शत्रूंचा] गर्व हरण करणारा [आणि] युद्ध करणारा [इन्द्र] आमच्या लोकांला सूर्याचा लाभ करून देओ. आजच्या दिवसीं सज्जनांचा पालक [आणि] बहुभक्त [असा जो], [तो] मरुतांसहित इन्द्र आमचा संरक्षिता होओ.

6. He the humiliator of [the enemy's] pride, the hero of the battle—may he make the light of the sun accessible to our warriors. This day [he who is] the lord of the good, he invoked by many—may [that] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

---

६. 'तर असा जो येथें इंद्र सांगितला, कीं जो सकळ शत्रूंचा पराभव करून टाकणारा, आणि युद्धांत विजयी होणारा, तो आमच्या लोकांस सूर्यप्रकाशाचा लाभ करून देओ, शत्रुजनांला लाभ होऊं न देओ. तो सज्जनांचा पालक आणि अनेक भक्तांनीं सेविलेला इंद्र आज मरुतांसहित येऊन आमचें संरक्षण करो,' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

'आमच्या लोकांला सूर्याचा लाभ करून देओ'='अस्माकेभिर्नृभिः सूर्यं सनत्.' म्हणजे सूर्याच्या प्रकाशाचा लाभ आमच्या मनुष्यांस होओ, शत्रूंच्या मनुष्यांस न होओ, असा हा अर्थ आम्हीं सायणानुसारें केला आहे. पण त्याविषयीं आम्हांला संशय आहे. या अर्थाविषयीं सायणांला सुद्धा दुर्बोधपणा वाटला असावा. कारण ते म्हणतात कीं, "शत्रूंनीं "गाई चोरून नेल्या होत्या त्या आण- "ण्यासाठीं शत्रूंशीं युद्धाला या सूक्ताचे "कर्ते ऋज्राश्व इत्यादि गेले होते त्या "प्रसंगीं या मंत्रानें इंद्राची स्तुति केली "तो हा मंत्र." परंतु अर्थ समजण्यासाठीं अशा कथेची कल्पना मानण्यापेक्षां, 'सूर्य' म्हणजे 'उत्कर्ष,' 'वैभव' असा अर्थ संभवतो तो करावा म्हणजे बहुतकरून सर्व अडचण दूर होईल.

वृत्तार्थ दुसरा चरण 'अस्माकेभिर्नृभिः सूरिअं सनत्' असा म्हटला पाहिजे.

j 1

तमूतयो रणयञ्छूरसातौ तं क्षेमस्य क्षितयः कृण्वत त्राम् ।
स विश्वस्य करुणस्येश एको मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ ७ ॥
तम् । ऊतयः । रणयन् । शूरऽसातौ । तम् । क्षेमस्य । क्षितयः ।
कृण्वत । त्राम् ।
सः । विश्वस्य । करुणस्य । ईशे । एकः । मरुत्वान् । नः । भवतु ।
इन्द्रः । ऊती ॥ ७ ॥
तमप्सन्त शवस उत्सवेषु नरो नरमवसे तं धनाय ।
सो अन्धे चित्तमसि ज्योतिर्विदन्मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥८॥
तम् । अप्सन्त । शवसः । उत्ऽसवेषु । नरः । नरम् । अवसे । तम् ।
धनाय ।
सः । अन्धे । चित् । तमसि । ज्योतिः । विदत् । मरुत्वान् । नः ।
भवतु । इन्द्रः । ऊती ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. तम् [ इन्द्रमेव ] ऊतयः ( =सहाया मरुतः ) शूरसातौ ( =संग्रामे ) रणयन् ( =प्रोत्साहयन्ति ) । तम् [ एव ] क्षितयः ( =मनुष्याः ) क्षेमस्य त्रां ( =धनस्य रक्षितारं ) कृण्वत ( =कुर्वन्ति ) । स [ एव ] विश्वस्य करुणस्य ( =सकलस्यापि कर्मण ) एक ईशे ( =एक एव प्रभुरस्ति ) । [ स ] मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु ( =अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्य अस्मान् रक्षतु )॥

८. तम् [ इन्द्रं ] शवस उत्सवेषु ( =बलस्य प्रसङ्गेषु=संग्रामेषु ) [ वीरा ] अप्सन्त ( =ऐप्सन्=आप्तुमिच्छन्ति ), तं नरं ( =तं वीरं ) नरः ( =वीरा ) अवसे धनाय ( =रक्षणाय=संपत्प्राप्तये च ) [ अप्सन्त=ईप्सन्ति ] । स [ एव ] अन्धे चित् तमसि ( =अन्धवद्दृष्टिशून्येन्धकारेपि ) ज्योतिर्विदत् ( =प्रकाशं लम्भयति ) । [ स ] मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु ( =अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु ) ॥

७. त्याला त्याचे साहाय्यकर्ते मरुत् समरांगणांत उत्तेजन देत असतात. त्याला मनुष्यें आपल्या सकळ संपत्तीचा त्राता करीत असतात. तो सकळ कर्मांचा एकला प्रभु होय. [ तर तो ] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

८. त्याला बळाच्या प्रसंगीं [ शूर लोक ] वांछीत असतात. त्या शूराला शूर [ जन ] रक्षणाकरितां [ आणि ] धनप्राप्तीकरितां [ वांछीत असतात ], तो आंधळ्या काळोखामध्यें सुद्धा प्रकाश प्राप्त करून देतो. [ तर तो ] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

7. Him his allies urge in battle. Him all men constitute the protector of their good. He is the sole master of all actions. May [that] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

8. Him they desire on occasions of strength, that hero the heroes desire for protection [and] prosperity. He gives light even in blind darkness. May [ that ] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

---

७. भावार्थः—'ज्या इंद्राला त्याचे साहाय्यकर्ते मरुत् समरांगणांत उत्साह येण्यासाठीं उत्तेजन देत असतात, आणि ज्याला सर्व प्रसंगीं मनुष्यें आपल्या वस्तुमात्रांचें संरक्षण करण्याकरितां प्रार्थीत असतात, आणि या जगामध्यें यज्ञयागादिक जीं कर्में जन करितात त्यांचा जो अद्वितीय स्वामी होय, म्हणजे ज्याप्रीत्यर्थ तीं केलीं जातात, तो इंद्र मरुतांसह येऊन आमचें संरक्षण करो.'

'तो सकळ कर्मांचा एकला प्रभु होय'='स विश्वस्य करुणस्य ईशे एकः.' म्हणजे मनुष्यें यजनभजनादिक कर्में करितात तीं एकट्या इंद्राकरितांच करितात, दुसऱ्या देवाप्रीत्यर्थ करीत नाहींत.

'साहाय्यकर्ते'='ऊतयः.' 'ऊति' शब्दाचा हा येथें सायणानुसारें केलेला अर्थ कितीएक विद्वान् घेत नाहींत. पण आम्हांस वाटतें, सायणांचा अर्थ खरा आहे. सू. ५१, मं. २ आणि त्याजवरील टीप पहा. 'मति' म्हणजे 'ज्याला मति आहे तो=बुद्धिमान्' असा अर्थ जसा होतो (ऋ. ८. १८. ७ आणि ८. ६८.२), 'यज्ञ' याचा जसा 'जो यज्ञ करितो तो' असा अर्थ आहे, तसा 'ऊति' म्हणजे 'रक्षण करणारा,' 'साहाय्य क-

**स स॒व्येन॑ यमति॒ व्राध॑तश्चि॒त्स द॑क्षि॒णे संगृ॑भीता कृ॒तानि॑ ।**
**स की॒रिणा॑ चि॒त्सनि॑ता॒ धना॑नि म॒रुत्वा॑न्नो भवत्विन्द्र॑ ऊ॒ती ॥९॥**

सः । स॒व्येन॑ । य॒म॒ति॒ । व्राध॑तः । चि॒त् । सः । द॒क्षि॒णे । सम्ऽगृ॑भी-ता । कृ॒तानि॑ ।
सः । की॒रिणा॑ । चि॒त् । सनि॑ता । धना॑नि । म॒रुत्वा॑न् । नः॒ । भ॒व॒तु॒ । इन्द्रः॑ । ऊ॒ती ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. स [ इन्द्रः ] सव्येन ( =वामेन ) [ हस्तेन ] व्राधतश्चित् ( =वृद्धानपि=म-हतोपि शत्रून् ) यमति ( =नियमयति=निगृहीतान् करोति ) स [ इन्द्रो ] दक्षिणे ( =दक्षिणहस्ते ) कृतानि संगृभीता [ धारयति ] ( =कृतानि संगृहीतानि धारयति= संग्रामेषु संपादितानि धनानि संगृह्य धारयति ) । स कीरिणा चित् ( =स्तोत्रा स्तुतः सन्नेव ) धनानि सनिता ( =धनानां दाता भवति=अकृतयज्ञाय स्तोत्रेपि धनानां दा-ता भवति ) । [ स ] मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु (=अ-स्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु ) ॥

रणारा ' असा अर्थ होण्यास अडचण दिसत नाहीं.

वृत्तसुखार्थ पहिला चरण " तमूतयो रण्णिॲन्शूरसातौ " असा म्हटला पाहिजे.

८. 'जेथें जेथें म्हणून बळ खर्च करावयाचें असतें तेथें तेथें ज्याला सर्व लोक बोलावितात, ज्याला वीर युद्धांत साहाय्यार्थ आणि धनप्राप्त्यर्थ हाक मारितात, आणि मोठ्या अंधकारांतहि जो प्रकाशाचा लाभ करून देतो, असा इन्द्र मरुतांसहित येऊन आमचें संरक्षण करो ' असा भावार्थ.

' बळाच्या प्रसंगीं '=' शवसः उत्सवेषु.' म्हणजे युद्धादिक जे सामर्थ्य प्रगट करण्याचे प्रसंग ते.

' धनप्राप्तीकरितां '=' धनाय.' म्हणजे युद्धांत शत्रूच्या सर्व धनाची आपणांस लूट मिळावी म्हणून.

'आंधळ्या काळोखामध्यें सुद्धा प्रकाश प्राप्त करून देतो '=' अन्धे चित् तमसि ज्योतिः विदत्.' म्हणजे दुःखांत सुद्धा सुख देणारा, अज्ञानादि अंधकार असतांहि ज्ञानरूप प्रकाश प्राप्त करून देणारा असा भावार्थ दिसतो. अक्षरशः अर्थ करावयाचा नाहीं असें वाटतें. अथवा 'अन्धे तमसि' याचा अर्थ 'तमोमये आन्ध्ये ' अंधकारमय जो अन्धळेपणा त्यांत

९. तो डाव्या [ हाता]नें मोठ्या सुद्धा [ शत्रूं]चा निग्रह करितो [ आणि ] तो उजव्या [ हातां]त [ शत्रूंपासून ] हरून घेतलेलीं धनें धरितो. तो स्तोत्यालाहि धनें देतो. [ तो ] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

9. He with [his] left [hand] crushes even great enemies : he in [his] right [hand] [holds] spoils seized [in battle]. He [is] the Giver of wealth even to the singer. May [that] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

---

प्रकाशाचा लाभ करून देतो, (ज्योतिर्विदत्) म्हणजे पुनः डोळे देतो. या सूक्ताचा कर्ता ऋज्राश्व, त्याचे डोळे गेले असतां अश्वी देवांनीं ते पुनः आणिले असें सांगितलें आहे. (ऋ.१.११६.१६) त्या गोष्टीला उद्देशून ऋज्राश्व येथें बोलत असेल.

---

९. ‘जो इन्द्र इतका बलिष्ठ आहे, कीं तो युद्धांत आपल्या शत्रूचीं धनें हरण करून उजव्या हातांत घेत असतो, आणि एकट्या डाव्या हातानें शत्रु मोठे असले तरी त्यांला भूतळाला मिळवितो; आणि जो इंद्र कृपाळु तर इतका आहे, कीं त्याला हवि अर्पण करून यज्ञ न केला आणि त्याची नुस्ती स्तुतिच म्हटली तर तीच तितकी ऐकून घेऊन स्तुतिकर्त्याला धनसंपन्न करितो; तो इंद्र आपल्या मरुतांसहित येऊन आमचा संरक्षक होओ.’

‘शत्रूंपासून हरण केलेलीं धनें [ धरितो ]’=‘ संगृभीता कृतानि.’ अक्षरशः अर्थ ‘हरण केलेलीं धनें संगृहीत [ धरितो ]’=‘ म्हणजे तीं सगळीं धनें हातांत एकत्र धारण करितो, त्या सर्व धनांचा संग्रह आपल्या हातांत करितो, म्हणजे हरण करून धरितो.’ ‘कृत ’ शब्दाचा अर्थ युद्धांत शत्रूचें हरण केलेलें धन म्हणजे लूट असा अर्थ होतो याविषयीं ऋ. १०. १०२. २ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

‘तो स्तोत्यालाहि धनें देतो ’=‘ स कीरिणा चित् सनिता धनानि.’ अक्षरशः ‘ स्तोत्याच्या योगानेंहि धनांचा दाता [ होतो ].’ म्हणजे हवि न दिलें आणि स्तोत्यांकडून स्तोत्र म्हणविलें तरीहि धन देतो.

**स ग्रामेभिः सनिता स रथेभिर्विदे विश्वाभिः कृष्टिभिर्न्वद्य ।**
**स पौंस्येभिरभिभूरशस्तीर्मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ १० ॥ ९ ॥**

सः । ग्रामेभिः । सनिता । सः । रथेभिः । विदे । विश्वाभिः । कृष्टिऽभिः । नु । अद्य ।
सः । पौंस्येभिः । अभिऽभूः । अशस्तीः । मरुत्वान् । नः । भवतु । इन्द्रः । ऊती ॥ १० ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

१०. स [ इन्द्रो ] ग्रामेभिः ( =मरुद्रूपैर्योद्धृसमूहैर्द्वारा ) स [ च ] रथेभिः ( =रथैः=रथद्वारा ) सनिता ( =धनदातेति=धनदातृत्वेन ) नु अद्य ( =अधुनापि ) विश्वाभिः कृष्टिभिः (=सर्वैर्मनुष्यैः) विदे ( =विद्यते=ज्ञायते ) । स पौंस्येभिः ( =पौंस्यैः=स्ववीर्यैः ) अभिशस्तीः ( =शत्रून् ) अभिभूः ( =अभिभविता=पराजेता ) [ भवति ] । [ स ] मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु ( =अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु ) ॥

१०. तो [ आपल्या मरुत् ] समुदायांच्या योगानें [आणि] तो [ आपल्या ] रथांच्या योगानें धनदाता [ होत असतो ] [ असें ] सकळ लोकांला अजूनहि ठाऊक आहे. तो [ आपल्या ] सामर्थ्याच्या योगानें शत्रूंचा पराभव करणारा [ होय ]. [ तर तो ] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

10. He— [ Indra ]—is known even to this day to all men, he, [ as ] the giver [ of riches ] through [ his ] troops [ of Maruts ], [and] through [ his ] chariots. He through [ his ] prowess [ is ] the conqueror of [his] foes. May [ that ] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

१०. 'जो इंद्र आपल्या मरुतांच्या साहाय्यानें आणि रथांच्या साहाय्यानें भक्तजनास धन मिळवून देतो अशी अजून प्रख्याति सर्व लोकांत आहे, आणि जो आपल्या शौर्याच्या योगानें सकळ शत्रूंला पराभवून टाकितो, तो इंद्र मरुतांसहित येऊन आमचें संरक्षण करो,' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

'मरुत्समुदायांच्या योगानें आणि आपल्या रथांच्या योगानें '=' ग्रामेभिः रथेभिः.' म्हणजे तो मरुतांला घेऊन आपल्या रथांत बसून येत असतो, आणि आपल्या भक्तांच्या पक्षानें लढून त्यांला युद्धांत विजयी करितो आणि शत्रूंची संपत्ति त्यांस मिळवून देतो, असा भावार्थ.

वृत्तानुरोधेंकरून दुसरा आणि तिसरा हे चरण खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटले पाहिजेतः—

विदे विश्वाभिः कृष्टिभिर्नु अद्य ।
स पौंसिएभिः अभिभूरशस्तीः ॥

**स जामिभिर्यत्समजाति मीळ्हेऽजामिभिर्वा पुरुहूत एवैः ।**
**अपां तोकस्य तनयस्य जेषे मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ ११ ॥**

सः । जामिऽभिः । यत् । सम्ऽअजाति । मीळ्हे । अजामिऽभिः । वा । पुरुऽहूतः । एवैः ।
अपाम् । तोकस्य । तनयस्य । जेषे । मरुत्वान् । नः । भवतु । इन्द्रः । ऊती ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

११. स पुरुहूतः ( =बहुभिराहूतः=बहुभिः संभक्त ) [ इन्द्रो ] यद् ( =यदा ) एवैः ( =शीघ्रगमनैर् ) [ मरुद्भिः सहितो भूत्वा ] मीळ्हे ( =संग्रामे ) [ अपां=यज्ञयागादिकर्मकर्तॄणां ] जामिभिः ( =बन्धुभिः ) अजामिभिर्वा ( =अबन्धुभूतैर्वा ) [ युद्धार्थं ] समजाति ( =संगतो भवति=तैः सह युद्ध्यते ) [ तदा स ] अपां तोकस्य तनयस्य ( =कर्मकर्तॄणाम्=उपासकानां ) तोकस्य तनयस्य ( =पुत्रस्य पौत्रस्य च ) जेषे ( =जयाय ) [ भवति ] । [ स ] मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु ( =अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । यदा देवभजकाः स्वकीयैर्बन्धुभिः सह अबन्धुभूतैः परैः सह वा युध्यन्ते तदेन्द्रो मरुद्भिः सहागत्य स्वोपासकानां पक्ष्यो भूत्वा तैर्बन्धुभिः सह परैः सह वा स्वयमेव युध्यते उपासकानां पुत्रपौत्रादीनां यथा जयो भवति तथा करोति ।

अपां तोकस्य तनयस्येति वाक्यं पुनरस्पष्टार्थकम् । यथा पुनः उषःशब्दार्थे उष् शब्दः प्रयुज्यते तथा कर्मोपेतयजमानार्थकस्य अपःशब्दस्य स्थाने अप्शब्दो न संभवतीति न । अप्शब्दस्य कर्मोपेतयजमानार्थकत्वम् उक्तं सायणेनापि मन्त्रान्तरभाष्ये । शोचिर्वसानः पर्यायुरपां श्रियो मिमीते बृहतीरनूनाः ३. १. ५. इत्यत्र हि यदुक्तं तेन तद् द्रष्टव्यम् ।

एतां सायण एवं व्याख्यातवान् । पुरुहूतो बहुभिर्यजमानैराहूतः स इन्द्रो मीळ्हे संग्रामे । मीळ्हमिति धननाम । तद्धेतुत्वात्संग्रामोपि मीळ्हशब्देनोच्यते । जामिभिर्बन्धुभिरजामिभिर्वा बान्धवरहितैर्वैर्युद्धार्थं मरुद्भिः सह यत्रदा समजाति संगच्छते । तेषामुभयविधानामपामिन्द्रं प्राप्नुवतां पुरुषाणां तोकस्य पुत्रस्य तनयस्य तत्पुत्रस्य च जेषे जयप्राप्तये स इन्द्रो भवति । किमु वक्तव्यमस्माकं स्तोतृतमानां जयो भवतीति । अन्यत्समानम् । इति ॥

११. तो बहुभक्त [ इंद्र ] जेव्हां [ आपल्या ] शीघ्रगामी [ मरुतां ]सहित जाऊन युद्धांत बांधवांशीं अथवा अबांधवांशीं लढूं लागतो, [ तेव्हां ] उपासकांच्या पुत्रपौत्रांचा जय होतो. [ तो ] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

11. When he who is worshipped by many, he [accompanied] by [his] swift [Maruts], joins in battle with the [worshippers] kinsmen or with [their] foes, he confers victory on the worshippers' sons and grandsons. May [that] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

---

११. 'जर कोणी उपासकजनांचे पुत्रपौत्र आपल्या भाऊबंदांबरोबर अथवा परकी शत्रूंबरोबर लढूं लागले तर त्या उपासकांच्या पुत्रपौत्रांच्या पक्षाला इंद्र आपल्या चपळ मरुतांला घेऊन मिळतो आणि त्या उपासकांच्या पुत्रपौत्रांचा जय होई असें करितो. म्हणजे इंद्र आपल्या उपासकांच्या पक्षानें युद्ध करून त्यांचा जय करून देईल यांत नवल नाहीं, पण त्यांचे पुत्रपौत्रांचाहि पक्ष धरून तो युद्ध करितो आणि त्यांला जय प्राप्त करून देतो. तर असा जो इंद्र तो मरुतांसहित येऊन आमचें संरक्षण करो.'

'बहुभक्त'='पुरुहूतः.' अक्षरशः अर्थ 'बहुतांनीं ज्याचा धांवा केलेला असतो तो.' प्राचीन काळीं भक्ति करणें म्हणजे तिचा मुख्य प्रकार आवाहन करून आहुति देणें हा असे म्हणून पुरुहूत याचा अर्थ ज्याचे भक्त पुष्कळ आहेत तो, इतकाच होतो.

'उपासकांच्या पुत्रपौत्रांचा जय होतो'='अपां तोकस्य तनयस्य जेषे.' अक्षरशः अर्थ, 'उपासकांच्या पुत्राच्या [आणि] पौत्राच्या जयाला [होतो].' 'अपाम्' याचा उपासकांचा असा अर्थ केला आहे त्याविषयीं वादाला स्थळ नाहीं असें आमच्यानें म्हणवत नाहीं, पण दुसरा निर्वाहाचा मार्ग दिसत नाहीं. सायणांनींहि यासारिखाच कांहीं निर्वाह केला आहे. 'अप्' शब्दाचा अर्थ कर्म असा सायणांनीं दुसऱ्या कितीएक मंत्रांत केला आहे. आणि 'कर्म करणारा,' 'यजमान,' 'उपासक' असाहि केलेला आहे. ऋ.१.१५८.६; १.१३५.६; १.१८४.३ आणि ३.१.५ यांवरील सायणभाष्य पहा.

या मंत्राचे पहिले तीन चरण पहा कसे बहुतकरून श्लोकाप्रमाणेंच म्हणतां येतात.

स जामिभिर्यत्समजाति मीळ्हे<br>
अजामिभिर्वा पुरुहूत एवैः ।<br>
अपां तोकस्य तनयस्य जेषे ।

स वज्रभृद्दस्युहा भीम उग्रः सहस्रचेताः शतनीथ ऋभ्वा ।
चम्रीषो न शवसा पाञ्चजन्यो मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥१२॥

सः । वज्रऽभृत् । दस्युऽहा । भीमः । उग्रः । सहस्रऽचेताः । शतऽनीथः । ऋभ्वा ।
चम्रीषः । न । शवसा । पाञ्चऽजन्यः । मरुत्वान् । नः । भवतु । इन्द्रः । ऊती ॥ १२ ॥

तस्य वज्रः क्रन्दति स्मत्स्वर्षा दिवो न त्वेषो रवथः शिमीवान् ।
तं सचन्ते सनयस्तं धनानि मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ १३ ॥

तस्य । वज्रः । क्रन्दति । स्मत् । स्वःऽसाः । दिवः । न । त्वेषः । रवथः । शिमीऽवान् ।
तम् । सचन्ते । सनयः । तम् । धनानि । मरुत्वान् । नः । भवतु । इन्द्रः । ऊती ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१२. स [ इन्द्रो ] वज्रभृत् ( ="अन्यैर्भर्तुमशक्यस्य वज्रस्य भर्ता" ) दस्युहा ( =शत्रूणां हन्ता ) भीमः ( =भयंकरः ) उग्रः ( =प्रबलः ) सहस्रचेताः ( =सहस्रोपलक्षितैरसंख्यैश्चेतोभिरुपेतः ) शतनीथः ( =शतोपलक्षितैर्बहुभिः प्रापणैर्धनादीष्टप्रापणसाधनैर्युक्त ) ऋभ्वा ( =महान् ) [ भवति ] । [ स ] चम्रीषो न ( =सोम इव ) पाञ्चजन्यः ( =गन्धर्वा अप्सरसो देवा असुरा रक्षांसीति पञ्चजनानां रक्षको ) [ भवति ] । [ स ] मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु (=अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु ) ॥

१३. तस्य [ इन्द्रस्य ] स्वर्षाः ( =सर्वस्य धनस्य दाता ) शिमीवान् ( =कर्मयुक्तः=सकलपराक्रमयुक्तो ) वज्रः ( =एतन्नामकमायुधं ) दिवस्त्वेषो रवथो न (=द्युलोकस्य प्रदीप्तो वैद्युतो नाद इव ) स्मत् क्रन्दति ( =महान्तं नादं बहु करोति ) । तं सनयः सचन्ते ( =तं दानानि सेवन्ते ) तं [ च ] धनानि [ सचन्ते ] ( =तं सकलानि धनानि सेवन्ते=सकलान्यपि दातव्यानि तथेतराणि धनानि नित्यमेव तस्य हस्ते भवन्ति ) । [ स ] मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु ( =अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु ) ॥

१२. तो वज्रातें धारण करणारा, दस्यूंतें मारणारा, भयंकर, महाप्रतापी, सहस्रप्रज्ञ, शतोपाय, [ आणि ] महान् [ होय ]. [तो] सोमाप्रमाणें [ आपल्या ] बळाच्या योगेंकरून पंचजनांचा धनी [ होय ]. [ तो ] मरुतांसहित इन्द्र आमचा संरक्षिता होओ.

12. He [is] the holder of the thunderbolt, the killer of the Dasyus, dreadful, almighty, possessed of one thousand minds, possessed of one hundred means, [ and ] great. [ He is the ] lord of the five tribes like Soma. May [ that ] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

१३. त्याचें सकळ धनप्रद [ आणि ] महापराक्रमी वज्र द्युलोकाच्या देदीप्यमान नादाप्रमाणें मोठा आणि गंभीर नाद करितें. संपत्ति त्याच्या सेवेंत तत्पर आहेत, धनें त्याच्या सेवेंत [ तत्पर आहेत ]. [ तर तो ] मरुतांसहित इंद्र आमचा संरक्षिता होओ.

13. His thunderbolt, the giver of all wealth [ and ] renowned for its exploits, rumbles aloud like the glowing thunder of heaven. On Him [all] gifts attend, on Him all wealth. May [ that ] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

---

१२. ' जो कोणालाहि धरतां न येणारें वज्र धारण करीत असतो, जो सकळ अनार्य शत्रूंला मारून टाकितो, जो आपल्या प्रतापानें भयंकर होय, जो महाबळवान् होय, जो मनुष्याप्रमाणें एकच प्रज्ञेनें युक्त नसून सहस्र प्रज्ञांनीं भरलेला होय, ज्याच्या मनांत येईल तर पाहिजे तो लाभ करून देण्याकरितां जो शेकडो उपाय करणारा होय, जो मोठा होय, जो सोमदेवाप्रमाणें आपल्या पराक्रमानें पंचजनांचा प्रभु होय–तो इंद्र मरुतांसहित येऊन आमचें संरक्षण करो.'

' दस्यूंतें मारणारा '=' दस्युहा.' म्हणजे कोळी, खोंड, भिल्ल इत्यादिक ज्या अनार्य जाति आर्य जनांस उपद्रव करणाऱ्या त्यांचा नाश करणारा. किंवा साधारण ' शत्रूंला मारणारा ' इतकाच अर्थ घेतला तरी चालेल; मग ते शत्रु दैविक असोत अथवा मानुष असोत. सू. ३३, मं. ४ आणि त्याजवरील आमची टीप पहा.

' शतोपाय '=' शतनीथः.' म्हणजे शेकडो उपायांनीं इच्छिलेल्या ठिकाणीं नेणारा.

**यस्याजस्रं शवसा मानमुक्थं परिभुजद्रोदसी विश्वतः सीम् ।**
**स पारिषत्क्रतुभिर्मन्दसानो मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥ १४ ॥**

यस्य । अजस्रम् । शवसा । मानम् । उक्थम् । परिऽभुजत् । रोदसी इति । विश्वतः । सीम् ।
सः । पारिषत् । क्रतुऽभिः । मन्दसानः । मरुत्वान् । नः । भवतु । इन्द्रः । ऊती ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१४. यस्य उक्थम् ( =? उक्थ्यं=शंसनीयं=स्तोतव्यं ) मानं ( =महित्वं=महिमा ) शवसा ( =बलेन=मानं महिमा तथा बलं ) रोदसी ( =द्यावापृथिव्यौ ) विश्वतः सीं ( =सर्वस्मादपि प्रदेशाद् ) अजस्रम् ( =अनवरतं ) परिभुजत् ( =परिवेष्टयति= सर्वतः परिवेष्ट्य पालयति ) स [ इन्द्रः ] क्रतुभिर्मन्दसानः (=अस्माभिः क्रियमाणैः कर्मभिस्तृप्तः सन् ) [ नः ] पारिषत् ( =पारयतु=विपद्भिरहितं देशं नयतु ) । [ स ] मरुत्वात् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु ( =अस्माकमूतये भवतु= मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु ) ॥

उक्थशब्द उक्थ्यवत्स्तुत्यशब्देनास्माभिः सायणमनुसरद्भिर्व्याख्यातः । स चार्थो न संभवेदिति न । अथवा यस्य महिमा च बलं च तयोः प्रकाशकं स्तोत्रं च द्यावापृथिव्यौ परिवेष्टयतीति संयोजनीयम् ॥

---

'सोमाप्रमाणें '=' चम्रीषो न.' 'चम्रीष' म्हणजे 'प्याल्यांत घातलेला' म्हणजे सोमरस, त्यावरून सोमदेव. येथें इंद्राला सोमाची उपमा दिली आहे त्यावरून सोमाची योग्यता किती मोठी आहे ती दिसून येते.

'पंचजनाचा धनी '=' पाञ्चजन्यः.' 'पञ्चजन' हे कोण याविषयीं विवाद असलेला सू. ८९, मं. १० याजवरील मराठी टीकेंत सांगितला आहे. देवादिक जे सकळ जन त्यांचा स्वामी असा अर्थ कवीच्या मनांत आहे असें दिसतें.

१३. 'ज्या इंद्राचें महा उदार आणि महापराक्रमी वज्र द्युलोकांतील देदीप्यमान विद्युद्रूप नादाप्रमाणें प्रचंड आणि गंभीर नाद करीत असतें, आणि ज्याच्या सेवेंत सकळ संपत्ति आणि सकळ धनें तत्पर असतात तो इंद्र मरुतांसहित येऊन आम्हांस रक्षो.'

'सकल धनप्रद '=' स्वर्षाः.' वज्राला हें विशेषण लाविलें यांत नवल नाहीं. त्याला 'नर्य' (=मनुष्यांचें कल्याण करणा-

१४. ज्याचा स्तवनीय महिमा [आणि] प्रताप भूलोकाला आणि द्युलोकाला चोहोंकडूनहि नित्य व्यापून राहत असतो, तो [इन्द्र] [आमच्या] कर्मांच्या योगेंकरून तृप्त [होऊन] [आम्हांला] तारो. [तो] मरुतांसहित इन्द्र आमचा संरक्षिता होओ.

14. He whose praise-worthy greatness and power ever surround heaven and earth even on all sides,—may He, pleased with our actions, save [us]. May [that] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

रें) 'धैर्यपरिपूर्ण' (=धृष्णु) इत्यादि सचेतनाला योग्य अशीं विशेषणें ऋग्वेदांत पुष्कळ लाविलेलीं आढळतात (ऋ. १०. ७४. ५ आणि १०. २२. ३ इत्यादि अनेक मंत्रांत दिलेलीं आहेत).

'द्युलोकाच्या देदीप्यमान नादाप्रमाणें' ='दिवो न त्वेषो रवथः.' वज्र म्हणजे जरी वस्तुतः द्युलोकांतील विद्युल्लतेवरोवर होणारा मेघध्वनिच होय तरी येथें इंद्राच्या वज्राला एक घटकाभर रूपकाला विसरून स्वतंत्र अस्तित्व आहे असें क्षणभर कल्पून, वज्र द्युलोकाच्या नादाप्रमाणें प्रचंड नाद करितें असें येथें सांगितलें आहे.

वृत्तानुसारेंकरून पहिल्या चरणांत 'सुअर्षाः' असें म्हणावें लागतें.

१४. 'ज्या इंद्राचें स्तुत्य बळ आणि मोठेपण हीं इतकीं मोठीं असतात कीं, तीं सदैव चोहोंकडून पृथिवी आणि द्युलोक यांस परिवेष्टून राहतात; तो इंद्र आम्हीं केलेलीं यागादिक कर्में मान्य करून घेऊन प्रसन्न होओ आणि आम्हांला तारो. तो इंद्र मरुतांसहित येऊन आम्हांस संरक्षो.'

'स्तवनीय'='उक्थम्.' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. भाषा पहा.

'कर्मांच्या योगेंकरून'= क्रतुभिः.' कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'क्रतु' शब्दाचा अर्थ वेदांत कर्म अथवा याग असा होत नाहीं असें म्हणतात; प्रज्ञा, बुद्धि, कौशल्य असेच अर्थ होतात असें समजतात. पण जरी बहुतकरून सर्व मंत्रांत ते अर्थ होतात हें खरें आहे तरी 'क्रतु' म्हणजे 'कर्म' अथवा 'कर्म करणारा' असाहि केव्हां केव्हां अर्थ सायणांनीं केल्याप्रमाणें होत असतो असें आम्हांस वाटतें.

**न यस्यं देवा देवता न मर्ता आपश्चन शवसो अन्तमापुः ।**
**स प्ररिक्वा त्वक्षसा क्ष्मो दिवश्च मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥**
**॥ १५ ॥ १० ॥**

न । यस्यं । देवाः । देवता । न । मर्ताः । आपः । चन । शवसः ।
अन्तम् । आपुः ।
सः । प्रऽरिक्वा । त्वक्षसा । क्ष्मः । दिवः । च । मरुत्वान् । नः । भ-
वतु । इन्द्रः । ऊती ॥ १५ ॥ १० ॥

**रोहिच्छ्यावा सुमदंशुर्ललामीर्द्युक्षा राय ऋज्राश्वस्य ।**
**वृषण्वन्तं बिभ्रती धूर्षु रथं मन्द्रा चिकेत नाहुषीषु विक्षु ॥१६॥**

रोहित् । श्यावा । सुमत्ऽअंशुः । ललामीः । द्युक्षा । राये । ऋज्रऽअं-
श्वस्य ।
वृषण्ऽवन्तम् । बिभ्रती । धूःऽसु । रथम् । मन्द्रा । चिकेत । नाहु-
षीषु । विक्षु ॥ १६ ॥

---

## भाषायाम्.

१५. यस्य [ इन्द्रस्य ] शवसः अन्तं ( =बलस्यावसानं ) देवता ( =दिव्यजनानां मध्ये ) न देवा आपुः ( =देवा अपि न लब्धवन्तः=न जानन्ति ) न मर्ताः (=मरणधर्माणो मनुष्या न ) [ आपुर्जानन्ति ] आपश्चन (=उदकान्यपि न ) [ आपुर्जानन्ति ] स त्वक्षसा ( =आत्मीयेन तेजसा ) क्ष्मश्च दिवश्च ( =पृथिव्या द्युलोकस्य च ) प्ररिक्वा ( =रेचको=व्याप्ता ) मरुत्वान् इन्द्रः ( =मरुद्भिर्युक्त इन्द्रो ) नः ऊती भवतु ( =अस्माकमूतये भवतु=मरुद्भिः सहागत्यास्मान् रक्षतु ) ॥

१६. रोहित् ( =रोहितवर्णा ) श्यावा ( =श्यामवर्णा ) सुमदंशुः ( =शोभनांशुः=अतिदीर्घावयवा ) ललामीः ( =शिरोभूषणवती ) द्युक्षा ( =दिवि कृतनिवासा) [ इन्द्रस्य ] मन्द्रा ( =आह्लादकारिणी ) [ अश्वमाला ] वृषण्वन्तम् ( =वीरवन्तम् = अन्तरुपविष्टेन्द्रं ) रथम् ( =इन्द्रस्य रथम् ) ऋज्राश्वस्य राये ( =ऋज्राश्वर्षेधनाय= ऋज्राश्वाय धनं दातुं) धूर्षु बिभ्रती (युगसंबन्धिषु वहनप्रदेशेषु वहन्ती) नाहुषीषु विक्षु चिकेत ( =मनुष्येषु ज्ञायते=तं रथमानयन्ती मनुष्यैर्दृश्यते ) ॥

१५. ज्याच्या बळाचा अंत द्युलोकांमध्यें देवांला [लागलेला] नाहीं, मर्त्य मनुष्यांस [लागलेला] नाहीं आणि उदकांलाहि लागलेला नाहीं, तो [इंद्र] [आपल्या] तेजानें पृथिवी आणि द्युलोक यांस व्यापून टाकणारा [होय]. [तो] मरुतांसहित इन्द्र आमचा संरक्षिता होओ.

15. He the end of whose power neither the Gods among the immortals, nor mortals, nor even the waters have attained, He the surrounder of Earth and Heaven with [his] light—may [that] Indra accompanied by the Maruts stand for our protection.

१६. आरक्त वर्णाची [आणि] श्याम वर्णाची, अंगानें भरलेली, कपाळावर अलंकार असलेली [आणि] स्वर्गीं वास करणारी इंद्राची आनंदकारक [अश्वमालिका] इंद्राला रथांत घालून तो रथ धुरांस आपल्या माना देऊन ऋज्राश्वाला संपत्ति [देण्यासाठीं] ओढून आणीत असतांना लोकांस दृष्टी पडत असते.

16. [Indra's] joyful [horses],[some] red, [some] dark, of developed limbs, wearing ornaments on the heads, [and] living in heaven, are known among the neighbouring people to bring with [their shoulders to] the yoke the chariot [of Indra] with that hero in it, for [to give] wealth to Ṛijrâs'va.

---

१५. भावार्थः—' जो इतका बळवान् आहे कीं त्याचें बळ किती आहे त्याचा अंत देवांस, मनुष्यांस आणि उदकादिकांसहि लागला नाहीं तो भूलोकाचा आणि द्युलोकाचा व्यापी इंद्र मरुतांसहित येऊन आमचें संरक्षण करो.'

देव, मर्त्य आणि उदकें म्हणून सांगितलें याचा अभिप्राय द्युलोक, भूलोक आणि अंतरिक्ष यांस अंत लागला नाहीं असा आहे. कारण द्युलोकांत देव राहतात, भूलोकावर मनुष्य आणि अंतरिक्षांत मेघरूपानें उदकें राहतात म्हणून 'आपः' हें अंतरिक्षाचें नांव आहे.

' देवांमध्यें '=' देवता.' या अर्थाला प्रमाण ऋ. १०. ४९. २ आणि त्यावरील भाष्यांत मिळेल.

१६. ' या मंत्राचा भावार्थ असा आहे की इंद्राचे कितीएक घोडे आरक्त

वर्णाचे आहेत, आणि कितीएक काळ्या रंगाचे आहेत. तर मी जो इंद्राचा भक्त ऋज्राश्व त्याला धन देण्यासाठीं ते अश्व केव्हां केव्हां इंद्राचा रथ वाहून आणितात. आणि अशा प्रकारें इंद्र रथांत बसून मजकडे येत असतो तो माझ्या शेजाऱ्यांनीं पाहिला आहे.'

'अंगानें भरलेली'='सुमदंशुः.' सुमत् + अंशुः ह्याचा सु + अंशुः= शोभनांशुः असा अर्थ आहे. मात्र अंशुशब्दाचा अर्थ सायणाप्रमाणें अंश म्हणजे भाग असा समजला पाहिजे.

'कपाळावर अलंकार असलेली'= 'ललामीः.' म्हणजे 'कपाळावर घालण्याचे जे घोड्यांचे अलंकार असतात ते घातलेली.' कोतवाल घोडा समारंभांमध्यें मिरवीत नेतात त्याला आणि जुन्या चालीचें सामान घालून बसावयाच्या घोड्याला अजूनहि रुप्याचे अथवा रुप्याच्या मुलाम्याचे अलंकार कपाळावर बांधण्याची चाल अतिपुरातन काळीं आपल्या देशांत होती तशीच आहे.

'अश्वमालिका.' म्हणजे घोड्यांची हार, म्हणजे अनेक घोडे. अश्वमालि हा शब्द सायणास अनुसरून आम्हीं येथें अध्याहृत घेतला आहे. अशा प्रकारचा कांहीं तरी अध्याहार केल्याशिवाय निर्वाह दिसत नाहीं.

'धुरांला आपल्या माना देऊन लोटून आणितात'= 'धूर्षु बिभ्रती.' रथाच्या ज्या धुरा त्या मानेवर घेऊन रथ ओढून आणणाऱ्या.

'ऋज्राश्व.' 'पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ऋज्राश्व हा (सायणाप्रमाणें) एक क्षत्रीय जातीचा ऋषि असून तो या सूक्ताचा कर्ता आहे. ऋज्राश्वाविषयीं ऋग्वेदांत च्यार पांच स्थळींच उच्चार आलेला आहे. ऋ. १. ११६. १६ यांत असें सांगितलें आहे कीं, ऋज्राश्व हा वृषागिर राजाचा पुत्र होय. एके समयीं अश्वी देव जो आपल्या रथाला गाढव जोडीत असतात तो लांडगीचें रूप घेऊन ऋज्राश्वाजवळ आला असतां ऋज्राश्वानें त्या लांडगीला नगरवासी जनाचे एकशें एक मेंढे कापून खावयाला घातले. तेव्हां नगरवासी जनाची हानि केली म्हणून वृषागिर राजानें ऋज्राश्वाचे डोळे फोडून टाकिले. तेव्हां ऋज्राश्वानें अश्वी देवांची स्तुति केल्यावरून त्यांनीं त्यास पुनः दृष्टि दिली. सू. ११७, मंत्र १७ व १८ पहा.

हा मंत्र खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटला पाहिजे.

> रोहिच्छॅयावा सुमदॅशुर्ललामीर्
> दिउक्षॉ राये ऋजराशुअस्य ।
> वृषण्वॅन्तं बिभ्रतॉ धूर्षु रॅथं
> मन्द्रा चिकेॅत नॉहुषीषु विक्षु ॥

'ऋज्राश्वस्य' याच्या ऐवजीं 'ऋजराशुअस्य' असें म्हणावें लागतें आणि तसें म्हणण्यांत ऱ्हस्वदीर्घांची विशेष ओढाताण होत नाहीं. ज्या कवितेमध्यें अशा प्रकारचे स्वाभाविक अपवाद वृत्तनिय-

माला पुष्कळ दिसून येतात ती बहुतकरून चालू भाषेंत म्हणजे सर्व लोक जी भाषा बोलतात तींत रचिलेली असते. कालिदासाच्या कवितेपेक्षां तुकारामाच्या अभंगांत ऱ्हस्वदीर्घांचे, अक्षरसंख्येचे आणि अनुस्वारविसर्गांचे वगैरे अपवाद अधिक दृष्टीस पडतात. मोरोपंताच्या आर्यांपेक्षां पोवाडे आणि लावण्या यांत तसले अपवाद अधिक सांपडतील. कालिदासानें आपलीं संस्कृत काव्यें रचिलीं तेव्हां संस्कृत भाषा साधारण लोकांत चालू नव्हती आणि संस्कृत शब्दांचा वगैरे भरणा करून विद्वज्जनाच्या मनोरंजनासाठीं ज्या भाषेंत मोरोपंतांनीं कविता लिहिल्या तसली मराठी भाषाहि त्याच्या वेळीं कोणी बोलत नव्हते. या कवितेंत ह्रस्वदीर्घांचे वगैरे नियमांला पुष्कळ अपवाद आहेत. ती ही वेदसूक्तांची कविता रचली गेली तेव्हां आर्य लोक संस्कृत भाषा बोलत असतील, या अनुमानाला दुसरींहि प्रमाणें आहेत. त्यांतून एक हें होय कीं वेदसूक्तामध्यें लांब लांब समास नसून त्यांची जी भाषा ती कृतक दिसत नाहीं. तर साधारण लोकांला समजण्यासारिखी सुलभ आहे. दुसरें असें कीं आलीकडील संस्कृतांत जे कठिण कठिण संधि होतात ते वेदांत बहुतकरून होत नाहींत आणि साधारण संधि सुद्धा केव्हां केव्हां मुळींच होत नसतात.

एतत्त्यत्त इन्द्र वृष्णं उक्थं वार्षागिरा अभि गृणन्ति राधः ।
ऋज्राश्वः प्रष्टिभिरम्बरीषः सहदेवो भयमानः सुराधाः ॥ १७ ॥

एतत् । त्यत् । ते । इन्द्र । वृष्णे । उक्थम् । वार्षागिराः । अभि । गृणन्ति । राधः ।
ऋज्रऽअश्वः । प्रष्टिऽभिः । अम्बरीषः । सहऽदेवः । भयमानः । सुऽराधाः ॥ १७ ॥

---

इदमुक्तं भवति इन्द्रस्य कतिपया अश्वा लोहितवर्णाः कतिपयाश्च श्यामा भवन्ति । ते तस्य तत्सहितं रथम् ऋज्राश्वाय मह्यं धनं दातुमावहन्ति अतश् च मनुष्यैर्दृष्टा भवन्तीति ॥

अत्र अश्वमालेति पदम् अनुसायणमस्माभिरध्याहृतम् उपायान्तरस्यासद्भावात् ॥

---

## भाषायाम्.

१७. हे इन्द्र, एतत्त्यत् (=तदिदं) ते (=तव) उक्थं (=स्तोत्रं) राधः (=हविर्लक्षणमन्नं) [च] अभि गृणन्ति (=हविर्लक्षणमन्नं दत्त्वा स्तोत्रं स्तुवन्ति) वार्षागिरः (=वृषागिरो महाराजस्य पुत्राः), ऋज्राश्वः, अम्बरीषः, सहदेवः, भयमानः, सुराधाः [इत्येते] प्रष्टिभिः (=पार्श्वस्थैरनेकैरुपासकैः) [सहिताः] ॥

१७. तर हे इंद्रा, हें तुझें स्तोत्र वृषागिराचे पुत्र ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान [आणि] सुराध आणि त्यांचे सखे तुज समर्थाप्रत गाऊन तुला हवि अर्पण करीत आहेत.

17. This then O Indra, is the hymn the sons of Vṛishâgir Ṛijrâs'va Ambarîsha, Sahadeva, Bhayamâna [ and ] Surâdhas and their companions sing, and offer their oblation unto thee a hero.

---

१७. सूक्ताचा उपसंहार समीप आला, त्याला अनुलक्षून या ऋचेचा अर्थ केला पाहिजेः—'हे इंद्रा, वृषागिर राजाचे पुत्र असे जे आम्ही ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान, आणि सुराध ते आमच्या मित्रांसहित तुझी स्तुति गाऊन तुला हवि अर्पण करीत आहों. कारण कीं तूं सामर्थ्यानें परिपूर्ण आहेस.'

हें सूक्त ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान आणि सुराध या पांचजणांनीं मिळून केलें असें सूक्तारंभीं जें आम्हीं अनुक्रमणिकेस अनुसरून सांगितलें त्याचें कारण या मंत्रांत आहे. तें हें कीं, यांत ऋज्राश्व, अंबरीष, सहदेव, भयमान आणि सुराध हीं सूक्तगायकांचीं नांवें आलीं आहेत. पण वस्तुतः या पांचहि जणांनीं मिळून सूक्त रचिलें असें समजणें अवश्य नाहीं. यांतून कोणी तरी एकानें सूक्त रचून जे त्याचे अंबरीषादिक बंधु उपासनेंत त्याजबरोबर प्रवृत्त असतील, त्यांचीं नांवें त्यानें आपल्याबरोबर घातलीं असावीं. या पांचहि ऋषींनीं मिळून हें सूक्त केलें अशाविषयीं या मंत्राशिवाय या सूक्तांतील दुसऱ्या कोणत्याहि मंत्रावरून समजण्यास अथवा कल्पण्यास कांहीं आधार नाहीं.

या मंत्राची वृत्तरचना समजण्यास खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटलें पाहिजेः—

एतत्यॅत्ते इन्दर वृष्ण उक्थम्<br>
वार्षागिरा अभि गृणन्ति राधः ।<br>
ऋज्जॅरॉश्वः प्रष्टिभिरम्बरीषः<br>
सहॅदॅवो भयमॉनः सुराधाः ॥

दस्यूञ्छिम्यूँश्च पुरुहूत एवैर्हत्वा पृथिव्यां शर्वा नि बर्हीत् ।
सनत्क्षेत्रं सखिभिः श्वित्न्येभिः सनत्सूर्यं सनदपः सुवज्रः॥१८॥

दस्यून् । शिम्यून् । च । पुरुऽहूत । एवैः । हत्वा । पृथिव्याम् । शर्वा । नि । बर्हीत् ।
सनत् । क्षेत्रम् । सखिऽभिः । श्वित्न्येभिः । सनत् । सूर्यम् । सनत् । अपः । सुऽवज्रः ॥ १८ ॥

विश्वाहेन्द्रो अधिवक्ता नो अस्त्वपरिह्वृताः सनुयाम वाजम् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ १९ ॥ ११ ॥

विश्वाहा । इन्द्रः । अधिऽवक्ता । नः । अस्तु । अपरिऽह्वृताः । सनुयाम । वाजम् ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ १९ ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

१८. पुरुहूतः (=बहुभिराहूत) [इन्द्रः] एवैः (=शीघ्रैर्मरुद्भिः) [सहायैः] दस्यून् शिम्यून् च ("उपक्षययितॄन् शत्रून् शिम्यूंश्च शमयितॄन् वधकारिणो राक्षसादींश्च") हत्वा शर्वा (=वज्रेण) पृथिव्यां नि बर्हीत् (=भूम्युपरि नितरामवधीत्)। [तथा कृत्वा] श्वित्न्येभिः सखिभिः (=श्वेतैस्तेजस्विभिर्मरुद्रूपैर्मित्रैः) [सहित इन्द्रः] क्षेत्रं सनत् (=शत्रूणां स्वभूतां भूमिं लब्धवान्) सूर्यं सनत् (=लब्धवान्) सुवज्रः (=शोभनवज्रधारी) [इन्द्रः] अपः सनत् (=वृत्रेणापहृतान्युदकानि लब्धवान्)॥

१९. इन्द्रो विश्वाहा (=विश्वान्यहानि=नित्यं) नः अधिवक्ता (=अस्माकं पक्षपाती) अस्तु । [वयम्] अपरिह्वृताः (=निरुपद्रुताः) [सन्तो] वाजं सनुयाम (=अन्नं प्राप्नुयाम)। तत् (=तदेतत्=इन्द्रकर्तृकमस्माकमधिवचनम् अस्माभिर्वाजप्राप्तिं च) मित्रः वरुणः अदितिः सिन्धुः (=समुद्राभिमानी देवः) पृथिवी उत द्यौः (=पृथिवी द्युलोकश्च) नः मामहन्ताम् (=अस्मभ्यं रक्षन्तु=ददतु)॥

१८. बहुभक्त [इंद्रानें] द्वेष्ट्याला आणि शत्रूंला चपलगामी मरुतांच्या साहाय्यानें पृथिवीवर मारून वज्रानें भेदून टाकिलें. त्याणें आपल्या तेज:पुंज मित्रांच्या साहाय्यानें क्षेत्र घेतलें, सूर्य हरण करून घेतला, सुंदर वज्र धारण करणाऱ्या [ इंद्रा]नें उदकें हरण केलीं.

१९. इंद्र सदैव आमचा पक्षपाती होओ. [ आणि ] निरुपद्रव होऊन आम्ही अन्नाप्रत पावूं असें करो. आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू आम्हांला देओत.

18. Indra, whom many invoke, kills with his swift allies the thieves and the enemies and cuts them down on the earth. He conquers the field with his brilliant friends, he conquers back the sun, the wielder of the great thunderbolt conquers the waters.

19. Ever may Indra be our defender. May we unharmed attain food. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth, and Heaven confirm this unto us.

---

१८. इंद्रानें पूर्वी जे पराक्रम केले असें सर्वत्र प्रसिद्ध आहे, तशा प्रकारचे पराक्रम तो आमची ही स्तुति ऐकून अजूनहि करो, असें या मंत्राचें तात्पर्य आहे. मंत्रकर्ता म्हणतो, 'इंद्रानें पूर्वी अनार्यादिक शत्रूंस आणि वृत्रादिक असुरांस आपल्या मरुद्गणांच्या साहाय्यानें मारून टाकून भूमिगत केलें, आणि आपल्या उपासकांस शत्रूंची भूमि संपादन करून दिली, आणि वृत्रादिकांचा नाश करून सूर्यप्रकाशाचा आणि मेघोदकांचा लाभ करून दिला अशी प्रख्याति आहे. तर हे पराक्रम इंद्र आतांहि करो.' म्हणजे इंद्राची उपासना करणारे जे आमचे पूर्वज आर्य लोक त्यांच्या शत्रूंस म्हणजे भिल्ल, कोळी इत्यादिकांचे जे पूर्वज त्यांस मारून त्यांच्या स्वाधीन असलेला जो हा आमचा देश तो आर्य लोकांच्या हस्तगत करून दिला. आणि वृत्रादिक जे असुर मेघोदकांचा अवरोध करून त्यास आणि सूर्यकिरणांस पृथिवीवर पडावयास देत नसत, त्यांचा संहार करून मेघोदकें आणि सूर्यादिक तेजांचा प्रकाश हीं भूमीवर प्राप्त केलीं. इत्यादिक पराक्रम इंद्रानें पूर्वीच्या काळीं जसे केले तसे तो आतांहि करो.

आपले पूर्वज आर्य लोक या देशांत येऊन त्यांणीं येथील जे प्रथमचे अनार्य

## सूक्तम् १०१.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः । इन्द्रो देवता । अष्टम्याद्याश्चतस्त्रस्त्रिष्टुभः ।
शिष्टाः सप्त जगत्यः ।

**प्र मन्दिने पितुमदर्चता वचो यः कृष्णगर्भा निरहन्नृजिश्वना ।**
**अवस्यवो वृषणं वज्रदक्षिणं मरुत्वन्तं सख्याय हवामहे ॥ १ ॥**

प्र । मन्दिने । पितुऽमत् । अर्चत । वचः । यः । कृष्णऽगर्भाः । निःऽअहन् । ऋजिश्वना ।
अवस्यवः । वृषणम् । वज्रऽदक्षिणम् । मरुत्वन्तम् । सख्याय । हवामहे ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. [ हे ऋत्विजः], [ यूयं ] मन्दिने (=स्तुत्यर्हाय ) [ इन्द्राय ] पितुमद् वचः (=हविरन्नवत् स्तोत्रं ) प्रार्चत (=प्रकर्षेणोच्चारयत ) । य [ इन्द्र ] ऋजिश्वना (=एतन्नामकेन केनचिद् उपासकेन द्वारा ) कृष्णगर्भाः (=कृष्णवर्णापत्योपेता ) [ विशः ] [=अनार्यान् जनान् ] निरहन् (=निःशेषेणावधीत् ) । अवस्यवः (=रक्षणेच्छवो ) [ वयं ] वृषणं (=वर्षितारं=सामर्थ्योपेतं ) वज्रदक्षिणं (=दक्षिणकरे वज्रं धारयन्तं ) मरुत्वन्तं (=मरुद्भिर्युक्तम् ) [ इन्द्रं ] सख्याय हवामहे (=मित्रत्वायाह्वयामहे=स यथागत्यास्माकं मित्रो भवेत् तथाह्वयामः) ॥

लोक भिल्ल, कोळी इत्यादिक त्यांस जिंकून त्यांचा प्रदेश आपल्या हस्तगत करून घेतला आणि त्यांला रानोमाळ हाकून लाविलें. हा जो प्राचीन इतिहास त्याचें प्रमाण या मंत्रांत आहे.

' चपळगामी मरुतांच्या साहाय्यानें '= ' एवैः.' हा सायणानुसारें अर्थ आम्हांस दुसऱ्या कितीएक विद्वानांनीं केलेल्या अर्थापेक्षां विशेष प्रमाणसिद्ध दिसतो.

' तेजःपुंज मित्रांच्या साहाय्यानें '= ' श्वित्न्येभिः सखिभिः.' म्हणजे मरुतांच्या साहाय्यानें.

वृत्तसुखार्थ दुसऱ्या पादांत ' शर्वा ' याच्या ठिकाणीं ' शरुआ ' आणि 'श्वित्न्येभिः' याच्या ठिकाणीं ' श्वित्निएभिः ' असा उच्चार केला पाहिजे.

१९. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. ऋषि शेवटीं प्रार्थना करितो कीं, ' इंद्र

## सूक्त १०१.

ऋषि–अंगिरस्कुळांतील कुत्स या नांवाचा पुरुष. देवता–इंद्र. वृत्त–पहिल्या मंत्रापासून सातव्या मंत्रापर्यंत जगती; आठव्यापासून अकराव्या मंत्रापर्यंत त्रिष्टुभ्.

१. [ हे मित्र हो ], तुम्ही स्तुत्य [ इंद्रा]प्रत हव्ययुक्त स्तोत्र गा, जो [इंद्र ] ऋजिश्व्याच्या योगेंकरून काळया लोकांला मारून टाकिता झाला. रक्षणाची इच्छा करणारे [ जे आम्ही ते ] प्रबळ [ आणि] उजव्या-हातांत-वज्र-धारण-करणाऱ्या मरुद्युक्त इंद्रातें मैत्रीसाठीं बोलावितों.

## HYMN 10.

To *Indra*. By *Kutsa* of the family of *Angiras*. Metre—*Jagatî* except that of verses 8–11 which is *Trishṭubh*.

1. Sing ye a hymn accompanied by oblation to the praiseworthy [ Indra ], who destroyed the the black people through Ṛijis'van. Desiring protection we [ invoke ] puissant [ Indra ], who holds the thunderbolt in his right hand,—we invoke for friendship Indra accompanied by the Maruts.

---

सदैव आमचा कैवारी होओ, आणि आम्हांला अन्नाची प्राप्ति होओ, आणि त्याचा उपभोग निरुपद्रवेंकरून करितां येओ, आणि या गोष्टीचें मित्र, वरुण, अदिति, सिंधु, पृथिवी आणि द्युलोक हे आम्हांला दान देओत.'

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला तर श्लोकाप्रमाणें म्हणतां येतोः–

विश्वाहेन्द्रो अधिवक्ता नो अस्तु
अपरिह्वृताः सनुयाम वाजम् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्ताम्
अदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥

---

१. हें सूक्त इंद्राविषयीं आहे असें जरी सर्वानुक्रमणिकेंत आणि त्याजवरून आम्हीं वर सांगितलें आहे तरी वस्तुतः तें ' मरुत्वान् इंद्राविषयीं ' आहे. 'मरुत्वान् इन्द्र ' म्हणजे मरुतांसहित जो इंद्र तो. जसा नुस्ता महेश्वर वेगळा आणि उमामहेश्वर वेगळा आणि नुस्ता ' नारायण ' वेगळा आणि ' लक्ष्मीनारायण ' वेगळा; तसा नुस्ता इन्द्र वेगळा आणि मरुतांसहित इंद्र वेगळा होय.

या पहिल्या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, ' हे मित्रांनो, तुम्ही आज इं-

द्राला हवि अर्पण करून त्याचें स्तोत्र गा, कारण कीं त्याणें ऋजिश्व्याच्या द्वारें काळ्या लोकांला मारून त्यांचा विध्वंस केला. आम्हांला रक्षणाची इच्छा आहे यास्तव आम्ही त्याची स्तुति करून त्याणें आम्हांजवळ यावें आणि आमचा मित्र व्हावें अशी प्रार्थना करीत आहों. तर तो मरुतांला घेऊन येओ.'

'हव्ययुक्त स्तोत्र गा '=' पितुमत् वचः प्र अर्चत.' म्हणजे स्तोत्र गा आणि हव्य अर्पण करा. या ठिकाणीं 'पितु' या शब्दाचा अर्थ साधारण हविरन्न इतका आहे. परंतु पितुशब्दाचा अक्षरशः अर्थ पेय म्हणजे सोमादिक जे पिण्याचे पदार्थ ते असा आहे.

'ऋजिश्व्याच्या योगेंकरून काळ्या लोकांला मारून टाकिता झाला'='ऋजिश्वना कृष्णगर्भा [विशो] निरहन्.' म्हणजे ऋजिश्वा या नांवाचा जो भक्त त्याच्या हातून अनार्य कोळी भिल्ल इत्यादिक काळ्या लोकांला मारविता झाला. ऋजिश्वा याविषयीं सू. ५१, मं. ५ आणि सू. ५३, मं. ८ आणि त्यांजवरील टीपा पहा. त्यांजवरून दिसून येईल कीं ऋजिश्व्याच्या हातून अनार्य लोकांस इंद्रानें मारविलें असें वेदांत सांगितलें आहे. ऋ. ४. १६. १३ हाहि मंत्र पहा. 'कृष्णगर्भाः' या शब्दाचा अक्षरशः अर्थ 'ज्यांचीं पोरें काळीं आहेत अशा प्रजा' इतका आहे. आमचे पूर्वज आर्य लोक प्रथम या देशांत आले तेव्हां येथील कोळी, भिल्ल, खोंड इत्यादि लोकांपेक्षां ते फार गोरे असत त्यामुळें ते त्यांस काळे लोक असें म्हणत असत. सांप्रतकाळीं काळे लोक आणि गोरे लोक हे शब्द ज्या संबंधानें व्यवहारांत आले आहेत त्याप्रमाणेंच प्राचीन काळींहि त्यांचा प्रयोग आर्य लोकांनीं हा देश घेतला तेव्हां होऊं लागला. जे आर्य लोक या देशांतील मूळच्या लोकांस काळे लोक असें म्हणत त्यांच्याच वंशजांस परद्वीपस्थ लोक त्यांच्या प्रमाणेंच या देशांत येऊन जिंकतील आणि काळे लोक म्हणतील असें त्यांस वाटलें असेल काय ?

'मरुद्युक्त इंद्रातें बोलावितों '=' मरुत्वन्तं हवामहे.' म्हणजे इंद्रानें मरुतांसहित यावें अशी प्रार्थना करितों. 'मरुद्युक्त इंद्रातें मैत्रीसाठीं बोलावितों ' हा चवथा पाद या सगळ्या सूक्तभर पालवपदाप्रमाणें येत जाईल.

या मंत्राविषयीं इतकें सांगावयाचें आहे कीं स्त्रियांची गर्भापासून सुटका होत नसली तर ती सत्वर व्हावी म्हणून हा मंत्र म्हणण्याचा अथवा जपण्याचा प्रचार पडला आहे. परंतु हा मंत्र म्हटल्यानें प्रसव कसा त्वरित होईल याचा विचार केला तर, आणि गर्भमुक्ति होण्यासाठीं या मंत्राचा जप कां करितात त्याचा विचार केला तर, इतकेंच कारण दिसतें कीं या मंत्रांत 'गर्भ' शब्द आ-

ला आहे परंतु त्याचा अर्थ मातेच्या पोटांत असलेला गर्भ असा येथें होत नाहीं, आणि तसा होतो असें क्षणभर कल्पिलें तरी गर्भाची सुटका व्हावी अशाविषयीं यांत कांहींच अर्थ नाहीं. इतकेंच नव्हे, परंतु त्या गर्भाचा नाश होण्याविषयीं मात्र सांगितलें आहे. तेव्हां गर्भाची सुटका होण्याविषयींच्या जपाकडे या मंत्राचा विनियोग करणाऱ्याला काय म्हणावें ? परंतु वेदमंत्राचा विनियोग ज्या ज्या कामीं करितात त्या त्याविषयीं बहुतकरून सर्वत्र अशीच स्थिति आहे याविषयीं आम्हीं पूर्वी पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे.

हा मंत्र श्लोकवृत्ताला खालीं लिहिल्याप्रमाणें बसतोः–

प्र मंदिने पितुमदर्चता वचो
यः कृष्णगर्भा निरहन्नृजिश्वना ।
अवस्यवो वृषणं वज्रदक्षिणं
मरुत्वंन्तं सखिआय हवामहे ॥

**यो व्यंसं जाहृषाणेन मन्युना यः शम्बरं यो अहन्पिप्रुमव्रतम् ।**
**इन्द्रो यः शुष्णमशुषं न्यावृणङ्मरुत्वन्तं सख्याय हवामहे ॥ २ ॥**

यः । विऽअंसम् । जहृषाणेन । मन्युना । यः । शम्बरम् । यः । अहन् । पिप्रुम् । अव्रतम् ।

इन्द्रः । यः । शुष्णम् । अशुषम् । नि । अवृणक् । मरुत्वन्तम् । सख्याय । हवामहे ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. य [ इन्द्रो ] जर्हृषाणेन मन्युना (=प्रवृद्धेन क्रोधेन ) व्यंसम् (=एतन्नामानम् असुरम्) [ अहन् ], यः शम्बरम् (=एतन्नामानमसुरं), यः अव्रतं पिप्रुं (=य इन्द्रः कर्मरहितं पिप्रुनामकमसुरम् ) अहन् (=हतवान् ), य इन्द्रः अशुषं (=शुष्णं =सर्वेषां भक्षकं शुष्णनामकमसुरं ) नि अवृणक् ( =नितरां हतवान् ) [ तं ] मरुत्वन्तं ( =मरुद्भिः सहितम् ) [ इन्द्रं ] सख्याय ( =मित्रत्वाय=अस्माकं मित्रो यथा भवति तथा ) [ वयं ] हवामहे ( =आह्वयामः) ॥

२. जो [इंद्र] मोठया क्रोधानें व्यंसाला [ मारिता झाला]; जो शंबराला, जो धर्महीन पिप्रूला मारिता झाला; जो इंद्र [सर्व]भक्षक शुष्णाला समूळ नाहींसा करिता झाला, त्या मरुद्युक्त इंद्रातें आम्ही मैत्रीसाठीं बोलावितों.

2. He who [slew] Vyaṁsa with enraged anger, who [slew] S'ambara, who slew riteless Pipru,—Indra who cut down devouring S'ushṇa—we invoke for friendship that Indra accompanied by the Maruts.

२. ज्या ज्या असुरांला इंद्रानें मारल्याविषयीं प्रसिद्धि आहे त्यांच्या वधाविषयीं सांगून त्या इंद्राला मरुतांसहित आम्ही बोलावितों असें या मंत्राचें तात्पर्य आहे.

'व्यंस.' व्यंस या नांवाच्या असुराला इंद्रानें मारिलें असें ऋग्वेदांत साहा सात ठिकाणीं सांगितलें आहे. पण 'व्यंस' हा कोणता असुर व त्याला मारण्याचें प्रयोजन काय पडलें तें कोठें सांगितलेलें नाहीं. ऋ. ४. १८. ९; २. १४. ५; १. १०३. २ आणि ३. ३४. ३ हे मंत्र पहा.

'शंबर.' ऋ. १. ५१. ६; १. ५४. ४; १. ५९. ६ आणि त्यांजवरील आमच्या टीपा पहा.

'पिप्रु.' ऋ. १. ५१. ५ आणि त्याजवरील टीप पहा.

'शुष्ण.' ऋ. १. ३३. १२; ५६. ३; ६३. ३; ५१. ११; ५४. ५ आणि त्या मंत्रांवरील आमच्या टीपा पहा.

व्यंस, शंबर, पिप्रु, आणि शुष्ण ह्यांस इंद्रानें मारिलें अथवा आपल्या भक्तांच्या हातून मारविलें असें वेदांत सांगितलें आहे आणि ह्यांस मारिल्याविषयीं एकत्रच सांगितलेलें आढळतें आणि त्यांजबरोबर 'नमुचि' 'वृत्र' इत्यादि दुसऱ्यांस मारिलें त्यांचींहि नांवें येत असतात. सायणाचार्य ते सर्व असुर होत, त्यांस इंद्रानें मारिलें असें म्हणतात. तर हे असुर म्हणजे कोण? जेथें जेथें तीं नांवें येतात ते मंत्र वाचून पहातां ते कोणी अनार्य लोकांचे राजे असावे असें दिसतें. जसे कोणी शूर योद्धे होऊन गेले म्हणजे त्यांस मागाहून पुष्कळ काळ लोटल्यावर देव असें समजून आपण भजत असतों, तसे त्यांच्या विरुद्ध जे लढले असतील त्यांस आपण असुर असें समजतों. उदाहरणार्थ, दाशरथि राम आणि रावण; कृष्ण आणि कंस; भीम आणि हिडिंब इत्यादि. त्याप्रमाणेंच व्यंस, शंबर, पिप्रु, शुष्ण हे अनार्य लोकांचे कोणी राजे असावे आणि अनार्य लोकांचा विध्वंस करण्याच्या कामीं गुंतलेले जे दिवोदास, ऋजिश्वा इत्यादि इंद्रभक्त, त्यांस त्यांनीं फार उपद्रव दिला आणि त्या उपद्रवापासून

**यस्य द्यावापृथिवी पौंस्यं महद्यस्य व्रते वरुणो यस्य सूर्यः ।**
**यस्येन्द्रस्य सिन्धवः सश्चति व्रतं मरुत्वन्तं सख्याय हवामहे॥३॥**

यस्य । द्यावापृथिवी इति । पौंस्यम् । महत् । यस्य । व्रते । वरुणः ।
यस्य । सूर्यः ।

यस्य । इन्द्रस्य । सिन्धवः । सश्चति । व्रतम् । मरुत्वन्तम् । सख्याय ।
हवामहे ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. यस्य [ इन्द्रस्य ] महत् पौंस्यं (=प्रवृद्धं बलं) द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ=द्यौश्च पृथिवी च) [ अनु वर्तेते] यस्य व्रते (=नियमने ) वरुणो [ वर्तते ] यस्य [ व्रते नियमने ] सूर्यो [ वर्तते ] यस्येन्द्रस्य व्रतं (=नियमं ) सिन्धवः (=नद्यः=मेघोदकानि=मेघोदकोपलक्षिता अन्तरिक्षस्य प्रदेशाः) सश्चति (=सचन्ते =अनुसरन्ति ) [ तं ] मरुत्वन्तं (=मरुद्भिः सहितम् ) [ इन्द्रं ] सख्याय (=मित्रत्वाय=अस्माकं मित्रो यथा भवति तथा ) [ वयं ] हवामहे (=आह्वयामः) ॥

---

इंद्रानें आपल्या भक्तांची मुक्ति करून त्या अनार्य राजांला मारून टाकिलें. ही कथा लोकांच्या ऐकण्यांत इतिहासपरंपरेनें असावी आणि त्या अनार्य राजांस मारण्याला फार आयास पडले असावे त्यामुळें ते असुर होत अशी मागाहून कल्पना सहज होऊं लागली असावी. जो कोण मोठा असून आपणांस आवडतो आणि कांहीं तरी मोठें काम करून जातो तो कोणी देव अथवा देवांचा अवतार होय, आणि जो कोणी त्याविरुद्ध असेल तो असुर होय असें समजून त्याप्रमाणें वर्णन करणें हा प्रचार अजून चालूच आहे. शंकराचार्य होऊन गेले त्यांस शंकराचा अवतार असें आपण समजतों हें ठीकच आहे. पण गुजराथेंत गेल्या पन्नास साठ वर्षांत जो होऊन गेला, आणि 'स्वामी नारायण'-पंथाची स्थापना करून गेला, तो सहजानंद स्वामीहि कृष्णाचा अवतार होय असें 'सत्संगी' लोक मानूं लागले आहेत.

३. ज्याच्या मोठ्या बळाला द्यू आणि पृथिवी [ अनुसरतात ], ज्याच्या नियमांप्रमाणें वरूण [वर्ततो], ज्याच्या [ नियमांप्रमाणें ] सूर्य [ वर्ततो ], ज्याच्या नियमातें अंतरिक्षप्रदेश पाळीत असतात, त्या मरुद्युक्त इंद्रातें आम्ही मैत्रीसाठीं बोलावितों.

3. He whose vast power Heaven and Earth [obey], He in whose ordinance Varuṇa [remains], in whose [ordinance] Sûrya [walks], He whose ordinance the watery regions of the sky obey,— we invoke for friendship that Indra accompanied by the Maruts.

---

३. 'द्युलोकानें प्रकाश धारण करावा, पृथिवीनें सर्व भूतें धारण करावीं आणि अचल राहावें, असे जे इंद्रानें आपल्या अतिशय मोठ्या बळाच्या योगानें नियम केले आहेत त्या नियमांला सोडून द्युलोक आणि पृथिवी वागत नाहींत; वरुणानें रात्र प्रतिदिनीं उत्पन्न करून दिवसभर कष्टानें थकलेल्या प्राण्यांस विश्रांति द्यावी आणि ते निजले असतां पापी जनांचा उपद्रव त्यांस होऊं नये असें करावें असा जो इंद्रानें घालून दिलेला नियम त्यातें वरुण पाळीत असतो; प्रतिदिनीं मनुष्यांनीं आपापलीं कामें करावीं आणि चराचर सर्व भूतांनीं प्रकाशाच्या योगानें प्रफुल्लित व्हावें म्हणून सूर्यानें उगवत असावें आणि संध्याकाळपर्यंत आकाशांत क्रमण करीत असावें असा जो इन्द्रानें केलेला नियम तो सोडून सूर्य चालत नाहीं; पावसाळ्यांत मेघोदकांचा वर्षाव करावा आणि तेणेंकरून चराचर सर्व भूतांला जिवंत राखून वाढवावें आणि दुसऱ्या ऋतूंत उदकवर्षाव करूं नये असा जो नियम इंद्रानें अंतरिक्षप्रदेशांला घालून दिला आहे त्याप्रमाणेंच ते अंतरिक्षप्रदेश वागत असतात. तर असा जो महान् इंद्र तो मरुतांसह येऊन आमचा साहाय्यकर्ता होवो असें आम्ही प्रार्थीत आहों.'

'अंतरिक्ष प्रदेश'='सिन्धवः' सिंधुशब्दाचा अर्थ 'अंतरिक्ष' अथवा 'अंतरिक्षप्रदेश' असा कां होतो याविषयीं सू. ३५, मं. ८ याजवरील अंतरिक्ष शब्दावरची टीप पहा.

यो अश्वा॑नां॒ यो गवां॒ गोप॑ति॒र्वशी य आ॑रि॒तः कर्म॑णिकर्म॑णि स्थि॒रः।
वी॒ळोश्चि॒दिन्द्रो॒ यो असु॑न्वतो व॒धो म॒रुत्व॑न्तं स॒ख्याय॑ हवामहे॥४
यः । अश्वा॑नाम् । यः । गवा॑म् । गोऽप॑तिः । व॒शी । यः । आ॒रि॒तः ।
कर्म॑णिऽकर्म॑णि । स्थि॒रः ।
वी॒ळोः । चि॒त् । इन्द्रः॑ । यः । असु॑न्वतः । व॒धः । म॒रुत्व॑न्तम् । स॒-
ख्याय॑ । ह॒वा॒म॒हे ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. य [ इन्द्रः ] अश्वानां [ पतिः=स्वामी भवति ], यो वशी (=बलवान् ) गवां गोपतिः (=गवां स्वामी ) [ भवति ], यः स्थिरः (=निश्चल ) [ इन्द्रः ] कर्मणि-कर्मणि (=सर्वेष्वपि युद्धकर्मसु ) आरितः (=स्तुतिभिः प्रापितः=स्तुतो ) [ भवति], य इन्द्रो वीळोश्चित् (=दृढस्यापि ) असुन्वतः (=यागान् अननुष्ठातुर्जनस्य ) वधः (=मारको ) [ भवति ], [ तं ] मरुत्वन्तं (=मरुद्भिः सहितम् ) [ इन्द्रं ] सख्याय (=मित्रत्वाय=अस्माकं मित्रो यथा भवति तथा ) [ वयं ] हवामहे ( आह्वयामः) ॥

४. जो इंद्र अश्वांचा प्रभु, जो गोसंपन्न [ आणि ] बलाढ्य इंद्र गाईंचा प्रभु [ होय ], जो निश्चल इंद्र प्रत्येक कर्माच्या ठायीं स्तविला [ जातो ], जो इंद्र सोम न अर्पण करणाऱ्या प्रबळ जनांचाहि मारक [होय ], त्या मरुद्युक्त इंद्रातें आम्ही मैत्रीसाठीं बोलावितों.

4. He who is the lord of horses, that victorious Indra, who rich in cows is the lord of cows, who indomitable is approached with praises in every battle, Indra who is the destroyer of even the strong man who doth no sacrifice—we invoke for friendship that Indra accompanied by the Maruts.

४. ' जो इंद्र, युद्धांत अचल होय, आणि ज्याला सर्व समरांगणांत भक्त जन स्तोत्रानें आळवितात, जो शत्रूंला पराजित करून आपल्या स्वाधीन करून घेतो, आणि त्या शत्रूंच्या गाई आणि घोडे हरण करून गोसंपन्न आणि अश्वसंपन्न होतो, आणि जो इंद्र नास्तिक जन प्रबळ असतांहि त्यांचा नाश करण्याविषयीं समर्थ होतो, त्या इंद्राला साहाय्यार्थ आम्ही बोलावितों.'

'अश्वांचा प्रभु' आणि 'गाईंचा प्रभु.' म्हणजे युद्धांत शत्रूंचीं गुरें आणि घोडे जिंकून त्यांचा मालक होतो. 'प्रत्येक कर्माच्या ठायीं'=' कर्मणिकर्मणि.' येथें कर्म म्हणजे ' युद्धरूपी कर्म ' म्हणजे युद्धच, असा अर्थ आहे.

' सोम न अर्पण करणाऱ्या प्रबळ जनांचाहि मारक'=' वीळोश्चित् असुन्वतो वधः.' म्हणजे इंद्राची भक्ति करणारे जन कितीहि दुर्बळ असले तरी त्यांचें तो संरक्षण करितो आणि त्यांची भक्ति न करणारे जन कितीहि बलाढ्य असले तरी त्यांचा तो संहार करितो.

यो विश्वस्य जगतः प्राणतस्पतिर्यो ब्रह्मणे प्रथमो गा अविन्दत् ।
इन्द्रो यो दस्यूँरधराँ अवातिरन्मरुत्वन्तं सख्याय हवामहे ॥ ५ ॥

यः । विश्वस्य । जगतः । प्राणतः । पतिः । यः । ब्रह्मणे । प्रथमः । गाः । अविन्दत् ।
इन्द्रः । यः । दस्यून् । अधरान् । अव॒ऽअतिरत् । मरुत्वन्तम् । सख्याय । हवामहे ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. य [ इन्द्रो ] विश्वस्य (=सकलस्यापि ) जगतः प्राणतः (=जङ्गमस्य प्रश्वसतश्च भूतजातस्य ) पतिः (=स्वामी ) [ भवति ], य [ इन्द्रो ] ब्रह्मणे (=ब्रह्मकर्त्रे=स्तोतृजनाय ) प्रथमो गा अविन्दत् (=सर्वेभ्योपि देवेभ्यः पूर्वं गा अलभत प्रत्याहृतवान् ) [ अपि च ] य इन्द्रो दस्यून् (=उपक्षपयितॄन् असुरान् ) अधरान् अवातिरत् (=भूमौ पातयित्वा अवधीत् ), [ तं ] मरुत्वन्तं ( मरुद्भिः सहितम् ) [ इन्द्रं ] सख्याय (= मित्रत्वाय =अस्माकं मित्रो यथा भवति तथा ) [ वयं ] हवामहे ( आह्वयामः) ॥

ब्रह्मणे गा अविन्ददित्यत्र गोशब्देन वृत्रादिभिर्निरुद्धा अप्रूपाः प्रकाशरूपाश्च गा ज्ञातव्या इत्यवधेयम् ॥

५. जो [ इंद्र ] सकल जंगम प्राण्यांचा प्रभु होय, जो भक्तजनांकारणें प्रथम गाई शोधून काढिता झाला, जो इंद्र दस्यूंला रसातळास मिळवून संहारिता झाला—त्या मरुद्युक्त इंद्रातें आम्ही मैत्रीसाठीं बोलावितों.

5. He who is the lord of all that moves and breathes, who was the first to discover the cows for the worshipper, [ and ] who felled flat the Dasyus to the earth—we invoke for friendship that Indra accompanied by the Maruts.

५. 'जो इंद्र सकल प्राण्यांचा प्रभु होय, आणि वृत्रादिकांनीं मेघोदकरूपी गाईस आणि सूर्यप्रकाशरूपी गाईस अवरोधून टाकिलें असतां ज्याणें त्या मुक्त केल्या, आणि त्यांचा लाभ आपल्या भक्त जनांस करून दिला आणि तसें करून ज्याणें वृत्रादिक असुरांला रसातळास मिळविलें, त्या इंद्राला आम्ही मैत्रीसाठीं बोलावितों.'

'भक्त जनांकारणें प्रथम गाई शोधून काढिता झाला '=' ब्रह्मणे प्रथमो गा अविन्दत्.' म्हणजे आकाशांतील पाणी आणि प्रकाश वृत्रानें झांकून ठेविलीं असतां वृत्रादिकांला भूमिगत करून तीं मुक्त केलीं आणि त्यांची प्राप्ति मनुष्यांस करून दिली. सकल विश्वाच्या जीवनार्थ आणि वृद्ध्यर्थ दोन वस्तूंची अनिवार्य अवश्यकता आहे, त्या वस्तु पाणी आणि प्रकाश या होत. त्या आम्हां दीन जनांस मिळूं नयेत म्हणून वृत्रादिक जे देवांचे शत्रु त्यांणीं पूर्वीं अवरोधून ठेविल्या होत्या, आणि त्या वेळीं मोठा अनर्थ होऊं लागला तेव्हां इंद्रानें वृत्रादिकांशीं युद्ध करून त्या दोनहि वस्तु मनुष्यांस प्राप्त करून दिल्या, हा इंद्राचा मोठा पराक्रम होय असें वेदांत सर्वत्र प्रसिद्ध आहे. समुद्राचें पाणी वाढून पूर्वीं एक वेळ सर्व जग बुडालें तेव्हां मनुष्याचा वंश वांचविण्याकरितां ईश्वरानें मनूला ( म्हणजे मनुष्याच्या आदि पुरूषाला ) एका लहानशा नावेंत घालून रक्षिलें अशी कथा पुराणादि ग्रंथांत आणि इतर लोकांच्या धर्मपुस्तकांत जशी प्रसिद्ध आहे, आणि त्या कथेला उद्देशून जशा अनेक गोष्टी सांगण्यांत येतात, तशीच वृत्रानें हरण केलेल्या गाई इंद्रानें पुनः संपादन केल्या हीहि कथा प्रसिद्ध आहे.

ह्या गाई पुनः संपादन करण्याचा पराक्रम दुसऱ्या देवांनींहि केला असें त्या त्या देवांच्या सूक्तांमध्यें वर्णिलें आहे. त्याला अनुलक्षून सांप्रतच्या ऋचेंत इंद्र 'प्रथम ': गाई शोधून काढिता झाला असें ऋषीनें म्हटलें आहे.

यः शूरैभिर्हव्यो यश्च भीरुभिर्यो धावद्भिर्हूयते यश्च जिग्युभिः ।
इन्द्रं यं विश्वा भुवनाभि संदधुर्मरुत्वन्तं सख्याय हवामहे ॥
॥ ६ ॥ १२ ॥

यः । शूरैभिः । हव्यः । यः । च । भीरुऽभिः । यः । धावत्ऽभिः ।
हूयते । यः । च । जिग्युऽभिः ।
इन्द्रम् । यम् । विश्वा । भुवना । अभि । सम्ऽदधुः । मरुत्वन्तम् ।
सख्याय । हवामहे ॥ ६ ॥ १२ ॥

रुद्राणामेति प्रदिशा विचक्षणो रुद्रेभिर्योषा तनुते पृथु ज्रयः ।
इन्द्रं मनीषा अभ्यर्चति श्रुतं मरुत्वन्तं सख्याय हवामहे ॥ ७ ॥

रुद्राणाम् । एति । प्रऽदिशा । विऽचक्षणः । रुद्रेभिः । योषा । तनुते ।
पृथु । ज्रयः ।
इन्द्रम् । मनीषा । अभि । अर्चति । श्रुतम् । मरुत्वन्तम् । सख्याय ।
हवामहे ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. य [ इन्द्रः ] शूरेभिः (=शौर्योपेतैर्मनुष्यैः) हव्यः (=योद्धुमाह्वातव्यः) यश्च भीरुभिः (=शौर्यरहितैः) [रक्षणार्थं] [हव्यो भवति ] यो धावद्भिर्हूयते (=पराजितैः पलायमानैः रक्षणार्थमाहूयते ) यश्च जिग्युभिः (=विजयिभिः) [ हूयते ] यम् इन्द्रं विश्वा भुवना (=सर्वाणि भूतानि ) अभि संदधुः (=आभिमुख्येन स्थापयन्ति=स्वतः पुरो धारयन्ति ) [ तं ] मरुत्वन्तं (=मरुद्भिः सहितम् ) [ इन्द्रं ] सख्याय (=मित्रत्वाय= अस्माकं मित्रो यथा भवति तथा ) [ वयं ] हवामहे(=आह्वयामः) ॥

७. विचक्षणः (=विशेषेण प्रभावान् ) इन्द्रो रुद्राणां (=रुद्रपुत्राणां मरुतां ) प्रदिशा (=प्रदेशनेन= मार्गदर्शनार्थं पुरतो गमनेन ) एति (=गच्छति ) (=यदेन्द्रो गच्छति तदा तस्मात्पुरतो मार्गदर्शनार्थं भृत्या इव रुद्रपुत्रा मरुतो यान्ति ) । रुद्रेभिः (=रुद्रपुत्रैर्मरुद्भिः सह ) योषा (=योषया=यौवनवत्योषसा च सह ) [इन्द्रः] पृथु ज्रयः (=विस्तीर्णं तेजः ) तनुते (= वितनुते=करोति ) । श्रुतं (=प्रख्यातम् ) इन्द्रम् (=इन्द्रमेव ) मनीषा (=मनुष्याणां स्तुतिरूपा वाक् ) अभ्यर्चति (=आभिमुख्येन स्तौति)

६. ज्याचा धांवा शूरांनीं करण्यास योग्य होय, आणि ज्याचा धांवा भित्र्यांनीं करण्यास योग्य होय, ज्याचा धांवा पळून जाणारे करितात आणि विजयी जनहि करितात, ज्या इंद्राला सर्व भूतें आपणांपुढें ठेवितात—त्या मरुद्युक्त इंद्राला आम्ही मैत्रीसाठीं बोलावितों.

६. He who deserves to be invoked by the brave and invoked by the timid, He who is invoked by those that flee and invoked by those that vanquish, He whom all beings place before themselves—we invoke for friendship that Indra accompanied by the Maruts.

७. तेजःपुंज इंद्र चालतो तेव्हां त्याला रुद्राचे पुत्र [ मरुत् ] वाट दाखवितात; रुद्राचे पुत्र [ मरुत् ] आणि तरूण [ उषा ] यांसहित [इंद्र] विस्तीर्ण तेज पसरितो. कीर्तिमान् इंद्रालाच मनुष्याची वाणी स्तविते—त्या मरुद्युक्त इंद्राला आम्हीं मैत्रीसाठीं बोलावितों.

7. Resplendent Indra goes forth with the guidance of Rudra's sons; with Rudra's sons and with youthful [Ushas] He spreads the wide effulgence. It is renowned Indra the piety of men approacheth and praiseth—we invoke for friendship that Indra accompanied by the Maruts.

---

'भक्तजनांकारणें' = 'ब्रह्मणे'. ब्रह्मा शब्दाचा जो हा अर्थ येथें होतो त्याजकडेस विशेष लक्ष दिलें पाहिजे. 'ब्रह्म' म्हणजे स्तोत्र अथवा उपासना ती जो करितो तो ब्रह्मा. आणि ब्रह्मा व ब्राह्मण हे दोनहि शब्द समानार्थक आहेत. क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र नव्हे तो ब्राह्मण हा अर्थ अर्वाचीन आहे, अति प्राचीन वेदांच्या वेळचा नव्हे.

---

६. 'ज्या इंद्राचा शूर जसा धांवा करितात तसाच भित्रे जनहि करितात, पराजय पावून पळणारे जन जशी त्याला संकटसमयीं हाक मारितात तशीच जय पावलेले लोकहि मारितात, आणि ज्या इंद्राला सकल भूतें साहाय्यार्थ आपल्यापुढेंच जणूं उभा असल्याप्रमाणें नित्य स्मरतात, त्या इंद्राला आम्हीं मैत्रीसाठीं बोलावितों.

७. या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, मरुतांसारिखे मोठे देव इंद्राच्या रथापुढें मार्ग दाखविण्यास जणुं धांवत

**यद्वा मरुत्वः परमे सधस्थे यद्वावमे वृजने मादयासे ।**
**अत आ याह्यध्वरं नो अच्छा त्वाया हविश्चकृमा सत्यराधः ॥८॥**

यत् । वा । मरुत्वः । परमे । सधऽस्थे । यत् । वा । अवमे । वृजने । मादयासे ।
अतः । आ । याहि । अध्वरम् । नः । अच्छ । त्वाऽया । हविः । चकृम । सत्यऽराधः ॥ ८ ॥

[ तं ] मरुत्वन्तं (=मरुद्भिः सहितम्) [ इन्द्रं ] सख्याय (=मित्रत्वाय=अस्माकं मित्रो यथा भवति तथा) [ वयं ] हवामहे (=आह्वयामः) ॥

अत्रेदमुक्तम् । यदेन्द्रः सूर्यादिरूपेण आकाशप्रदेशेषु गच्छति तदा तस्य रथस्य मार्गदर्शनार्थं किंकरा इव मरुतः पुरः प्रयान्ति । तथा अन्यस्य कस्यापि देवस्य मरुतो मार्गं न दर्शयन्ति । यदा च सूर्यरूपेण इन्द्रः सर्वान् द्युप्रदेशान् प्रदीपयति तदा तेन सह रुद्रपुत्रा मरुतो यौवनवत्पुषाश्च प्रयान्ति न तथा देवान्तरेण सह प्रयान्ति । अपि च सर्वेषां मनुष्याणां स्तुतिलक्षणा वाग् इन्द्रमेव प्रस्तौति न तथा देवान्तरम् इति कृत्वा मरुत्वन्तमिन्द्रं हवामह इति ॥

## भाषायाम्.

८. हे मरुत्वः (=मरुद्युक्तेन्द्र), यद्वा परमे सधस्थे [ मादयासे ] (=यद्यपि उत्कृष्टे भवने तृप्यसे) यद्वा अवमे वृजने मादयासे (=निकृष्टे गृहे यद्यपि तृप्तो वर्तसे), अतः (=तस्मादुत्कृष्टाद्भवनात् तस्माद्वा निकृष्टाद्गृहात्) नः अध्वरम् अच्छ आ याहि (=अस्माकं यज्ञं प्रति आगच्छ) । हे सत्यराधः (=सत्यधन), [ वयं हि ] त्वाया (=त्वत्कामनया) हविश्चकृम (=हव्यं कृतवन्तः स्मः) ॥

असतात, आणि सूर्यरूपानें आणि उषोरूपानें जेव्हां इंद्र सर्व आकाशप्रदेश प्रकाशेंकरून युक्त करितो तेव्हांहि मरुत् त्याजबरोबर जात असतात, आणि सर्व मनुष्यें जी जी कांहीं स्तुति करितात ती केवळ इंद्राचीच करीत असतात, तर असा ज्याचा महिमा त्या इंद्राला आम्ही मैत्रीसाठीं बोलावितों.

'रुद्राचे पुत्र मरुत्'=' रुद्राः.' मरुत् हे रुद्रनामक देवाचे पुत्र होत याविषयीं सू. ६४, मं. २ आणि सू. ३८, मं. ७ यांजवरील टीप पहा.

८. हे मरुद्युक्त इंद्रा, तूं उत्कृष्ट वाड्यांत अथवा अगदीं लहान झोपडींत सोमाचा उपभोग घेत असशील तरी तूं तेथून आमच्या यज्ञाप्रत ये—हे सत्यधन इंद्रा, आम्हीं तुझ्या भक्तीनें तुजकरितां हवि सिद्ध केलें आहे.

8. Whether, O friend of the Maruts, thou art enjoying thyself in the highest palace or in the lowest cottage, come thou thence unto our sacrifice. With a yearning for thee, O Indra of eternal wealth, we have prepared [ this ] oblation [ for thee ].

---

८. ऋषि अशी कल्पना करितो कीं, इंद्र दुसऱ्या कोणत्या तरी ठिकाणीं सोम पीत बसला असेल, तो एकाद्या राजाच्या हवेलींत पीत असेल, अथवा एकाद्या गरीब मनुष्याच्या झोंपडींत पीत असेल. तर कोठें पीत असेल तो असो, तेथून त्याणें येऊन ऋषीच्या यज्ञांत ऋषीनें मोठ्या प्रेमानें सिद्ध केलेलें हवि ग्रहण करावें.

त्वायेन्द्र सोमं सुषुमा सुदक्ष त्वाया हविश्चकृमा ब्रह्मवाहः ।
अधा नियुत्वः सगणो मरुद्भिरस्मिन्यज्ञे बर्हिषि मादयस्व ॥९॥

त्वाऽया । इन्द्र । सोमम् । सुसुम । सुऽदक्ष । त्वाऽया । हविः । चकृम । ब्रह्मऽवाहः ।
अध । नियुत्वः । सऽगणः । मरुत्ऽभिः । अस्मिन् । यज्ञे । बर्हिषि । मादयस्व ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

९. हे इन्द्र, हे सुदक्ष (=शोभनबलवन्), त्वाया (=त्वत्कामनया=त्वमागच्छेरिति हेतोः) सोमं सुषुम (=सोमम् अभिषुतवन्तः स्मः) त्वाया (=त्वत्कामनया) हे ब्रह्मवाहः (=स्तोत्रेणोह्यमान), हविश्चकृम (=पुरोडाशं कृतवन्तः स्मः)। अध (=अतः कारणात्) हे नियुत्वः (=अश्वयुक्त), मरुद्भिः सगणः (=मरुतां गणैः सहितः सन्) अस्मिन् [अस्माभिः क्रियमाणे] यज्ञे [आस्तीर्णे] बर्हिषि (=दर्भासने) [उपविश्य] मादयस्व (=सोमं पीत्वा हविश्च भक्षयित्वा तृप्तो भव) ॥

अस्माभिरभिषुतं सोमं कृतं हविश्च दृष्ट्वा स्वकीयानश्वान् रथे योजय मरुद्भिश्च सह आगत्य दर्भासने गृहीतासनो भूत्वा तं सोमं तद्धविश्च आतृप्ति भक्षयेत्यर्थः ॥

ब्रह्मवाहः इत्यत्रेदमनुसंधेयम् । उपासकैरुक्ते सति स्तोत्रे झटिति इन्द्र आगच्छतीति प्रसिद्धेः अश्वेनेव स्तोत्रेणेन्द्र उह्यमानो भवतीति भावगतम् ऋषेः ॥

९. हे इंद्रा, हे उत्तमबलयुक्त [इंद्रा], त्वां यावें म्हणून आम्हीं सोम काढून सिद्ध केला आहे, त्वां यावें म्हणून हे स्तोत्रवाहना [ इंद्रा ], आम्हीं हवि सिद्ध केलें आहे, तर हे अश्वयुक्त [ इंद्रा ], तूं मरुतांच्या गणासहित [ येऊन] या [आमच्या] यज्ञांत दर्भांवर [ बसून ] तृप्त हो.

9. With a yearning for thee, O Indra, O Possessor of excellent power, have we pressed the Soma; with a yearning after thee, O Indra, carried by hymns, have we prepared this food. Therefore, O Possessor of horses, accompanied by the troops of the Maruts, be thou gratified on the Kus'a seat in this [ our ] sacrifice.

९. 'हे इंद्रा, तूं आमच्या यज्ञांत यावेंस अशा इच्छेनें हा सोम आम्हीं तुजकरितां काढिला आहे, तूं आमच्या यज्ञांत यावेंस म्हणून हा पुरोडाश आम्हीं शिजवून तयार केला आहे आणि हें स्तोत्र म्हणत आहों. तूं जर उपासकांनीं स्तोत्रें म्हटल्याबरोबर घोड्यावर बसल्याप्रमाणें त्या स्तोत्रांवर जणुं बसून सत्वर येत असतोस, तर हे इंद्रा, आतां तूं आपले घोडे रथास जोड आणि आपल्या मरुद्गणांस बरोबर घेऊन आमच्या यज्ञाप्रत ये, आणि हें जें आम्हीं दर्भासन घातलें आहे त्याजवर बसून तृप्ति होईपर्यंत हा सोम पी आणि हें हवि खा.'

'स्तोत्रवाहना '=' ब्रह्मवाहः.' स्तोत्र म्हणतांच इंद्राचे घोडे आपोआप रथाला जोडले जातात आणि जें स्तोत्र उपासक गातात त्याजवर इंद्र घोड्यावर बसून आल्याप्रमाणें बसून येत असतो, अशाविषयीं ऋग्वेदांत पुष्कळ उल्लेख आले आहेत. सू. ८२, मं. ६ आणि त्यावरची टीप पहा.

'हे अश्वयुक्त इंद्रा '=' नियुत्वः.' अश्वयुक्त हें विशेषण येथें जरी संबोधनाच्या रूपानें योजिलें आहे तरी 'तूं अश्वयुक्त होऊन ये,' म्हणजे रथाला घोडे जूप आणि ये असा भावार्थ आहे.

मादयस्व हरिभिर्ये त इन्द्र वि ष्यस्व शिप्रे वि सृजस्व धेने ।
आ त्वा सुशिप्र हरयो वहन्तूशन्हव्यानि प्रति नो जुषस्व ॥१०॥

मादयस्व । हरिऽभिः । ये । ते । इन्द्र । वि । स्यस्व । शिप्रे इति । वि । सृजस्व । धेने इति ।
आ । त्वा । सुऽशिप्र । हरयः । वहन्तु । उशन् । हव्यानि । प्रति । नः । जुषस्व ॥ १० ॥

मरुत्स्तोत्रस्य वृजनस्य गोपा वयमिन्द्रेण सनुयाम वाजम् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ ११ ॥ १३ ॥

मरुत्ऽस्तोत्रस्य । वृजनस्य । गोपाः । वयम् । इन्द्रेण । सनुयाम । वाजम् । तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ११ ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१०. हे इन्द्र, ये [ हरयः ] ते ( =तव स्वभूताः ) [ सन्ति ] [ तैर् ] हरिभिः [ सह ] मादयस्व ( =तृप्तो भव) शिप्रे वि ष्यस्व ( =" हनू संहते विष्यस्व सोमपानार्थं विवृते कुरु " ) धेने वि सृजस्व ( =" पानसाधनभूते जिह्वोपजिह्विके विसृजस्व सोमपानार्थं विश्लिष्टे कुरु " ) । हे सुशिप्र ( =शोभनहनो इन्द्र), हरयः (=हरिद्वर्णास्तवाश्वास् ) त्वा ( =त्वाम् ) आ वहन्तु ( =आनयन्तु ) । उशन् ( =कामयमानः सन् ) [ त्वं ] नो हव्यानि ( =अस्माकं हवींषि ) प्रति जुषस्व ( =पुनःपुनः सेवस्व=महत्या प्रीत्या सेवस्व ) ॥

११. [इन्द्रो] मरुत्स्तोत्रस्य ( =मरुद्विषयकं स्तोत्रं यत्र=मरुतः स्तूयन्ते यत्र तस्य ) वृजनस्य ( =गृहस्य=उपासकसमूहस्य) गोपाः (=रक्षको) [भवति] । [ तेन ] इन्द्रेण ( =इन्द्रबलाद् ) वयं वाजं सनुयाम ( =अन्नं लभेमहि ) । तत् (=एतद्=अन्नलाभं च ) मित्रः, वरुणः, अदितिः ( =एतन्नाम्नी देवानां माता ), सिन्धुः ( =समुद्राभिमानिनी देवता ), पृथिवी उत द्यौः ( =पृथिवी द्युलोकश्च ) [ इत्येते ] नः मामहन्ताम् ( =अस्मभ्यं पूजयन्तु=ददतु ) ॥

---

१०. हे इंद्रा, जे तुझे पिवळे घोडे [ आहेत ] त्यांसहित तूं तृप्त हो. तूं [आपलें] तोंड उघड. तूं [ आपली ] जीभ बाहेर काढ. हे सुमुख [ इंद्रा ], [ तुझे ] घोडे तुला वाहून आणोत. तूं प्रीतीनें आमचीं हव्यें सेवन कर.

११. [ इंद्र ] मरुतांनां स्तवणाऱ्या गृहाचा पालक [ होय ]. त्या इंद्राच्या योगेंकरून आम्हांस अन्नाचा लाभ होओ, आणि हें दान मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू आम्हांस देओत.

10. Be thou gratified, O Indra, in company with the tawny horses which [ are ] thine. Open thy mouth, put forth thy tongue. May thy tawny horses carry thee hither, O handsome [ Indra ]; enjoy our offerings with pleasure.

11· Indra is the preserver of that house where the Maruts are praised. May we through that Indra obtain food. And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

---

१०. भावार्थः—‘ हे इंद्रा, तुझे जे पिवळ्या वर्णाचे घोडे त्यांस घेऊन तूं ये आणि तृप्ति होईपर्यंत आमचा सोम आणि हवि यांचें सेवन कर. तूं आपलें तोंड उघडून या आमच्या सोमाला आपली जीभ लाव. आणि तूं आपले घोडे रथास जोडून सत्वर ये आणि आम्हीं अर्पण केलेले सोम आणि हवि हीं प्रीतीनें भक्षण कर.’

‘ तूं आपलें तोंड उघड,’ ‘ तूं आपली जीभ बाहेर काढ ’=‘ विष्यस्व शिप्रे ’ ‘ विसृजस्व धेने.’ हा अर्थ आम्हीं सायणास अनुसरून केला आहे, आणि तो एकंदरींत आधारबद्ध आहे असें आम्हांस वाटतें. ‘शिप्र’ म्हणजे हनवटी असा अर्थ समजला तर ‘शिप्रे’ या द्विवचनाचा अर्थ खालच्या ओंठापासून खालचा जो तोंडाचा भाग तो एक, आणि वरच्या ओंठापासून तोंडाचा वरचा जो भाग तो दुसरा. म्हणून ‘शिप्रे’ या द्विवचनाचा प्रयोग झाला आहे आणि पर्यवसानीं तोंड उघड इतकाच अर्थ होतो. आतां ‘धेने’ या द्विवचनाचें प्रयोजन काय असा प्रश्न निघतो. त्याचें उत्तर सायणाचार्य जिव्हा आणि उपजिव्हा या दोनी मिळून ‘ धेने ’ असा अर्थ करून जाणवितात; परंतु आम्हांस असें भासतें कीं ‘ शिप्रे ’ हें जें द्विवचन त्याच्या संनिध ‘ धेना ’ शब्द आला असल्यामुळें केवळ साहचर्याकर्षणाच्या योगेंकरून ‘ धेने ’

## सूक्तम् १०२.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः। इन्द्रो देवता। अन्त्या त्रिष्टुप्। शिष्टा दश जगत्यः ॥

**इमां ते धियं प्र भरे महो महीमस्य स्तोत्रे धिषणा यत्त आनजे।**
**तमुत्सवे च प्रसवे च सासहिमिन्द्रं देवासः शवसामदन्ननु ॥ १ ॥**

इमाम्। ते। धियम्। प्र। भरे। महः। महीम्। अस्य। स्तोत्रे। धिषणा। यत्। ते। आनजे।
तम्। उत्ऽसवे। च। प्रऽसवे। च। ससहिम्। इन्द्रम्। देवासः। शवसा। अमदन्। अनु ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. [ हे इन्द्र ], महस्ते (=महतस्तव) महीं (=महतीम्) इमां (=मया क्रियमाणां) धियं (=स्तोत्रं) प्र भरे (=प्रकर्षेण संपादयामि=त्वदर्थम् उच्चारयामि) यद् (=यस्मात् कारणात्) ते (=तव) धिषणा (=बुद्धिः) अस्य (=मद्रूपस्योपासकस्य=मम) स्तोत्रे आनजे (=अक्ता संश्लिष्टा भवति=रता भवति) तम् [ एतं सासहिं ] (=शत्रूणामतिशयेनाभिभवितारम्) ईम् इन्द्रम् उत्सवे च प्रसवे च (=युद्धोत्पत्तौ युद्धप्रकर्षे च) देवासः (=देवाः=मरुतः) शवसा अनु अमदन् (=बलेन अभ्यनन्दयन्=अभिनन्दयन्ति) ॥

या द्विवचनाचा प्रयोग झाला असावा. सोम पिण्याशीं जो हा जिभेचा संबंध त्याच संबंधानें 'धेना' शब्दाचा एकवचनीं प्रयोग सूक्त २, मं. ३ यांत आला आहे तो पहा.

११. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. ऋषि म्हणतो, 'ज्या घरांत मरुतांची आणि इंद्राची स्तुति गाइली जाते, त्याचा पालक इंद्र होतो. तर असा जो इंद्र त्याच्या कृपेकरून आम्हांला अन्नादिक संपत्तीचा लाभ होओ. आणि ही संपत्ति आम्हांस मिळेल असा वर मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यू हे आम्हांला देओत.'

'मरुतांला स्तवणाऱ्या गृहाचा '=' मरुत्स्तोत्रस्य वृजनस्य.' म्हणजे ज्या घरीं मरुतांची (आणि इंद्राची) स्तुति गाइली जाते तेथील लोकांचा. 'वृजन' शब्दाचा अर्थ घर असा होतो याविषयीं सूक्त १०१, मं. ८ याजवरील सायणभाष्य पहा. 'मरुत्स्तोत्रस्य' या शब्दाचा अर्थ अक्षरशः 'मरुतांचें स्तोत्र जेथें आहे अशाचा' असा जरी आहे, तरी 'मरुद्युक्तेन्द्रस्तोत्रस्य' ='मरुतांसहित जो इंद्र त्याचें स्तोत्र जेथें आहे अशाचा' असा अर्थ इष्ट दिसतो.

## सूक्त १०२.

ऋषि—अंगिरसकुळांतील कुत्स या नांवाचा ( पूर्व सूक्ताचा जो तोच ). देवता—इन्द्र. वृत्त—जगती; मात्र शेवटच्या ( अकराव्या ) ऋचेचें त्रिष्टुभ्.

१. [ हे इंद्रा ], मोठा असा जो तूं त्या तुला हें मोठें स्तोत्र मी अर्पण करीत आहें. कारण कीं ह्या [ जना]च्या स्तोत्राच्या ठायीं तुझी मति चिकटून राहते. विजयी जो इंद्र त्याला संग्रामांत आणि तुमुल युद्धांत देव बळेंकरून अभिनंदीत असतात.

## HYMN 102.

To *Indra.* By *Kutsa* of the family of *Angiras* (same as the author of the previous hymn). Metre— *Jagatî,* except of the last verse where it is *Trishṭubh.*

1. [O Indra], I offer this great hymn to Thee [who art] great, as thy mind sticks in the prayer of this [thy worshipper].—It is this Indra whom the Gods urge with strength both in the beginning and in the middle of a battle.

---

१. ऋषि म्हणतोः—' हे इंद्रा, मी केलेलें स्तोत्र तुला आवडत असतें आणि माझ्या स्तोत्राच्या ठायीं तूं अनुरक्त होऊन राहतोस. यास्तव मोठा जो तूं त्या तुला हें माझें मोठें स्तोत्र अर्पण करितों. तुझा पराक्रम एवढा मोठा आहे कीं लढाईचा प्रसंग आला म्हणजे आणि लढाईचा भर असला म्हणजे देव तुज विजयीला अभिनंदन करून तुझ्या अंगीं बळ आणितात.'

' हें मोठें स्तोत्र '=' इमां महीं धियम्.' म्हणजे हें जें मी सूक्त म्हणत आहें तें. तें लांब आहे म्हणून मोठें नव्हे, तर मोठ्या भक्तीनें आणि प्रेमानें रचिलें आणि तें तुला प्रसन्न करणार आहे म्हणून मोठें.

' संग्रामांत आणि तुमुल युद्धांत '=' उत्सवे च प्रसवे च.' ' उत्सव' आणि ' प्रसव ' या शब्दांचे येथें केलेले अर्थ प्रमाणसिद्ध आहेत याविषयीं सू. १००, मं. ८ आणि याच सूक्ताचा नववा मंत्र यांजवरील सायणभाष्य पहा.

' देव '=' देवासः.' या ठिकाणीं ' देव' म्हणजे ' मरुत् ' असावेत असें वाटतें.

अस्य श्रवो नद्यः सप्त बिभ्रति द्यावाक्षामा पृथिवी दर्शतं वपुः।
अस्मे सूर्याचन्द्रमसाभिचक्षे श्रद्धे कमिन्द्र चरतो वितर्तुरम् ॥२॥

अस्य । श्रवः । नद्यः । सप्त । बिभ्रति । द्यावाक्षामा । पृथिवी । दर्शतम् । वपुः ।
अस्मे इति । सूर्याचन्द्रमसा । अभिऽचक्षे । श्रद्धे । कम् । इन्द्र । चरतः । विऽतर्तुरम् ॥ २ ॥

तं स्मा रथं मघवन्प्राव सातये जैत्रं यं ते अनुमदाम संगमे ।
आजा न इन्द्र मनसा पुरुष्टुत त्वायद्भ्यो मघवञ्छर्म यच्छ नः॥३

तम् । स्म । रथम् । मघऽवन् । प्र । अव । सातये । जैत्रम् । यम् । ते । अनुऽमदाम । सम्ऽगमे ।
आजा । नः । इन्द्र । मनसा । पुरुऽस्तुत । त्वायत्ऽभ्यः । मघऽवन् । शर्म । यच्छ । नः ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. अस्य ( =इन्द्रस्य ) श्रवः ( =कीर्तिं ) सप्त नद्यः (=सप्तसंख्योपलक्षितबहुनदीनाम् उदकाग्रस्थानम्=अन्तरिक्षप्रदेशाः ) बिभ्रति ( =धारयन्ति )। पृथिवी ( =पृथिव्यौ=विस्तीर्णे ) द्यावाक्षामा ( =द्युलोकभूलोकौ ) [ अस्य ] दर्शतं वपुः ( =कमनीयं रूपं प्रकाशात्मकं ) ( बिभृतः )। अस्मे अभिचक्षे ( =अस्माकं दर्शनाय=द्रष्टव्यानां पदार्थानाम् अस्माभिर्दर्शनाय) श्रद्धे कं (=श्रद्धार्थं च=त्वमेव सर्वेषामुत्पादयितेति वयं यथा श्रद्दध्मस्तथा) सूर्याचन्द्रमसा (=सूर्याचन्द्रमसौ) वितर्तुरं (=परस्परव्यतिहारेण ) चरतः ( =गच्छतः ) ॥

३. हे मघवन् ( =धनवन् इन्द्र ), यं ते (=यं तव ) जैत्रं ( =जयशीलं ) [ रथं ] [ वयं ] संगमे अनुमदाम ( =युद्धे अभिनन्दयामः ) तं स्म रथं ( =तमेव रथं ) सातये प्राव ( =अस्माकं धनलाभाय प्रेरय=वयं यथा शत्रुधनं लभेमहि तथा अस्मान् प्रति आवह ) हे मनसा पुरुष्टुत ( =प्रेम्णा बहुभिः स्तुत ) इन्द्र, हे मघवन्, त्वं त्वायद्भ्यः ( =त्वां कामयमानेभ्यो ) नः ( =अस्मभ्यम् ) आजा ( =संग्रामे ) शर्म यच्छ (=सुखं देहि=विजयिनः कुरु ) ॥

२. याचें यश सप्त नद्या धारण करितात, याचें सुंदर रूप विस्तीर्ण द्यावापृथिवी [धारण करितात]. आम्हीं [आमच्या डोळ्यांनीं] पहावें म्हणून आणि हे इंद्रा, तुजवर श्रद्धा ठेवावी म्हणून सूर्य आणि चंद्र हे पाळीपाळीनें क्रमण करीत असतात.

2. His glory the Seven Rivers bear; vast heaven and earth hold his beautiful image. The Sun and Moon travel by turns that we may see and believe [ in thee ], O Indra.

३. हे मघवन्, ज्या तुझ्या विजयी रथाला समरांगणांत पाहून आम्ही त्याचें अभिनंदन करीत असतों, त्याच रथाला तूं हाकून घेऊन ये, कीं जेणेंकरून आम्हांला धनप्राप्ति होईल. हे प्रेमेंकरून बहुतांनीं स्तविलेल्या इंद्रा, हे मघवन्, आम्हां तुझ्या भक्तांला तूं युद्धांत जय दे.

3. O Maghavan, drive hither for our success that victorious chariot of thine which we hail in battle. To us O Indra, praised by many with devotion, grant O Maghavan, unto us thy servants good luck in battle.

---

२ 'इंद्राचें माहात्म्य द्युलोक, अंतरिक्ष आणि भूलोक यांजवरून प्रत्यक्ष दृष्टीस पडतें, आणि सूर्य आणि चंद्रमा यांजवरून इंद्र सर्व जगाचा कर्ता होय आणि प्रभूतशक्तिमान् होय याविषयीं खात्री होते. म्हणजे इंद्राची कीर्ति आणि त्याचें सौंदर्य हीं त्रैलोक्यामध्यें भरलेलीं आहेत, आणि इंद्रानें उत्पन्न केलेल्या सर्व वस्तु म्हणजे सर्व जग आमच्या दृष्टीस पडावें आणि त्यांच्या दर्शनाच्या योगेंकरून इंद्राविषयीं आमच्या मनांत श्रद्धा उत्पन्न व्हावी म्हणून इंद्रानें सूर्य आणि चंद्र हे महागोल उत्पन्न केले आहेत.'

'सप्त नद्या' = 'सप्त नद्यः.' येथें सप्त नद्या म्हणजे 'अंतरिक्ष' असा अर्थ आहे. सू. ३५, मं. ८ यांतील 'अंतरिक्ष' शब्दावरची टीप पहा.

'सुंदर रूप' = 'दर्शतं वपुः.' म्हणजे पृथिवीवरील समुद्र, नद्या, पर्वत इत्यादि जे पदार्थ आणि द्युलोकांतील असंख्य तारे आणि प्रकाश तेंच रूप.

३. युद्धांत आम्हांस विजयी कर असें या मंत्राचें तात्पर्य आहे. ऋषि म्हणतो, 'हे इंद्रा, समरांगणांत आम्हीं साहाय्या-

**वयं जयेम त्वया युजा वृतमस्माकमंशमुदवा भरेभरे ।**
**अस्मभ्यमिन्द्र वरिवः सुगं कृधि प्र शत्रूणां मघवन्वृष्ण्या रुज॥४**

वयम् । जयेम । त्वया । युजा । वृतम् । अस्माकम् । अंशम् । उत् । अव । भरेऽभरे ।
अस्मभ्यम् । इन्द्र । वरिवः । सुऽगम् । कृधि । प्र । शत्रूणाम् । मघऽवन् । वृष्ण्या । रुज ॥ ४ ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे इन्द्र, यं तव रथं संग्रामे नः साहाय्यार्थम् आगतं दृष्ट्वा वयं हृष्टा भवामस्तव तं विजयिनं रथम् अधिष्ठाय त्वमागच्छ, येन शत्रोर्धनं वयं लभेमहि अपि च त्वां कामयमानेभ्योऽस्मभ्यमेव संग्रामे सुखं देहीति । नःशब्दस्य द्विरुक्तिरन्य-व्युदासार्थम् ॥

## भाषायाम्.

४. हे इन्द्र, त्वया युजा (=सहायभूतेन त्वया) वयं वृतं जयेमहि (=शत्रून् अभिभवेम)। [अपि च] भरे भरे (=संग्रामे संग्रामे=सर्वेषु युद्धेषु) अस्माकं भागम् (=अस्माकं पक्षम्) उदव (=उत्कृष्टं रक्ष)। हे इन्द्र, अस्मभ्यं वरिवः सुगं कृधि (=शत्रूणां धनं सुलभं कुरु=अस्मान् प्रापय)। [अपि च] हे मघवन् (=धनवन्निन्द्र), शत्रूणां वृष्ण्या (=वृष्ण्यानि=वीर्याणि) प्र रुज (=प्रकर्षेण नाशय)॥

करितां तुझा धांवा केला म्हणजे तूं आपल्या जयशाली रथांत बसून येत असतोस, आणि त्या रथाला पाहून आम्हांस आनंद होतो आणि आम्हीं त्याचें अभिनंदन करावयास लागतों; तर त्याच रथांत बसून तूं आम्हांस साहाय्य करण्यासाठीं युद्धांत ये म्हणजे आम्हांस जयप्राप्ति होऊन आम्हीं शत्रूंचें धन हरण करूं; आणि तुला जरी पुष्कळ लोक स्तवितील आणि आपापल्या जवळ बोलावितील तरी आम्ही तुझे उत्तम भक्त आहोंत त्यापेक्षां आम्हांसच यश देऊन सुखी कर.'

ही ऋचा युद्धप्रसंगाविषयीं आहे; आणि या सूक्तांतील पुढच्याहि सर्व ऋचा युद्धाच्या संबंधाच्याच आहेत. पहिली ऋचा सुद्धा युद्धप्रसंगाची असून दुसरी मात्र केवळ इंद्राच्या मोठेपणाविषयीं आहे. तेव्हां हें सर्व सूक्त लढाईच्या संबंधाचें, म्हणजे युद्धप्रसंगाला अनुलक्षून केलें आहे असें सिद्ध होतें. यावरून प्राचीन ऋषींचा धंदा काय असे आणि

४. [ हे इंद्रा ], तुझ्या साहाय्यानें आह्मी शत्रूंला जिंकून टाकूं असें कर. आणि तूं आमच्या पक्षाला प्रत्येक संग्रामांत उत्कृष्ट रीतीनें राख. हे इंद्रा, तूं आह्मांला धन सुलभ कर [ आणि ] हे मघवन्, [ आमच्या ] शत्रूंच्या वीर्यांचा तूं भंग करून टाक.

4. May we [ O Indra ], vanquish the enemy with thee our ally. Protect thou our party in every battle. Make wealth accessible to us, O Indra; and crush the energies, O Maghavan, of [ our ] enemies.

---

ते युद्धाविषयीं किती तत्पर असत आणि आपणास युद्धांत जय मिळावा आणि आपणाकडून शत्रूंचा पराजय व्हावा याविषयीं किती उत्सुक असत तें स्पष्ट दिसून येतें.

'बहुतांनीं स्तविलेल्या'='पुरुष्टुत.' जरी तुला पुष्कळ जण विनवून बोलावितील तरी तूं आमच्या पक्षाच्याच साहाय्याला ये असा या विशेषणाचा गर्भित भाव आहे.

'आम्हां आम्हांला' = 'नः नः.' 'आम्हांलाच' असा अर्थ व्हावा म्हणून 'नः' शब्द दोनदा घातला आहे.

आधुनिक काळचे कविजन इंद्रासारिख्या देवाची स्तुति करूं लागले आणि त्याजपाशीं वर मागावयास लागले तर आम्हांस युद्धांत यश दे आणि शत्रूंचें धन आम्हांस लाभो अशा प्रकारची प्रार्थना बहुतकरून करणार नाहींत. कुत्स ऋषि ज्या काळीं होऊन गेला त्यांत आणि आम्ही कुत्साचे वंशज ज्यांत राहत आहों या काळांत पुष्कळ फेरफार झाला आहे.

---

४. युद्धास अनुलक्षून ऋषि म्हणतो, 'हे इंद्रा, युद्धप्रसंगीं तूं आमचा पक्षपाती हो, आणि तुझ्या साहाय्यानें आमच्या हातून शत्रूंचा पराजय होई असें कर; आणि प्रत्येक युद्धांत आमच्याच पक्षाचा जय कर, आणि आमच्या शत्रूंला हतवीर्य करून त्यांचें सर्व धन आमच्या हस्तगत कर.'

'धन सुलभ कर'='वरिवः सुगं कृधि.' म्हणजे शत्रूंचें धन आमच्या हातांत सहज येई असें कर. 'वरिवः कृधि' हे शब्द पुष्कळ मंत्रांत आले आहेत त्यांचा अर्थ कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'मुक्ति, म्हणजे मोकळीक कर' असा करीत असतात. परंतु तो केवळ धात्वर्थावरूनच केला आहे, दुसरें त्याला

नाना हि त्वा हवमाना जना इमे धनानां धर्तरवसा विपन्यवः ।
अस्माकं स्मा रथमा तिष्ठ सातये जैत्रं हीन्द्र निभृतं मनस्तव ॥
॥ ५ ॥ १४ ॥

नाना । हि । त्वा । हवमानाः । जनाः । इमे । धनानाम् । धर्तः । अवसा । विपन्यवः ।
अस्माकम् । स्म । रथम् । आ । तिष्ठ । सातये । जैत्रम् । हि । इन्द्र । निऽभृतम् । मनः । तव ॥ ५ ॥ १४ ॥

## भाषायाम्.

५. हि (=यस्मात् कारणात्) हे धनानां धर्तः (=द्रव्याणां धारक), अवसा विपन्यवः (=रक्षणहेतुना=रक्षणेच्छया स्तुवन्तस्) त्वा हवमाना (=त्वामाह्वयन्त) इमे जनाः (=एते सर्वत्र दृश्यमाना जना) नाना (=विभिन्नाः) [सन्ति]। [एवं सत्यपि] [त्वम्] अस्माकं स्म सातये (=अस्माकमेव धनलाभाय=अस्मानेव शत्रुधनं प्रापयितुं) रथमातिष्ठ (=स्वरथम् आरोह)। हि (=यस्मात् कारणात्) हे इन्द्र, तव निभृतं मनः (=अव्याकुलं स्थिरं मनो) जैत्रं (=जयशीलं) [भवति] ॥

अस्माकं शत्रून् जेतुं यदि त्वं निश्चितमना भवसि तदा त्वमनायासेनैव ताञ्जेष्यसीत्यर्थः ॥

प्रमाण दिसत नाहीं. सू. ५२, मं. ५ यावरील आमची भाषा पाहा.

हा मंत्र खालीं दाखविल्याप्रमाणें म्हटला म्हणजे श्लोकवृत्ताला जमेल:—

वयं जयेम तुअया युजा वृतम्
अस्माकमंशम् उदवा भरे भरे ।
अस्मभ्यमिन्द्र वरिवः सुगं कृधि
प्र शत्रूणां मघवन् वृष्णिआ रुज ॥

५. कारण कीं, हे संपत्तिधरा इंद्रा, तुला उत्कंठेनें बोलाविणारे स्तोते जन [ जे ] हे [आहेत ते] पुष्कळ [ आहेत ]. परंतु तूं आम्हांलाच धन मिळवून देण्यासाठीं रथांत बसून ये. कारण कीं, हे इंद्रा, तुझें स्थिर मन जयशाली होय.

5. For many [are] these people who invoke thee, O possessor of wealth, with anxious prayers. But mount thy chariot that only we may get the booty. For, Indra, thy inflexible mind is victorious.

५. 'कारण कीं रक्षणाची इच्छा धरून तुझी प्रार्थना करितात आणि तुझा धांवा करितात असे जन या जगांत जिकडे तिकडे पसरले आहेत. असें आहे तथापि हे इंद्रा, तूं आमच्याच साहाय्याला ये आणि आम्हांस विजयी करून शत्रूचें धन सगळें आमच्या हातांत येईं असें कर. आणि असें करणें तुला कांहीं कठिण नाहीं, तुझा निश्चय झाला म्हणजे पुरे, यश हें तुला येणारच आहे,' असा भावार्थ. हाहि मंत्र युद्धाला अनुसरूनच केला आहे. इंद्रानें येऊन आपणास युद्धांत मदत करावी आणि शत्रूचे धनाची लूट मिळवून द्यावी अशी कुत्स ऋषीची प्रार्थना आहे. जर ऋषि नित्य गिरिकंदरीं राहून कंदमुळें भक्षण करीत करीत तप आचरणारा असता तर त्याला युद्ध कशाला पाहिजे आणि शत्रूच्या धनाची इच्छा कशाला झाली असती ?

'संपत्तिधरा'='धनानां धर्तः.' म्हणजे संपत्ति ज्याच्या हातींच जणुं सर्व धरलेल्या आहेत तो. आधुनिक काळीं जसें 'श्रीधर' हें नांव प्रचारांत आलें आहे तसेंच आणि त्या अर्थाचेंच 'धनानां धर्ता' हें विशेषण आहे.

'धन मिळवून देण्यासाठीं'='सातये.' हें धन म्हणजे शत्रूची संपत्ति; ती लूट मिळाली म्हणजे 'धन' मिळवून दिल्यासारखें झालें. 'धन' हा शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं येतो आणि त्याचा अर्थ 'लूट' (म्हणजे शत्रूकडून हरण करून घेतलेलें धन) हा एक, आणि लूट मिळविण्याकरितां बहुतकरून पूर्वीच्या काळीं युद्धें करण्याची चाल असे म्हणून 'युद्ध' हा एक दुसरा, असे दोन अर्थ वेदांत होतात. 'धन' शब्दाचा लूट या अर्थीं प्रयोग सांप्रत काळीं तरी होत नाहीं असें नाहीं. 'अमुक ठिकाणीं त्याला नौकरी मिळेल तर त्याची धन होईल' यांत 'धन' म्हणजे लूट असाच अर्थ आहे.

वृत्तसुखासाठीं 'जैत्रं हि इन्द्रं निभृतं मनस्तव' असा चवथा चरण वाचला पाहिजे.

गोजिता बाहू अमितक्रतुः सिमः कर्मन्कर्मञ्छतमूतिः खजंकरः ।
अकल्प इन्द्रः प्रतिमानमोजसाथा जना वि ह्वयन्ते सिषासवः ॥६॥

गोऽजिता । बाहू इति । अमितऽक्रतुः । सिमः । कर्मन्ऽकर्मन् । शतम्ऽऊतिः । खजम्ऽकरः ।
अकल्पः । इन्द्रः । प्रतिऽमानम् । ओजसा । अथ । जनाः । वि । ह्वयन्ते । सिसासवः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. [ इन्द्रस्य ] बाहू गोजिता ( =गोजितौ=शत्रूणां पराजयेन गवां लम्भयितारौ ) [ भवतः ] । [ इन्द्रः ] अमितक्रतुः (=अपरिच्छिन्नप्रज्ञः) सिमः (=श्रेष्ठः), कर्मन्कर्मन् ( =कर्मणिकर्मणि=सर्वस्मिन्कर्मणि संग्रामादिरूपे ) शतमूतिः ( =शतरक्षणोपायः) खजंकरः ( =संग्रामस्य कर्ता ) [ भवति ] । इन्द्रः ओजसा ( =स्वबलेन ) अकल्पः ( =अन्यकल्परहितः=अद्वितीयः ) प्रतिमानं ( =सर्वेषाम् उपमानं [ भवति ] । अथ ( =अतः कारणात् ) [ तं ] सिषासवो जनाः ( =धनमिच्छन्तो जना ) वि ह्वयन्ते ( =विविधम् आह्वयन्ति=विभिन्नेषु स्थलेष्वाह्वयन्ति ) ॥

६. इन्द्राचे बाहू गाई जिंकून देणारे [होत]. इन्द्राची प्रज्ञा अमित [आहे] तो सर्वश्रेष्ठ [होय]; प्रत्येक कृत्याच्या ठायीं तो शतशः उपायांनीं रक्षण करणारा [होय]; [तो] संग्रामकर्ता [होय]. इन्द्र आपल्या बळानें अनुपम [आणि] सर्वांस ज्याची उपमा द्यावी असा होय. ह्मणूनच धनाची इच्छा करणारे जन निरनिराळ्या स्थळीं धांवा करून त्याला बोलावितात.

6. His arms are conquerors of cattle. His wisdom is unfathomed, he is the best; in every action he brings a hundred protections; he fights battles. Indra has no equal in his might and he is the standard [of all]. Hence people desirous of booty invoke him in different places.

---

६. हाहि मंत्र युद्धाविषयींच आहे. ऋषीचा भावार्थ असा आहे कीं 'इंद्राचे बाहू सामर्थ्यपूर्ण आहेत आणि तो आमच्या शत्रूंबरोबर लढून त्यांच्या गाईंची आम्हास लूट मिळवून देतो. त्याच्या बुद्धीला सीमा नाहीं. तो सर्वांहून श्रेष्ठ आहे. युद्धादिक कोणताहि प्रसंग आला तरी शेकडो उपाय करून तो आपल्या उपासकाचें संरक्षण करितो आणि त्याच्या पक्षानें लढतो. त्याच्या सारिखा दुसरा कोणी नाहीं म्हणून दुसऱ्याची उपमा त्याला देतां येत नाहीं. त्याची उपमा दुसऱ्यास देतां येईल, असा त्याचा पराक्रम आहे. म्हणूनच धनाची इच्छा करणारे जन अनेक ठिकाणीं त्याला हाका मारितात.'

'गाई जिंकून देणारे'='गोजिता.' प्राचीन काळीं आपल्या आर्य पूर्वजांची संपत्ति म्हटली म्हणजे बहुतकरून गाई आणि बैल हे असत म्हणून 'गाई जिंकून देणारे' म्हणजे 'शत्रूंचें धन जिंकून देणारे' असा अर्थ आहे. प्राचीन आर्यांच्या पदरीं जसे घोडे, गाई आणि बैल हे असत तशा म्हैसी आणि रेडे अथवा गाढवें होतीं असें दिसत नाहीं; कारण कीं त्यांविषयीं उल्लेख फारकरून कोठें येत नाहीं. म्हैस अथवा रेडा वेदांत सांगितलेला नाहीं असें नाहीं, परंतु 'हस्ती' हें पद जसें विशेषणार्थीं (हस्ती मृगः= हात आहेत ज्याला तें जनावर अशा रीतीनें) योजिलेलें आढळतें तसें 'महिष' हें 'मोठा पशु' (महिषो मृगः) अशा अर्थीं विशेषणासारिखें योजिलेलें असतें. परंतु 'महिष' शब्द ज्यांत आला

उत्ते॑ श॒तान्म॑घव॒न्नुच्च॒ भूय॑स॒ उत्स॒हस्रा॑द्रिरिचे कृ॒ष्टिषु॒ श्रवः॑ ।
अ॒मा॒त्रं त्वा॑ धि॒षणा॑ तित्वि॒षे म॒ह्यधा॑ वृ॒त्राणि॑ जिघ्नसे पुरंदर॥७॥

उत् । ते॒ । श॒तात् । म॒घ॒ऽव॒न् । उत् । च॒ । भूय॑सः । उत् । स॒हस्रा॑-
त् । रि॒रि॒चे॒ । कृ॒ष्टिषु॑ । श्रवः॑ ।
अ॒मा॒त्रम् । त्वा॒ । धि॒षणा॑ । ति॒त्वि॒षे॒ । म॒ही । अध॑ । वृ॒त्राणि॑ । जि॒घ्न॒से॒ ।
पु॒र॒म्ऽद॒र ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे मघवन्, ते श्रवः ( =तव संपद्="त्वया दीयमानं यदन्नमस्ति तत्" ) कृष्टिषु ( =मनुष्येषु ) शतात् उत् [ रिरिचे ] ( =शतसंख्याकाद् उद्रिक्तमधिकं भवति=शतगुणादप्यधिकं भवति), उत् च भूयसः [रिरिचे ] (=शतादप्यधिकसंख्याकादधिकं भवति), उत् सहस्रात् रिरिचे ( =सहस्रसंख्याकादप्यधिकं भवति )। [अपि च ] अमात्रं त्वा (=इयत्तारहितं त्वाम् ) [अस्माकं] मही धिषणा (=महती स्तुतिलक्षणा बुद्धिस् ) तित्विषे ( =दीपयति=शस्त्रवत् तीक्ष्णं करोति )। अध ( =अथ=अतः कारणात्) हे पुरंदर (=शत्रूणां पुरां भञ्जक ), [त्वं] वृत्राणि जिघ्नसे (=शत्रून् हन्तुं समर्थो भवसि ) ॥

आहे ते सर्व मंत्र वाचून पाहातां 'महिष' हा पशु वेदाच्या काळीं मनुष्यें आपल्या घरीं पाळूं लागलीं नव्हतीं, तो अरण्यांतच असे आणि पाण्यांत राहून अथवा लोळून सुख पावणारा असे असें दिसून येतें. मोठा आणि बलवान् कोणी असला तर त्याला 'महिष' पशूची ( रेड्याची ) उपमा दिलेली वेदांत आढळते. 'सोम' देवाला बहुतकरून ही उपमा दिलेली आढळते. वेदांच्या वेळीं म्हैसीला गाईसारखी घरीं बाळगीत नसतील असें म्हणण्याला आणखी प्रमाणें अशीं आहेत कीं, १ म्हैस या अर्थी महिषी हा शब्द ऋग्वेदांत आलेला नाहीं, २ जसें गाईच्या दुधाला गव्य हें नांव आहे आणि त्या दुधाच्या संबंधानें गवाशीर, इत्यादि शब्द आहेत त्याप्रमाणें म्हैसीच्या दुधाला वेदांत नांव नाहीं, ३ देवांपाशीं गाई मिळण्याविषयीं जशी प्रार्थना जिकडे तिकडे आढळते तशी आम्हांला म्हैसी मिळोत अथवा आमच्या म्हैसींला चारा पाणी पुष्कळ मिळो अशी प्रार्थना वेदांत नाहीं, आणि ४ आधुनिक काळीं तरी गाईचें दूध जसें पवित्र मानितात तसें म्हैसीचें मानीत नाहीं. यावरून म्हैसीला घरीं बाळगून तिचें दूध पिणें हा प्रचार मागाहून पडला असावा.

'धनाची इच्छा करणारे'='सिषासवः.' म्हणजे शत्रूला जिंकून त्याचें द्रव्य हरण करण्याची इच्छा करणारे.

७. हे मघवन्, मनुष्यांमध्यें त्वां दिलेली संपत्ति शंभरपटीपेक्षां, आणि त्याच्याहि पलीकडे, आणि सहस्रपटीपेक्षांहि अधिक होत असते. अतुल अशा तुला [ आमच्या ] मोठया स्तुतीनें उत्तेजन दिलें म्हणजे, हे पुरंदरा, तूं शत्रूंला मारीत असतोस.

7. Thy wealth among men, O Maghavan, exceeds a hundred-fold, nay more than a hundred-fold, and even a thousand-fold. Thee, [ who art ] without a measure, our great prayer strengthens and then O Purandara, thou slayest the enemies.

---

७. 'हे इंद्रा, तूं धन मिळवून देणारा होस असें आम्हीं वर सांगितलें. तर तूं शत्रूंला जिंकून जें धन मिळवून देतोस तें असें असतें कीं एकदा मिळवून दिलेंस म्हणजे तें शतपट, त्याहूनहि अधिक, किंबहुना हजारपट वाढत असतें. तूं शत्रूंला मारण्याविषयीं आधींच अतिसमर्थ आहेस; पण आम्हीं तुझें उत्तम स्तोत्र केलें म्हणजे शस्त्राला धार आल्याप्रमाणें तुझ्या शौर्याला धार जणूं येते आणि तूं आमचे सर्व शत्रु मारून टाकीत असतोस.'

'त्वां दिलेली संपत्ति'=' ते श्रवः.' हा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे. पण 'तुझी कीर्ति,' 'तुझें यश' असा कितोएक विद्वानांनीं केलेला अर्थ चांगला संभवतो. 'कीर्ति' आणि 'धन' (अथवा 'संपत्ति') हे दोनहि अर्थ आहेतच, मग सायणांनीं त्यांपैकीच एक दिलेला अर्थ कां घेऊं नये अशा बुद्धीनें आम्हीं सायणांस अनुसरलों आहों. 'यश' अथवा 'कीर्ति' असा अर्थ घेतला तर 'शतात् उत् रिरिचे' याचा अर्थ शेकडो मनुष्यांच्या कीर्तीपेक्षां तुझी कीर्त मोठी आहे इत्यादि भाषांतर केलें पाहिजे.

'उत्तेजन दिलें'=' तित्विषे.' अक्षरशः अर्थ 'पाजळलें,' 'धार काढून तीक्ष्ण केलें.' 'शस्त्राला पाजळल्याप्रमाणें पाजळलें' असा ध्वन्यर्थ आहे.

त्रिविष्टिधातु प्रतिमानमोजसस्तिस्रो भूमीर्नृपते त्रीणि रोचना ।
अतीदं विश्वं भुवनं ववक्षिथाशत्रुरिन्द्र जनुषा सनादसि ॥ ८ ॥

त्रिविष्टिऽधातु । प्रतिऽमानम् । ओजसः । तिस्रः । भूमीः । नृऽपते । त्रीणि । रोचना ।
अति । इदम् । विश्वम् । भुवनम् । ववक्षिथ । अशत्रुः । इन्द्र । जनुषा । सनात् । असि ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. हे नृपते (=नृणां प्रभो पालक), [त्वम्] ओजसः (=तेजसः सर्वेषां वस्तूनां बलस्य) त्रिविष्टिधातु प्रतिमानं (=त्रिगुणितं प्रतिनिधिर्) [भवसि]। [त्वं] तिस्रो भूमीः (=त्रीन् भूलोकान्) [तथा] त्रीणि रोचना (=त्रीणि रोचनानि=त्रीन् द्युलोकान्) [अपि च] इदं विश्वं भुवनम् (=इदं सर्वं जगत्) अति ववक्षिथ (=अतिक्रम्य प्रवृद्धोसि=एतेभ्यः सर्वेभ्योपि प्रवृद्धो भवसि)। हे इन्द्र, [त्वं] जनुषा (=जन्मना=जन्मप्रभृति) सनात् (=चिरकालात्) अशत्रुः असि (=शत्रुरहितो भवसि=न कोपि तव शत्रुर्भवितुं योग्यो भवति)॥

सकललोकेषु एतस्मिंश्च भुवने यत्सर्वेषां वस्तूनां बलमस्ति तस्य त्रिगुणं बलं त्वयि भवतीति भावः। इमे च ये लोकास्तेभ्यः सर्वेभ्योपि त्वं महीयान् भवसि। अतः कारणान्न कोपि तव शत्रुः क्वापि भवतीति च॥

८. हे मनुष्यांच्या प्रभो इन्द्रा, [ समग्र ] शक्तीचें तिप्पट प्रमाण असा तूं तीन्ही भूलोकांपेक्षां [ आणि ] तीन्ही द्युलोकांपेक्षां आणि या समग्र भुवनापेक्षां मोठा आहेस. हे इन्द्रा, तूं जन्मापासून सदैव शत्रुरहित होस.

8. The three-fold archetype of power, thou hast, Lord of men, outgrown the three terrestrial, and the three heavenly worlds, and [ outgrown ] the whole of this universe. Ever since thy birth, Indra, thou hast been without an enemy.

८. हा मंत्र अशा कारणामुळें महत्त्वाचा आहे कीं, यांत इंद्राचें मोठेपण आणि बळ आणि सार्वभौमत्व हीं किती मोठीं आहेत याविषयीं आर्य जनांची कल्पना काय होती ती दिसून येते. देवाचे जे अनेक गुण त्यांतून मोठेपण आणि शक्ति आणि सर्वातीतत्व हे तीन गुण मुख्य आहेत. त्यांचें प्रतिपादन या मंत्रांत केलें आहे. ऋषि म्हणतोः—'हे इंद्रा, सकळ स्थळीं जें जें म्हणून बळ आहे त्याच्या तिप्पट बळाचें माप तूं होस, म्हणजे त्याच्या तिप्पट बळ तुला आहे. आणि यांत नवल नाहीं, कारण कीं तूं तीनहि भूलोक आणि तीनहि द्युलोक आणि हें सकळ भुवन यांच्याहिपेक्षां मोठा आहेस आणि त्यामुळेंच तुला कोणीहि शत्रु कधींहि कोठेंच झाला नाहीं.'

'समग्र शक्तीचें तिप्पट प्रमाण '=' त्रिविष्टिधातु प्रतिमानमोजसः.' म्हणजे सकळ विश्वामध्यें जो अपरिमेय अवकाश त्यांतील असंख्य तारागण, ग्रहगण, सूर्यगण, पृथिवीवरील समुद्र, पर्वत इत्यादि महान् महान् पदार्थ या सर्वांचें बळ एकवट केलें तर त्याच्या तिप्पट बळ तुझे अंगीं भरलेलें आहे.

' तिप्पट '=' त्रिविष्टिधातु'. 'त्रिविष्टि' आणि ' त्रिविष्टिधातु ' यांचा अर्थ एकच आहे. ' त्रिविष्टि ' म्हणजे तीनदा याविषयीं ऋ. ४. ६. ४ (त्रिविष्टि एति प्रदिवः पुराणः ) हा मंत्र पहा. ' धातु ' हें पद ज्या संख्यावाचक शब्दाच्या शेवटीं जोडिलें असेल तितकेपट असा अर्थ होत असतो. उदाहरणार्थ 'सप्तधातु' (=सातपट, ऋ. ६.६१.१२). 'त्रिधातु' (=तिप्पट १. १८३.१;३.५६. ६). या संबंधानें 'धातु'पदाचा अर्थ पदर अथवा गुण, म्हणजे जे निरनिराळे तंतु अथवा भाग घेऊन दोरी वळलेली असते ते पदर अथवा पेड असा आहे.

'तीन्ही भूलोकांपेक्षां' आणि 'तीन्ही द्युलोकांपेक्षां '=' तिस्रो भूमीस्त्रीणि रोचना.' द्युलोक जसे तीन आहेत तसेच भूलोकहि तीन आहेत अशाविषयीं वेदांत कोठें कोठें उल्लेख येतात. द्युलोक तीन म्हणजे द्युलोकाचे अगदीं खालचा, त्याच्या वरचा म्हणजे मधला आणि अ-

त्वां देवेषु प्रथमं हवामहे त्वं बभूथ पृतनासु सासहिः ।
सेमं नः कारुमुपमन्युमुद्भिदमिन्द्रः कृणोतु प्रसवे रथं पुरः ॥ ९॥

त्वाम् । देवेषु । प्रथमम् । हवामहे । त्वम् । बभूथ । पृतनासु । ससहिः । सः । इमम् । नः । कारुम् । उपऽमन्युम् । उत्ऽभिदम् । इन्द्रः । कृणोतु । प्रऽसवे । रथम् । पुरः ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. [ हे इन्द्र ], देवेषु प्रथमं त्वां हवामहे ( =सर्वेभ्योपि देवेभ्यस्त्वामेव प्रथममाह्वयामः) । त्वं [ हि ] पृतनासु (=युद्धेषु) सासहिर्बभूथ (=शत्रूणामभिभविता भवसि ) । —स इन्द्र इमं नः ( =एतं पुरःस्थितमस्माकं ) कारुं ( =स्तोतारं=कविं) [ प्रसवे=युद्धोत्पत्तौ ] उपमन्युम् ( =सर्वज्ञम् ) उद्भिदं ( =शत्रूणामुद्भेत्तारं=तेषां जेतारं ) [ कृणोतु=करोतु ] [ नो ] रथं [ च ] प्रसवे ( =युद्धे ) पुरः कृणोतु (="अन्येभ्यो रथेभ्यः पुरतो वर्तमानं करोतु " ) ॥

गर्दी वरचा म्हणजे सर्वांहून जो उंच तो असे तीन भाग हेच तीन द्युलोक होत. ( सू. ३५, मं. ६ याजवरील ' द्युलोक तीन आहेत ' या शब्दांविषयींची आमची टीप पहा). भूलोक तीन असल्याविषयीं ऋ. ७. ८७. ५ यांत सांगितलें आहे कीं, 'तिस्रो द्यावो निहिता अन्तरस्मिन् तिस्रो भूमीः'=' वरुणाच्या पोटीं तीन द्युलोक आणि तीन भूलोक ठेविलेले आहेत,' म्हणजे वरुण देव तीन द्युलोक आणि तीन भूलोक यांस व्यापून राहतो. ऋ. ८.४१.९ यांत ' वरुणाचें दिव्य तेज तीनहि भूलोकांस आणि तीनहि द्युलोकांस भरून टाकितें' (=यस्य श्वेता विचक्षणा तिस्रो भूमीरधिक्षितः। त्रिरुत्तराणि पप्रतुर्वरुणस्य) असें सांगितलें आहे. ऋ. २. २७.८ यांत 'वरुणादिक आदित्य नांवांचे देव तीन भूलोकांस आणि तीन द्युलोकांस धारण करीत असतात ' असें सांगितलें आहे ( तिस्रो भूमीर्धारयन् त्रीँरुत द्यून् ). आतां हे तीन भूलोक कोणते याविषयीं प्रश्न आहे. सायणाचार्य एका ठिकाणीं (७.८७.५ यांत) म्हणतात कीं, तीन भूलोक म्हणजे खालचा, मधला आणि वरचा हे पृथिवीचे तीन भाग होत; म्हणजे पृथिवी अथवा भूलोक वस्तुतः एकच आहे, परंतु द्युलोकाचे जसे खालचा, मधला आणि वरचा हे तीन भाग मिळून तीन द्युलोक होत, त्याप्रमाणेंच पृथिवीचे म्हणजे भूलोकाचे तीन भाग मिळून तीन भूलोक होत. दुसऱ्या ठिकाणीं ( २. २७.८ येथें ) सायणाचार्य म्हणतात कीं, तीन भूमिलोक म्हणजे पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक हे होत.

९. तुला [ हे इन्द्रा, ] [ सकळ ] देवांतून प्रथम आह्मी बोलावीत असतों, तूं संग्रामांत शत्रूंचा पराभवकर्ता होस. तर तो इन्द्र आमच्या ह्या कवीला सर्वज्ञ आणि शौर्यसंपन्न करो [ आणि ] [ आमच्या ] रथाला युद्धप्रसंगीं सर्वांच्या पुढें ठेवो.

9. Thee we invoke first among the Gods. Thou, Indra, becomest the vanquisher in battles.— May, therefore, that Indra make this our poet wise [and] victorious and place our chariot foremost in battle.

---

म्हणजे 'भूमि'शब्दाचा अर्थ साधारण 'लोक' इतकाच समजावयाचा. आम्हांस असें वाटतें कीं एकाच द्युलोकाचे जसे तीन भाग कल्पून ते तीन द्युलोक होत असें कितीएक वैदिक ऋषि बोलत, त्याप्रमाणेंच एकाच भूलोकाचे तीन भाग कल्पून तेच ' तीन भूलोक ' होत असा ऋषीच्या वचनाचा भावार्थ आहे; या आमच्या पृथिवीसारिखे तीन स्वतंत्र भूगोल ऋषीच्या मनांत विवक्षित आहेत असें आम्हांस वाटत नाहीं.

' मोठा आहेस '=' अति ववक्षिथ.' अक्षरशः अर्थ 'वाढला आहेस,' ' वाढून मोठा झाला आहेस.' ' वक्ष् ' धातूचा अर्थ ' वाढणें अथवा मोठा होणें ' असा आहे. सू. ८५, मं. २ यावरील ' महान्' शब्दावरची टीप पहा.

---

९. ऋषि इंद्राला म्हणतो, ' हे इंद्रा, लढाईचा प्रसंग आला अथवा दुसरें कांहीं तरी जडभारी पडलें, तर आम्ही इतर देवांस हाक न मारितां प्रथम तुला हाक मारीत असतों; कारण कीं युद्धांत तूं महापराक्रम करीत असतोस. तर हे इंद्रा, आम्हांपैकीं ज्याणें हें सूक्त रचिलें आहे, त्याला तूं ज्ञानयुक्त आणि शौर्ययुक्त कर, आणि आमचे रथ युद्धांत सर्वांच्या रथापुढें जातील असें कर.'

' पराभवकर्ता होस '=' सासहिः बभूथ.' अक्षरशः अर्थ ' पराभवकर्ता झाला आहेस;' म्हणजे जेव्हां जेव्हां तूं शत्रूंबरोबर लढलास तेव्हां तेव्हां तुलाच यश आलें आहे, तूं सर्वदा विजयी होत असतोस.

' तर तो इंद्र.' पूर्वार्धांत प्रत्यक्षनिर्देश असून उत्तरार्धांत तृतीय पुरुषीं आहे. याचीं उदाहरणें वेदांत जिकडे तिकडे विपुळ सांपडतात.

'आमच्या ह्या कवीला सर्वज्ञ आणि शौर्यसंपन्न करो'='इमं नः कारुम् उपमन्युम् उद्भिदं [ कृणोतु].' आपण असें समजलें पाहिजे कीं, हें सूक्त कितीएक जण मिळून म्हणून इंद्राची उपासना करीत आहेत आणि त्यांतून एकानें हें सूक्त रचि-

त्वं जिगेथ न धना रुरोधिथार्भेष्वाजा मघवन्महत्सु च ।
त्वामुग्रमवसे सं शिशीमस्यथा न इन्द्र हवनेषु चोदय ॥ १० ॥

त्वम् । जिगेथ । न । धना । रुरोधिथ । अर्भेषु । आजा । मघऽवन् ।
महत्ऽसु । च ।
त्वाम् । उग्रम् । अवसे । सम् । शिशीमसि । अथ । नः । इन्द्र । हवनेषु । चोदय ॥ १० ॥

## भाषायाम्.

१०. हे मघवन् ( =धनवन्निन्द्र ), त्वम् अर्भेषु महत्सु च आजा ( =अर्भेषु महत्सु च आजिषु=अल्पेषु महत्सु च युद्धेषु ) धना जिगेथ न रुरोधिथ ( =धनानि जयसि न रुणत्सि=शत्रूणां द्रव्याणि जयसि तानि पुनस्त्वदर्थं न रक्षसि=उपासकेभ्यः प्रयच्छसि ) । [ वयम् ] उग्रम् ( =उद्गूर्णबलं=बलवन्तं ) त्वाम् अवसे ( =रक्षणाय ) सं शिशीमसि ( =शस्त्रवत् सम्यक् तीक्ष्णीकुर्मः=स्तोत्रैः प्रभूतशौर्ययुक्तं कुर्मः ) । अथ ( =अतः कारणात् ) हे इन्द्र, हवनेषु ( =युद्धार्थम् तवाह्वानेषु सत्सु=यदा यदा त्वां युद्धार्थमाह्वयामस्तदा तदा ) [ त्वं ] नश्चोदय ( =अस्मान् धैर्येण संग्रामे प्रेरय=संग्रामं प्रति गंच्छतोस्मान् धैर्ययुक्तान् कुरु ) ॥

लेलें आहे. आणि ज्याणें रचिलें त्याचें विशेष कल्याण होओ अशी प्रार्थना करणें यांत कांहीं नवल नाहीं. उत्तरार्धाच्या पहिल्या चरणांत सूक्त रचणाऱ्या कवीचें कल्याण होओ अशी, आणि दुसऱ्या चरणांत सूक्त म्हणणाऱ्या सर्व उपासकांचें कल्याण होओ अशी प्रार्थना आहे. सायणांनीं हाच अर्थ केला आहे. मात्र ते 'हा कवि' म्हणजे आमचा स्तोत्रकर्ता हा पुत्र असा अर्थ करितात, पण ते दुसराहि अर्थ करून दाखवितात. त्याप्रमाणें ' इमं नः कारुमुपमन्युमुद्भिदं ' हे शब्द ' रथ ' शब्दाकडे घेऊन ' आमच्या ह्या दारुण, आवेशयुक्त आणि विजयी रथाला युद्धप्रसंगीं सर्वांच्या पुढें ठेवो ' असा अर्थ उत्तरार्धाचा करितात. परंतु ' कारु ' शब्द ज्यांत आला आहे ते सर्व मंत्र आम्हीं वाचून त्यांचा विचार केला, परंतु त्यांत कोठेंहि ' कारु ' याचा अर्थ विशेषणार्थी करण्यासारिखा दिसत नाहीं, व सायणांनींहि कोठें केलेला नाहीं; ते नित्य ' स्तोता ' असाच अर्थ करितात.

' रथाला युद्धप्रसंगीं सर्वांच्या पुढें ठेवो '=' कृणोतु प्रसवे रथं पुरः.' म्हणजे आम्हीं सर्वांच्या पुढें पुढें जाऊन विजयी व्हावें आणि शत्रूंस जिंकावें असें घडो. आधुनिक कवींतून अथवा प्रार्थना करणाऱ्या लोकांतून कोणता कवि अथवा

१०. हे मघवन्, लहान संग्रामांत आणि मोठ्या संग्रामांत तूं धन जिंकितोस, तथापि तें तूं आपणाला ठेवून घेत नाहींस. तुला महाबळाला आह्मी आमच्या रक्षणासाठीं पाजळीत असतों. यास्तव हे इन्द्रा, तुला आह्मीं जेव्हां जेव्हां युद्धार्थ बोलावूं, तेव्हां तेव्हां तूं आमच्या आंगीं धैर्याची प्रेरणा कर.

10. Thou conquerest, O Maghavan, in battles small and in [battles] great, but keepest not, the spoils to thyself. Thee, who art mighty, we sharpen for our protection. Do thou therefore inspire us whenever, O Indra, we invoke thee.

कोणता उपासक अशी प्रार्थना करील? या संबंधानें पाहिलें तर मात्र आमचे आर्य पूर्वज ज्या काळीं होऊन गेले तें कृतयुग होय, आणि त्यांचे हतवीर्य आणि हतोत्साह आणि हतभाग्य वंशज आपण राहत आहों तें कलियुग होय, यांत संशय नाहीं.

हा मंत्र आधुनिक श्लोकाप्रमाणें सहज म्हणतां येतोः—

तुआं देवेषु प्रथमं हवामहे
तुअं बभूथ पृतनासु सासहिः ।
सेमं नः कारुम् उपमन्युमुद्भिदम्
इन्द्रः कृणोतु प्रसवे रथं पुरः ॥

१०. हाहि मंत्र लढाईच्या संबंधाचाच आहे. 'हे इंद्रा, तूं युद्धांत शत्रूंला जिंकून त्यांचें द्रव्य लुटून घेतोस, पण तें तूं आपणांस ठेवून घेत नाहींस, तर उपासकांला देतोस. मग तें युद्ध मोठें असो अथवा लहान असो, तुला श्रम कितीहि पडले तरी पडोत. यास्तव आमचें रक्षण करण्यासाठीं शस्त्राला धार काढिल्याप्रमाणें तुला आम्ही स्तोत्रांनीं धार लावितों; म्हणजे, तुझीं स्तोत्रें म्हणून तुला आमच्या पक्षानें लढण्याविषयीं उत्तेजन देत असतों. तर हे इंद्रा, तुला जेव्हां जेव्हां आम्ही युद्धार्थ बोलावूं, तेव्हां तेव्हां तूं आमच्या आंगीं धैर्याची प्रेरणा कर.'

'धन जिंकितोस'=' धना जिगेथ.' म्हणजे शत्रूला जिंकून त्याची संपत्ति लुटतोस.

'पाजळीत असतों'=' सं शिशीमसि.' म्हणजे वस्तऱ्याला धार काढिल्याप्रमाणें तुला धार काढीत असतों, तुला आमच्या पक्षानें युद्ध करण्यास उत्तेजन देत असतों. युद्धप्रसंग आला म्हणजे आमच्या शस्त्रास धार देऊन उपयोग नाहीं, म्हणून तूं हेंच आमचें शस्त्र, त्याला आम्हीं धार काढीत असतों. मग आमच्या शस्त्रास धार नसली तरी त्यास

विश्वाहेन्द्रो अधिवक्ता नो अस्त्वपरिह्वृताः सनुयाम वाजम् ।
तन्नो मित्रो वरुणो मामहन्तामदितिः सिन्धुः पृथिवी उत द्यौः ॥
॥ ११ ॥ १५ ॥

विश्वाहा । इन्द्रः । अधिऽवक्ता । नः । अस्तु । अपरिऽह्वृताः । सनुयाम । वाजम् ।
तत् । नः । मित्रः । वरुणः । ममहन्ताम् । अदितिः । सिन्धुः । पृथिवी । उत । द्यौः ॥ ११ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

११. इन्द्रो विश्वाहा ( =विश्वान्यहानि=नित्यं ) नः अधिवक्ता (=अस्माकं पक्षपाती ) अस्तु। [ वयम् ] अपरिह्वृताः ( =निरुपद्रुताः ) [ सन्तो ] वाजं सनुयाम ( =अन्नं प्राप्नुयाम )। तत् ( =तदेतत्=इन्द्रकर्तृकमस्माकमधिवचनम् अस्माभिर्वाजप्राप्तिं च ) मित्रः, वरुणः, अदितिः, सिन्धुः ( =समुद्राभिमानी देवः ) पृथिवी उत द्यौः ( =पृथिवी द्युलोकश्च ) नः मामहन्ताम् ( =अस्मभ्यं रक्षन्तु=ददतु ) ॥

उत्तम धार असल्याप्रमाणें आमचें कार्य होत असतें. शस्त्राला धार काढिल्याप्रमाणें स्तोत्रानें इंद्राला धार लावितों असें म्हणणें याचीं उदाहरणें वेदांत वरींच येतात. याच सूक्ताचा सातवा मंत्र पाहा. ऋ. १०. ८७. २४ यांत अग्नीला एक ऋषि म्हणतो, 'तुला मी स्तोत्रांनीं पाजळतों' ( सं त्वा शिशामि...मन्मभिः ). ऋ. १०. १२०. ५ यांत म्हटलें आहे, 'हे इंद्रा, मी स्तोत्राच्या योगानें तुझ्या बळास धार देतों' ( सं ते शिशामि ब्रह्मणा वयांसि ).

हा मंत्र श्लोकवृत्ताला सहज म्हणता येतो.

तुअं जिगेथ न धना रुरोधिथ
अर्भेषु आजा मघवन् महत्सु च ।
तुआम् उग्रम् अवसे सं शिशीमसि
अथा न इन्द्र हवनेषु चोदय ॥

११. इन्द्र सदैव आमचा पक्षपाती होओ, आणि निरुपद्रव होऊन आह्मी अन्नाप्रत पावूं असें करो. [आणि] हें [ दान ] मित्र, वरुण, अदिति, समुद्र, पृथिवी आणि द्यु आम्हांला देओत.

11. Ever may Indra be our defender. May we unharmed attain food: And may Mitra, Varuṇa, Aditi, the Sea, Earth and Heaven confirm this unto us.

---

११. हा मंत्र पूर्वी एकदा आला आहे (सू. १००, मं. १९). याविषयीं इतकें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे कीं, शंभरावें सूक्त आणि हें येथें संपलें तें सूक्त हीं एकाच ऋषीचीं नव्हेत. असें असतांना त्या आणि या सूक्ताचा उपसंहारमंत्र एकच आहे. आधुनिक कवितांप्रमाणें या सूक्तांचा विचार करूं लागलों तर असा प्रश्न निघतो कीं, १०० व्या सूक्ताचा १९ वा मंत्र कुत्स ऋषीनें (१०२ व्या सूक्ताच्या कर्त्यानें) घेतला, कीं कुत्स ऋषीचा पाहून १०० व्या सूक्ताच्या कर्त्यानें घेतला? याचा निर्णय होणें अशक्य आहे. आधीं अमुक सूक्तांचे कर्ते अमुक असें जरी सर्वानुक्रमणिकेंत वगैरे सांगितलें आहे, तरी खरोखर कोण कर्ते होत याविषयींच संशय आहे. ज्यांचीं नांवें सर्वानुक्रमणिकेंत सांगितलीं आहेत तेच कर्ते असें खात्रीनें समजण्यासारिखें नाहीं. त्यांच्या कुटुंबांत वेदसूक्तें सांपडलीं तीं वेदव्यासानें घेऊन संहिता केली, म्हणून त्यांचीं नांवें कर्त्यांदाखल लिहिलीं गेलीं असें पुष्कळ सूक्तांविषयीं सहज म्हणतां येतें.

## सूक्तम् १०३.

आङ्गिरसः कुत्स ऋषिः। इन्द्रो देवता। त्रिष्टुप् छन्दः॥

तत्त॑ इन्द्रि॒यं प॑र॒मं प॑रा॒चैरधा॑रयन्त क॒वयः॑ पु॒रेदम्।
क्ष॒मेदम॒न्यद्दि॒व्य॑१॒न्यद॑स्य॒ समी॑ पृच्यते सम॒नेव॑ के॒तुः॥ १॥

तत्। ते॒। इ॒न्द्रि॒यम्। प॒र॒मम्। प॒रा॒चैः। अधा॑रयन्त। क॒वयः॑। पु॒रा। इ॒दम्।
क्ष॒मा। इ॒दम्। अ॒न्यत्। दि॒वि। अ॒न्यत्। अ॒स्य॒। सम्। ई॒म् इति॑। पृ॒च्य॒ते॒। स॒म॒नाऽइ॑व। के॒तुः॥ १॥

---

## भाषायाम्.

१. [हे इन्द्र], तद् इदं ते (=तदेतद्वक्ष्यमाणं तव) इन्द्रियम् (=इन्द्रत्वं=स्वकीयं तेजः=बलं) कवयः (=मेधाविनो जनाः) पुरा (=पुरातनकाले) पराचैः परमम् अधारयन्त (=अतिशयेनोत्तमं धृतवन्तः=अवधारितवन्तः) [यत्] अस्य (=तव) इदमन्यत् (=एकम्) [इन्द्रियम्=अग्निरूपं तेजः] क्षमा (=क्षमायां=भूलोके) [सत्] अन्यत् (=सूर्यरूपम् इन्द्रियं च) दिवि (=द्युलोके) [वर्तमानं सत्] ईं (=तदेतद् इन्द्रियद्वयं) केतुः समना इव (=परस्परं संग्रामे युध्यतोर्ध्वज इव) सं पृच्यते (=संगच्छते=संयुक्तं भवति)॥

अत्रेदमुक्तं भवति। हे इन्द्र, एकं तव बलं भौमाग्निरूपं तेजो भूलोके वर्तते अन्यत् तव तेजः द्युलोके सूर्यरूपेण वर्तते एतत् तेजोद्वयं च प्रतिदिनं परस्परेण संगतं भवति एतद्रूपं तव बलं प्रागेव कवयः श्रेष्ठमिति अवधारयन्निति॥

## सूक्त १०३.

ऋषि—अंगिरसकुळांतील कुत्स नांवाचा (पूर्व सूक्ताचा जो तोच).[1] देवता—इंद्र. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. [ हे इन्द्रा ], हा जो तुझा पराक्रम त्यातें प्राचीन काळापासून कविजन उत्तम मानीत आले आहेत,—कीं तुझा एक पराक्रम हा पृथिवीवर [आणि] दुसरा द्युलोकीं [ आहे ], आणि युद्धांतील ध्वजाप्रमाणें ते एकमेकास भेटतात.

## Hymn 103.

To *Indra*. By *Kutsa* of the family of *Angiras*. Metre— *Trishṭubh*.

1. This, this splendour of thine, O Indra, the poets have considered from ancient time by far the highest; that thou hast this one [ splendour ] on earth and another in heaven; and that they meet together as banner [ meets banner ] in battle.

---

१. हेंहि सूक्त कुत्स ऋषीचेंच आहे. तो ऋषि या पहिल्या मंत्रांत म्हणतो, 'हे इंद्रा, तूं आपल्या स्वताहाच्या आंगच्या सामर्थ्यानें पृथिवीवर अग्निरूप तेज पसरिलें आहेस, आणि स्वर्गलोकीं म्हणजे द्युलोकीं तूं आपल्या स्वताहाच्या आंगच्या सामर्थ्यानें सूर्यरूप तेज स्थापिलें आहेस, आणि दोन सेनांचें तुंबळ युद्ध होऊं लागलें म्हणजे, रंगानें वगैरे भिन्न असतांहि उभय पक्षांच्या पताका जशा एकवट होऊन कोणाची कोणती हें समजत नाहीं, तशीं आतां सांगितलेलीं तुझीं दोन तेजें प्रतिदिनीं एकवट होत असतात; आणि सूर्याचें तेज कोणतें आणि अग्नीचें कोणतें हें समजूं शकत नाहीं. तर हा जो तुझा पराक्रम तेंच तुझें अतिउत्तम इंद्रपण होय, असें कविजन म्हणजे ऋषि लोक प्राचीनकाळापासून मानीत आले आहेत.'

या ऋचेचा अर्थ कांहींसा कठिण आहे. हें काठिन्य 'तत्' या शब्दानें कोणतें ' इन्द्रियम् ' समजावयाचें तें एकदम लक्षांत येत नाहीं त्यावरून, आणि ' परमम् ' आणि ' पराचैः' यांचा संबंध वाक्यांत कसा लावावा हें एकदम ध्यानांत येत नाहीं त्यावरून, आलेलें आहे. आम्ही ' तत् ' शब्दाचा संबंध उत्तरार्धांत जें सांगितलें आहे त्याजकडे लावितों, आणि ' पराचैः' हें ' परमम् ' याचें विशेषण समजतों, आणि 'परमम्' हें ' इन्द्रियम् ' याचें गुणविशेषण न समजतां 'अधारयन्त' याचें विधिविशेषण

स धा॑रयत्पृथि॒वीं प॒प्रथ॑च्च॒ वज्रे॑ण ह॒त्वा निर॒पः स॑सर्ज ।
अह॒न्नहि॒मभि॑नद्रौहि॒णं व्यह॒न्व्यं॑सं म॒घवा॒ शची॑भिः ॥ २ ॥

सः । धा॒र॒य॒त् । पृ॒थि॒वीम् । प॒प्रथ॑त् । च॒ । वज्रे॑ण । ह॒त्वा । निः । अ॒पः । स॒स॒र्ज ।
अह॑न् । अहि॑म् । अभि॑नत् । रौ॒हि॒णम् । वि । अह॑न् । वि॒ऽअं॑सम् । म॒घ॒ऽवा॑ । शची॑भिः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. स ( =इन्द्रः ) पृथिवीम् अधारयत् ( =स्थिरामकरोत् ) पप्रथत् च ( =विस्तीर्णामकरोच्च ) । वज्रेण [ वृत्रं ] हत्वा अपो निः ससर्ज ( =निरगमयत्=मेघेभ्यो भूमिं प्रत्यपातयत् ) । [ स ] अहिं ( =वृत्ररूपं सर्पम् ) अहन् ( =अवधीत् ) । [ स ] रौहिणं व्यभिनत् ( =रौहिणनामकमसुरं व्यच्छिनत् ) । मघवा शचीभिः ( =" आत्मीयैर्युद्धकर्मभिः " ) व्यंसम् ( =एतन्नामकमसुरम् ) अहन् ( =हतवान् ) ॥

करितों; आणि असें केल्यानें मंत्राचा अर्थ उघड होतो असें आम्हांस वाटतें.

पहिल्या अर्धांत प्रत्यक्ष निर्देश असून दुसऱ्या अर्धांत परोक्ष निर्देश आहे, म्हणजे इंद्राविषयीं तृतीय पुरुषीं सांगितलें आहे. याचीं उदाहरणें वेदांत पुष्कळ सांपडतात.

## पोंच ता. १ पासून ता. ३१ मार्चपर्यंत.

| | रु. आ. |
|---|---|
| रा. रा. घनश्यामभट्टाचार्य अकौंटन्ट. पब्लिक वर्क्स डिपार्टमेन्ट. | ९– ० |
| ,, विठ्ठल धोंडदेव ऊर्फ अण्णासाहेब लिंग्रस.... .... | ६– ६ |
| ,, बापुजी सावंत हॉस्पिटल असिस्टन्ट .... .......... | १०– ० |
| ,, गोपाळ त्र्यंबकाजी कवे.... .... .... .... .... .... | १२–१२ |
| ,, काशिनाथ परशुराम गाडगीळ.... .... .... .... | ६– ६ |
| ,, नारायण रामचंद्र शिरस्तेदार.... .... .... .... | ६– ० |
| रावसाहेब गणपतरावजी शास्त्री.... .... .... .... ........ | १२–१२ |
| रावसाहेब माधवराव बल्लाळ लघाटे.... .... .... ........ | ६– ६ |
| पंडित सहिजराम गंगाधरदास.... .... .... .... ........ | १२–१२ |
| रावबाहादूर गोपाळराव गोविंद फाटक...................... | ६– ६ |
| रा. रा. भिकाजी विठ्ठल मामलतदार........ .... ........ | १२–१२ |
| नेटिव जनरल लायब्ररी एलीचपूर.................. ........ | ११– २ |
| डाक्टर विश्राम रामजी घोले....................... ........ | ६– ६ |
| रा. रा. यादव माधव रायपूर.... .... .... .... .... .... | ६– ६ |
| ,, गणेश त्रिंबक ओव्हरसिअर........ .... .... .... | ६– ६ |
| प्रोफेसर केरो लक्ष्मण छत्रे.................. .... .... | ६– ६ |
| रा. रा. बहिरु आपाजी कुळकरणी.... ........ .... .... | ६– ६ |
| ,, वीरप्रसाद तापीप्रसाद मामलतदार............ .... | १२–१२ |
| ,, नरसो रामचंद्र गोडबोले.................. .... .... | १२–१२ |
| ,, गोपाळ बळवंत फौजदार.................. .... .... | ९–१२ |
| तिमैया नाईक शेटी.............................. .... .... | ६– ० |
| बसेटपा तांडूर.... .... .... .... .... .... .... .... .... | ६– ६ |
| रा. रा. माधवराव सदाशिव इनामदार .... .... .... .... | ६– ६ |
| ,, नारायण विनायक गोडबोले.......... .... .... | ६– ६ |
| ,, जगन्नाथ इच्छाराम........ .... .... .... ........ | ६– ६ |

Registered No. 110 of 1878.

# सूचना.

| | रु. | आ. |
|---|---|---|
| वर्षाची वर्गणी, आगाऊ | ६ | ० |
| मुंबईबाहेर राहणारास टपाल हांशिलाबद्दल दरवर्षाचे | ० | ६ |

All communications to be addressed to the Manager Mr. Mahádev Náráyan Pandit, No. 29 *Moroba Popatji's Oart, Kalka Devi Road, Bombay.*

ग्रंथकर्त्यांच्या नांवचा वगैरे सर्व प्रकारचा पत्रव्यवहार मुंबई मोरोबा पोपटजीची वाडी घर नंबर २९, या पत्त्यावर रा. रा. महादेव नारायण पंडित "म्यानेजर वेदार्थयत्न" यांच्याशीं ठेवावा.

**विशेष सूचना.**–आमच्या कितीएक वर्गणीदाराकडे गेल्या वर्षाची बाकी येणें आहे ती त्यांणीं मेहेरबानी करून लवकर पाठवून द्यावी.

तिकिटें पाठविणें झाल्यास अर्ध्या आण्याच्या दराचीं असून दर रुपयास अर्धा आणा वर्ताळा असावा. नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं.

62569